A THESIS SUBMITTED TO

# TILAK MAHARASHTRA UNIVERSITY, PUNE

FOR THE DEGREE OF VIDYAVACHASPATI (PH.D.)

**Doctor of Philosophy in the**

Subject : श्रीसंत ज्ञानेश्वर – एक विभूती (चिकित्सा)

Under the Faculty of : MORAL AND SOCIAL SCIENCES

Name of the Candidate : Dr. AVINASH MAHADEO SATHE

Under the Guidance of

Name of the Guide : DR. MADHAV CHINTAMAN DIXIT

Name of the Department : DEPARTMENT OF PHILOSOPHY

Month and Year : NOVEMBER, 2010

I hearby declare that the thesis entitled

**"श्रीसंत ज्ञानेश्वर – एक विभूती (चिकित्सा)"**

completed and written by me has not been previously formed as the basis for the award of any Degree or other similar title upon me of this or any other University or examining body.

**Research Student**

(Dr. AVINASH M. SATHE)

**Place :** PUNE

**Date :** November, 2010

# CERTIFICATE

This is to certify that the thesis entitled "श्रीसंत ज्ञानेश्वर – एक विभूती (चिकित्सा)" which is being submitted herewith for the award of the Degree of Vidyavachaspati (Ph.D.) in PHILOSOPHY of Tilak Maharashtra University, Pune is the result of original research work completed by Dr. AVINASH M. SATHE under my supervision and guidance. To the best of my knowledge and belief the work incorporated in this thesis has not formed the basis for the award of any Degree or similar title of this or any other University or examining body upon him.

**Research Guide**

(Dr. MADHAV C. DIXIT)

**Place :** PUNE

**Date :** November, 2010

# ऋणनिर्देश

संशोधन प्रबंध हा अचूक मार्गदर्शन, संशोधकाचे योग्य निर्णय, अनेकांचे सहकार्य, आपलेपणातून उभा राहत असतो असे मला वाटते.

टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरू मा. डॉ. दीपक टिळक यांच्या ऋणाचा निर्देश करणे मी माझे प्रथम कर्तव्य मानतो. पूर्वपरवानगीने जेव्हा मी कुलगुरुंना भेटून माझे अगोदरचे प्रकाशित साहित्य त्यांना दाखविले व माझी संत ज्ञानेश्वरांवर पी.एच्.डी.साठी प्रबंध लिहिण्याची इच्छा व्यक्त केली, तेव्हा त्यांनी मला तात्काळ होकार दिला व सर्व सहकार्याचे आश्वासन दिले. त्यांनी लगेच मला कागदावर डॉ. दीक्षितसरांचा दूरध्वनी क्रमांक दिला व त्यांना भेटण्यास सांगितले. कुलगुरु डॉ. दीपक टिळक यांचा मी अत्यंत ऋणी आहे. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे नाव आदराने का घेतले जाते याचा अर्थ मला समजला.

मी माझे मार्गदर्शक प्राध्यापक डॉ. माधवराव दीक्षित यांच्याशी फोनवर खूप वेळ बोललो. त्यांना माझी ज्ञानेश्वर या विषयीची ओढ व तळमळ जाणवली. दुसऱ्या दिवशी आम्ही उभयता सरांचे घरी गेलो. खूप बोलणे झाले व सरांनी मला संशोधनाचा आराखडा (synopsis) तयार करण्यास सांगितले. त्यानंतर सरांनी प्रत्येक सोमवारी सकाळी नऊ ते अकरा या वेळेत भेटण्यास सांगितले. काही वेळेला मी घरी गेल्यावर सरांना त्या विषयावर उत्स्फूर्त काव्य सुचत असे. ते लिहून ठेवीत असत. असे काव्य प्रबंधात आहे. मी घेत असलेल्या कष्टांची काळजी सरांना आहे. म्हणून नेहमी ते सावकाशीचा सल्ला देत असत. मला हे लक्षात आले की मी पूर्वी केलेले वैज्ञानिक संशोधन व आजचे संशोधन यांचे अंतिम साध्य जरी संशोधन प्रबंध असले तरी हे दोन समांतर रुळ एकमेकांना कधीच भेटत नाहीत, त्यांची रचना पद्धतीच वेगळी आहे. या सर्व कालखंडात डॉ. दीक्षित सरांनी जे कष्ट घेतले त्यांचा मी अत्यंत कृतज्ञ आहे. सरांनी व सौ. उषावहिनींनी आम्हा उभयतांस थोरल्या भाऊ-भावजय म्हणून प्रेम व आपलेपणा दिला.

आळंदीच्या पू. किसनमहाराज साखरे यांचे कितीही आभार मानले तरी ते कमीच पडतील,

त्यांचे व माझे अनेक वर्षांचे ऋणानुबंध आहे. मी ज्ञानेश्वरांवर संशोधन करीत आहे हे माझेकडून त्यांना समजताच त्यांनी मला त्यांच्या 'यशोधन' प्रकाशनाने प्रकाशित केलेले सुमारे चाळीस ग्रंथ भेट दिले. किती आभार मानावेत त्यांचे !

संदर्भग्रंथासाठी मला बारामतीच्या तु. च. महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. चंद्रशेखर मुरुमकर, स.प. महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. पेंडसे व आळंदीच्या संशोधन ग्रंथालयाचे खूप आभार मानले पाहिजेत, कारण या तीनही ठिकाणचे ग्रंथ माझ्यासाठी नेहमी उपलब्ध असत.

माझे चाळीस वर्षापासूनचे मित्र डॉ. सुधाकर के. भोसले यांनी मला वेळोवेळी चर्चेतून मदत केली आहे. त्यांचा व त्यांची सुविद्य पत्नी सौ. शैलजावहिनी यांचा मी आभारी आहे.

ज्या ग्रंथाचा मी उपयोग केला त्यातल्या काही ग्रंथातील अवतरणे प्रबंधात नोंदली आहेत व त्यांचा उल्लेखही आहे. वै. गुरुदेव रानडे, वै. शं. वा. दांडेकर, वै. के. वि. बेलसरे, वै. ल. ना. पांगारकर, डॉ. पेंडसे, इ. अनेक ज्येष्ठांचे ग्रंथांचा उल्लेख संदर्भसूचीत मी केलेले आहे. तसेच जे ग्रंथ वाचले त्यांचाही शक्य तितका उल्लेख ग्रंथसूचीत केला आहे. आजच्या काळात कुठलेही लिखाण, संशोधन वा वैचारिक मांडणी ही स्वयंभू उभी राहात नाही. आधी ज्यांनी कार्य करून ठेवले आहे त्यांच्या खांद्यावर उभे राहूनच संशोधक अधिक विस्तारित क्षितिज पाहात असतो.

माझ्या प्रबंधाचाही यास अपवाद नाही. माझ्या विचारांची वीण सहज सुंदर होण्यामागे अनेकांचे लिखाण, विचार, चर्चा ह्यांचा आधार आहे. त्या सर्वांचा मी नम्रपणे ऋणी आहे. वै. शं. वा. दांडेकर यांचे माउलींचे तत्त्वज्ञानावरील लिखाण अतिशय सखोल पण सहज समजणारे आहे. मी इतकी वर्षे त्यांचेच विचार मानतो. त्याचाही उपयोग प्रबंधात आहे. त्यांच्या इतके ज्ञानेश्वर तत्त्वज्ञानाचा सखोल विचार करणारे फार थोडे संत तत्त्वज्ञानी आहेत.

प्रबंध पूर्ण झाल्यावर माझे स्नेही श्री. अभय ढमढेरे यांनी लिखाण टंकलिखित केले. सौ. उर्मिलाताई पुरंदरे यांनी मुद्रित तपासून लिखाण बिनचूक होण्यासाठी साहाय्य केले, ह्या दोघांचाही मी मनापासून आभारी आहे. श्री. रमेश बावकर यांनी काही अभंगाबद्दल माझे मनातील संदेह दूर केला याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

पुन्हा एकदा टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे व माझे मार्गदर्शक डॉ. माधवराव दीक्षित यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतो.

एक गोष्ट लक्षात ठेवणे महत्त्वाचे वाटते की ज्ञान जिज्ञासेला वयाची अडचण येत नाही. कारण ज्ञान अनंत आहे.

ஃஃஃ

# मनोगत

हे मनोगत लिहित असताना मी अत्यंत समाधानी आहे. ज्ञानेश्वरांच्या संबंधी 'जे' लिहावे अशी अनेक वर्षांची ओढ होती ती आज डॉ. दीक्षितसरांच्या अचुक मार्गदर्शनाने परिपूर्ण झालेली आहे. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरु मा. डॉ. दीपक टिळक व माझे मार्गदर्शक मा. डॉ. माधवराव चिं. दीक्षित यांच्या थोर ऋणांचा निर्देश मी 'ऋणनिर्देशात' केलेला आहे.

माझ्या आई-वडीलांच्या आशीर्वादाने मला आयुष्यांत चांगले मार्गदर्शक मिळाले. माझे पहिले मार्गदर्शक माझे वै. आई-वडील, त्यांनी मला घडविले व माझी माउलीशी गाठ घालून दिली. माझे वडील वै. डॉ. म. ना. साठे हे वै. ह.भ.प. सोनोपंत दांडेकर यांचे विद्यार्थी. त्यामुळे वडिलांबरोबर मी पुण्यात व आळंदीत वै. मामासाहेबांचे जवळ गेलो व त्यांचा सहवास मिळाला. माझे दुसरे ज्येष्ठ मार्गदर्शक माझे शालेय जीवनापासूनचे शिक्षक कै. बी. जी. घारेसर. त्यांचे जीवनाच्या प्रत्येक अंगाला स्पर्श करणारे मार्गदर्शन त्यांच्या जीवनाच्या अगदी अखेरपर्यंत, चाळीस वर्षापेक्षाही जास्त काळ मिळाले. त्यांनी मला विज्ञान व विचार दिले. मी विज्ञानाचा अभ्यासक. अमरावतीच्या विदर्भ महाविद्यालय या सरकारी महाविद्यालयाच्या प्राणिशास्त्र विभागांचे प्रमुख डॉ. पी. व्ही. रांगणेकर हे माझे पी.एच्.डी. प्रबंधाचे मार्गदर्शक, आणि मी त्यांचा पहिलाच विद्यार्थी. ते नुकतेच अमेरिकेहून शिक्षण पूर्ण करून आले होते. दोघांचाही उत्साह सळसळता होता. प्रबंध वेळेत पूर्ण तर झालाच, शिवाय माझे पांच संशोधन निबंध विज्ञान मासिकातून प्रसिद्धही झाले. त्यांच्याकडून जे शिकलो त्याचा उपयोग मला पुढील आयुष्यांत पदवी व पदव्युत्तर विद्यार्थ्यांना शिकविताना झाला. माझ्या संगतीने जिने आयुष्याची छप्पन्न वर्षे वाटचाल केली ती माझी पत्नी सौ. सुधा. स्पष्ट व निर्भिड विचार करणारी व विचार मांडणारी. प्रबंध अभ्यासासाठी डॉ. दीक्षितसरांकडे जातानाही बरोबर येणारी व मी लिहित असताना अचुक ठिकाणी लक्ष वेधणारी. डॉ. माधवराव दीक्षितसरांचा तर मी आयुष्यभर ऋणी आहे. त्यांची विचारांची अचूकता अत्यंत तीक्ष्ण आहे. विचारांची मांडणी सुबद्ध असली पाहिजे हा त्यांचा कटाक्ष आहे. माझी कन्या डॉ. संजीवनी ही माझी शेवटची मार्गदर्शिका. काय लिहावे यापेक्षा काय लिहू नये, विचार एककल्ली नसावेत हे ती

कटाक्षाने सांगते.

माउलीना समजावून घेण्यासाठी मी थोडेफार प्रयत्नही केले आहेत. ज्ञानेश्वरी सप्तशताब्दीच्या काळात प्रसिद्ध झालेले ज्ञानेश्वरांचे अक्षर वाङ्मय वाचताना, विशेषतः ज्ञानेश्वरी वाचताना मी काही शब्दांवर मी अडखळत असे. म्हणून केवळ 'स्वांत:सुखाय' या विचारांनी मी ज्ञानेश्वरीची माझ्या दृष्टीने शुद्ध अशी 'प्रसाद ज्ञानेश्वरी' माझ्या सुबक अक्षरात लिहून काढली. अनमोल प्रकाशनाने माझ्या पाठीस लागून ती छापली. या 'प्रसाद ज्ञानेश्वरीस' प.पू. किसनमहाराज साखरे यांचा अभिप्राय आहे. त्या नंतर मी ज्ञानदेवांच्या 'अमृतानुभवाचे' सान्वय सार्थ निरूपण 'प्रसाद अमृतानुभव' या नावाने केले. हाही ग्रंथ अनमोल प्रकाशनने प्रकाशित केला. या ग्रंथास पुणे विद्यापीठाचे माजी तत्त्वज्ञान विभाग प्रमुख डॉ. शं. रा. तळघट्टी व प.पू. किसनमहाराज यांचा अभिप्राय आहे. ज्ञानेश्वरांचे 'हरिपाठ' अभंग व 'अमृतानुभव' यांचे इंग्रजी रुपांतर करण्याची पार्श्वभूमी म्हणून मी दोन हजार चार – दोन हजार सहा या दोन वर्षांत बारामतीच्या तु. च. महाविद्यालयातून नियमित विद्यार्थी म्हणून रोज जाऊन 'संपूर्ण इंग्रजी' (Entire English) या विषयाची पदवी (M.A.(Eng.)) प्रथम वर्गात मिळविली. त्यानंतर ज्ञानदेवांच्या 'चांगदेव पासष्टी'वर सान्वय–सार्थ निरूपणात्मक ग्रंथ लिहिला. या ग्रंथास डॉ. शं. रा. तळघट्टी व प्राचार्य डॉ. मुकुंदराव दातार याचे अभिप्राय आहेत. तो सरोज प्रकाशनाने प्रसिद्ध केला.

माझ्या आयुष्यातील अनेक वर्षे 'ज्ञानेश्वर' या चार शब्दांनी व्यापलेली आहेत. ज्ञानदेवांच्या एकवीस वर्षे तीन महिने पांच दिवस या लहान आयुष्यातील जवळ जवळ प्रत्येक दिवस माझ्या मनाने अनेक वेळा पाहिला आहे. हा भाबडेपणा नाही. हे आहे ज्ञानेशांवरील डोळस प्रेम व श्रद्धा. म्हणूनच या विभूतिच्या अवतार कालखंडातील बराच मोठा अज्ञात असलेला कालखंड प्रश्नचिन्ह म्हणून माझ्या मनासमोर उभा राहत आहे. ज्ञानदेवांच्या व नामदेव व अन्य संतांच्या वाङ्मयातून ज्ञानेश्वर जीवनातील काहीच ठळक घटना स्पष्टपणे समजतात. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी, निरनिराळे अभंग, हरिपाठ वाचताना त्यांच्या सांगण्या व लिहिण्यामागे त्यांचा अत्यंत सुस्पष्ट विचार असल्याचे स्पष्टपणे जाणवते. तरीही पैठणला शुद्धीपत्रासाठी जाण्यापूर्वीच्या त्यांच्या आयुष्याबद्दल कोणाही समकालीन संत अगर नंतरचे अभ्यासक केवळ ज्ञानदेवच नव्हे तर

निवृत्तिनाथ, सोपानदेव, चित्कला मुक्ताई यांचे बद्दलही काहीही विचार करीत नाहीत. माहीत आहे तो फक्त निवृत्तिनाथांना श्रीगहिनीनाथांकडून मिळालेला अनुग्रह आणि तोही नामदेवाच्या अभंगातून व ज्ञानेदवांच्या अठराव्या अध्यायातील गुरुपरंपरेच्या ओव्यातून. हरिपाठ अभ्यासातांनाच त्याचे वैशिष्ट्य जाणवले. पण तो सामान्यांना केव्हा व कोठे सांगितला? तीर्थयात्रेहून परत येताच संजीवन समाधी घेणार हे निश्चित होते. (बाळछंदाचा अभंग). मग त्या पूर्वीच्या दोन वर्षांच्या तीर्थयात्रेचे निश्चित प्रयोजन काय? असे मुद्दे जर स्पष्ट झाले, अथवा साम्यबुद्धीने विचार करून त्यांची कारणमीमांसा मांडता आली तर या ईश्वरी विभूतिच्या जीवन आलेखाची काहीतरी विचारांना पटणारी मांडणी करता येईल, मी हाच प्रयत्न केला आहे. वास्तविक माझ्या प्रबंधाचा प्रमुख विषय 'संत ज्ञानेश्वर – एक विभूती (चिकित्सा)' हा आहे. याच प्रबंधाचे दोन प्रकरणांत मी ज्ञानदेवांच्या जीवनाचा मागोवा तर्कनिष्ठ पद्धतीने घेण्याचा प्रयत्न केला आहे. हे माझ्या पुढील लिखाणाचे प्रास्ताविक आहे. या विषयी हट्टाग्रह नाही. मला जे सुसंगत वाटले ते मी लिहिले. सगळेच विचार करू या.

ज्ञानेश्वर हे माझे सर्वश्रेष्ठ मार्गदर्शक. त्यांनीच मला आळंदीत त्यांचे जवळ आणून ठेवले आहे. गेल्या पंचवीस वर्षापेक्षा जास्त काळ मी आळंदीच्या हरिहरेंद्रस्वामीमठाचा विश्वस्त व आज प्रमुख विश्वस्त आहे. हा मठ समाधीमंदिराच्या अगदी शेजारी आहे. श्रीहरिहरेंद्रस्वामी हे विठ्ठलपंतांचा पुढील अवतार मानतात. विठ्ठलपंत या अवतारातील अपूर्ण राहिलेला संन्यास आश्रम पूर्ण करण्यासाठी हा श्रीहरिहरेंद्रस्वामी अवतार. महाराष्ट्रात ज्ञानेश्वरकालीन दोन शीलालेख आहेत. त्यापैकी एक श्रीहरिहरेंद्रस्वामी मठातील 'सतीचे' समाधीवर आहे. व दुसरा पंढरपुरी पांडुरंगाचे मंदिरात ऐंशी चा शीलालेख म्हणून प्रसिद्ध आहे. हा शीलालेख पुरातत्व विभागाने प्रसिद्ध केला आहे. मी केवळ माउलीच्या इच्छेनेच आळंदीत आलो. मला आता मनात येईल तेव्हा माउली दर्शन घेता येते. वर्षातून चार वेळा माउलीची पालखी (आषाढी-कार्तिकी) मठात पूजेसाठी येते. पूजा मीच करतो. हे प्रबंध लिखाण माझे हातून पूर्ण व्हावे ही त्या सर्वेश्वराचीच इच्छा व त्याच्याच प्रेरणेने माझी व दीक्षितसरांची गाठ पडली.

लहानपणी शाळेत कै. घारेसरांनी एक इंग्रजी कविता शिकविली होती. '''तो' (देवदूत)

उंबऱ्या पलीकडे उभा आहे व 'मी' अलीकडे उभा आहे. 'त्याने' हात पुढे करताच 'त्याच्या' हातात हात घालून विश्वासाने 'उंबरठा' ओलांडायचा.'' कै. घारेसरांनी त्यांच्या आयुष्याच्या शेवटी मला याच कवितेची आठवण करून दिली होती. 'त्याचे' स्वागत 'मी'ही अगदी हसतमुखाने करण्याची जाणीव 'मला' सरांनी शेवटी करून दिली होती.

~~~
~~~

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

ज्ञानेश्वर – व्यक्ती की विभूती? हा या प्रबंधाचा मुख्य विषय आहे.

व्यक्ती म्हणजे मनुष्यरुप देह धारण करणारा जीव होय. 'व्यक्ती तितक्या प्रकृती' या न्यायाने प्रत्येक व्यक्तीची गुण-वैशिष्ट्ये, दोष, मर्यादा, ज्ञान, बुद्धिमत्ता, मनाची जडण घडण, अहंभाव, चिंतन, व्यासंग इत्यादी बाबतीत विविध व बहुरंगी असतात. वैविध्य आणि गतिमानता हा प्रकृतीचा (निसर्गाचा) गुणधर्म आहे. आणि जीव प्रकृतीच्या अधीन असतो. 'स्व'तंत्र नसतो. व्यक्तीच्या आचारांवर व विचारांवर प्रकृतीचे पडसाद उमटतात व व्यक्तिमत्त्वाची जडण घडण होते. जडण घडण ही स्थित्यंतरात्मक प्रक्रिया आहे. कालमानानुसार बालपण, यौवन, म्हातारपण या जीवनाच्या टप्प्यामध्ये व्यक्ती आपला शारीरिक व बौद्धिक आविष्कार दाखवते. हा आविष्कार दाखवण्यासाठी त्याला मेंदू (बुद्धी) मन (भाव व विचार) त्याचा अहंपणा (स्वत:ची थोडीशीच पटलेली ओळख) मोहमाया, विकृती, विकार, भ्रम, चांचल्य, अज्ञान, या गोष्टींचे चिंतन बोधासाठी आवश्यक असते. व्यक्ती मुळात ज्ञानस्वरुप असतेच परंतु अज्ञान व अहंकाराच्या जाळ्यात सापडून, अज्ञानाचे मळभ त्याच्या मूळ 'स्व'रूपावर साचते. हे मळभ गुरुपद स्वीकारलेली व्यक्ती काढून टाकून जीवाला त्याच्या मूळ स्वरूपाचे दर्शन (आत्मबोध किंवा निजबोध) घडवते. हीच गुरूकृपा होय. याबद्दल भगवद्‌गीतेत सांगितले आहे की –

'उपदेश्यंति तेऽज्ञानं ज्ञानिनं तत्त्वदर्शिन:'

(टीप – ऽ हा अवग्रह 'अ' दर्शवतो.)

गुरु हा मूळ ज्ञानी, तत्त्वदर्शिन किंवा तत्त्वज्ञ असतो. तो अज्ञानी जिवाला ज्ञानाविषयी उपदेश करीत नाही. कारण ज्ञान स्वयंभूच असते. म्हणून ज्ञान हा चर्चेचा किंवा उपदेशाचा विषय होऊ शकत नाही. मात्र अज्ञान काय व कशात आहे याबद्दलचा उपदेश 'तत्‌त्वं' (तत् त्वं असि-ते-ज्ञान तूच आहेस) ज्ञानी अज्ञानी जिवाला देतो व त्याचे मूळ 'स्वरूप' काय आहे ते दर्शवितो. म्हणून जगात असलेल्या असंख्य व्यक्तींचे वर्गीकरण ज्ञानी व अज्ञानी किंवा तत्त्वदर्शिन तत्त्वज्ञ ज्ञानी आणि अहंकार व मोह यामुळे गोंधळात सापडलेला अज्ञानी असे करता येईल.

सगुण साकार देहरूप घेतलेले ज्ञानेश्वर हे व्यक्ती आहेत की विभूती याचा विचार या प्रबंधात केलेला आहे. व ज्ञानेश्वरांच्या विभूतिमत्त्वाचे विश्लेषण या ग्रंथात केले आहे. ज्यांना ज्ञानिया, ज्ञानेश्वर, कैवल्याचा

पुतळा, ज्ञानोबा, ज्ञानराज माउली या विशेषणांनी गौरविले गेले त्या सत्यरूप, ब्रह्मचैतन्यरूप आणि सौंदर्यरूप ज्ञानेश्वरांच्या 'विभूती' रूपाचा हा अभ्यास आहे. देहरूप ज्ञानेश्वरांचे व्यक्तिमत्त्व फक्त त्यांच्या देहरूपापुरते मर्यादित होते काय? जगाला ज्ञानाचा कलश देणारी व जगासाठी (सर्व चराचरासाठी) विश्वात्मक देवाकडून पसायदान मागून घेणारी व 'जो जे वांछील तो ते लाहो' असे म्हणून ईश्वराच्या प्रेमसत्तेचे ज्ञान घडवून त्याच्या कृपेचा प्रसाद जगाला वाटणारी व्यक्ती ही सामान्य होती की दैवी योजनेनुसार घडलेली 'घटना' होती हा अनेक चिंतकांच्या अभ्यासाचा व व्यासंगाचा विषय आहे. हा व्यासंग कितीही जरी केला तरी तो अपुराच आहे. व्यक्ताचे शब्दात वर्णन कितीही केले तरी सूक्ष्म व विराट असलेल्या अव्यक्ताचे वर्णन पूर्ण होत नाही. काहीतरी कळण्याचे व पूर्णाचे दर्शन घडणे शिल्लक राहतेच. ज्ञानेश्वरांच्या अशा विभूतिमत्त्वाचा हा अभ्यास आहे. त्यासाठी अनेक मान्यवर संत, महंत, दार्शनिक (तत्त्वज्ञानी) चिंतक यांनी शब्दावगुंठित केलेल्या गद्य व पद्य वाङ्मयाचा संदर्भ घेऊन, स्वतः केलेल्या चिंतनातून सुचलेले विचार या प्रबंधात मांडले आहेत.

व्यक्ती आणि विभूती या दोन संकल्पनांचा आशय जाणून घेण्याचा प्रयत्न या ग्रंथात आहे. या दोन शब्दांची व्युत्पत्ती (Etymoloy), आणि तत्त्वज्ञ किंवा तत्त्वज्ञानी व्यक्तीची गुणवैशिष्ट्ये या प्रबंधात विचारात घेतलेली आहेत. 'व्यक्त' म्हणजे उघड झालेले किंवा केलेले, स्पष्ट, दृश्य रुप होय. या रूपाचे प्रकटीकरण, आविष्करण, ज्या सगुण व साकार देहात होते तो व्यक्त पदार्थ, वस्तू किंवा देह म्हणजे 'व्यक्ती' होय. या देहाला लिंग, वय, वारसा, पूर्वेतिहास, जन्मस्थान व मृत्यू हे संदर्भ असतात. हे संदर्भ ज्ञानेश्वरांच्या देहाला 'व्यक्ती' आहेत असे ज्ञानेश्वरांचे चरित्र पाहिल्यावर वाटते. परंतु देहातीत असे 'विभूती' रूप ज्ञानेश्वरांचे आहे काय? हे रूप अक्षय, अमर, चिरंतन, शाश्वत, अतींद्रिय, स्थलकालाच्या मर्यादांना ओलांडून आहे काय? याचा शोध या प्रबंधात घेतला आहे. विभूती मध्ये 'भूत' – झालेला, होणारा हा पाठभेद आहे. हे सतत 'होणारे' व 'असणारे' विभूतिमत्त्व ज्ञानेश्वरांच्या देहापलीकडचे पार्थिव दृष्टीला न दिसणारे परंतु चिंतन, भक्ती, श्रद्धा, प्रेम शक्तींनी दृग्गोचर होणारे व बोध होणारे (आत्मबोध) अशा तऱ्हेचे आहे.

सामान्य प्रचलित भाषेत विचारायचे झाल्यास – ज्ञानेश्वरांकडे काय नाही? त्या ज्ञानी, प्रेमळ, अवतारी महापुरुषाकडे सर्वच आहे. 'पूर्णमिदमुच्यते' असे पूर्णत्वाला पोचलेले पुरुषोत्तम व प्रेमावतार म्हणजे ज्ञानेश्वर असाच सिद्धांत अभ्यास केल्यावर मांडता येतो. ज्ञानेश्वरांच्या मागे ज्या ईश्वरी कृपेचे व

प्रेमसत्तेचे वलय आहे ते श्रीकृष्णाने अर्जुनाला दिलेल्या ज्ञानदृष्टीनेच दिसू शकेल.

सगुणाकार देहरुप ज्ञानेश्वरांच्या भोवती जे गुरुकृपेचे व ईश्वरी प्रेमसत्तेचे वलय आहे त्या विभूतिरूपाच्या वैभवात काय नाही? विभूति म्हणजे ईश्वरी सत्तेचे व कृपेचे 'विशेष' होणे! या विशेषत्वात काय काय आहे? संपदा (संपत्ती) आहे, लक्ष्मी, सरस्वती, गायत्री, अन्नपूर्णा, धन्वंतरी या सर्व देवता व देव आहेत. महात्म्य, कल्याण, तेज, प्रभाव, ऐश्वर्य, शक्ति, अष्टसिद्धी, मनाचे समत्व व प्रसन्नता, बुद्धीचे सामर्थ्य, प्रतिभेचा स्फूर्तिविलास आणि सूक्ष्म परतत्वाचा विश्वातील विराट विस्तार आहे. ज्ञानेश्वर हे तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे 'अणुरणिया थोकडा' व आकाशा एवढेच नव्हे तर त्रिपुटी सांडून आकाशाला गवसणी घालून दशांगुळे शिल्लक राहिलेले आहेत. ते ज्ञान प्रकाशमय आहेत व बिनशर्त भक्तिप्रेमाचे अवतार आहेत. ते संपूर्ण विश्वापासून अलिप्त (सर्व संग परित्यागी) साक्षी आहेत. विवेक व वैराग्य या दोन गुणांनी नटलेले आहेत. ते सगुण आहेत तसे निर्गुण आहेत. ब्रह्मचैतन्य आहेत. या ब्रह्मचैतन्याचा प्रेमप्रवाह शुद्ध पवित्र गंगेसारखा आहे. या प्रेमप्रवाहात सर्व जीवांनी डुंबावे व ब्रह्मानंदी विलीन व्हावे, अशी ज्ञानेश्वरांची इच्छा आहे. 'अवघाची संसार सुखाचा (सुखरूप) करीन, आनंदे भरीन तीन्ही लोक' ही ज्ञानेश्वरांची प्रतिज्ञा किंवा संकल्प आहे व परमेश्वर त्यांच्या या संकल्पास सिद्धी देण्यास समर्थ व सज्ज आहे.

हे विवेकी व विरागी (रंगहीन, संतोष व विश्वातील व्यवहाराबद्दल अनासक्ती किंवा निरपेक्ष भाव, निरिच्छता, अप्रीती व उदासीनता) असणे व कोणतीही विरूपता, अयोग्यता, अभद्रता, साक्षीपण, (निष्क्रीय नसण्याची अवस्था) ज्ञानेश्वरांच्या बाबतीतच शक्य आहे. विवेकी (सारासार तारतम्य, निर्लेप विचारमंथन व चिंतन करणारा) आणि विरागी ज्ञानेश्वरच 'पसायदान' मागू शकतो. ज्ञानेश्वरांच्या प्रत्ययकारी पसायदानाची, त्यांच्या अमृतानुभवाची, हरिपाठांची बरोबरी जगातील कोणतेच तत्वज्ञान करू शकत नाही. ज्ञानेश्वरांच्या अक्षर वाङ्मयाचा प्रभाव अतुलनीय आहे. त्या वाङ्मयाच्या अक्षर अक्षरात ज्ञानेश्वरांचे विभूतिमत्त्व प्रगट होते. व जीवाला अंतिम सत्य, शिव व सुंदराचा अनुभव देऊन 'सुख' रूप करते. एकाच ओवीत हा अनुभव सिद्ध होतो. ज्ञानेश्वरांच्या मायेची ही किमया आहे. ज्ञानेश्वर ही 'दैवी घटना' त्यांच्या देहापुरती मर्यादित नाही. दिसायला देहरूप दिसणाऱ्या ज्ञानेश्वरांचे 'विभूति' स्वरूप अद्वितीय व अतींद्रिय आहे.

अशा विभूति-रूपाचा हा शोध म्हणजे हा प्रबंध आहे.

# प्रबंधाचा गृहीत सिद्धांत (Hypothesis)

विभूती ज्ञानेश्वर हे भगवंताचेच दुसरे नाव आहे. भगवंताने कृष्णावतारात जे कार्य केले त्याचसाठी त्याला तेराव्या शतकात पुन्हा ज्ञानेश्वर हा देह धारण करावा लागला. परंतु या विभूतीचे देह हे केवळ बाह्यावरण आहे. श्रीकृष्णाने गीतेत आपल्या अवतार धारण करण्याचे कारण स्पष्ट केले आहे.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।

अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।। भ. गी. ४.७

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।

धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।। भ. गी. ४.८

'संभवामि युगे युगे' हे अभिवचन पूर्ण करण्यासाठी भगवंताला ज्ञानेश्वर हा दिव्यावतार धारण करावा लागला. ज्ञानेश्वरांनी वरील श्लोकातील सर्व आश्वासने आपल्या अवघ्या एकवीस वर्षांच्या देहधारण कालात पूर्ण केली. फक्त 'विनाशाय च दुष्कृताम्' या मार्गाऐवजी या विभूतीने 'खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।' या त्या काळाला अनुरूप अशा मार्गाची निवड केली.

ज्ञानदेवांनी प्रत्येक भक्ताच्या हृदयात अढळ स्थान मिळवले आहे. म्हणून पुरुषस्वरूप असूनही प्रत्येक भक्त त्यांना हृदयाच्या गाभ्यातून 'माउली' अशी साद देतो. या प्रत्येक भक्ताच्या मनीमानसी 'माउली' आहेत. व माउलींच्याही हृदयात प्रत्येकाला स्थान आहे. प्रत्येकाला हा विश्वास आहे की माउली निरंतर आपण या जगात असेपर्यंतच नव्हे तर त्या नंतरही आपलीच असणार आहे. ही विभूती सर्वांना आश्वासन देते की –

यो मां पश्यति सर्वत्र सर्वच मयि पश्यति ।

तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ।। भ. गीता ६.३०

माउली सांगतात की जो मला सर्वत्र पाहतो आणि माझ्या ठिकाणी सर्व पाहतो, त्याला मी कधी दृष्टीआड होत नाही व तो मला कधी दृष्टीआड होत नाही. माउली हे विशद करून सांगताना म्हणतात.

जें जें भेटेभूत । तें तें मानिजे भगवंत ।

हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।। ज्ञा.१०.११८

जो भक्त ऐक्याच्या समजुतीने मी सर्व भूतात (प्राणीमात्रात) सारखाच व्यापून राहिलेला आहे, असे जाणून मला भजतो, माझ्यावर प्रेममय भक्ती करतो, तसेच प्राणिमात्रातील उच्च नीचतेच्या भेदभावाने ज्याच्या अंत:करणात द्वैत उत्पन्न होत नाही, जो जाती-वर्ण भेदातीत आहे. जो पूर्ण विश्वासाने माझे केवळ एकत्त्वच जाणतो, तो माझाच आहे. असा जो माझा भक्त आहे त्याच्याबाबतीत तो माझ्याशी एकरूप आहे हे बोलण्याचीच जरुरी नाही. कारण असा भक्त हे माझेच स्वरुप आहे, तो म्हणजेच मी, व मीच त्याच्या रुपाने उभा आहे. माउली आपल्या भक्तांना दृष्टांत देताना सांगतात - ''दिवा व त्याचा प्रकाश, हे जसे दोन्ही एकच आहेत, त्याप्रमाणे माझ्या हृदयात माझा भक्त व त्याच्या ठिकाणी मी ऐक्यानेच आहोत. ज्याप्रमाणे जमिनीवर जेथपर्यंत पाणी आहे, तेथपर्यंत ओलावा आहे. किंवा जेथपर्यंत हे अनंत आकाश आहे तेथपर्यंत पोकळी आहे. म्हणून माझा भक्त माझ्या रुपाने रुपवान आहे. ज्ञानदेव पुन्हा पुन्हा आग्रहाने सांगतात की तुमच्यासमोर, तुमच्या सहवासात येणारी प्रत्येक व्यक्ती, प्राणिमात्र ते कसेही असले तरी त्यांच्यात मला पहा. कुळ, गोत्र, जात, वंश, गरीब-श्रीमंत, काळा-गोरा ही सगळी वरवरची टरफले आहेत. अंतर्यामी तेथेही तुम्हाला मीच दिसेन.''

माझा भक्तियोग मी तुमच्या समोर स्पष्ट केला आहे. तुम्ही सर्व माझेच अंश आहात, व तुमच्या प्रत्येकात मीच आहे हा विश्वास अखंड ठेवा. तुमच्या प्रत्येकाच्या या पूर्वीच्याही अनंत जन्मात मीच तुमच्या बरोबर होतो व यापुढील प्रत्येक जन्मात मी तुमच्यातच असणार आहे. तुमच्या सर्वांच्या रुपाने मीच विविध रुपाने नटलो आहे. भावार्थ दीपिकेत मी तुम्हाला हेच सांगितले आहे.

मग तो एक हा मियां । बोलतां दिसतसे वायां ।

एऱ्हवीं न बोलिजे तरि धनंजया । तो मीचि आहें ।। ज्ञा.६.३९५

दीपा आणि प्रकाशा । एकवंकिचा पाडु जैसा ।

तो माझा ठायी तैसा । मी तयामाजीं ।। ज्ञा.६.३९६

जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु । कां गगनाचेनि मानें अवकाशु ।

तैसा माझेनि रूपे रुपसु । पुरुषु तो गा ।। ज्ञा. ६.३९७

काही प्राणिजात मला न मानणारे, माझे अस्तित्वच नाकारणारे आहेत. काही प्राणिमात्रांस भाषाच नाही. तरीही हे सर्व माझेच अंश आहेत. त्यांचे योगक्षेम मीच पाहतो. 'तया सत्कर्मी रती वाढो' हीच माझी त्यांच्याकडून अपेक्षा आहे!

ही विभूती असेही आश्वासन देते की –

यथाकाशास्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।

तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ।। भ. गीता अ.९.६

ज्ञानेश्वर म्हणतात. सर्वत्र संचार करणारा महान् वायु आकाशाच्या ठिकाणी जसा नित्य स्थित आहे, त्याप्रमाणे सर्व भूते माझ्या ठिकाणी स्थित आहेत असे जाण.

[१] याचे स्पष्टीकरण करताना माउली म्हणतात की आकाश जसे व जेवढे आहे, तसाच व तेवढाच वायू आकाशात असतो. काही कारणांनी किंवा पंख्यासारख्या उपायाने त्याला हलविले तरच पोकळीतील त्याचे वेगळे अस्तित्व जाणवते. नाहीतर आकाशाची पोकळी व वायू एकच आहेत. त्याचप्रमाणे प्राणिमात्र व मी यांच्यात त्यांच्या बाह्याकाराने काही कल्पना केली तर त्यांचे वेगळे अस्तित्व भासेल. परंतु सर्व प्राणिमात्र म्हणजे माझीच स्वरुपे आहेत अशी कल्पना जर माझ्या भक्तांनी मनात दृढ केली तर त्यांना सर्वत्र मीच भरून राहिलो आहे हे निश्चित समजेल. म्हणून भक्तांच्या मनातील कल्पनांप्रमाणे प्राणिमात्रांचे (भूतांचे) असणे अगर नसणे या कल्पना निर्माण होतात. मग यासाठी ज्ञानी भक्ताचे मनाची कल्पना किंवा वृत्ती काय व कशी असावी या विषयी माउली सुंदर उत्तर देतात.

---

१. दांडेकर शं. वा., सार्थ ज्ञानेश्वरी, पान २४३

हे विश्वचि माझे घर । ऐसी मती जयाची स्थिर ।

किंबहुना चराचर । आपण जाहला ।। ज्ञा.१२.२१३

वरील वैश्विक कल्पना, विचार मनात ठसल्यानंतर पुढील विकल्प मनात उभे राहणार नाहीत. कारण भूताभास ही कल्पना नष्ट झाली की तिच्या बरोबरच विकल्प नष्ट होतो व कल्पना उत्पन्न झाली की, तिच्या बरोबर विकल्प उत्पन्न होतो. ते कल्पना करणारे मनातील भूत किंवा विकल्प ज्या वेळी नाहीसा होता, तेव्हा (भुताचे) विकल्पाचे असणे किंवा नसणे हा व्यवहार कोठून होणार? या अनुभवरूपी ज्ञानसमुद्रामध्ये तू आपल्याला त्याचाच अभिन्न भाग अशी एक लाट समज. मग चराचरात जर तू पाहशील, तर सर्वत्र तूच एक आहेस असे तुला कळून येईल. माउली विचारतात की भक्ता, या ज्ञानाने तुला जागृती आली ना? जर जागृती आली असेल तर मनातील 'मी' व प्राणिमात्र यातील द्वैतभावाचे स्वप्न मिथ्या झाले की नाही? परंतु एक विचार मात्र मनात निश्चित ठेव की जर बुद्धीला पुन्हा कल्पनेची झोप आली, तर प्राप्त झालेले अभेद ज्ञान निघून जाईल आणि पुन्हा द्वैतात सापडशील. म्हणून या कल्पना रूपी झोपेचा मार्ग मोडेल आणि आपण केवळ स्वरूप जागृतीतच राहू. या साठीचे एक खास वर्म मी तुम्हाला सांगत आहे. अहो, सर्व प्राणिमात्रांना मायाच उत्पन्न करते व तीच त्यांचा नाश करते.

म्हणून तुम्ही माझ्यापेक्षा स्वत:ला वेगळे मानू नका. हे सर्व चराचर विश्व व्यापून तुम्ही उरला आहात अशी बुद्धी, अशी श्रद्धा ठेवा. माझ्या प्रमाणेच हे सारे विश्वच तुमचे घर आहे.

भावार्थ दीपिका सांगते –

पैं गगन जेवढें जैसें । पवनु गगनीं तेवढाचि असे ।

सहजे हालविलिया वेगळा दिसे । एऱ्हवी गगन तेंचि तो ।। ज्ञा.९.८९

तैसें भूतजात माझां ठायीं । कल्पिजे तरी आभासे कांहीं ।

निर्विकल्पी तरि नाहीं । तेथ मीच मी आघवे ।।

म्हणउनि नाहीं आणि असे । हे कल्पनेचेनि सौरसे ।

जे कल्पनालोपें भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ।।

तेंचि कल्पिते मुदल जाये । तैं असे नाहीं हें कें आहे ।
म्हणऊनि पुढती तूं पाहें । हा ऐश्वर्ययोगु ।।
ऐसिया प्रतीतिबोधसागरीं । तूं आपणेयातें कल्लोळु एक करी ।
मग जंव पाहासी चराचरीं । तंव तूचि आहासी ।।
या जाणणेयाचा चेवो । तुज आला ना म्हणती देवो ।
तरी आतां द्वैतस्वप्न वावो । जालें कीं ना ।।
तरी पुढती जरी विपायें । बुद्धीसि कल्पनेची झोंप ये ।
तरी अभेदबोधु जाये । जैं स्वप्नी पडिजे ।।
म्हणोनि ये निद्रेची वाट मोडे । निखळ उध्दोधाराचेंचि आपणचे धडे ।
ऐसे वर्म जें आहे फुडें । तें दावों आतां ।।
तरी धनुर्धरा धैर्या । निके अवधान देईं बा धनंजया ।
पैं सर्व भूतांते माया । करी हरी गा ।। ज्ञा.९.८९-९७

या दोन सिद्धांत श्लोकांचा मतितार्थ असा की -

[१]जो भक्त सर्व भूतांच्या ठायीं सर्वांचा आत्मरूप असा जो मी त्या मलाच (व्यापकत्वाने) पाहतो व सर्व भूतांना मज अंतर्गत पाहतो त्याला मी अदृश्य होत नाही आणि तोही मला अदृश्य होत नाही. कारण तो माझ्या ठिकाणी ऐक्य भावाने स्थित असतो.

[२]जसे (आकाशापासून उत्पन्न झालेला) सर्वगामी महान वायू नेहमीच आकाशात स्थित असतो, तसेच सर्व भुते माझ्या ठायी स्थित आहेत असे जाण.

अशा या विभूतीस्वरूप ज्ञानेश्वरांबद्दल - एका ईश्वर नियोजित दैवी घटनेचे निराळेपण पुढील गृहीत वचनांमध्ये सांगता येईल.

---

१. दांडेकर शं. वा., सार्थ ज्ञानेश्वरी १९८६

२. ज्ञानेश्वरी गूढार्थदीपिका, गीताप्रेस गोरखपूर सं.२०६५

- ज्ञानेश्वरांना खूप लहान वयात प्राप्त झालेली सर्वज्ञता, तटस्थता आश्चर्यकारकच आहे.
- ज्ञानेश्वरांच्या तोडीचे वाङ्मय केवळ सद्गुरु कृपेनेच निर्माण होते.
- ईश्वराची सगुण-निर्गुण ही दोनही रूपे सत्य आहेत. हे ज्ञानेश्वरी-तत्त्वज्ञानाचे सार आहे.
- नामजपानेही हरीची प्राप्ती होते. सामान्यांना हरिपाठ दिला. ईश्वरउपासनेसाठी भक्तिमार्गाचाच पुरस्कार ज्ञानेश्वरांनी केला.
- आयुष्यभर निवृत्त. कोणत्याही कार्याचे श्रेय घेतले नाही. निवृत्त असल्यामुळे विरागी योगी ज्ञानेश्वर आपल्या गुरूंसारखे - निवृत्तिनाथांसारखेच आहेत.
- वेदांची कृपणता दाखवून गीतेला पाचव्या वेदाचे महत्त्व दिले.
- प्राचीन काळापासून स्त्रीशूद्रांना अव्हेरले गेलेले स्थान मिळवून दिले. भेदीदृष्टी ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानात नाहीच.
- नाथपंथीय साधकांचा साधना मार्ग स्वतःच्या अनुभवातून सिद्ध करून सर्व साधकांना अनुभवामृत दिले.
- गुरु-शिष्य परंपरेचा सर्वश्रेष्ठ आदर्श ज्ञानेश्वरांनी निर्माण केला. मी जे सांगितले ते सर्व माझ्या श्रीगुरूंचे आहे. नम्रता हा ज्ञानेश्वरांचा सद्गुण ईश्वराचा सर्वात आवडता आहे.
- प्रत्येक हरिभक्त वारकरी, नामदेवांसारखे सर्व साक्षात्कारी संत यांच्या मनात हा विष्णूचा/ श्रीकृष्णाचाच अवतार आहे, हा प्रेमावतार आहे, असाच भाव होता व आहे.
- सान-थोर, वारकरी-संसारी-संन्यासी, संत-सामान्य सर्वांच्या हृदयी ते 'माउली' आहेत. पुरुष असूनही मातृप्रेमाचा श्रेष्ठ आदर्श आहेत. ते आदिमायेचे रुक्मिणीचे सुत आहेत.
- मायबोली मराठीतून अप्राप्य गीतातत्व भावार्थ दीपिकेतून सामान्यांपर्यंत आणले. भावतोचि देव.
- श्रीकृष्ण अवतारातील प्रतिज्ञेप्रमाणे मध्ययुगात धर्मसंस्थापन, अधर्माचे अभ्युत्थान व 'खळांची व्यंकटी सांडो-तया सत्कर्म रती वाढो' हे ईश्वरीउपासनेचे मर्म भाषा सौंदर्याने व

रसाळपणे स्फूर्तिविलासातून सांगितले. हाच संकल्प सिद्धीस जावो अशी विश्वात्मक देवास प्रार्थना करून  आपले अवतार कार्य पूर्ण होताच संजीवन समाधी घेतली. कारण ज्यासाठी विश्वात्मक देवाने देहरूप दिले त्या देहाचे प्रयोजन ज्ञानेश्वरी सांगितल्यावर पूर्ण झाले. हरिकीर्तन सिद्धीस गेले. मग देहाची त्रिपुटी सांडून टाकिली. मूळ विभूति स्वरूपात देह विलीन केला.

# पूर्वपीठिका

भागवत धर्म म्हणजे भगवंताचा धर्म. भगवंत म्हणजे तो जो विश्वाच्या कणाकणात आहे. आणि धर्म म्हणजे त्याला जाणून घेणे. हे सर्व चराचर विश्व हेच त्याचे स्वरूप. यातील कणाकणात तोच भरून राहिला आहे. सर्व सजीव-निर्जीव ही त्याचीच चल-अचल रूपे. त्याला जाणून घेण्याचा निसर्गदत्त अधिकार धर्म, जाती, वर्ण, लिंग निरपेक्ष प्रत्येकास आहे. मी जर त्याचेच स्वरूप आहे, तर तो कसा आहे? तो आणि मी जर एकच आहोत, तर मला माझाच बोध, माझीच ओळख करून घ्यावी लागेल. भगवंत आणि धर्म हे दोनही रूढ शब्द समाजात आपण ज्या अर्थाने वापरतो त्यापेक्षा हे शब्द कितीतरी बोधप्रद आणि अर्थगर्भ आहेत. मी हिंदू, मी मुस्लीम, मी ख्रिश्चन या भिंती या 'मी' ला अडवूच शकत नाहीत. धर्मातीत असणाऱ्या त्या 'मी' ला 'तो' माझ्यात आहे व मी 'त्याचा' आहे, त्याला समजणे हा माझा हक्क आहे. धर्म म्हणजे व्यक्ती, समाज हे घटक एकमेकांना व 'त्याला' जाणून घेऊन - सर्वेत्र सुखिनः सन्तु । सर्वे सन्तु निरामयाः । अशी जीवन पद्धती आहे.

हजारो वर्षांपूर्वी ऋषि-मुनींनी यावर प्रदीर्घ विचारमंथन करून जे आचार, नियम निश्चित केले, त्यातून वेद, उपनिषदे, सूत्रे इत्यादींची निर्मिती झाली. समाजातील लोकांनी सुसंस्कारीत होऊन, आपापली अपेक्षित आचार व कार्ये करून कसे वागावे इत्यादी गोष्टी या वेद, उपनिषदांनी सांगितल्या आहेत. समाज एकसंध, शुभ आचार विचारांचा असावा यासाठी नियमावली आल्या, निमयभंगांना शिक्षा आल्या. समाजाच्या एकसंघ रचनेस, व सुसंस्कृत आचार, सुरक्षा, सुख-दुःख, निर्वाह या आणि इतर अनेक कारणांसाठी ही रचना आवश्यक होती. त्या काळी अस्तित्वात असलेल्या गीर्वाण भाषेतून ते लिहिले अथवा सांगितले गेले आहे.

धर्म म्हणजे काय? हे विविध पद्धतींनी समाजाला सांगितले गेले होते. परंतु त्यामागील जो भगवंत, तो कोठे आहे, तो कसा आहे? याचे उत्तर अगदी धर्मग्रंथानी सुद्धा 'नेति-नेति' असेच सांगितले. त्या सर्वेश्वराला कसे जाणावे, त्याला कसे पहावे, कोठे पहावे याचा मात्र गुंताच होत राहिला. प्रत्येक शतकातील पंडितांनी त्यांना योग्य वाटेल, त्यांना योग्य व फायदेशीर होईल त्या प्रमाणे भगवंताचा व धर्माचा अर्थ मांडला होता, व त्यासाठी ते आग्रहीही राहिले. जे त्यांच्या नीति नियमांना मानणार नाहीत ते धर्मभ्रष्ट, जातिभ्रष्ट झाले. भगवंत

मात्र तसाच अप्राप्य, अबोध राहिला. संस्कृत भाषेमुळे धर्मतत्त्वे सामान्यापर्यंत पोहोचलीच नाहीत. प्रवाहपतिताप्रमाणे हे सामान्य कालौघात वाहतच राहिले. त्यांना कोणी जाणणारा, समजावणारा भेटलाच नाही. परधर्मीयांची आक्रमणे भागवत धर्मावर होतच राहिली. हा वैचारिक, सामाजिक, धार्मिक, रूढिनिष्ठ गोंधळ किती काळ असाच चालत राहणार होता? हे सगळे त्यांनी असेच सहन करीत राहायचे का? मग भगवंताचा आणि त्याच्या धर्माचा अर्थ काय? हा गुंता कसा सुटावा?

परमेश्वर निर्गुण असो वा सगुण असो, साकार असो वा निराकार असो. त्याच्याच व्यापकत्त्वात असणाऱ्या विश्वातील प्रत्येकाचा तो आहे, त्याला जाणून घेण्याचा अधिकार, त्याच्यावर प्रेम करण्याचा अधिकार प्रत्येकाला आहे. ही विश्वमनाची आर्त हाक होती. गीतेत भगवंतांनी सर्व मानवजातीला दिलेल्या आश्वासनाची त्यालाच करून दिलेली आठवण होती. विश्वचेतनेला केलेले ते आवाहन होते, ती विश्वाच्या आक्रंद मनाची मागणी होती. 'यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्' । हे कार्य श्री ज्ञानेश्वर या विभूतीने केले.

विश्वचेतनेला विभूतिस्वरूप ज्ञानेश्वर माउलींना भागवत धर्म म्हणजे काय हे सांगण्यासाठी यावेच लागले. भगवंताला जाणणे, समजणे, आपलासा करणे या मूळ भागवतधर्मापासून – मानवधर्मापासून इतर सर्व धर्म, धर्ममार्तंड किती तरी दूर होते. त्यातील कोणीही ही जाणीव, हा प्रेमाचा अधिकार, हा भगवंत माझा – मी भगवंताचा हे जाणण्याचा भक्तीचा मार्ग देऊ शकत नव्हते. त्यांच्यात होती फक्त शाब्दिक व धार्मिक युद्धे, क्लिष्ट परंपरा व शोषण. भगवंत म्हणजे कोण? तुम्ही म्हणजेच तो, म्हणजेच मी स्वतः ज्ञानदेव, हे त्यांच्याच मायभाषेत सांगणारे विश्वचेतनेचे ब्रह्मस्वरूप म्हणजेच – ज्ञानेश्वर – सर्वांची माउली. माउलींनी सर्वांना सांगितले, 'अरे भगवंत कोणी वेगळा का आहे? तो म्हणजे तुम्ही – मी. मीच तुमच्या सर्वात आहे. हेच सांगण्यासाठी तर 'मी' आलेलो आहे.

या विषयावरच्या चिंतनाची व विवेचनाची सुरुवात श्रीमत् चतुःश्लोकी भागवताचे सार सांगणाऱ्या खालील काव्यरचनेने करता येईल. तसेच त्यानंतरचा ज्ञानदेवांचा पुढील अभंगही हा विषय स्पष्ट करणार आहे –

## [१]श्रीमत् चतु:श्लोकी भागवताचे सार –

सत्ता अंतिम मी निरंजन सदा दिक्काल ओलांडुनी ।
मीही आदि भविष्य भूत प्रगटे या वर्तमानातुनी ।।
सृष्टी सूक्ष्म स्वरूप स्थूलहि मला ती पूर्वजा ना तरी ।
जे जे शिल्लक वर्तमान म्हणूनी तो मी लयानंतरी ।।
वस्तू एकच जी प्रतीत बनुनी भासे दुजा चंद्र तो ।
नक्षत्रांतिल राहु जो दिसतसे माझ्याच मायेत तो ।।
जीवीं पंचभुतें प्रवेश करिती देहांस निर्मावया ।
मीही होत परी न होतहि जरी मी खेळवीतो तयां ।।
माझे भक्त मला अती प्रिय खरे त्यांच्यात आहे सदा ।
जे जे भक्त मला अनन्य शरणी त्यांच्या हरे आपदा ।।
त्यां भक्ता वश मी स्वयें प्रगटुनी नेईन माझ्या पदा ।
जे भासे असते तसा दिसतसे सर्वत्र मी सर्वदा ।।
रक्षी देउन प्राप्य मी कलियुगी अप्राप्यही त्याजला ।
सारे नश्वर सोडुनी मज प्रती माझ्यात जो रंगला ।।
नित्यानित्य विवेक ज्ञान घडवे वैराग्य 'श्री' दर्शन ।
परमात्म्यांत विलीन लीन बनवे मम नामसंकीर्तन ।।
बुद्धी जाणत आत्मतत्त्व म्हणुनी 'नेऽती'च माझ्या प्रती ।
यत्नासी करिता विचार करूनी लागेल कां संगती? ।।
श्रीमद् भागवता करून श्रवणा लाभास घ्यावे मम ।
हेची साधन भक्तिचे करितसे माझा तुझा संगम ।।
जेथे भक्ति आनंद उत्सव असा भजण्यास पुरुषोत्तम ।
तेथे येत असे स्वयें त्यजुनिया जे धाम परमं मम ।।

---

१. काव्यरचना : प्रा. डॉ. माधवराव दीक्षित.

आणि ज्ञानेश्वर माउली म्हणतात –

तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ।।

अनुमाने ना अनुमाने ना । श्रुति नेतिनेति म्हणती गोविंदु रे ।।

तुज स्थूळ म्हणों कीं सूक्ष्म रे । स्थूलसूक्ष्म एकु गोविंदु रे ।।

तुज आकार म्हणों कीं निराकार रे । साकारु निराकारु एकु गोविंदु रे ।।

तुज दृश्य म्हणों कीं अदृश्य रे । दृश्यअदृश्य एकु गोविंदु रे ।।

निवृत्तिप्रसादे ज्ञानदेव बोले । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु रे ।। ज्ञा.गा. ४०

ज्ञानदेवांचा भागवत धर्म कसा आहे? ज्ञानी विद्वानापासून सामान्यांपर्यंत, श्रीमंतापासून गरीबापर्यंत, सर्व वर्णांच्या, जातींच्या प्रत्येकास सहज आचारिता येणारा, सर्व धर्म समभावाचा धर्म. हा धर्म जाणणे म्हणजेच – सर्वेत्र सुखिनः सन्तु । सर्वे सन्तु निरामयाः । सर्वे भद्राणि पश्यन्तु । मा कश्चित् दुःखमाप्नुयात् । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः । हा भद्रतेचा मार्ग सांगणारा आहे. ज्ञानेदवांचा हा धर्म लोकांनी सर्वभावे आचरावा म्हणून of the People, सर्वांच्याच कल्याणाचा असणारा म्हणून for the People आणि लोकानुसरणाने पूर्णतेला जाणारा म्हणून By the People. असा सहज जाणता येणारा, प्रत्येक जीवाचा म्हणून भगवंताचा धर्म आहे. माउलींनी सर्वांच्या जीवनाचे सार्थकतेसाठी मांडलेल्या या भागवत विचारांची जबाबदारी आपल्यानंतर आपला सखा नामदेव व सर्व जातिवर्गांच्या संतांच्या खांद्यावर दिली. इतरांच्या सुखासाठी झटणे हाच खरा भागवत धर्म ज्ञानदेवांनी सांगितला.

माउलींचा विभूतिधर्म कसा आहे याचा उलगडा वरील काव्यातून होईल. धर्म म्हणजे समाजाची धारणा, समाजमनाची जडणघडण व समज जाणून घेणे. समाजाची धारणा काय असावी? याबाबतीत काय संकल्प होता ज्ञानदेवांचा? 'ईश्वरनिष्ठांची मांदियाळी' हा ज्ञानदेवांचा संकल्प होता. चराचरातील ईश्वराबद्दल माउली काय म्हणतात? सगुण – निर्गुण, श्रुतिंचे नेति नेति, स्थूळ – सूक्ष्म, आकार – निराकार, दृश्य – अदृश्य या शब्दातून माउलींना काय सांगायचे आहे? हा भागवतधर्म काय आहे हे माउलींना गुरु मानणाऱ्या नाथांनी चतुःश्लोकी भागवताच्या विवरणात सांगितले आहे. त्यावरच हे वरील काव्य आहे. त्याचा विचार करू. भगवंत म्हणजेच विभूति ज्ञानदेव.

सत्ता अंतिम मी निरंजन सदा दिक्काल ओलांडुनी ।

मीही आदि भविष्य भूत प्रगटे या वर्तमानातुनी ।।१।।

'सत्ता अंतिम मी', मी कोण आहे? हे जे ईश्वराचे निर्गुण स्वरूप आहे, ती माझी शक्तिरूप सत्ता आहे. प्रश्न येतो ही सत्ता 'दहशतीची' आहे का? नाही. ज्ञानदेवच म्हणतात – तो परमेश्वर गाईची तहान भागवितो, वाघाचीही तहान भागवितो. म्हणून ती 'प्रेमसत्ता' आहे. ही प्रेमळ आईची सत्ता आहे. म्हणून ती सत्ता म्हणजे विभूति ज्ञानेश्वर माउलींची सत्ता. 'सत्ता अंतिम मी निरंजन सदा दिक्काल ओलांडुनी.' 'अलख निरंजन' हा जो नाथसंप्रदायी मंत्र आहे, त्यातील 'अलख' म्हणजे अतींद्रिय आणि तो निरंजन आहे. आकाशाला वस्त्र कोण घालणार? अशा निरंजन स्वरूपाचा 'तो' परमेश्वर आहे. आणि 'तो' Time and Space म्हणजे काल आणि अवकाशाच्या पलीकडे आहे, म्हणून 'दिक्काल ओलांडुनी' असा हा भगवंत आहे. 'मीही आदि भविष्य भूत प्रगटे या वर्तमानातुनी'. हा जो वर्तमान आहे त्यालाच भूत आणि भविष्य हे संदर्भ जोडले जातात. मी विद्यमान आहे. मीच सगळ्यांचा वर्तमान आहे. मी आजही आहे, कालही होतो आणि उद्याही मीच एकमेव असणार आहे. म्हणून मी एकमेव आहे. मी त्रिकाल आहे. म्हणून 'मीही आदि भविष्य भूत प्रगटे या वर्तमानातुनी.'

सृष्टी सूक्ष्म स्वरूप स्थूलहि मला ती पूर्वजा ना तरी ।

जे जे शिल्लक वर्तमान म्हणूनी तो मी लया नंतरी ।।२।।

'सृष्टी सूक्ष्म स्वरूप स्थूलहि मला', आपल्याला न दिसणारी सृष्टीची सूक्ष्म रूपे, आणि दिसणारी स्थूल सृष्टी 'तो'च आहे. माउली म्हणतात. 'तुज स्थूळ म्हणो की सूक्ष्म रे । स्थूळसूक्ष्म एकु गोविंदु रे।।' 'ती पूर्वजा ना तरी'. सृष्टी माझ्या अगोदर जन्माला आलेली नाही. तिचाही निर्माता मीचः. 'एकोऽहं बहुस्याम्' आहे. तुम्हाला जी सृष्टी दिसते तो माझाच विलास आहे. तिचा आदि मी आणि अंतही मीच. ही सृष्टी जी माझाच विलास आहे, म्हणून ती माझ्या अगोदर अस्तित्वात आलेली नाही. 'जे जे शिल्लक वर्तमान म्हणूनी तो मी लयानंतरी'. स्थित्यंतर हा विश्वाचा धर्म आहे. कोणत्याही वस्तूचे कालचे स्वरूप आज राहत नाही. वर्तमान म्हणून आज जे दिसते आहे, त्याचाही उद्या लय होणार आहे. आणि या सर्व लयानंतर 'मी'च एकटा असणार आहे. कारण त्या नंतरही मला हाच खेळ पुन्हा मांडायचा आहे. म्हणून माझ्याबद्दल कोणतेही एक अंतिम अनुमान काढता येणार नाही.

वस्तू एकच जी प्रतीत बनुनी भासे दुजा चंद्र तो ।

नक्षत्रातिल राहू जो दिसतसे माझ्याच मायेत तो ।।३ ।।

'वस्तू एकच जी प्रतीत बनुनी भासे दुजा चंद्र तो'. 'वस्तू', परमात्मा एकच आहे. आकाशात चंद्र म्हणून जो आपल्या पार्थीव दृष्टीला दिसतो, तो त्या 'वस्तू'चाच विलास आहे. स्वामी समर्थांच्याकडे एक बाई भक्त म्हणून यायच्या. त्या म्हणाल्या, 'मी पंचपात्रात स्वयंपाक करणार आहे.' स्वामी गंमतीने म्हणाले, 'अग, तुला पंचपात्रातील 'वस्तू' माहीत आहे का? पंचपात्राच्या पंचमहाभूतात्मक स्वरूपातील आत जी 'वस्तू' (सदवस्तू) आहे, ती 'वस्तू' माझा अंश आहे." प्रत्येक भूतमात्रातील जे आत्मतत्त्व आहे, ते त्या परमात्म्याचाच अंश आहे. वस्तू अनेक परंतु त्यातील आत्मतत्त्व एकच आहे, पदार्थ निरनिराळे असोत; जसे रसायनशास्त्रातील अनेक मूलद्रव्ये वा संयुगे, सोने, लोखंड असे निरनिराळे धातू, आपल्या अन्नातील निरनिराळे घटक असोत त्यातही 'एकोऽर्विष्णुं महाभूतं पृथक भूतानि अनेकशः ।' असेच असते. खाणारा विष्णू आहे, जे खाल्ले जाते ते विष्णुमयच आहे, ते देणारा व घेणाराही विष्णूच आहे, असे हे विष्णुमय विश्व आहे. तुकाराम महाराज म्हणतात, 'हे विष्णुमय जग'. पण या सर्वातील परमेश्वर एकच आहे. माउली म्हणतात, 'एकतत्त्व नाम दृढ धरी मना'. आपण कधी म्हणतो का की यातला आत्मा आम्हाला दिसत नाही. पण या सगळ्यांचा आत्मा 'मी'च आहे. तो प्रत्येक घटक माझाच अंश आहे. हे सारे सागरातल्या थेंबासारखे आहे. सागर विशाल असला तरी तो थेंबही त्याचीच ओळख (Identity) आहे. सागराची व त्याच्या थेंबाची ओळख एकच. 'वस्तू एकच जी प्रतीत बनुनी भासे दुजा चंद्र तो.' आम्हाला उगीचच वाटत असते की वस्तू वस्तूतील घटकांची ओळख माझ्यापेक्षा / सापेक्ष वेगळी आहे. पण त्यांच्यात 'ते' जे आहे. ते माझ्यातही आहे. या शरीरातील विविध क्रियांचे जे शास्त्र आहे, ते रसायनशास्त्रच आहे. शरीरातील चयापचय हे रसायनशास्त्रच आहे. चंद्रासमोर आरसा धरला तरी दिसणारे प्रतिबिंब हा दुसरा चंद्र नाही हे आपल्याला समजते. 'नक्षत्रातिल राहु जो दिसतसें माझ्याच मायेत तो.' हे सर्व माझ्याच चिद्विलासाचे (मायेचे) खेळ आहेत. हा चंद्र, राहू ही माझीच स्वरूपे आहेत. रामाने चंद्रासाठी हट्ट केला. त्याच्यासमोर आरसा धरल्यावर त्याला त्यात चंद्र दिसला. आणखी आरसे धरले तर कितीतरी चंद्र दिसतील. परंतु मूळ चंद्रस्वरूप एकच आहे, आणि तो 'माझ्या' मायेचा आहे. ही सापेक्षता (Relativity) आहे. विश्वातील सर्व आकाशगंगा, सूर्यमाला ही सर्व माझीच माया, माझीच स्वरूपे आहेत.

जीवीं पंचभूतें प्रवेश करिती देहांस निर्मावया ।

मीही होत परी न होतहि जरी मी खेळवितो तयां ।।४।।

जीवांतील पंचमहाभूतांना खेळविण्यासाठी आणि ही क्रिया कशी घडून येते, येथे गणपतीच्या स्वरूपाचा संबंध येतो. गणपती रक्तवर्णी आहे. निरनिराळ्या प्रकारचे, निरनिराळ्या चरीचे अन्न पोटात जाते. त्यावर होणाऱ्या रासायनिक क्रिया दिसत नाहीत. त्याचे रक्तवर्णी रसायन म्हणजे रक्त तयार होते, ज्यामधे प्राण असतो (प्राणवायू, जिवंतपणा). आणि त्याचा रंग तांबडा आहे, म्हणून ते गणपती स्वरूप आहे. आणि याच गणेश स्वरूपाला ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या सुरुवातीच्या ओव्यांतून वंदन केले आहे. ॐ नमो जि आद्या । वेद प्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरुपा ।। माउलींनी आत्मरूपाचे स्वरूप म्हणून ॐकार वर्णिला आहे. ज्ञानेशांनी आत्मरूपावर ॐकाराचे व ॐकारावर गणेशाचे रूपक मांडले आहे. ओंकारात तीन वर्ण आहेत. अ–ऊ–म्. माउलींनी आडव्या ओंकाराला उभे केले आहे. ॐ मधील दोन वेटोळी व आडवी व उभी रेघ ही गणपतीची बैठक व चौथरा आहे. 'ऊ' हे गणेशाचे उदर आहे. म्हणून 'अ' म्हणजे आसन–बैठक, 'ऊ' म्हणजे उदर आणि 'म्' म्हणजे मस्तक आहे, असा तो श्रीगणेश आहे. 'म्' मधील अर्धा वर्ण म्हणून 'म'चा पाय मोडलेला आहे, तो गणपतीचा पूर्ण दात आहे. गणपतीचे दोन्ही दात पूर्ण नाहीत, 'म्' ने दर्शविलेला पूर्ण दात आहे. तो भक्तिचे स्वरूप दाखवितो. दुसरा जो अर्धा–मोडलेला दात आहे तो अपूर्ण ज्ञान दर्शवितो (बौद्ध मतांचे दार्शनिक स्वरूप). ज्ञान केव्हा पूर्ण होईल? तर ते ज्ञानोत्तर भक्तीनेच पूर्ण होईल, असे हे ओंकार स्वरूप गणेशाचे महत्त्व आहे. याच साठी भागवत संप्रदायात माउलींनी ज्ञानोत्तर भक्ति सांगितली आहे. या ज्ञानात सूक्ष्माचे (समग्राचे) (Micro) व स्थूलाचे (Macro) ज्ञान सांगितले आहे. पण ते भक्तीशिवाय अपूर्ण आहे. अन्यथा वेदांना 'नेतिनेति' असे का म्हणावे लागले असते? ते ज्ञान केव्हा पूर्ण होईल, तर 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्।' या न्यायाने भक्तीचे मूळ श्रद्धा हीच आहे. त्यामुळेच ज्ञानेश्वरीच्या सुरुवातीसच ज्ञानेश्वरांनी गणपतीचे स्वरूपास नमन केले आहे. हा गणपती जीवांच्या रक्तामध्ये प्रगट आहे, आणि त्याला सतत कार्य करायचे असते. श्रीकृष्णाने अर्जुनाला विचारले की, तू तुझे कार्य का सोडतो आहेस? पण माझेही (श्रीकृष्णाचे – ईश्वराचे) कार्य मला कधी चुकत नाही. चिमणी जन्माला घातली की तिच्या चारापाण्याची व्यवस्था करावी लागते. जे जीव माझ्यामुळे जन्माला आले त्यांना प्राण द्यायला पाहिजे ना? ते माझाच अंश आहेत ना? युगानुयुगे मी असा सारखा प्रगट होत असतो. म्हणून संभवामि युगे युगे. उत्पत्ति, स्थिती व लय हे

मीच करीत असतो.

पण 'मीही होत परी न होतहि जरी', म्हणजे मी अलिप्त आहे. मी जसा देहात प्रवेश करतो तसा मी बाहेरही पडतो. म्हणून माझे गुरू डॉ. दीक्षित यांचे गुरू प.पू. काटे महाराज म्हणायचे की, 'तो' आत शिरला की 'शिव' व बाहेर पडला की 'शव', म्हणून 'वस्तू' ही प्राणस्वरूप आहे. म्हणून 'मीही होत परी न होतहि जरी मी खेळवितो तया'. विश्वाचा सगळा कारभार हा माझ्याच सत्तेने चालतो. अन्न खाल्ल्यावर त्याचे चयापचय मलाच बघावे लागते. अन्न खाल्यावर शरीर काय करते? खरे तर अन्न पचविण्यासाठी काहीच करत नाही. हा ईश्वरी खेळ (क्रिया) प्रत्येक सर्जीवाच्या बाबतीत निरंतर चालूच असतो. शरीराचे चलनवलन पोषण, मन आणि बुद्धीचा विकास यातून भक्तिभाव निर्माण होतो.

माझे भक्त मला अतिप्रिय खरे त्यांच्यात आहे सदा ।

जे जे भक्त मला अनन्य शरणी त्यांच्या हरे आपदा ।।५।।

भक्तीमध्ये चित्त हे महत्त्वाचे. श्रद्धा ही चिकित्सेपेक्षा श्रेष्ठ आहे (Heart is superior to Brain). कारण प्रेमाचा अनुभव श्रद्धेनेच येतो. चिकित्सेने येत नाही. बुद्धी चिकित्सा करू शकेल, पण ईश्वरी प्रेमाचा अनुभव श्रद्धेनेच येतो. 'माझे भक्त मला अतिप्रिय खरे त्यांच्यात आहे सदा'. नामदेव, जनाई, चोखोबा हे माझे भक्त माझीच रूपे आहेत. कारण भक्तीने त्यांनी मला आपलेसे केले आहे. म्हणून मी त्यांचा सेवकसुद्धा होईन. नामदेवाशी बोलणारा मीच. त्याच्या बरोबर कीर्तनात नाचणारा मीच. तो उत्तरेकडे गेला तेव्हा मीच त्याच्या खांद्यावरची पताका आणि त्याचे पाय झालो. चोख्याची गुरे राखणारा मीच. जनी संगे दळणारा मीच. सावतामाळ्याच्या मळ्यात पाटातून वाहणारे पाणीही मीच. माझ्या प्रत्येक भक्तांत मीच असतो. त्यांची झोपडी मला वैकुंठापेक्षाही जास्त प्रिय आहे. त्यांनी रागाने दिलेल्या शिव्याही मला गोड लागतात. 'जे जे भक्त मला अनन्य शरणी त्यांच्या हरे आपदा'. या माझ्या भक्तांच्या हृदयीचे शल्य माझ्याखेरीज कोण जाणणार? सांदिपनी हे माझे गुरू असले तरी त्यांची माझ्यावर भक्ती होती, म्हणूनच त्यांच्या सागरांत बुडालेल्या मुलाला मी जिवंत केले. गोरोबांच्या हातून भजनात तुडविला गेलेला त्यांचा मुलगा मीच त्यांना दिला. माझा भक्त सच्चिदानंद याला मला उठवावेच लागले. कारण तो माझ्या ज्ञानेश्वरीचा लेखकु होणार होता. किती सांगु रे भक्तीची उदाहरणे !

त्या भक्ता वश मी स्वये प्रगटुनी नेईन माझ्या पदा ।

जे भासे असते तसा दिसतसे सर्वत्र मी सर्वदा ।।६।।

'त्या भक्ता वश मी', श्रीसाईबाबा (साक्षात ईश्वर) भक्तांना म्हणायचे 'कितीही चतुराई करणाऱ्याला, वादविवाद घालणाऱ्याला, पूर्वपक्ष–उत्तरपक्ष करणाऱ्याला मी उपलब्ध नाही. या बुद्धिवंतांना मी अप्राप्य आहे. मी फक्त श्रद्धेने भक्ती करणाऱ्याला प्राप्य आहे. म्हणून भक्तिमार्ग हा श्रेष्ठ आहे. म्हणून 'त्या भक्ता वश मी स्वये प्रगटुनी नेईन माझ्या पदा.' मामेकं शरणं व्रज । अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि माशुचः । तुझ्या सर्व अडचणी दूर करीन आणि 'तत् धामं परमं मम' । हे आहे, तिथे तुला मी नेईन, जेथून पुन्हा परतणे नाही. म्हणजेच त्याचा जन्म–मृत्यूचा फेरा चुकला. वार्धक्याने आणि माझ्या भागवत धर्माच्या प्रसाराने थकलेल्या नामदेवाला मी त्याच्याच इच्छेप्रमाणे माझ्याच जवळ अढळ स्थान दिले आहे. माझेच 'नाम' घेत शेवट झालेल्या मंगळवेढ्याच्या चोखोबालाही मी पंढरीत माझ्याच समोर अढळ स्थान दिले आहे. अगदी ध्रुव बाळाला दिले तसे. 'जे भासे असते तसा दिसतसे सर्वत्र मी सर्वदा.' प.पू. काटे महाराज म्हणायचे, 'या समोरच्या ग्रंथालासुद्धा मी देव मानतो, कारण तो आहे हे मला स्पष्ट दिसते आहे. त्याच्या मागचे, त्याच्यातील काही दिसत नाही. तरी माझी श्रद्धा आहे की ते जे काही आहे ते 'तत्त्वमसि' हेच आहे. म्हणून ते हेच आहे. 'जे भासे असते तसा दिसतसे सर्वत्र मी सर्वदा'. यालाच ज्ञानेश्वरांनी चांगदेव पासष्टीत 'विश्व आभास' म्हटले आहे. तुम्ही कोठेही मला अन्यत्र न बघता फक्त भक्तीने मला आठवा, मला आळवा. आठवणं आणि आळवणं हे दोन भक्तिमार्ग आहेत. नामदेव मला भक्तीने आठवून आळवत असे म्हणूनच मी त्याच्या कीर्तनात त्याच्या बरोबर नाचत असे. माझ्या आठवणीने विव्हळ झाला तर पोटाशी घेत असे. याच प्रेमाच्या भक्तीने मी जनीच्या शिव्याही खाल्या आहेत.

रक्षी देउन प्राप्य मी कलियुगी अप्राप्यही त्याजला ।

सारे नश्वर सोडुनी मज प्रती माझ्यात जो रंगला ।।७।।

'रक्षी देउन प्राप्य मी कलियुगी अप्राप्यही त्याजला.' कलियुगी हा शब्द अतिशय विपरीत काळ या अर्थाने वापरला आहे. कारण विचार करताना असे लक्षात येते की कलियुगात जे वाईट अनुभव आले, ते पूर्वीच्या द्वापारयुगात, सत्ययुगात आले नाहीत का? पांडवांचा काय आणि किती छळ झाला? श्रीरामाचा किती छळ झाला? म्हणून कलियुगाची जी वैशिष्ट्ये आहेत ती म्हणजे – कलि म्हणजे – negative power

(-ve) खळांची शक्ती आहे. कारण सत्य हे आहे की माझ्या स्वरूपांमध्ये काळंही आहे आणि पांढरंही आहे. काळं संपूर्णपणे नाहीसे होत नाही. कारण अस्तित्वाचा नियम असा आहे की अस्तित्वात येण्यासाठी काळे आणि पांढरे अशी दोघांचीही गरज आहे. हे आपण फोटो पहातानाही समजते. म्हणजे अस्तित्वात येण्यासाठी द्वैत लागते. दिव्याच्या प्लगमध्ये दोन पिना का बसवाव्या लागतात? म्हणून अस्तित्वासाठी +ve श्रद्धा व -ve चिकित्सा, वासना या दोघांचीही गरज आहे. 'मी' त्याची जबाबदारी घेतलेली आहे. 'परित्राणाय साधुनां-विनाशाय च दुष्कृताम् ।' हे 'माझे' आश्वासन आहे. तेथे मी 'विनाशाय च दुर्जनानाम्' असे म्हटलेले नाही. 'दुष्कृताम्' म्हणजे दुष्ट प्रवृत्तितील दुष्कर्मे, कर्मास कारण शक्ती (Energy) धन (+ve) व ऋण (-ve) अशी आहे. प्रवृत्ती ऋण (-ve) असेल तर संहार होईल. कारण शक्ती कशीही वापरता येते. अग्नी हा निरांजन पेटविण्यासाठी वापरता येईल किंवा आग लावण्यासाठीही वापरता येईल. म्हणून आपण म्हणतो की इच्छा शुभ असावी. आपण ज्या वास्तूत रहातो तिचा जर आशीर्वाद हवा असेल तर, 'या वास्तूत माझं वाटोळे झाले' असं स्वप्नातसुद्धा म्हणू नका. नेहमी शुभाचाच विचार करा (Always think Positive), कारण आपलं जे 'सूक्ष्म' मन आहे. त्याभोवती 'अंतरिक्ष' मन आहे. सूक्ष्म मनातील आंदोलने अंतरिक्ष मनात पोहोचतात. वास्तूदेवता असे म्हणते की 'तुझ्या मनात जसे व्हायला हवे तसे होईल. म्हणून ज्ञानेश्वरांनी सर्व साधारण शब्द वापरले – 'जो जे वांछील तो ते लाहो प्राणीजात' म्हणजे ज्याची जशी कामना असेल तसेच त्याला 'हे सर्वात्मका सर्वेश्वरा' दे. आणि तोही तसेच देतो. या सर्व ठिकाणी ईश्वराचे अस्तित्व आहे हे विसरता येणार नाही. 'अप्राप्यही त्याजला', 'योगक्षेमं वहाम्यहम्' म्हणजे काय? योग म्हणजे अप्राप्य वस्तूची प्राप्ती. आम्हाला अप्राप्य काय आहे? सर्व काही बाजारात मिळते. पण ईश्वर मात्र मिळत नाही. ईश्वराचा स्पर्श, ईश्वराची कृपा, ईश्वरी सत्तेचे ज्ञान हे सर्व आम्हाला मिळत नाही. या गोष्टी अप्राप्य आहेत. ईश्वर म्हणतो, 'माझी भक्ती केलीस तर 'श्रद्धावान लभते ज्ञानम्' तुमची माझ्यावर अशी श्रद्धा आहे का? श्रद्धा असेल तर मी ज्ञान देतो. आणि ज्ञान देणे याचा अर्थ अज्ञान घालविणे. कारण ज्ञान असतेच. इवल्याशा मुंगीला साखरेचे ज्ञान कसे असते? फक्त अज्ञानाचे शेवाळे त्यावर साठले तर मात्र अविद्या. बाबांनी छान सांगितलं आहे. गुरूचे काम काय? 'उपदेश्यन्ति तेऽज्ञानम्' याचा भक्तांनी अर्थ काढला की 'गुरू ज्ञानाचा उपदेश करीत आहेत. तसे नाही. नीट पाहिले की लक्षात येते की 'उपदेश्यन्ति तेऽज्ञानम्' म्हणजे उपदेश्यन्ति ते अज्ञानम् । गुरू अज्ञान काय आहे याचा उपदेश करतात. ज्ञान आपोआपच प्रगट होते. जणू काय सूर्यावर काळा ढग

आलेला आहे. पण सूर्य प्रकाशस्वरूपच आहे. अज्ञानाचा काळा ढग निघून गेला की स्वयंभू ज्ञान प्रकट होतेच. म्हणून सद्गुरूंचा उपदेश अज्ञानाशी संबंधित आहे. ज्ञान हा बोलण्याचा विषय नाही. ते समजून घ्यावे लागते. 'रक्षी देऊन' म्हणजे हे जे ईश्वरी सत्तेचे ज्ञान आहे, ती अप्राप्य वस्तू मी तुम्हाला देतो, म्हणजे अज्ञान घालवितो. ही अप्राप्य 'वस्तू' मिळालेली जपलीही पाहिजे. म्हणून देण्याबरोबरच संरक्षणाचीही व्यवस्था 'त्याला'च करावी लागते. म्हणून 'क्षेम'. हे झाले 'योगक्षेमं वहाम्यहम्' मी तुला क्षेम देतो आणि तुझे कुशल राहील हेही पाहतो. ही जी कुशल सत्ता आहे ही आहे 'रामाची कौसल्या'. कौसल्या हे नाव कसे आले ते लक्षात ठेवणे जरूर आहे. 'योगकर्मः तु कौशलम्' आणि हे जे कौशल्य, कुशलता आहे ती म्हणजे रामाची 'आदिमाया', म्हणजे कौसल्या. ही आदिमाया असल्याशिवाय शिवही कार्य करू शकत नाही. पार्वती ही आदिमाया आहे म्हणून शिव कार्य करू शकतो. ही सर्व माझी माया आहे हे त्या 'वस्तू'चे सांगणे आहे. ही जी आदिमाया कौसल्या आहे, तिचे बळ मी तुम्हाला देतो आहे. मी पुरुष आहे, परंतु मी परप्रकाशित आहे. मी स्वयंभू नाही. त्या आदिमायेच्या प्रकाशात मी कार्य करतो. कारण मी अलिप्त साक्षी आहे. आणि ते कार्य आहे अप्राप्य 'वस्तूची' प्राप्ती आणि तिचे संरक्षण म्हणून 'योगक्षेमं वहाम्यहम्' आणि माझे हे कार्य निरंतरचे आहे. जीवाला जन्म द्यायचा, त्याचं पालनपोषण करायचे, त्याला वाढवायचे, आणि त्याचे क्षेम संपले की संपवायचे. हेच माझे विश्वाच्या उत्पत्तीपासूनचे कार्य. 'सारे नश्वर सोडुनी मज प्रती माझ्यात जो रंगला.' तो माझा भक्त माझ्यात रंगला म्हणून मी 'श्रीरंग', 'श्याम रंगी रंगेल मन' किंवा 'रामरंगी रंगले मन'.

नित्यानित्य विवेक ज्ञान घडवे वैराग्य 'श्री' दर्शन ।
परमात्म्यांत विलीन लीन बनवे मम नाम संकीर्तन ।।८ ।।

'नित्यानित्य विवेक ज्ञान घडवे वैराग्य 'श्री' दर्शन'. माउली सांगतात, विवेक आहे, नित्य काय, अनित्य काय, नश्वर काय, ईश्वर काय हे मला समजले. अज्ञानाचे मळभ नाहीसे झाले की नश्वर काय, ईश्वर काय याचा बोध होतो. नश्वर काय हे समजले की ईश्वराचा बोध होतो. आपल्या कर्मकर्तव्याला बाधक ठरणाऱ्या देहाच्या आसक्तीचा त्याग म्हणजे वैराग्य, हे समजणे(बोध) म्हणजे विवेक. म्हणून विवेक आणि वैराग्य ही जोडी महत्त्वाची. वैराग्य हे विवेकयुक्त असले पाहिजे. ज्ञानेश्वरीतून माउलींनी हाच विवेक जागा केला. भागवत धर्म हा प्रवाहपतितांचा धर्म नाही. अंधश्रद्धेला यात जागा नाही. या धर्मात आहे फक्त डोळस विवेक. हा विवेक ज्ञानाचे परिशीलन, संवर्धन करतो.

फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी ।

देखो आवडे ते खाणी । ब्रह्मविद्येची ।। ज्ञा. १३.११६०

तैसे वैराग्यांची शिंव न देखती । जे विवेकाची भाषा नेणती ।

ते मूर्ख केंवीं पावती । मज ईश्वरातें ।। ज्ञा. ४.२५

योग्यायोग्याची निवड करण्याच्या मनाच्या, बुद्धीच्या शक्तीला विवेक म्हणतात. 'वैराग्य 'श्री' दर्शन', म्हणजे Detachment अलिप्तता, निवृत्ती आणि या पूर्ण अलिप्ततेतून प्राप्त होते ईश्वर दर्शन. ज्ञानेश्वर कसे आहेत हे ओवीच्या पुढील भागातून समजेल. 'परमात्यात विलीन लीन बनवे मम नाम संकीर्तन'. ज्ञानेश्वर विरागी आहेत, विभूति आहेत, कारण ते विवेकी आहेत. खरा ईश्वर काय आहे हे त्यांना पूर्ण ठाऊक आहे. हाच नित्यानित्यचा विवेक आहे. माउलींचे वैराग्य कसे आहे? ते आहे Total Detachment, Total Withdrawal संपूर्ण अलिप्तता, संपूर्ण साक्षित्व. मी ज्या कार्यासाठी ज्ञानेश्वर हा अवतार धारण केला, ते कार्य मी पूर्ण केले. माझे विहित कार्य पूर्ण झाले, कार्याची परिपूर्ती झाली. आता मी माझ्या मूळ स्वरूपात विलीन होतो. आणि विलीन होण्यासाठी लीन असले पाहिजे. ही माउलींची नम्रता किती आहे पहा. अगदी नेहमीचे रूपक घेऊ. पाण्यात लव्हाळे असते. ते जर न वाकता ताठ राहिले तर पाण्याच्या प्रवाहात विलीन होईल. पण ते प्रवाहाप्रमाणे वाकते म्हणून टिकते. तसे लीन असावे. माउलींची नम्रता अशीच आहे? ते लीन आहेत, भगवंताला नामस्मरणाने त्यांनी ध्याईले आहे. सर्वेश्वर, श्रीगुरू, त्यांचे श्रोते, संतमंडळी यांचे समोर ते लीन आहेत. 'परमात्म्यात विलीन लीन बनवे मम नाम संकीर्तन'. नाम संकीर्तनाच्या भक्तीचे टप्पे तरी काय आहेत? फक्त 'तो' आहे असे म्हणा. 'तो' आहे असे माना आणि सतत 'त्याचे' नाम घ्या.

निरीश्वरवादी लोक ईश्वराला मानायलाच तयार नाहीत. ते या सगळ्याला खोटे म्हणतात. ते शक्तीला खोटे म्हणत नाहीत. ते प्रतिमेला खोटे म्हणतात. राम, कृष्ण वगैरे काहीही नाहीत. आपण ते बरोबर आहेत असे मानूया. राम, कृष्ण नाहीत. पण मूळ शक्तिस्वरूप या नावाने काही आहे ना ! तीच शक्तिस्वरूप सत्ताधारी आहे. देवांची बुजगावणी करणाऱ्यांना या अंधश्रद्धेचा विरोध आहे, आणि त्यातून फसवणूक करणाऱ्यांचा. पण देवांच्या या बुजगावण्यांना तुम्ही विचारी कसे फसलात? त्यांनी तुम्हाला फसवले म्हणून तुम्ही देव मानीत नाही का? पण देव आहे. या विश्वाच्या मागे कोठली तरी शक्ती आहे हे तर मान्य करा. तुमचा विरोध आहे तर शक्तीला राम, कृष्ण म्हणू नका. तुम्हाला जे हवे ते म्हणा. परंतु, त्या शक्तीचे कार्य तुम्ही कसे नाकारू

शकता? झाडाला खत पाणी दिले, काळजी घेतली की त्याला फळे, फुले येतात. अन्न खाल्ले की त्याचे रक्त, पेशी बनतात हे ही नाकारता का? पण हे कार्य कोणती तरी शक्ती करीत आहे. ती Energy, तिला आम्ही आदिशक्ती म्हणतो, तिला तुम्ही का मानीत नाही? हाच मुळातला वाद आहे. म्हणून श्रद्धा काय आहे, अंधश्रद्धा काय आहे याचा विचार करावा. मुळात अंधश्रद्धा हा शब्द प्रयोगच चुकीचा आहे. आमची श्रद्धा हा अनुभव आहे. झाडाला फळे, फुले आली, म्हणजे हे कार्य कोणीतरी करीत आहे. त्याच्या मागे कोणती तरी शक्ती Energy आहे. ही श्रद्धा अनुभवावर आधारलेली आहे. गुलाबाचे रोप लावले, खतपाणी घातले तर सुंदर फुले येतात, आंब्याला रसाळ आंबे येतात. मग हे कार्य कोणती तरी अदृश्य शक्ती करते ना? एवढेच फक्त मान्य आहे असे म्हणा. [१] रामदासांच्या दासबोधात आहे की 'सद्गुरू, तू जसा असशील तसा असशील, पण तू आहेस. तू कसा आहेस हे आम्हाला अजून कळलेले नाही. पण तू आहेस हे नक्की. आणि तू सारखी तुझी चाहूल आम्हाला दाखवीत असतोस.' मग ते नाकारण्यात काय अर्थ आहे? पण 'तू' कसा आहेस याबद्दलचा वाद चालू आहे. निरीश्वरवादी म्हणतात तू तसा नाहीस. हा भोंदू यांत्रिक जो आहे, त्याने दगड धोंडे मांडले आहेत, आणि तो म्हणतो की हे देव आहेत. पण ते देव नाहीत. कारण आपल्याला तसा अनुभव आलेला नाही. पाणी प्यायल्यावर तहान भागते. पाण्याची तहान इतर पेये प्यायल्याने भागत नाही. पण जेव्हा आपण निर्मळ थंड पाणी पितो तेव्हा आपली तहान भागते. मग ही तहान भागते, भूक भागते, या मागे कोणीतरी आहे, कोणती तरी शक्ती आहे, एवढे तरी मान्य व्हावे. तो यांत्रिक फसवतो आहे व या शक्तीचे काही तरी खोटं रूप दाखवतो आहे. त्याला तुम्ही शिव्या घाला. पण ती शक्ती नाहीच, 'त्याला' त्या 'शक्तीला' मोडीत काढा ही भाषा अज्ञानाची आहे. त्याला जाणायचे असेल तर नामसंकीर्तन हाच एकमेव उपाय आहे.

बुद्धी जाणत आत्मतत्त्व म्हणूनी 'नेऽति'च माझ्या प्रती ।
यत्नासी करिता विचार करूनी लागेल का संगती? ।।९।।

'बुद्धी जागत आत्मतत्त्व म्हणूनी 'नेऽति'च माझ्या प्रती' । ज्ञानाच्या मार्गाने वेदांच्या मार्गाने आम्ही गेलो आणि लक्षात आले की हे 'ते' नाही, हेही 'ते' नाही. असे करीत Theory of Elimination गाळणी पद्धतीने गेलो तर याला शेवट नाही. आमची जाणीव एवढीच की 'ते' विश्वाचे चैतन्य आहे. त्याचाच अंश

---

१. वै. बेलसरे के. वि., सार्थ श्रीमत् दासबोध

माझ्यात आहे, सर्वात आहे, म्हणून –

'डोळ्याने बघतो, ध्वनी परिसतो, पायी परी चालतो ।
जिव्हेने रस चाखितो मधूर तो, वाचे आम्ही बोलतो ।
हाताने बहुकाळ काम करितो, विश्रांती ही घ्यावया ।
घेतो झोप सुखे, फिरोनी उठतो, ही ईश्वराची कृपा ।'

म्हणजे 'तो' कृपाळू, दयावंत आहे, दया स्वरूप आहे. हे सगळे मी करतो आहे. पण आत चैतन्य आहे म्हणून करतो आहे ना ! हे चैतन्य सोडून गेले तर मी काहीच करू शकणार नाही. आणि मग असे जर आहे तर माझ्या बुद्धीला एवढे जर कळले की जे आत्मतत्त्व आहे, ते माझ्यात आहे. आणि मग मी श्रद्धेने त्याला आवाहन करून, त्याला शरण गेलो की 'त्याच्या' शिवाय मी नाही. हे झाले तर अहंकार संपला, अज्ञान संपले, आणि भक्ती निर्माण झाली. भक्ती म्हणजे प्रेम, निष्ठा, आणि शेवटी काय, आनंद अगदी ब्रह्मानंद. हा ब्रह्मानंद, हे प्रेम निष्ठेत आहे. चिकित्सेत नाही. नात्यातील भावनेत प्रेम, आनंद असतो. कारण तो आनंद प्रेम – स्वरूप असतो. ज्ञानेश्वर प्रेम – स्वरूप आहेत. तुकाराम, नामदेव, रामदास हे सर्व संत प्रेमस्वरूप आहेत, प्रेमावतार आहेत. प्रेमाचा हा आनंद मला चिकित्सेने कसा येईल? या प्रेमाचा आनंद, अनुभव मी माझ्या हृदयातूनच घेतो. जिव्हाळ्याने मनापासून प्रेम केले, जीवाला जीव लावला म्हणजे काय केले? आनंदच दिला ना ! तुमच्यात ब्रह्मचैतन्य आहे, जीव आहे. तुमच्यातील शिव व माझ्यातला शिव एक झाले की जीवाशिवाची भेट. या जीवाशिवाच्या भेटीत प्रेमानंद आहे. आणि प्रेमानंद का तर ते जे मूळ प्रेमस्वरूप आहेत त्यांची सत्ता आणि जाणीव म्हणून हा आनंद आहे. ती सत्ता नाही मानली तर ती काही शाप देत नाही. ती म्हणते नको मानूस. तुझ्या मागण्या न मागण्यावर माझे कार्य मी थांबवणार नाही. थोडक्यात जेथे मन अज्ञानावर आणि चिकित्सेवर आधारलेले आहे, तिथे प्रेम नाहीसेच होते. आणि नुसते प्रेम नाहीसे होत नाही तर तिथे भय निर्माण होते. जिथे भय आहे तिथे प्रेम नाही. आणि जिथे प्रेम आहे तिथे भय नाही. मला तुम्हाला भेटावेसे वाटले तर मी कधीही येईन. आधी भेटीची वेळ (Appointment) का नाही घेतली वगैरे औपचारिकता (Formalities) नाही. मला वाटले तुम्हाला भेटावे, मी आलो. हा प्रेमाचा अनुभव आहे. या प्रेमाच्या अनुभवाला नियम आणि अटी (Terms and conditions) नाहीत. या नियम आणि अटी बौद्धिक अनुभवाला असतात. प्रायोगिकता (Laboratory) नियंत्रितता (conditioning) करावी लागते. प्रेमाला ही

नियंत्रितता नाही. 'बुद्धी जाणत आत्मतत्त्व म्हणून 'नेऽति'च माझ्या प्रती' । फक्त बुद्धीनेच विचार करायचे ठरवले तर काय होईल माणसाचे? 'यत्नासी करिता विचार करून लागेल का संगती?' व्यालेल्या कुत्रीच्या पिलांना हात लावू गेले तर ती चवताळून अंगावर येते. याची काय संगती आहे? तर तिचे त्या पिल्लांवर प्रेम आहे म्हणून ती अंगावर धावून येते. ईश्वरासंबंधी सारखा सारखा विचार करून ईश्वर समजत नाही. म्हणून शंकरमहाराजांनी उपदेश केला आहे की 'विचार प्रक्रिया थांबवा' विचार हे ईश्वर प्राप्तीचे साधन नाही, ईश्वर दर्शनाचे साधन नाही. पृथक्करण (Analysis) हे उपयोगी नाही. पृथक्करण करून काय करणार? योगेश्वर[१] (योगानंदांचे गुरू) म्हणायचे की ईश्वराला परीक्षानळीत घालून ईश्वर समजेल का? शास्त्रीय प्रयोगांनी समजेल का? शास्त्रज्ञांनी हे मान्य केले आहे की आम्हाला जे ज्ञात झालेले आहे त्याच्या पलीकडचे आम्हाला समजलेले नाही, कळलेले नाही. म्हणून 'यत्नासी करित विचार करून लागेल का संगती?'

श्रीमद् भागवता करून श्रवण लाभास घ्यावे मम ।
हेची साधन भक्तीचे करितसे माझा तुझा संगम ।।१०।।

'श्रीमद्भागवता करून श्रवणा लाभास घ्यावे मम' । भागवताचे नित्य श्रवण करा आणि माझा लाभ घ्या. नवविधा भक्तींपैकी श्रवण ही एक भक्ती आहे. 'हेची साधन भक्तीचे करितसे माझा तुझा संगम' । माझे आणि तुझे मीलन, जीवाशिवाची भेट केवळ भक्तीनेच होईल, म्हणून 'राधा-कृष्ण', 'नामदेव-विठ्ठल', 'विठ्ठल-तुकाराम'.

जेथे भक्ती आनंद उत्सव असा भजण्यास पुरुषोत्तम ।
तेथे येत असे स्वयें त्यजुनिया जे धाम परमं मम ।।११।।

भगवंत म्हणतात जेथे माझे भक्त माझे कीर्तन करीत असतील तेथे मी निश्चित असेन. शंकरमहाराज म्हणायचे जेथे माझे सामगायन चालू असेल तिथे मी असेन. श्रीकृष्णाचा वेदातील सर्वात आवडता वेद म्हणजे सामवेद, कारण त्यात नामाला सुरांची जोड आहे. आणि सूर म्हणजे मूळ ओंकारनाद. त्या मूळ ओंकार नादाला तुम्ही नामाच्या अक्षरांची जोड दिली की तिथे आनंद निर्मिती आली. म्हणून म्हणतात ' मी आनंदमय आहे, प्रेमरूप आहे. मी सत्यम् आहे, मी शिवम् आहे, मी सुंदर आहे. अशा रितीने भगवंतांनी 'मी' कोण आहे, माझी भक्ती का करावी हे सांगितले. हाच भक्तिसंप्रदाय आणि हाच भक्तिसंप्रदाय ज्ञानेश्वरांनी

---
[१]. श्री परमहंस योगानंद : योगी कथामृत

नामदेवांना वाढवायला सांगितला आणि त्याचा धर्म म्हणजे 'भागवत धर्म'.

'ईश्वरनिष्ठांची मांदियाळी' हा ज्ञानदेवांचा संकल्प होता. ईश्वरनिष्ठांची मांदियाळी व्हावी म्हणून ते कार्य पुढे त्यांनी नामदेवांना सांगितले. त्यांच्या मनात असे असेल की ज्ञानेश्वरी सांगितली, अमृतानुभव सांगितला, चांगदेव पासष्टी सांगितली. अद्वैत व चिद्विलास सांगून भागवत धर्माला चेतनेचे नवं रूप दिले. आता ही भागवत धर्माची पताका तू पुढे चालव, ज्याच्याकडे हे कार्य सोपवलं त्याचं नाव नामदेव आहे. म्हणजे नामसंकीर्तन. हा जो वारकरी संप्रदायाचा मूळ मंत्र आहे किंवा उपासना – पद्धती आहे त्यामध्ये नाम आहे आणि तो देव म्हणजे ईश्वरस्वरूप आहे. नाम आणि देव या दोघांचाही संगम नामदेवाचे नावात आहे. म्हणून तोच योग्य संत आहे. त्याने ज्ञानेशांना उत्तरेकडे जाण्याचा शब्द दिला आहे. आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे नामदेवाला चराचरात असलेला जो देव आहे, ज्याबद्दल ज्ञानेश्वर म्हणाले की 'तुज सगुण म्हणू की निर्गुण रे' आणि हा जो सगुणातही आणि आणि निर्गुणातही आहे त्या देवाचं दर्शन, विश्वात्मक देवाचं दर्शन, जे ज्ञानदेवांनी घेतलेले आहे, ते नामदेवांना विसोबा खेचरांकडून मिळाले. म्हणून ज्ञानदेवांचा हा ज्ञानोत्तर भक्तीचा वारसा पुढे नामदेवांनी चालविला. भागवत धर्माची गुढी उभारली व ती हातात घेऊन भागवत धर्माचे प्रचारकार्य ज्ञानोबांच्या संकल्पाप्रमाणे केले.

## ईश्वरनिष्ठा आणि ईश्वरदर्शन

भागवत धर्माचे दोन स्तंभ म्हणजे ज्ञानदेव आणि नामदेव. ज्ञानोत्तर भक्ती हा ईश्वरी उपासनेचा पाया आहे. भक्तीच्या शक्तीनेच हृदयाचे दार उघडले जाते व त्यामध्ये भगवंत आपला निवास करतो व म्हणतो, 'नाहं वसामि वैकुंठे'. सगुण निर्गुण देवाचा साक्षात्कार म्हणजेच 'स्व'रूपाचे ज्ञान (निजबोध) याविषयी जी पूर्वपिठिका सांगितली आहे त्यातून ज्ञानेश्वर माउलीचे विभूतिदर्शन आणि भागवत धर्माचे स्वरूप स्पष्ट होण्यास मदत होईल. त्याचा सारांश पुढीलप्रमाणे देता येईल.

ज्ञानेश्वरांचे तत्वज्ञान त्यांच्या जीवनविषयक दृष्टीवर आधारलेले आहे. सदगुरू निवृत्तिनाथांनी आपणास परमानंदपदी स्थित केले अशी कृतज्ञता ज्ञानेश्वर निवृत्तीचरणी व्यक्त करतात. परंतु हा परमानंद मी एकट्यानेच भोगावा काय? असा प्रश्न औदार्याने निर्माण करतात व सदगुरूंना विचारतात. परमानंद जगाला वाटण्यासाठी ग्रंथरचना केली. हरीकिर्तन पूर्ण केले. त्यासाठी तत्त्वचिंतनातून तत्त्वानुभूती ज्ञानेश्वरांना झाली होती. त्या अनुभवातून त्यांनी जीव जगत व परमात्मा यांची रूपे कथन केली आहेत. त्यांचा भागवतधर्म व

सद्धर्माचरण ज्ञानोत्तर भक्तीमध्ये स्थिर झालेले आहे.

ज्ञानेश्वरांचे चिंतन आत्मानुभूतीवर आधारलेले आहे. तत्त्वज्ञानदृष्टया ज्ञानेश्वरीपेक्षा अमृतानुभव हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. कारण तो टीकाग्रंथ नाही किंवा दुसऱ्या ग्रंथातील चिंतनावर आधारलेला नाही. तो स्वयंप्रकाशित स्वयंभू आहे. तो तर्क आणि स्वानुभवावर आधारलेला आहे. अमृतानुभवात इतर मतांचे (वादांचे) प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष खंडन केले आहे. (उदा. बौद्धांचा विज्ञानवाद, शून्यवाद आणि केवलाद्वैताचा अज्ञानवाद.) ज्ञानेश्वरांचे चिंतन व तत्वज्ञान निरुपण सांप्रदायिक व खंडित वा भेदाभेदी नाही कारण त्यांचा स्फूर्तीवाद स्फुरण किंवा स्फूर्तीतून म्हणजेच परमात्म्याच्या स्फुरणातून निर्माण होतो. सोन्याने सोन्याचे अलंकार घालावेत किंवा जलाने आपल्या लाटां अंगावर घ्याव्यात तसे अलंकारयुक्त व कल्लोळयुक्त स्फुरण शक्ती म्हणून ज्ञानेश्वरांच्या आत्मानुभवाच्या निरुपणामागे आहे. हा स्फूर्तीवाद म्हणजे चिद्विलास होय. तो 'स्व'तंत्र व उत्स्फूर्त (sponteneous) आहे. जगात परमात्म्याखेरीज काहीच नाही, सगळीकडे परमात्माच आहे असा ज्ञानेश्वरांच्या स्फूर्तीवादाचा आशय आहे. परमात्मा ही अंतीम सत्ता आहे पण ती प्रेमसत्ता आहे. परमात्मा सिद्ध करताना प्रत्यक्ष, अनुमान इत्यादी कोणत्याही प्रमाणांची गरज नाही. योगियांना दुर्लभ असलेल्या परमात्म्याच्या सत्तेचा व कृपेचा अनुभव आणि दर्शन ज्ञानेश्वरांना स्वत:ला आलेला आहे.

'सत्ता अंतिम मी' असे ज्ञानेश्वर स्वत:बद्दलच सांगतात असे म्हणता येईल. 'उपदेश्यंती तेऽज्ञानं ज्ञानीनं तत्वदर्शीन:' या भगवद्गीतेतील उक्तीप्रमाणे विभुतीरूप ज्ञानी, तत्वदर्शी महापुरुष ज्ञानदेव पूर्णाद्वैत दृष्टीने व काव्यात्मक रसिकतेने जग ही परमात्म्याची प्रभा आहे असे विश्वाचे वर्णन करतात. अज्ञान हे जगताचे कारण आहे. या कारणकल्पनेची चिकित्सा व कल्पनाविलासातून तिचे काव्यालंकारयुक्त वर्णन निरनिराळे युक्तीवाद करून केले आहे. ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवात जग 'काय नाही' याचे अज्ञानखंडन झाल्यावर सिद्धांत मांडला की जग ही परमात्मस्फूर्ती आहे. हे सगळे निरुपण उपमा, उत्प्रेक्षा व दृष्टांतांनी समृद्ध आहे. तत्वज्ञानी ज्ञानेश्वरांचे कवीमन स्वत:चे भावविश्व समर्थपणे उभे करते.

ज्ञानेश्वरांनी भावार्थ दीपिका लिहून भगवद्गीतेचा गौरव वाढविला. भावार्थ दीपिका या ग्रंथाने गीतेला प्राकृत भाषेत अलंकार चढविला गेला. अलंकाराने हाताला शोभा आली, त्यापेक्षा जास्त शोभा अलंकाराला हाताने आली असे झाले. ही ज्ञानेश्वरांच्या असामान्य विभुतिमत्त्वाची ताकद आहे. आई मोठी की अपत्य मोठे? ज्ञानेश्वर 'माऊली' मोठी , तिचे आईपण मोठे. तिचा प्रेमाविष्कार उदंड (विश्वात्मक) व या प्रेमसत्तेचा

परिणाम म्हणूनच - भावार्थदीपिका (ज्ञानेश्वरी), अमृतानुभव, चांगदेव पासष्ठी अशा त्रिकालाबाधित व अपूर्व भाषासौंदर्याने नटलेल्या, अलंकारिक, क्रांतिकारक, स्वयंभू व 'स्व'तंत्र धार्मिक ग्रंथांची ज्ञानेश्वरांसारख्या अवतारी पुरुषाकडून निर्मिती झाली.

एक गुरु एक शिष्य या ज्ञानसाधनेच्या नवनाथपंथीय संप्रदायाची चौकट ज्ञानेश्वरांनी मोडली व गुर्वाज्ञेने ज्ञानभांडार सर्वसामान्य जनांना ज्ञानोत्तर भक्तीचे भांडार खुले केले ही अभूतपूर्व घटना ज्ञानेश्वरांसारख्या विभूतिकडूनच घडू शकते. विष्णु-शंकर-विष्णु-शंकर-विष्णु-शंकर-विष्णु या दैवी परंपरोतील शेवटचे अवतार -विष्णु-शंकर-विष्णु म्हणून ज्ञानेश्वर जन्माला आले. विष्णु म्हणजे सर्व विश्वाला व्यापून दशांगुळे उरणारे ब्रह्मचैतन्य होय. या चैतन्य शक्तीचा साक्षात्कार ज्ञानेश्वरांनी ईश्वर उपासकांना घडविला व भगवद्गीतेला नवीन प्रतिष्ठा मिळवून दिली.

वैदिक हिंदू धर्माच्या परंपरेमध्ये भागवतधर्माचा आधारभूत ग्रंथ भगवद्गीता हा मानला गेला आहे. परंतु भगवद्गीतेचे हे प्रामाण्य वेदांपेक्षा दुय्यम मानले गेले. ही परंपरा गीताभाष्यकार शंकराचार्य यांच्यापर्यंत वेदांपेक्षा गीतेला दुय्यम प्रामाण्य मानून चालली. 'भाष्यकारातें वाट पुसत' जरी ज्ञानेश्वरी लिहिली गेली तरी भाष्यकारांची श्रुति स्मृति विषयक प्रमाण पद्धती ज्ञानेश्वरांनी अमान्य केली. इतर अनेक महत्त्वाच्या मुद्यांवरही ज्ञानेश्वरांनी शंकराचार्यांचे विचार मान्य केले नाहीत. अंतिम श्रेष्ठ ज्ञानसाधन म्हणून संन्यासाश्रमाचा शंकराचार्यांनी पुरस्कार केला तसा ज्ञानेश्वरांनी केला नाही तर 'श्रद्धावत् लभते ज्ञानम्' या तत्त्वानुसार श्रद्धा व ज्ञानोत्तर भक्ती मार्गाचा पुरस्कार केला. भक्ती ही ज्ञानाचे साधान म्हणून शंकराचार्यांनी मान्य केली पण अंतिम निष्ठा म्हणून नव्हे. ज्ञानेश्वरांनी ज्ञानमय भक्ती, अद्वैत भक्ती, किंवा परम भक्ती म्हणून भक्ती ही अंतिम निष्ठा म्हणून स्वीकारली. त्याचप्रमाणे त्यांनी दृश्यविश्व हे चैतन्याची लीला, ईश्वरूप दृश्यविश्व (विश्वात्मक देव) हे परमार्थ सत्य असा अखेरचा सिद्धांत प्रस्थापित केला. भगवद्गीता हा भारतीय विद्यांचा अंतिम विकास (वेदांचे मूळ) होय असे मानले. गीतेमध्ये वेदांचे सारसर्वस्व सामावले आहे व त्यामुळे वेदांचे प्रयोजनच संपले आहे. वेदातील कर्म, उपासना, व ज्ञान ही तीनही साधने गीतेमध्ये सांगितली आहेत. म्हणून गीता हे वेदांचे बीज होय. ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात ज्ञानेश्वर म्हणतात.

तरि झड्झडोनि वहिला निघ । इथे भक्तिचिये वाट लाग ।

जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ।। ज्ञा. आ. ९.५१६

भक्ती हे साधन नसून साध्यही आहे. इतर सर्व मार्गातील उत्तम गोष्टी भक्तिमार्गाने सुलभ होतात. योगातील चित्ताची एकाग्रता, कर्मातील चित्तशुद्धी व ज्ञानातील ऐक्यानुभव या सर्व गोष्टी भक्तीने साध्य होतात. कर्म वैराग्य ज्ञान व भक्ती या क्रमयोगाच्या एकाहून एक वरच्या पायऱ्या आहेत. ज्ञानेश्वरांची भक्ती म्हणजे ज्ञानरूपी भक्ती होय.

म्हणून ज्ञानेश्वर म्हणतात –

तूं मन हें मीचि करीं । माझां भजनीं प्रेम धरीं ।

सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ।। ज्ञा. आ. ९.५१७

[१]या मृत्युलोकांच्या रहाटीतून झटकन मोकळा हो आणि या भक्तीच्या मार्गाला लाग, की त्या भक्तीच्या योगाने माझे निर्दोष स्वरूप पाहशील. तू आपले मन मद्रूप कर माझ्या भजनाच्या ठिकाणी प्रेम घर आणि सर्व ठिकाणी माझेच स्वरूप आहे असे समजून मला एकाला नमस्कार कर. सर्व संकल्प जाळून माझे भजन करणारा माझा भक्त मद्रूप आहे.

विभूतीस्वरूप ज्ञानेश्वरांच्या या अलौकिक कार्याचे श्रेय ज्ञानेश्वरांना देताना लो. टिळक गीता रहस्यात म्हणतात –

[२]''भाष्यकाराते' (शंकराचार्यास) वाट पुसत आपण आपली गीतेवरील टीका रचली असे जरी ज्ञानेश्वरांनी आपल्या ग्रंथामध्ये म्हटले तरी गीतेचा अर्थ अनेक सरस इष्टांतांनी खुलवून सांगत ज्ञानेश्वरांनी अलौकिक शैलीत शंकराचार्यांपेक्षा विशेषतः भक्तिमार्गाचे व काही अंशी निष्काम कर्माचेही समर्थन केले आहे.''

ज्ञानेश्वरांनी पराभक्तीच्या सर्वोच्च अनुभवातून अंतिम सत्याचे – विश्वात्मक देवाचे दर्शन घेतले आहे. परमात्म प्रेम निष्काम स्वधर्माचरणातून अनुभवणे हे सर्वाहुन श्रेष्ठ होय. या अपारंपारिक स्वयंभू स्फूर्तिविलासातूनच भागवत धर्माचा 'ज्ञानदेवे रचिला पाया' हा पाया सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी रचला गेला. तरी परंपरागत

---

१. वै. दांडेकर शं. वा., सार्थ ज्ञानेश्वरी, पान २८१

२. लो. टिळक बा. ग., 'श्रीमत् भगवतगीता रहस्य', विषय प्रवेश, पान १७

भागवत धर्मात काय वगळावे (उदा. कर्मकांड) आणि नवीन काय आणावे याचा बोध व शोध ज्ञानेश्वरांच्या ग्रंथसंपत्तीत अवगाहन केले असता सिद्ध होतो. याला कारण म्हणजे एक श्रेष्ठ योगी, तत्त्वज्ञानी, तत्त्वानुभवी व रसिक कवि म्हणून ज्ञानेश्वरांनी जिचे दर्शन घडविले ती विशाल जीवन दृष्टी होय. म्हणून विभूतिस्वरूप ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास हा इतर सर्व प्रकारच्या व्यासंगापेक्षा श्रेष्ठ व श्रेयस्कर आहे.

# ज्ञानेश्वर जीवन (पूर्वार्ध)

ज्ञानेश्वरादि भावंडांच्या जीवनक्रमाकडे पाहताना किमान दोन पिढ्या मागे पहाव्या लागतात. एक त्यांचे आई-वडील रुक्मिणी-विठ्ठलपंत व आपेगावचे विठ्ठलपंतांचे आई-वडील गोविंदपंत-निराबाई व रुक्मिणीचे आई-वडील श्री सिद्धोपंत अथवा सिधोपंत-उमाबाई. वास्तविक याबद्दल अनेक इतिहासतज्ञांनी व चरित्र - लेखकांनी खूप लिहून ठेवले आहे. ज्ञानेश्वरादि भावंडे, त्यांचे आई-वडील व दोन्हीकडील आजोबा-आजी यांच्याबद्दलची माहिती प्रायत: संतनामदेवांचेच अभंगातून मिळाली आहे. नामदेवांनी आपल्या गाथेतील पुढील भागात ही माहिती दिली आहे.

[१]१) श्री ज्ञानेश्वरमहाराजांची आदि

२) श्री ज्ञानेश्वरमहाराजांची तीर्थावली,

३) श्री ज्ञानेश्वरमहाराजांची समाधी,

४) श्री ज्ञानेश्वर समाधीमहिमा,

५) श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या भेटीविषयी श्रीनामदेवांची आळ.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांची आदि या भागात ज्ञानेशांच्या उभय बाजूंच्या आजोबा-आजी, आई-वडील, आई-वडिलांचा विवाह, विठ्ठलपंतांच्या स्वभावातील उपजत वैराग्य, त्यांचे जन्माआधी गोविंदपंत व निराबाई यांना झालेला श्रीगहिनीनाथांचा अनुग्रह व पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद व भविष्यात विठ्ठलपंतांना होणाऱ्या अपत्यांचे देवत्व या गोष्टी आलेल्या आहेत. या गोष्टींची नोंद चरित्रकारांनीही घेतली आहे. श्रीगहिनीनाथांच्या आशीर्वादाने गोविंदपंतांचे वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी पुत्र झाला असावा. तेच विठ्ठलपंत. आठव्या वर्षी मौजीबंधनानंतर ते पैठणास त्याचे मामा कृष्णाजीपंत देवकुळे यांचेकडे राहून त्यांनी पैठण येथे वेदाध्यायन केले. आपेगावास परत आल्यावर गोविंदरावांना कुलकर्णीपदाचे कामात मदत करण्यात त्यांचे मन रमले नाही. ते तीर्थयात्रेसाठी बाहेर पडले. या तीर्थयात्रेत ते अलंकापुरी म्हणजे आळंदीस आले असताना सिधोपंतांना त्याची वागणूक, ईश्वरीभाव

---

[१]. श्रीसंतनामदेवांची गाथा, गीता प्रेस, गोरखपूर

वगैरे आवडले. सिधोपंतास स्वप्न पडून त्यांनी विठ्ठलपंतास आपली कन्या रुक्मिणी द्यावी असा पांडुरंगाचा दृष्टांत झाला. सिधोपंतानी विठ्ठलपंतास घरी रहाण्यास आणून आपल्याला झालेला दृष्टांत सांगितला. यावर विठ्ठलपंतांनीही सांगितले की पांडुरंगाची जर अशी इच्छा असेल तर त्याचा दृष्टांत मलाही होईल, व मग मी अनुमती देईन. आणि विठ्ठलाला त्याच रात्री दृष्टांत झाला. त्याने तो सिधोपंतांना सांगितला. मोठ्या कौतुकाने विठ्ठल-रुक्मिणीचा विवाह झाला. मुहूर्त लवकरचा असल्याने व वयोमानामुळे गोविंदपंत व निराबाई आळंदीस येऊ शकले नाहीत. लग्नानंतर सर्वजण पंढरपुरी जाऊन आले. आपली दक्षिण तीर्थयात्रा पूर्ण करण्यासाठी विठ्ठल तीर्थयात्रेस गेला. यथावकाश तो यात्रेहून परत आला. आता त्याला आपल्या वृद्ध आई-वडिलांना भेटण्याची व त्यांना आपली पत्नी दाखविण्याची घाई झाली होती. सिधोपंत-उमाबाईसह सर्वजण आपेगावी गेले.

आपेगावचे घर सुखावले असेल. परंतु काही काळातच गोविंदपंत व निराबाई यांचे निधन झाले. सिधोपंत विठ्ठल-रखुमाई यांना आळंदीत आपल्याचजवळ घेऊन आले. आळंदी येथील विठ्ठलाची दिनचर्या कशी होती त्याबद्दल नामदेव सांगतात.

[१]येउनि अळंकापुरी केला क्षेत्रवास । देऊनी चित्तास समाधान ।।

नित्य हरिकथा नामसंकीर्तन । संतांचे दरूशन सर्वकाळ ।।

पंढरीची वारी आषाढी कार्तिकी । विठ्ठल एकाएकी सुखरूप ।। ना.गा. ८९५

अशी कालक्रमणा होत असताना काही वर्षे उलटली तरी संतान झाले नाही. मूळ विरक्त प्रकृतीचा विठ्ठल आणखी बेचैन झाला व त्यांनी रुक्मिणीकडे काशीस जाण्याच्या परवानगीचा हट्ट धरला. अनावधानाने दिल्या गेलेल्या परवानगीचा फायदा घेऊन विठ्ठल काशीला गेला.

काशीला रामानंदस्वामी प्रसिद्ध होते. व त्यांच्याजवळ राहून वेदाभ्यास करावा ही विठ्ठलाची इच्छा होती. असे म्हणतात की या रामानंदांचा एक शिष्य विठ्ठलाला गंगेच्या घाटावर भेटला. त्याने विठ्ठलाला सांगितले की रामानंदस्वामी फक्त ब्रह्मचारी शिष्यासच ज्ञानदान करतात. म्हणून विठ्ठलाने स्वामींना आपण ब्रह्मचारी असल्याचे सांगून संन्यास घेतला. स्वामींनी त्यांचे नाव 'चैतन्याश्रम' असे

---

१. श्रीसंतनामदेवांची गाथा, गीता प्रेस, गोरखपूर

ठेवले. शीघ्रबुद्धीमत्तेमुळे चैतन्य त्यांचा आवडता शिष्य बनला. अशी बारा वर्षे उलटली स्वामी आपला आश्रम चैतन्यावर सोपवून रामेश्वर यात्रेकरिता बाहेर पडले.

विधिलिखीत जसे घडणार होते तसेच घडले. विठ्ठलाने काशीस जाऊन संन्यास घेतल्याचे सिधोपंत व रुक्मिणीस समजले. रुक्मिणीची कडक तपश्चर्या सुरू झाली. अशी बारा वर्षे गेली. रुक्मिणीचे वैराग्य, देवतांच्या, पार्वतीच्या तोडीचे होते. त्याला इष्टप्राप्ती मिळणे अपरिहार्य होते. रामानंदांच्या यात्रेत त्यांचा मुक्काम आळंदीस पडला. रुक्मिणीने नित्य देवदर्शन व पिंपळाच्या प्रदक्षिणांनंतर या यतींना पाहून श्रद्धेने नमस्कार केला. तिच्या अंगावरील सौभाग्य अलंकार पाहून स्वामींनी तिला 'पुत्रवती भव' असा आशीर्वाद दिला. त्यावर ती खिन्नपणे हसली. स्वामींनी चौकशी केल्यावर तिने आपला पती काशीस असून त्याने संन्यास घेतल्याचे सांगितले. त्याच्या तिने सांगितलेल्या खाणाखुणांवरून हा आपलाच शिष्य चैतन्य असल्याचे स्वामींना लक्षात आले. स्वामींनी यात्रा पुढे न नेता, तेथूनच सिधोपंत व रुक्मिणीस घेऊन ते काशीस परतले. स्वामी लवकरच परतल्याचे पाहून चैतन्यास आश्चर्य वाटले. स्वामींनी त्याला समोर बोलावून खरे सांगण्याची आज्ञा केली. त्यानेही खरे सांगितले. रामानंद स्वामींनी चैतन्याश्रमास पुनश्च गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा केली व आशीर्वाद दिला. नामदेव लिहितात –

उठवुनि श्रीपादे दिधले आश्वासन । म्हणती करी ग्रहण इचें आता ।।
अविधी कर्माचे न धरावे भय । यासी आहे साक्ष जगदीश ।।
स्वदेशा जावून करावा आश्रम । सुखरुप स्वधर्म चालवावा ।।
श्रीपादे मस्तकी हात ठेवीयेला । निरोप दिधला चैतन्यासी ।। ना.गा. ८९९

विठ्ठलपंत व रुक्मिणी यांचा संसार पुन्हा सुरू झाला पण कसा?

रूक्मिणीचा स्वीकार कर असे सांगताना त्यांनी हिच्या पोटी ईश्वरांश अवतरतील असा आशीर्वाद दिल्याचेही पांगारकरांनी[१] लिहिले आहे.

विद्येसाठी खोटे बोलून विठ्ठलाने रामानंदस्वामींच्याकडून बारा वर्षे वेदोपनिषदांचे ज्ञान

---

१. वै. पांगारकर ल. रा. श्रीज्ञानेश्वर महाराज चरित्र आणि ग्रंथ विवेचन. पान ४०

मिळविले. हे चूकही होते व पापही होते. असेच खोटे बोलून ब्रह्मास्त्र मिळविण्याचे पाप कर्णानेही केले होते. पण त्या खोटे बोलण्यामागे कर्णाचा स्वार्थ होता. महाभारतयुद्धात अर्जुनवधासाठी त्याला ब्रह्मास्त्र हवे होते. म्हणून त्याला परशुरामाचा शाप घ्यावा व भोगावा लागला होता. विरक्त, ज्ञानाची भूक असणाऱ्या विठ्ठलाने खोटे बोलण्याचे पाप केले, परंतु ते ज्ञानार्जनासाठी. म्हणूनच स्वामींनी त्याला क्षमा केली व रुक्मिणीने आपल्या जाज्वल्य तपस्येचे बळ त्याच्यापाठी उभे केले.

'स्वदेशा जावून करावा आश्रम । सुखरुप स्वधर्म चालवावा ।।

हे सुख विठ्ठल-रुक्मिणी यांना लाभले नाही. काशीहून परत येताना आता यापुढे विठ्ठल-रुक्मिणी यांना आळंदीस आपलेच जवळ ठेवून त्यांचे योगक्षेम पहावे असा विचार सिधोपंतांचे मनात असावा व परतीच्या वाटेवर विठ्ठलास लग्नाचेपूर्वी विश्वंभराने स्वप्नात येऊन दिलेला दृष्टांत आठवला असावा -

[१]भक्ति आणि ज्ञान वैराग्य आवडी । असती उघडी तुझ्या अंगी ।।

मूर्तिमंत चारी जन्म इच्या उदरी । म्हणोनि स्वीकारी आज्ञा माझी ।। ना.गा. ८८९

विठ्ठलाला आपल्या आई-वडिलांना गहिनीनाथांनी दिलेला आशीर्वादही आठवला असेल. परंतु त्यांच्या नशिबीचे प्राक्तन वेगळेच होते.

गृहस्थाश्रमातून संन्यास व संन्यासाश्रमातून पुन्हा गृहस्थाश्रम अशी उलटी रीती आळंदीकरांनी कधीच पाहिली नव्हती. आळंदीच्या ब्रह्मसभेने विठ्ठल-रुक्मिणी यांना धर्मभ्रष्ट ठरविले व त्यांच्यावर बहिष्कार टाकला. सिधोपंत ही अधिकारी व्यक्ती असूनही एका मर्यादेपलीकडे तेही काहीही करू शकले नाहीत. पती-पत्नी उभयता सिद्धबेटावर झोपडी बांधून गाडग्या-मडक्यांचा संसार करू लागले.

बारा वर्षे असा संसार चालत असताना जे पूर्वीच घडावे असे वाटत होते ते जगदोद्धारासाठी घडले. विठ्ठलपंत-रुक्मिणी यांना चार अपत्ये झाली.

---

१. श्रीसंतनामदेव गाथा. गीता प्रेस, गोरखपूर. अ.८८९,

२. पांगारकर ल. रा. श्रीज्ञानेश्वरमहाराज चरित्र आणि ग्रंथ विवेचन. पान-४०

१) निवृत्तिनाथ : शके ११९५ श्रीमुख संवत्सर, माघ वद्य १, सोमवार, प्रातःकाळ.

२) ज्ञानदेव : शके ११९७ युवा संवत्सर, श्रावण वद्य ८, गुरुवार, मध्यरात्र.

३) सोपानदेव : शके ११९९ ईश्वर संवत्सर, कार्तिक शुद्ध १५, रविवार, प्रहररात्र.

४) मुक्ताबाई : शके १२०१ प्रमाथी संवत्सर, अश्विन शुद्ध १, शुक्रवार, माध्यान्न.

परंतु जनाईच्या पुढील अभंगाप्रमाणे हे शक वेगळे आहेत.

[१,२] शालिवाहन शके अकराशे नव्वद । निवृत्ति आनंद प्रगटले ।।

त्र्याण्णवाच्या साली ज्ञानेश्वर प्रगटले । सोपान देखिले शाण्णवात ।।

नव्याण्णवाच्या साली मुक्ताबाई देखिली । जनी म्हणे केली मात त्यांनी ।।

जनाबाई अ.२७७

पण याच जनाबाईचा आणखी एक अभंग पांगारकारांचे ग्रंथात आहे. ती म्हणते –

[३]शके अकराशतें पंचाण्णव संवत्सरी । निवृत्ति उदरी प्रगटले ।।

सत्त्याण्णवसाली ज्ञानदेव झाले । नव्याण्णवी देखिले सोपानदेव ।।

बाराशतें एकी मुक्ताई जन्मली । जनी म्हणे केली मात त्यांनी ।।

(विसोबा व सच्चिदानंदबाबा यांनीही याच शकाचा उल्लेख त्यांचे अभंगात केला आहे.)

अधिक सत्याण्णव शके अकराशतीं । श्रावण मास तिथी कृष्णाष्टमी ।।

वर्षाऋतु युवा नाम संवत्सर । उगवे निशाकर रात्रिमाजी ।।

पंचमहापातकी तारावया जन । आले नारायण मृत्युलोकां ।।

नामा म्हणे पूर्ण ब्रह्म ज्ञानेश्वर । घेतसे अवतार अलंकापुरी ।।

ज्ञानेशांचा आणि भगवान श्रीकृष्णांचा जन्म गोकुळआष्टमीचा किंवा कृष्णाष्टमीचा हा निव्वळ योगायोग (Coincidence) नाही. 'गोकुळ' म्हणजे गाईचे कुळ म्हणजे जेथे गोमाता कुलदेवता, पवित्र

---

१. सकलसंत गाथा. ज. अ. २७७,

२. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी-प्रस्तावना पान ३

३. वै. पांगारकर ल. रा. ज्ञानेश्वर महाराज चरित्र. पान-४०

मानली जाते त्या कुळी म्हणजे त्या देशात-भारतात. अष्टमी म्हणजे अष्टधा प्रकृती धारण केलेला. 'कृष्णाष्टमी' या अष्टमीच्या दिवशी अवतार घेऊन या विश्वातील 'कृष्ण', अंधार, अज्ञान नाहीसे करणारा. निवृत्ति-ज्ञानदेव-सोपान हे ब्रह्मा, विष्णू-महेशांचे अवतार आहेत असे मानतात. परंतु मला वाटत नाही. कारण ब्रह्मा-विष्णू-महेश हे कारण अवतार आहेत. ब्रह्मा-उत्पत्ती, विष्णु-स्थिती, महेश-लय अशी त्यांची कार्ये आहेत. उलट निवृत्ति-ज्ञानदेव-सोपान यांचे कार्य एकच आहे - विश्वाचे आर्त घालविणे व सामान्यानाही विश्वात्मक सर्वेश्वराची ओळख करून देणे, त्या ईश्वराची गाठ घालून देणे. म्हणूनच हे तिघेही त्या सर्वेश्वराचीच रूपे आहेत व मुक्ताई हे आदिमातेचे चित् स्वरूप आहे. ती या तीनही अवतारांची प्रेरणा शक्ती आहे. हा माझा विचार आहे.

श्रीकृष्ण आणि ज्ञानदेव यांच्या जन्माकडे पाहिल्यावर मनात खोलवर काहीतरी सारखेपणा वाटतो. देवकीमाता व वसुदेव कारागृहात श्रीकृष्ण जन्माची वाट पाहत त्या आधी मारल्या गेलेल्या आपल्या सात अश्राप बालकांच्या आठवणींनी वर्षानुवर्षे दु:खी होऊन श्रीकृष्ण जन्मासाठी आतुर झालेले असतील. कारण तोच एक त्यांचा त्राता होता. विठ्ठल-रुक्मिणींनी अनेक वर्षे विठ्ठलाला झालेल्या दृष्टांताच्या सत्यतेची, गहिनीनाथांनी विठ्ठलाच्या आई-वडिलांना दिलेल्या आशिर्वादाची व रामानंदांनी आश्रम सोडण्यापूर्वी विठ्ठलाचे कानात सांगितलेल्या आशीर्वचनाची वाट डोळ्यात प्राण आणून वाट पाहिली असेल. आणि या चार बालकांचा जन्म झाला तरी केव्हा, जेव्हा त्यांचे आई-वडील जातिभ्रष्ट झाले तेव्हा. म्हणजे हे चौघेही जण जन्मत:च जातिभ्रष्ट झाले. युगंधर किंवा विभूती अशाच वेळी जन्माला येतात. श्रीकृष्णाचे विभूती म्हणून अवतारकार्य वयाच्या तेरा/चवदा व्या वर्षी कंस भेटीसाठी मथुरेस गेला तेव्हापासून सुरू झाले असावे. श्री ज्ञानदेवाचे ईश्वरी अवतार कार्य पैठण भेटीपासून सुरू झाले. त्यावेळी त्यांचे वय तेरा वर्षांचे असावे.

विठ्ठलपंतांनी चोवीस वर्षांपेक्षा जास्त काळ केवळ वेदांचे, धर्मशास्त्रांचे अध्ययन केलेले असून ते थोर विरागी, तपस्वी आणि निर्भीड ज्ञानी होते. त्याकाळी धर्मपीठ म्हणेल तो अंतिम शब्द हीच समाज - पद्धती होती. शास्त्रांचे सखोल अध्ययन नव्हतेच. याचाच पुरावा पुढे चौघांना मिळालेल्या शुद्धीपत्रात आहे. विठ्ठलपंतांच्या संगतीत राहून व कठोर तपस्येने रुक्मिणीही अत्यंत संस्कारित व ज्ञानी होत्या. विठ्ठलाला लागणारे व पैठणला उपलब्ध असणारे सर्व धर्मग्रंथ सिधोपंत निश्चितपणे

त्यांना आणून देत असले पाहिजेत. त्यांच्या जवळ पैसा व अधिकार होते व याची आळंदीकरांना जाणीव असलीच पाहिजे. आणि तरीही सिधोपंत ब्राह्मण्याच्या आड कधीही आले नाहीत. परंतु रुक्मिणीची चारही बाळंतपणे व त्यासाठीची मदत हे तर भिक्षेतून मिळणारे नव्हते. ते तिच्या आई-वडिलांनीच पुरविले असणार. जेथे त्यांची सावलीही अपवित्र मानली जात होती तेथे त्यांना कपडा-अडका भिक्षेत कोण देणार? व्यवहाराने विचार केल्यास याचे दुसरे उत्तर नाही. संन्यासआश्रम स्वीकारल्यानंतर पुन्हा गृहस्थाश्रमात परत येणे हे शास्त्र संमत नव्हतेच. साहजिकच समाजाने, विशेषत: ब्रह्मवृंदाने विठ्ठलपंत-रुक्मिणी यांना व पर्यायाने त्यांच्या चारही मुलांना वाळीत टाकले. नामदेव लिहितात -

द्विजीं वाळियेले जगीं सांडियेले । शेखीं उपेक्षिले आप्तवर्गी ।। ना.गा. ९००

गीतेतील सहाव्या अध्यायात योगभ्रष्ट पुन्हा जन्म घेण्यासाठी दैवी संपत्तीने श्रेष्ठ अशा पवित्र घराण्यात जन्म घेतात, असे भगवंताने सांगितले आहे. परंतु मी ज्ञानदेवादि भावंडांना पूर्वजन्मीचे 'योगभ्रष्ट' समजत नाही. श्रीकृष्णाने ज्या परिस्थितीत अवतार धारण केला तसाच विश्वशक्तीने व विश्वचेतनेने, (आदिमातेने) या भूमीवर जन्म घेतले. कृष्णाला जन्मापासून आई-वडिलांपासून दूर गोकुळात रहावे लागले. ज्ञानदेवादींना जन्मापासून अनेक, विविध हाल, शिव्याशाप भोगावे लागले. तरीही या भावंडाचे विभूतित्व लपणार नव्हते.

पुढील आयुष्यांत विश्वाने त्यांच्या अगाध कर्तृत्वाकरिता मान्यता दिली आहे. आजही श्रद्धा हीच आहे की माउलींच्या समाधीवर पूर्ण श्रद्धेने डोके ठेवले तर जीवनाची धन्यता होते व माउलींनी वात्सल्यपूर्ण हात डोक्यावर ठेवल्याचे समाधान मनाला लाभते. संपूर्ण महाराष्ट्र अगदी वर्षभर समाधी दर्शनासाठी उतावळा असतो. अशांना व त्यांच्या आई-वडिलांनाही अनन्वित हाल, शिव्याशाप भोगावे लागले. अगदी यापैकी कोणाचेही दर्शनसुद्धा अपवित्र, अपशकुनी मानले गेले. ही शिक्षा विठ्ठलपंतांनी तोडलेल्या समाजबंधनांची होती. विठ्ठलपंत व रुक्मिणी यांच्यासमोर मुलांचा प्रश्न होता. घराबाहेरील वातावरण जितके असहाय्य, रखरखीत, सहानुभूतीशून्य होते, तितकेच घरातील वातावरण सोज्वळ, प्रेममय, आदर्श होते. भोवतीच्या परिस्थितीचा विठ्ठलपंत-रुक्मिणी यांना पूर्ण अंदाज होता.

वीस-बावीस वर्षांच्या प्रदीर्घ वाट बघण्यानंतर घरात बागडणाऱ्या दुडदुड पावलांनी विठ्ठल-रखुमाई यांना आनंदाने आकाश ठेंगणे झाले असेल. त्यातनू निवृत्ती शांत, गंभीर, विरक्त प्रकृतीचे. चिंतन, अध्ययन, मनन व समाधी यात राहणारे असावेत. पांडवातील जेष्ठ पांडव युधिष्ठिर यांच्या सारखे ते स्थितप्रज्ञ असावेत. या उलट माउलींचा स्वभाव लडिवाळ. आई-वडिलांबद्दल त्यांना खूप प्रेम असावे असे ज्ञानेश्वरीतील त्यांच्या पुढील ओव्यावरून सहज समजू शकते. अशा मातृ-पितृ प्रेमाच्या अनेक ओव्या माउली सांगतात -

जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा ।
तरी अधिकाधिक तेयांचा । संतोष आथी ।। ज्ञा. १.६४
नातरी बालक बोबडां बोली । कां वाकुडां विचुकां पाउलीं ।
तें चोज करूनि माउली । रिझे जेवीं ।। ज्ञा. ९.६
बाळक बापाचिये तार्टी रिगे । रिगौनि बापातेंच जेवऊं लागे ।
की तो संतोषलेनि वेंगें । मुखचि वोडवी ।। ज्ञा. ९.१५
अहो तान्ह्याची लागता झटे । तरी अधिक पान्हा फुटे ।
रोषें प्रेम दुणवटे । पढियंताचेनि ।। ज्ञा. ९.१७

या ओव्या वाचून निश्चित असे दिसते की माउलींचे आपल्या आई-वडिलांवर, विशेषत: आईवर खूप प्रेम होते. त्यातून सात वर्षात झालेल्या या चार आपत्यामुळे लहानग्या सोपान-मुक्ताई यांना आई आणि माउली यांचा साहजिक लळा लागला.

ही चारही अपत्ये अत्यंत प्रखर बुद्धिमत्तेची आहेत हे विठ्ठलपंतांचे केव्हाच लक्षात आले असले पाहिजे. विभूतींनी जरी देह धारण केला तरी देहभावातील बाल्य, शैशव, शिक्षण या अवस्थातून त्यांनाही जावेच लागते. विभूती किंवा अवतार जेव्हा मानव देह धारण करतात त्यावेळी त्यांना लौकिक जीवनातील अवस्थांची मर्यादा नसते. श्रीरामांना शिक्षण देताना वसिष्ठ ऋषींनी 'तू ईश्वर आहेस, व केवळ उपचार म्हणूनच मी तुला शिष्यत्व देऊन शिकवीत असल्याचे' सांगितले. तसेच श्रीकृष्णाने सांदिपनी ऋषींच्याकडून चौसष्ठ दिवसात सर्व विद्या प्राप्त करून घेतल्या व

गुरूदक्षिणा म्हणून त्यांच्या मृत पुत्रास जिवंत करून गुरूदक्षिणा दिली.

माउली व त्यांची भावंडे यांचा विचार करता हे परमेश्वराचेच अवतार आहेत हे सिद्ध करण्याची आवश्यकताच नाही. केवळ सातव्या वर्षी नाथसंप्रदायाची दीक्षा व आचार्यपद निवृत्तिनाथांना मिळाले व त्यांनी ज्ञानदेवांना त्याच वयात दीक्षा दिली. बाल वयातच सर्व भावंडे योगज्ञानी होऊन त्यांना समाधी अवस्थाही प्राप्त झाली. ज्या ज्ञानेश्वरीचा पूर्णार्थ आयुष्यभर अभ्यास करूनही समजला नाही असे अनेक श्रेष्ठ संत व अभ्यासकांनी सांगितले आहे ती ज्ञानेश्वरी ज्ञानदेवांनी वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षी सांगितली. त्यातील संदर्भाचा विचार समजणे हे माउलींनी त्याही पूर्वीच केलेले असणार आहे. ज्ञानेश्वरीइतका श्रेष्ठ ग्रंथ त्यापूर्वी झाला नाही व पुढे होणारही नाही. कारण हे कार्य ईश्वरी विभूतीचे आहे.

ज्ञानेशांच्या अक्षर वाङ्मयात वेद, उपनिषदे, भारत, भागवत, योगवाशिष्ठ या ग्रंथाचे दाखले मिळतात. याचाच अर्थ हे ज्ञान त्यांना त्यांच्या उच्चशिक्षित पित्याकडूनच मिळाले आहे. जे त्यांनी काशी-पैठण येथे वाढविले. कारणपरत्वे जेवढे बाहेर जाणे अपरिहार्य असेल, त्या व्यतिरिक्तचा वेळ विठ्ठलपंत या मुलांचे शिक्षण व संस्कार यातच घालवीत असले पाहिजेत. त्याचप्रमाणे निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई हे चारहीजण बाल्यावस्थेपासूनच गीतेतील सहाव्या अध्यायात त्रेचाळीसाव्या श्लोकात भगवंताने म्हटल्याप्रमाणे कुशाग्र बुद्धीचे असले पाहिजेत.-

तंत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यततेच ततो भूय: संसिद्धौ कुरूनंदन ।। गी.अ.६.४३

त्याचप्रमाणे ज्ञानदेवांच्या लिखाणात येणारे देवदेवतांचे उल्लेख व बौद्ध, जैन, म्लेंच्छ व अन्य पंथाचे उल्लेख किंवा [१]पंढरीचे विठ्ठलाचा अप्रत्यक्ष ज्ञानेश्वरीतील उल्लेख व अभंगातील पांडुरंगवर्णन, 'बापरखुमादेवीवरु' ही मुद्रा याचा अर्थ असाच आहे की ज्ञानदेवांनी याचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला आहे. आपले भिक्षांदेही व अपमानाचे आळंदीतील आयुष्याला विरंगुळा व मुलांना, विशेषत: ज्ञानदेव-निवृत्ती यांना सर्वांगीण ज्ञान प्रत्यक्ष प्रत्ययाने देण्यासाठी विठ्ठलपंतांनी अनेक यात्रा केल्या असल्या पाहिजेत. [२]''तीर्थक्षेत्रे हिंडण्याचे प्रेमी विठ्ठलपंत हे सारखेच आळंदीत राहिले असतील हे

---

१. डॉ. रानडे रा. द. ज्ञानेश्वर वचनामृत.

२. वै. दांडेकर शं. वा., सार्थ ज्ञानेश्वरी, प्रस्तावना, पान ४

फारसे संभवत नाही. ते तीर्थयात्रा करीत असताना त्यांचे बरोबर ही लहान मुलेही फिरत असावीत. कारण या यात्रांचे संस्कार आपणास ज्ञानेश्वरीत दिसतात.'' विठ्ठलपंतांना तीर्थयात्रेनिमित्त व वारीनिमित्त हिंडण्याची किती हौस होती, हे त्यांच्या पूर्वायुष्यावरून स्पष्ट होते. लग्नानंतर त्यांनी सिधोपंत–उमाबाई व रखुमाईसह पंढरपूरची यात्रा केली होती. त्यानंतर आपली अपूर्ण राहिलेली दक्षिणयात्रा पूर्ण करण्यासाठी पुन्हा बाहेर पडले होते. आळंदीत होते तोपर्यंत त्यांनी दरवर्षी आषाढी कार्तिकी पंढरपूर वारीही केली असे नामदेवांचे अभंगातही आहे. अशा यात्रा या त्यांच्या ज्ञानसाधनेला खूप साहाय्यक झाल्या असल्या पाहिजेत. आपण धर्मभ्रष्ट झालो, आपली मुले तर जन्मत:च धर्मभ्रष्ट ठरली. आपल्यामागे आपल्या चारही मुलांना अशा दुष्ट समाजात ताठ मानेने जगता आले पाहिजे, म्हणून त्यांना बहुश्रुत करण्यासाठी अनेक योजना विठ्ठलपंतांनी मनात आखल्या असतील. आपण आळंदीकर ब्रह्मवृंदासमोर मुलांच्या मुंजीचा प्रस्ताव व प्रायश्चिताचा विषय घेऊन गेलो तर मुलांच्या मुंजीची परवानगी तर मिळणार नाहीच उलट आपण केलेल्या संन्यासातून गृहस्थाश्रमाच्या परतीस म्हणजे प्रत्यावृत्तीस देहांताची शिक्षा सांगतील याची शक्यता त्यांना वाटत होती. म्हणूनच ते ब्रह्मवृंदासमोर जाण्याचे पुढे ढकलीत होते. परंतु मनात मात्र मुलांच्या मुंजीची काळजी होती. त्यांना आपल्या मुलांना वेद, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, योगवाशिष्ठ इ. धर्मग्रंथाबरोबरच पूर्वापार चालत आलेली तत्त्वज्ञानाची विविध अंगे (schools of thoughts) त्यांना माहीत होणे अत्यावश्यक आहे असे वाटले होते. त्यामधे नाथपंथ त्यांची शांकरी विद्या, शैव व वैष्णवधर्माची तत्त्वे, शंकराचार्यांची बह्मसूत्र भाष्ये (ब्रह्मसूत्र शांकरभाष्य), याज्ञवल्क्य, माधवाचार्य, कमलाकरभट्ट, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, विष्णुगुप्त, अभिनवगुप्त, इ. ची तत्त्वज्ञाने मुलांना समजलीच पाहिजेत यासाठी काय करावे हा विचार त्यांच्या तत्त्वज्ञानी मनात निश्चित घोळत असणार. माउलींना इतका दूरचा विचार करणारा प्रज्ञावंत व काळाची पावले ओळखणारा पिता लाभणे ही त्या सर्वेश्वराचीच आखणी, याचाही उल्लेख गीतेच्या सहाव्या अध्यायात आहे. महाराष्ट्रातील दोन कुलदेवतांकडे मुलांना आशीर्वादासाठी नेणे त्यांना आवश्यक वाटले असावे. त्यापैकी पहिला पंढरीचा पांडुरंग व दुसरी महाराष्ट्राची कुलदेवता कोल्हापूरची अंबाबाई, या ठिकाणच्या तीर्थयात्रांचा विचार तीर्थयात्राप्रेमी विठ्ठलपंतांचे मनात येणे माउलींच्या दृष्टीने आवश्यकही

होते. ज्या यात्रा त्यांनी मुलांना लहानपणीच घडविल्या होत्या. या दोन महाराष्ट्राच्या दैवतांच्या यात्रेचे वेळी ज्ञानदेवांचे वय पांच वर्षांचे असावे. विठ्ठलपंतांनी महाराष्ट्रातील मुख्यदेवस्थांनाची व कोरीव लेण्यांचीही यात्रा मुलांना घडविली असणार. कारण लेण्यांचा व देवळांचा ज्ञानेश्वरीत व [१]अमृतानुभवात उल्लेख आहे. त्याबद्दल सविस्तर पुढे लिहिले आहेच. त्याचप्रमाणे गणपतीपुळे या यात्रेत या मुलांनी सागराची विशालताही पाहिली असेल. पैठणहून परत येताना माउलींनी वेरूळ व वेरुळच्या लेण्या निश्चित पाहिल्या आहेत. कारण [२]श्री. उदयन इंदूलकर व डॉ. देगलूरकर यांचे संशोधनाप्रमाणे लेण्यांवर आधारीत ओव्या ज्ञानेश्वरीत आहेत. त्याही या लिखाणात आहेत. शिवाय त्या काळी वेरूळ येथे नाथपंथाचे मोठे अभ्यास केंद्र होते. निवृत्तिनाथ आता सातवर्षाचे झाले, त्यांच्या मुंजीला ब्रह्मवृंद परवानगी देणार नाहीत म्हणून त्यासाठी काहीतरी कठोर अनुष्ठान करावे असा विचार विठ्ठलपंताचे मनात येत होता. त्याप्रमाणे त्यांना श्रद्धेय असणाऱ्या नामपंथाच्या त्र्यंबकेश्वराच्या ब्रह्मगिरीला भक्तिभावाने प्रदक्षिणा घालण्यासाठी सर्वांसह जावे असा विचार त्यांच्या मनात आला. अगदी हाच विचार निवृत्तिनाथांच्या मनांत आल्याचे [३]गुरूवर्य दांडेकरही लिहितात. ही यात्रा ईश्वरीय प्रेरणेनेच असली पाहिजे. कारण प्रदक्षिणेत वाघाच्या भयाने पळणारे निवृत्तिनाथ एका गुहेत ध्यानस्थ असलेल्या गहिनीनाथांसमोर आले. गहिनीनाथही आपल्या शिष्योत्तमाची वाटच पाहत होते. ज्ञानेश्वर या प्रसंगाबद्दल ज्ञानेश्वरीत म्हणतात-

तेणें कळि कळितु भूतां । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ।। ज्ञा. १८.१७५७
ना आदिगुरु शंकरा । लागोनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसरा । जाला तो आमुतें ।। ज्ञा. १८.१७५८
तो हा तूं घेऊनि आघवा । कळी गिळितयां जीवां ।
सर्व प्रकारी धांवा । करी पा वेगी ।। ज्ञा. १८.१७५९

---

१. डॉ. साठे अ. म., प्रसाद अमृतानुभव, प्र. ९-४१
२. श्री. इंदूरकर उदयन, अद्भुत भारतीय शिल्प - वेरुळ
३. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी, प्रस्तावना, पान ४

घरी परत आलेले निवृत्तिनाथ पूर्ण बोधावर गेले होते, व तेही वयाच्या अवघ्या सातव्या वर्षी. दोन वर्षानी त्यांनी नाथपंथाचा हा गुरूपदेश ज्ञानेश्वरांनाही दिला. दोघेही पूर्णावस्थेला पोहोचले. दोघेही दैनंदिन व्यवहारातही सहजसमाधी अवस्थेत असत. अशीच साधनेत वर्षे सरकत होती. मुलांना घेऊन विठ्ठलपंत तीर्थयात्रा करीत होते. घरचे अध्ययनही पूर्णपणे चालूच होते. विठ्ठलपंतांना मुलांच्या मुंजीची काळजी पोखरीतच होती. माउली अकरा वर्षांचे झाले. तोपर्यंन्त ज्ञानदेवांनी सोपानदेव व मुक्ताई यांनाही नाथपंथाची दीक्षा दिली. सोपानदेव व मुक्ताई यांना ज्ञानदेवांनीच अनुग्रह दिला असे आग्रहाने लिहिण्याचे कारण असे की ज्ञानेश्वरीत आपण आपल्या श्रीगुरुंचे एकूलते एक शिष्य आहोत असे माउलींनी अठरावे अध्यायात स्पष्टपणे सांगितले आहे. या पुढील चार वर्षे विठ्ठलपंत व त्यांची चारही मुले यांच्या आयुष्याच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाची ठरली आहेत. नाथपंथाच्या अनुग्रहाने चारही भावंडे पूर्ण योगमार्गी झालेली होती. त्यांच्यातील हा क्रियाशील बदल पाहून विठ्ठलपंतही अचंबित झाले असतील.

आळंदीच्या ब्रह्मवृन्दासमोर मुलांच्या मुंजीसाठी परवानगी मागण्यापूर्वी मुलांच्या अध्ययनाचा शेवटचा टप्पा विठ्ठलपंताच्या मनात सारखा घोळत असला पाहिजे. तसेच पश्चात्ताप होऊन तीव्र तपश्चर्येने देवतांच्या श्रेणीत गेलेल्या आपल्या पत्नीचा आपण स्वीकार करून पुनश्च गृहस्थाश्रम स्वीकारावा हे सांगताना श्रीगुरूंनी दिलेला कानमंत्रही त्यांना आठवला असेल. अशा प्रकारची तपस्तेजाने दैदिप्यमान झालेली रुक्मिणी रामानंदस्वामींनी पाहिली, तेव्हा त्यांच्या मनात पूज्यबुद्धी उत्पन्न होऊन ते तीर्थयात्रा सोडून परत काशीस गेले व ''हिचा स्वीकार कर म्हणजे हिच्या पोटी ईश्वरांश अवतरतील'' असा त्यांनी विठ्ठलपंतास कानमंत्र सांगितला. याच बरोबर त्यांना आपल्या आईस गहिनीनाथांनी 'तुझ्या पुत्राच्या पोटी देव अवतार घेतील' या आशीर्वादाची आठवण झाली असावी.

यानंतर काही गोष्टींचा माझ्या दृष्टीने खुलासा करणे मला महत्त्वाचे वाटते. ज्ञानदेव व त्यांच्या भावंडांनी पैठण येथे शुद्धिपत्रासाठी भरलेल्या ब्रह्मवृंदाच्या सभेत दाखविलेल्या असामान्य बुद्धिमत्तेने दक्षिणकाशी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पैठण क्षेत्रातील ज्येष्ठ ब्रह्मवृंद व जाणकार आश्चर्यचकीत झाले. ही चार भावंडे सामान्य नाहीत हे त्यांच्या असामान्यत्वाने दाखवून दिले. पूर्णज्ञानी व विभूती

असलेल्या या भावंडांचे जगाला झालेले हे पहिले खरे दर्शन या वेळी ज्ञानदेवांचे वय तेरा/चवदा वर्षांचे असावे. कारण पैठण, येथून नेवासे येथे गेल्यावर ज्ञानदेवांनी वयाचे पंधरावे वे वर्षी 'भावार्थदीपिका' म्हणजे 'ज्ञानेश्वरी' सांगितली (शके बाराशे बारा). याचा स्पष्ट उल्लेख ज्ञानेश्वरीत आहे. ही चार भावंडे सोडून त्यांच्या समकालीन बहूतेक सर्व संताच्या आयुष्यांची, यांच्या अभंगांची पुष्कळशी माहिती उपलब्ध आहे.[१,२] अगदी चोखोबांचे अभंगही मंगळवेढ्याच्या अनंत भट यांनी लिहून ठेवल्याचाही स्पष्ट उल्लेख आहे. [३]नामदेवानेही समकालीन काही संतांवर अभंग गाथेत अभंग लिहिलेले आहेत. गाथेतील श्रीज्ञानेश्वरमहाराजांची आदि या भागाची सुरुवातीतच विठ्ठलपंताच्या आई निराबाई यांना झालेला गहिनीनाथांच्या कृपाप्रसादाने झालेली आहे. (अभंग आठशे चौऱ्याऐंशी)

विठ्ठलपंतासह या चार भावंडांना आळंदीच्या ब्रह्मवृंदास शुद्धीपत्राची विनंती केली आहे. विठ्ठलपंताना देहान्त प्रायश्चित्त सांगून निवृत्तिने विचारल्यावरून मुलांना पैठणला जाण्यास सांगितले. (अभंग नऊशे एक) अभंग नऊशे बारा हा आदिपर्वाचा शेवटचा अभंग आहे. या अभंगात नामदेवाने ज्ञानदेवास गौरविले आहे. या अभंगात त्र्यंबकेश्वराच्या यात्रेचाही उल्लेख नाही. नऊशे नऊ या अभंगात पैठणच्या विद्वानांनी या भावंडांचा केलेला गौरव आहे. तीर्थयात्रेचे अभंगांचे वेळी ज्ञानदेवांचे वय एकोणीस वर्षांचे असावे. कारण तीर्थयात्रेहून दोन वर्षांनी परत आल्यानंतर लगेचच ज्ञानदेवांनी पांडुरंगास समाधीची परवानगी नामदेवासमोरच मागितली. त्र्यंबकेश्वराच्या यात्रेचा व निवृत्तिनाथांना गहिनीनाथांचा अनुग्रह[४] सार्थ ज्ञानेश्वरीचे प्रस्तावनेत आहे (पान चार). पैठणच्या अद्वितीय भेटीमुळे या चारही विभूती एकदम प्रकाश झोतात आल्या. इतिहासानेसुद्धा अनेक संतांच्या माध्यमातून त्यांची दखल पैठण नंतरच घेतली. या चार मुलांच्या मुळेच विठ्ठलपंत-रुक्मिणी यांच्या या जगावेगळ्या आयुष्याची ओळख जगाला झाली. अन्यथा त्यांची नोंद होण्याचे काहीही कारण नव्हते. परंतु विभूतींचे आई-वडील होण्याचे भाग्य त्यांच्या ललाटी होते. ही चारही भावंडे

---

१. श्रीसकल संत गाथा खंड -१, श्रीसकल संत वाणी खंड - १

२. श्रीसकल संत चरित्र - प्रा. भट नम्रता

३. श्रीसंतनादेवाची गाथा

४. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी, प्रस्तावना, पान ४

ईश्वराचेच अवतार आहेत हे त्यांच्या ज्ञात आयुष्यावरून स्पष्ट होते. कारण जे कार्य त्यांनी इतक्या लहान वयात केले ते मानवी जीवनात कोणासही शक्य झालेले नाही. तसे एकही उदाहरण ज्ञानदेवानंतर झाले नाही.

पैठणला या भावंडाचे व विशेषतः ज्ञानदेवांचे धर्मग्रंथाचे जे ज्ञान प्रगट झाले त्याच्या पाठीशी विठ्ठलपंतांची तपश्चर्या निश्चितच आहे. परंतु ज्ञानदेवांचे सर्व वाङ्मय अभ्यासताना ते केवळ विठ्ठलपंताकडून मिळालेले ज्ञानच आहे असे मात्र निश्चितपणे वाटत नाही. ज्ञानेश्वरीच्या नऊ हजार पेक्षा जास्त ओव्यातून, अमृतानुभवातून, चांगदेवपासष्टीतून व अभंगातून (हरिपाठसुद्धा) जे दृष्टांत, उपमा, तत्त्वज्ञान त्यांनी मांडले आहे, त्या सर्व गोष्टी त्यांनी केव्हा पाहिल्या, केव्हा अभ्यासल्या, या प्रश्नांची समर्पक उत्तरे मांडणे आवश्यक आहे. ज्ञानेश्वरीत अगदी पहिल्या अध्यायापासून ज्ञानदेवांनी बौद्ध, जैन व शेवटच्या अध्यायात यवनांचा उल्लेख केला आहे. भाष्यकाराते वाट पुसतु । असे सांगतांना वेद, उपनिषदे, योगवाशिष्ठ, अन्य ज्येष्ठ तत्त्ववेत्ते यांच्याही विचारांचा सुयोग्य मागोवा घेतल्याचे स्पष्ट होते. ज्ञानेश्वरीत सजीव-निर्जीव, वृक्ष, वेली, नद्या, डोंगर, सागर, अवकाश, पशु-पक्षी, अगदी आपल्याला ज्ञात असलेल्या सोने, चांदी, धातू, व्यवहार, प्रेम, मातृत्व ते कोरीव लेण्यापर्यंत, तसेच सर्व प्रकारचे स्वभाव, समाजव्यवस्था, स्त्रीशूद्रांना मिळणारी वागणूक या प्रत्येकाचे अचुक वर्णन ज्ञानदेवांनी सांगितले आहे.

आळंदीतील या भावंडांचे जीवन किती यातनामय असेल याची कल्पना करता येते. त्यांची साधी सावली अगर दर्शनही अशुभ मानले जात होते. वेदोपनिषदांचे शिक्षण विठ्ठलपंतांनी दिलेले असणार हे सत्यच आहे. विठ्ठलपंतांच्या बरोबरच्या तीर्थयात्रातून त्यांना महाराष्ट्रातील देव-देवतांची दर्शने झाली. नाथपंथाच्या अनुग्रहामुळे समाधी, योग, परमेश्वराचे सगुण-निर्गुण दर्शनही प्राप्त झाले. विभूतिमत्त्वामुळे सहज समाधी तर त्यांना उपजतच प्राप्त होती. तरीही त्यांचा विविध धर्मपंथाचे, समाज पद्धतीचे व सहसा न दिसणाऱ्या, परंतु त्यांनी वर्णन केलेल्या गोष्टींचे ज्ञान कसे झाले, हे अनाकलनीय आहे. विभूतीने मानवदेह धारण केल्यावर काही बंधने येणारच ना? ईश्वरच सर्वांचा प्रणेता आहे हे प्रत्येकजण जाणतोच. तरीही राम, कृष्ण यांना गुरुगृही लौकीकासाठी ज्ञानार्जनासाठी जावे लागले होते. मग ज्ञानेश्वरादी भावंडांना हे ज्ञान कोणी दिले? असे ज्ञान देऊ शकणारी एकच

श्रेष्ठ व्यक्ती विठ्ठलपंताचे नजरे समोर होती, ते होते विठ्ठलपंतांचे सद्गुरू ऋषितुल्य रामानंदस्वामी [१]वै. भिंगारकरबुवा लिहितात त्या प्रमाणे विठ्ठलपंतांचे वडीलास गहिनीरानाथ, व रामानंदस्वामी यांचेकडून विठ्ठलपंतास रुक्मिणीबाईच्या उदरी ईश्वरीअवतार जन्म घेतील असा आशीर्वाद होता. आळंदीकरांना शुद्धीपत्रासाठी सामोरे जाण्यापूर्वी (कारण ते काय निर्णय देणार याची विठ्ठलपंतांना कल्पना असावी) आपण आपल्या मुलांच्या कल्याणाचा अखेरचा मार्ग म्हणून त्यांच्या नजरेसमोर त्यांचे श्रीगुरु रामानंदस्वामी यांचे खेरीज अन्य कोणीही असणे शक्य नव्हते. त्यांच्याकडेच निवृत्ति-ज्ञानदेवांना सर्व धर्मांचे व आचार्यकुलांचे परिपूर्ण ज्ञान मिळेल असा त्यांना पूर्ण विश्वास होता. विठ्ठलपंतांचा असा विचार त्यावेळच्या परिस्थितीचा विचार केला असता मुलांचे वडील म्हणून अगदी योग्य असाच होता. वै. भिंगारकरांनी लिहील्याप्रमाणे रामानंदस्वामी यांनी दिलेला आशीर्वादही त्यांना आठवला असावा.

विठ्ठलपंतांना काशीचा मार्ग पूर्ण माहीत होता. त्यांच्या या तीर्थयात्रेला त्यांचे सासरे सिधोपंत यांनी निश्चित पूर्ण सहाय्य दिले असणार शके बाराशे सात ते बाराशे नऊ पर्यंत ही काशीयात्रा झाली असावी. ज्ञानदेवांना लौकिक अर्थाने हवे असणारे सर्व काही त्यांच्या विभूतिमत्त्वाला थोडाही धक्का न लागता मिळाले. आता ज्ञानदेव त्यांच्या मनी उठलेल्या 'विश्वाचे आर्त' सिद्ध करण्यासाठी सज्ज झाले. भागवत धर्माला सर्व धर्मांचा, परिस्थितीचा जाणता अद्वैताचार्य ज्ञानदेवांच्या रूपाने मिळाला. (बौद्ध, जैन, महानुभाव या धर्मांचे, जेष्ठ वैदिक धर्माचार्यांचे, काश्मिरीशैव पंथाचे, व यवनांच्या आक्रमणाचे भेसूर स्वरूप ज्ञानदेवांना आळंदीत मिळणे शक्य नव्हते. विभूती असूनही लौकीक कारणांसाठी त्यांची ही काशीयात्रा निश्चित झाली असावी असे मला वाटते. या यात्रेत जे पाहिले त्यामुळेच पुढे त्यांनी नामदेवास उत्तर यात्रेस नेले.)

आपल्या श्रीगुरूंची भेट घ्यावी, आपली झालेली जातिभ्रष्ट स्थिती सांगावी व त्यांचा उपदेश घ्यावा व आपली ही चार लेकरांची ईश्वरी भेट त्यांचे पायी ठेवावी, मुलांनाही बहुश्रुततेच्या दृष्टीने हा आपल्या बरोबरचा शेवटचा प्रवास उपयोगी ठरेल, या विचारांनी विठ्ठलपंतांनी काशीक्षेत्री जाण्याचा निर्णय केला असावा. तेथून परत आल्यावर आळंदीच्या ब्रह्मवृंदाना मुलांच्या मुंजीबद्दल विचारावे

---

१. वै. भिंगारकर श्री. र. महासाधु श्रीज्ञानेश्वर चरित्र

असा त्यांनी विचार केला असावा. चारही मुले आता नाथपंथाच्या अधिकारी व्यक्ती झाल्या होत्या. स्वामी रामानंद ज्ञानदेवांनापाहून चकित झाले असतील. काशीतील वास्तव्यात रामानंदस्वामींनी स्वत: पुढाकार घेऊन ज्ञानदेवांना बौद्ध, जैन इत्यादी धर्मांचे धर्मग्रंथ व शंकराचार्यादि वैदीक धर्मपंथांच्या विविध आचार्यकुलांचे धर्मग्रंथ, काश्मिरी शैव पंथाचे, विशेषत: आचार्य विष्णुगुप्त व अभिनवगुप्तांचे वाङ्मय उपलब्ध करून दिले असावे. कारण या सर्वांचे संदर्भ ज्ञानेश्वरी, अमृतानुभवात सापडतात. 'भाष्यकाराने वाट पुसतु ।' असे ज्ञानेशांनी ज्ञानेश्वरीत म्हटले आहेच. आपल्या श्रीगुरूंचे आशीर्वाद घेऊन विठ्ठलपंत आळंदीस परतले. हा काळ शके बाराशे नऊ-बाराशे दहा असावा. रामानंदस्वामींनी ज्ञानदेवास संजीवनी विद्या दिली असे [१]भिंगारकरबुवा लिहितात. आपल्या चारही मुलांना घेऊन काशीक्षेत्री आपल्या श्रीगुरू रामानंदस्वामी यांना भेटण्याच्या विठ्ठलपंताच्या विचारामागे मला दोन विशिष्ट विचार प्रवाह स्पष्टपणे दिसतात. एक म्हणजे ज्ञानदेव-निवृत्तिनाथ यांच्या दृष्टीने या उभयतांना आपल्या श्रीगुरूंकडून भारतातील विविध धर्मपंथांचे व चालीरितींचे मार्गदर्शन, लोक दर्शन, त्या काळी होत असलेल्या परचक्राची जाणीव, निसर्ग व भूप्रदेश, मंदिरे त्यांची माहिती असणे जरूर होते. व या विभूती पूर्णत्वास जाण्यासाठी लागणारे संदर्भ जाणून घेणे जरूर होते. दुसरा प्रमुख उद्देश म्हणजे रामानंदस्वामी हे त्या काळातील सर्वमान्य अशी ऋषितुल्य, विद्वान व अधिकारी व्यक्ती होती. त्यांच्याच आज्ञेने विठ्ठलपंतांनी पुन्हा गुहस्थाश्रम स्वीकारला होता व नामदेवांच्या 'आदि' तील अभंगाप्रमाणे रामानंदस्वामींनी 'स्वस्ति'चा आशीर्वादही दिला होता.

चैतन्ये चरणी ठेवियेला माथा । म्हणे त्यागुनी कांता आलो स्वामी ।।५।।
उठवुनी श्रीपादें दिधले आश्वासन । म्हणतां करीं ग्रहण इचें आता ।।६।।
अविधी कर्माचें न धरावें भय । यासी आहे साह्य जगदीश ।।७।।
स्वदेशा जाउनी करावा आश्रम । सुखरूप स्वधर्म चालवावा ।।८।।
श्रीपादें मस्तकी हात ठेवियेला । निरोप दिधला चैतन्यासी ।।९।। ना.गा. ८९९

रामानंदस्वामीसारखा एक तपोनिष्ठ श्रीगुरू जेव्हा आशीर्वाद देतो तेव्हा त्यामागचे तपोबल

---

१. वै. भिंगारकर श्री. र. महासाधु श्रीज्ञानदेव चरित्र. पान ६९

लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. श्रीगुरू सामर्थ्याचे वर्णन ज्ञानदेवांनी 'अमृतानुभवा'च्या दुसऱ्या प्रकरणात केले आहे. तेव्हा मुलांच्या भवितव्याच्या दृष्टीने श्रीगुरूरामानंदांशी चर्चा व त्यांचे मार्गदर्शन हे विठ्ठलपंताना अपरिहार्य वाटले असावे.

विठ्ठलपंतावर व पर्यायाने पत्नी व मुलांवर झालेल्या ब्राह्मण्याने जातिभ्रष्ट व्हावे लागले हे शल्य विठ्ठलपंतांच्या हृदयास मोठे होते. श्रीगुरूंचा आशीर्वाद तर 'सुखरूप स्वधर्मा'चा होता. या साठी श्रीगुरूंचे मार्गदर्शन आवश्यक होते कारण प्रश्न मुलांच्या मुंजीचा होता. विठ्ठलपंतांच्या अवस्थेबद्दल नामदेव 'आदि'त म्हणतात –

झाली उपवर व्रतबंधा योग्य । उभयतां उद्वेग चिंतातुरे ।।६।।

जाती कुळावेगळी पडियेली निराळी । माझी वंशावळी प्रायश्चित्त ।।७।। ना.गा. ९००

या गोष्टीचा योग्य उहापोह होण्यासाठी तत्कालीन वैदिक धर्मसंस्थांचा, विशेषत: उत्तर भारत व पैठण यांचा विचार करणे जरूरीचे आहे.

[१]'ज्ञानेश्वर चिंतन' या ग्रंथात (कै) लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा 'ज्ञानदेवांची जातिकुळावेगळी वंशावळी' हा लेख आहे. ते लिहितात – "चाळीस वर्षापूर्वी 'श्रीज्ञानेश्वर दर्शन' या नावाचा ग्रंथ अहमदनगर येथील वाङ्मयोपासक मंडळाने दोन भागात प्रसिद्ध केला होता. (या ग्रंथाचा उल्लेख (कै) [२]ह.भ.प. शं. वा.दांडेकर यांनीही आपल्या 'ज्ञानेश्वर चरित्रात' केलेला आहे) आदि अभंगाच्या संदर्भात म. म. श्रीधरशास्त्री पाठक यांचा 'श्रीज्ञानेश्वरांची पितृत: शुद्धि व धर्मशास्त्र' हा लेख प्रसिद्ध झाला (पृष्ठ वीस ते एकोणचाळीस)." "ईश्वराचा आशीर्वाद असल्यामुळे संन्यासातून गृहस्थाश्रमात जाणे हे अवैध कर्म म्हणून मनाशी भीती बाळगू नये. गृहस्थाश्रम हाच स्वधर्म समजावा, अशी आज्ञा विठ्ठलपंताना त्या यतिवर्याने केली. आळंदीला परतल्यावर बारा वर्षे प्रपंच केला. या बारा वर्षांत बहिष्कार पडला होता तो सोसला. परंतु मुलगे उपनयन संस्काराच्या वयात आले हे पाहून ब्रह्मवृदांना विठ्ठलपंत शरण गेले; आणि प्रायश्चित्त सांगावे, अशी याचना केली. वैदिक शास्त्रज्ञांनी धर्मशास्त्र निबंध पाहून देहान्तप्रायश्चित्त सांगितले. येथे देहांत प्रायश्चित्त म्हणजे

---

१. कै. जोशी लक्ष्मणशास्त्री ज्ञानेश्वर चिंतन, ज्ञानदेवांची जातिकुळावेगळी वंशावळी, पान–४

२. वै. दांडेकर शं. वा. श्रीज्ञानदेव (चरित्र, ग्रंथ, तत्वज्ञान) १९३२ पान–५५–५६

जिवंत असेपर्यंत आचारायचे प्रायश्चित्त किंवा देहत्यागरूपी प्रायश्चित असे आहे. विठ्ठलपंतानी गृहत्याग केला.''

''श्री पाठकशास्त्री यांच्या मते 'आदि' अभंगातील आळंदीतील ब्रह्मसभेचा हा देहान्त प्रायश्चित्ताचा निर्णयच अशास्त्रीय आहे; असे याज्ञवल्क्यस्मृतीवरील सुप्रसिद्ध 'मिताक्षरानिबंध', माधवाचार्यांची पराशरस्मृतीवरील टीका, कमलाकर भट्टाचा 'निर्णयसिंधू'. नागेश भट्टाचा 'प्रायश्चित्तेंदुशेखर' आणि काशिनाथोपाध्याय यांचा 'धर्मसिंधू' या सर्वांचे विवेचन पाहता म्हणता येते. संन्यासातून गृहस्थाश्रमात येणे हे उपपातक आहे, महापातक नाही. याचे प्रायश्चितही सहा महिनेपर्यंत आचरावयाची चांद्रायणी व्रते हे होय.'' परंतु कै. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांचे लिहिण्या प्रमाणे ''आळंदीच्या ब्रह्मवृंदांनी जो निर्णय दिला त्याचा आधार म्हणजे 'ब्रह्मसूत्रशांकरभाष्य' होय. प्रायश्चित्त घेतल्यावरही त्यांच्यावरचा बहिष्कार उठू शकत नाही. प्रत्यारोहण उपपातक आहे असे कित्येकांचे मत ब्रह्मसूत्रकारांनीही नोंदलेले आहे, परंतु ब्रह्मसूत्रानुसार त्यावर उपाय नाही. मिताक्षरादि धर्मशास्त्रग्रंथांना हजार बाराशे वर्षापासून महाराष्ट्रात व भारतात धर्मप्रवण म्हणून मान्यता आहे. वरील ग्रंथ व भाष्य यांचा समुच्चयाने विचार करता संन्यासातून गृहस्थाश्रमात परत फिरण्यासाठी दोन विरुद्ध परंपरा प्राचीन काळी मान्यता पावलेल्या दिसतात.''

माझ्या चिंतनाप्रमाणे विठ्ठलपंतांना त्यांच्या श्रीगुरूंनी दिलेल्या 'स्वस्ति'च्या आशीर्वादाचा अर्थ समजला असेल. त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरादि चारही भावंडांना पाहताच पूर्णज्ञानी असलेल्या रामानंदस्वामींना हे तर चार परब्रह्माचेच अवतार आहेत हे लक्षात आलेच असणार ते विठ्ठलपंतांना निश्चित म्हणालेही असतील की, ''शिष्या, तू धन्य आहेस. तुझ्या पोटी देवांनीच अवतार घेतला आहे. तुझ्यामुळेच मीही आज धन्य झालो. श्रीरामाला, श्रीकृष्णाला काही शिकवावे लागले होते का? हा तुझा ज्ञानदेव तर श्रीकृष्णाचाच पुन्हा घेतलेला अवतार आहे. ते जन्मत:च ब्रह्मज्ञ आहेत. लौकिकापुरते जे हवे आहे ते तू त्यांना पूर्णपणे दिले आहेस, तरीही मी ज्ञानदेवास वैदिक धर्माबरोबरच अन्य बौद्ध, जैन, काश्मिरी शैव, इत्यादींचे सखोल ज्ञान देईन. मी ज्ञान देणे हे केवळ निमित्तच असणार आहे. त्यांना परकीय आक्रमणही जाणून घेऊ देत. मी ही धन्य होईन. अरे, ते ज्या दिशेला बघतील तेथील सर्व विश्व व तेथील व्यवहार त्यांचे होतील. तुझा जेष्ठ पुत्र निवृत्ती तर

आता भारतभर पसरलेल्या नाथसंप्रदायाचा अध्वर्यू झालेला आहे. व त्यानेच आपल्या धाकट्या भावास म्हणजे ज्ञानदेव यासही नाथसंप्रदायाचा अनुग्रह दिलेला आहे. तू ईश्वरी ऋणातून मुक्त आहेस. तुला योग्य वाटेल तेव्हा तुम्ही माझ्या आश्रमात वा बद्रिकेदारला वानप्रस्थाश्रम स्वीकारावा हे बरे. आता परमेशाच्या अवतार कार्यास सुरुवात होणार आहे.''

ज्ञानदेव-निवृत्ती-सोपान-मुक्ताई यांना काशीक्षेत्राने व प्रवासाने हवे ते दिले. संतुष्टमनाने विठ्ठल-रखुमाई आळंदीस परतले असतील. हा अपवादात्मक प्रत्यय विठ्ठलपंतानाही माहीत असावा. परंतु आळंदीत केवळ त्या दोघांचेच नव्हे तर चारही मुलांचे बहिष्काराने अनन्वित हाल झाले. पण विठ्ठलपंतानी शेवटपर्यंत त्या अपवादात्मक प्रत्ययाचा उच्चार केला नाही. अंतत: जलसमाधीही पत्करली. याचे कारण केवळ एकच, त्यांनी जर तो अपवाद प्रकट केली असता तर पैठणातील स्वार्थी लोकांनी त्याचा प्रच्छन्न उपयोग करून अपवादाचा नियम केला असता व धर्मसंस्था व समाजसंस्था यांना छेद गेला असता. [१]म. म. पाठकशास्त्रींनी लिहिल्याप्रमाणे प्रायश्चित म्हणजे महाराष्ट्रातील शांकरभाष्यकरांना उघड विरोध झाला असता.

रामानंदस्वामींना अत्यंत व्रतस्थ, पवित्र अशा आपल्या शिष्यास सौम्य शिक्षेची अपेक्षा होती. परंतु विठ्ठलपंतानीही आपल्या श्रीगुरूंना कमीपणा येऊ दिला नाही.

ज्ञानदेव, निवृत्ती, सोपान, मुक्ताबाई हे चौघेही पूर्ण आत्मरूप झालेले होते. आळंदीकरांनी आपल्याला जरी धर्मबहिष्कृत केले असले तरी त्यांनी या चौघांच्या मौजी बंधनाच्या (अभ्युदय-नि:श्रेयसाच्या) आड विघ्न आणू नये या विचारांनी शरणागत होऊन विठ्ठलपंतानी आळंदीच्या ब्रह्मसभेला मुलांच्या मुंजी संस्कारासाठी विनंती केली.

[२]नामदेव म्हणतात -

झाली उपवर व्रतबंधा योग्य । उभयतां उद्वेग चिंतातुरे ।।

जाती कुळावेगळी पडियेली निराळी । माझी वंशावळी प्रायश्चित्त ।।

---

१. म. म. पाठक सिद्धेश्वरशास्त्री, ज्ञानेश्वर दर्शन.

२. श्रीसंतनामदेवांची गाथा, गीता प्रेस, गोरखपूर.

मिळविले व्दिज केली ब्रह्मसभा । क्षमा अपराधा करा दीना ।।

निबंधी निर्णय पाहती धर्मशास्त्री । तुम्ही अति श्रौती पारायण ।।

सांगाल तें मान्य म्हणती साहीजणे । शुची हे करणे पतितांसी ।।

निवृत्ती म्हणे तुम्ही भूदेव प्रत्यक्ष । दर्शनेची मोक्ष जडमूढा ।। ना.गा. ९००

देहांत प्रायश्चित्त असे या बोलिले । विचारुनि भले हित करा ।।

म्हणती व्हिजवर आणीक नाही उपाव । संस्कारे वैश्वदेव केला शुद्ध ।।

दारा पुत्र गृह त्यजूनी निघाला । नमस्कार केला द्विजवृंदा ।।

त्याग आणि वैराग्य हेंचि प्रायश्चित्त । झाला शुचिर्भूत गुरूकृपे ।।

निवृत्ति म्हणती आम्हा कवण गती । सांगावे श्रीमंती विचारूनि ।। ना.गा. ९०१

आई-वडील सोडून गेल्यावर आपापसातील विचारानंतर चौघे आळंदीत ब्रह्मसभे समोर गेले. विठ्ठलपंतांना दिलेल्या शिक्षेत आपण आपला अधिकार गैरवाजवी वापरला असावा या शंकेने आळंदीकरांनी मुलांना पैठणला जाण्यास सांगितले असावे. कारण शुद्धिपत्राबरोबरच्या संस्कृत ओव्यात व नामदेवांच्या अभंगात आपण अज्ञानाच्या अधिकाराने वागलो हे पैठणच्या ब्रह्मवृदांनी मान्य केले आहे.

पैठणला शुद्धीपत्रासाठी जाण्याचा विचार निवृत्तिनाथ व सोपान देव यांना पसंत नव्हता. कारण जे शुद्धच आहेत त्यांना शुद्धीपत्राची जरुर काय, हा त्यांचा विचार होता. ज्ञानदेवांनी निवृत्ति-सोपान यांना विरोध करून शुद्धिपत्र म्हणजे अविधि आचरण न करता, वेदोक्तपद्धतीने आचरून वेदांनी सांगितलेल्या शुद्धत्त्वाने कुळधर्म पाळावा, अनाचार होऊ देऊ नये, आणि पावन होऊनही अशास्त्रीय वर्तन करू नये असे धर्मशास्त्राप्रमाणे वागण्याचा विचार सांगितला. हा विचार निवृत्तिनाथ व सोपान देव या दोघांनाही मान्य झाला. हे अभंग[१] नामदेव गाथेत आहेत.

नामदेवांच्या अभंग नऊशे पांच या अभंगात पैठणच्या ब्रह्मसभेने या चौघांनी पुढील आयुष्य कसे घालवावे याचा आदेश असून त्यांना गो-खर-श्वान यांनाही वंदून रहावया सांगितले आहे. व

---

१. श्रीनामदेवांची गाथा, अभंग ९०२, ९०१, ९०५, ९०६

या चारही भावंडांनी ते आनंदाने मान्यही केले आहे. वास्तविक पैठणच्या सभेचा निर्णय म्हणजे ज्ञानदेवांनी पुढील आयुष्यात जे कार्य केले त्याला पूर्णविरामच ठरणार होता. या चौघांचे स्वतंत्र अस्तित्वच संपले असते. पण विभूतींच्या अवतारांचे कर्तृत्त्वाचा प्रवास इथेच थांबणार नव्हता. इतिहासाला कलाटणी देणारा क्षण पुढेच उभा होता.

ज्ञानेश्वर विभूतीने उभा केलेला क्षण पुढीलप्रमाणे अवतरला -

ब्रह्मवृंदातील काही कुटाळ ब्राह्मणांनी चौघांना त्यांची नावे विचारली. संन्यासाच्या मुलांची निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई ही नावे ऐकून कुटाळक्या करणाऱ्या ब्राह्मणांना आणखीनच चेव चढला. यापुढील प्रसंग नामदेव सांगतात -

ऐकोनी ऐसीं नावें हासिन्नलें ब्राह्मण । नामाचें अभिधान सांगा आम्हा ।।१।।

एक म्हणती नामापाशीं काय आहे । ज्ञान वहात आहे परवालीसी ।।२।।

ज्ञानदेव म्हणे तोही माझा आत्मा । वेगळीक आम्हा तया नाहीं ।।३।।

मारिती आसुड म्हैशियाचे पाठीं । तोंचि वळ उठी ज्ञानदेवा ।।४।।

म्हणती व्दिजवर अहो ज्ञानदेवा । यापासोनी उच्चरावा वेदध्वनी ।।५।।

तरीच तुमची सत्ता आम्हा येईल कळों । नाही तरी बोलों नका कांही ।।६।।

ज्ञानदेव म्हणे बोले रे ऋग्वेद । ओंकार मूळ शब्द प्रणवाचा ।।७।।

वेदाचा आरंभ करिता झाला पशू । विधी उपन्यासु सांग पुढे ।।८।।

करिती आश्चर्य सकळ व्दिजवर । हे तिन्ही अवतार तीन देवांचे ।।९।।

आदिमाता मुक्ताई मुक्तपणे अवतरली । आम्हांपासून झाली थोर चुकी ।।१०।।

कर्मठ अभिमाने ठकलो देहबुद्धी । गोवियेली विधी निःसंदेह ।।११।।

नेणो भक्तिज्ञान वैराग्याचा लेश । कुटुंबाचे दास होऊनी ठेलो ।।१२।।

आणिकांसी सांगो आपण नाचरो । लटिकेच हुंबरो प्रतिष्ठेसी ।।१३।।

धन्य यांचा वंश धन्य यांचे कुळ । धन्य पुण्यशील अवतार हे ।।१४।।

सकळ व्दिजवर करिती नमस्कार । आनंदे जयजयकार करिताती ।।१५।।

तंव काव्ययज्ञ झाला गृहस्थाचे घरी । पितर मंत्रोच्चारी आव्हानिले ।।१२-९०७

पशुमुखें वेद दृश्य पितरलोक । थोर हे कवतूक दाखविले ।। १६-९०७

मिळोनि समस्त सोडियेली शास्त्रें । विचारोनी पत्र लिहीयेले ।।१७-९०७

हे परलोकीचे तारु देवत्रय यांसी । प्रायश्चित्त काय यासीं द्यावे कोणी ।।१८।।

लिहोनिया पत्र दिधले तया हातीं । समस्तासी निवृत्ति नमस्कारिले ।।१९।।९०७

हे शुद्धीपत्र देण्यासही पैठणकरांनी उशीरच केला. ब्राह्मणाचे घरी श्राद्धाचे जेवण्यास जेव्हा त्या ब्राह्मणाचे पितर प्रत्यक्ष अवतरले तेव्हाच ज्ञानेशांची खरी किंमत सर्वांना समजली. पैठणच्या ब्रह्मवृंदांनी ज्ञानदेवास जे संस्कृत शुद्धिपत्र दिले ते त्याची नक्कल भिंगारकरबुवांना सापडलेली पांगारकरांनी दिले आहे. त्याचे लेखक बोवदेव आहेत. कै. वे. शा. सं. भिंगारकर आपल्या श्री ज्ञानेश्वर चरित्रात लिहितात की, "पैठणातील श्रीमंत गृहस्थ लोकांनी असा बेत केला की विठ्ठलपंताचे मुलांचे व्रतबंध येथेच करावेत. व त्याला जो काही खर्च लागणारा तो आपण सर्वांनी द्यावा. वैदिकशास्त्री पुराणीक, हरिदास या सर्व मंडळींनी उत्तम प्रकारचे एक शुद्धिपत्र तयार कले. आमच्या मनात असा हेतू आहे की याचे मौजीबंधन सर्व भिक्षुक मंडळींनी मदत करून येथेच करावे. ज्ञानेश्वरांनी त्या सर्वास उत्तर दिले की मौजीबंधन करणे आम्हास युक्त नाही. मागे कधी संन्याशाच्या मुलांचा व्रतबंधसंस्कार झाला असे कोणी ऐकले व पाहिले नाही.... सर्वांनी मोठ्या आदराने वैहिक, पुराणिकांनी केलेले शुद्धिपत्र मोठ्या आदराने श्री ज्ञानेश्वरांचे स्वाधीन केले." या नंतर ही चारही भावंडे काही महिने पैठणातच राहिली. रोज प्रवचन, कीर्तनाबरोबरच त्यांनी तेथील प्रमुख धर्मग्रंथांचेही अध्ययन केले. याच काळात निवृत्तिनाथांनी श्रोत्यांसमोर हाती 'गीता संबोधनी' घेऊन गीतार्थ सांगितल. नामदेव म्हणतात -

अध्यात्मग्रंथ पाहती पैठणीं । गीता संबोधनी जवळी असे ।।

सांगती पुराण रात्रीं हरिकीर्तन । पैठणीचे जन वेधियेले ।। ना.गा. ९०७

आपल्या श्रीगुरूंच्या मुखातून श्रीगुरूंच्या म्हणजे गहिनीनाथांच्या आज्ञेने झालेले गीता प्रवचन

ऐकताना ज्ञानेशांची झालेली स्थिती त्यांनी अठराव्या अध्यायात गुरूपरंपरा सांगताना पुढील प्रमाणे वर्णिली आहे -

मग तिही ते शांभव । अव्दयानंद वैभव ।
संपादिले सप्रभव । श्रीगहिनीनाथा ।। ज्ञा. १८.१७५६

तेणे कळि कळितु भुतां । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा दिधली ऐसी ।। ज्ञा. १८.१७५७

ना आदिगुरू शंकरा- । लागोनि शिष्य परंपरा ।
बोधाचा हा संसार । जाला जो आमुतें ।। ज्ञा. १८.१७५८

तो हातूं घेऊनि आघवा । कळी गिळितयां जीवा ।
सर्व प्रकारी धावां । करी पां वेगीं ।। ज्ञा. १८.१७५९

आधीच तव तो कृपाळु । बरी गुरु आज्ञेचा बोलु ।
जाला जैसा वर्षाकाळु । खवळणे मेघा ।। ज्ञा. १८.१७६०

मग आर्ताचेनि वोरसे । गीतार्थ ग्रंथवमिसे ।
वर्षला शांतरसे । तो हा ग्रंथु ।। ज्ञा. १८.१७६१

तेथ पुढां मी बापिया । मांडला आर्ती आपुलीया ।
कीं यासाठीं येवढिया । आणिलो यशा ।। ज्ञा. १८.१७६२

एवं गुरूक्रमे लाधले । समाधिधन जे आपूले ।
ते ग्रंथे बांधौनि दिधलें । गोसावी मज ।। ज्ञा. १८.१७६३

ज्ञानेशांना श्रीगुरू मुखाने गीता समग्र ऐकायला मिळाली. ती ऐकताना माउली पूर्ण एकाग्रतेने सहज समाधी अवस्थेत, विश्वापासून पूर्ण दूर राहून हे समाधीधन हृदयात साठवीत होते.

येथपर्यंत पैठणचे कार्य, अध्ययन, श्रीगुरूंकडून गीतार्थ श्रवण व शुद्धीपत्र प्राप्ती हे कार्य झाले. पैठणच्या शुद्धीपत्रात कोठेही निवृत्तिनाथ, ज्ञानदेव व सोपान यांना मुंजीची परवानगी दिल्याचा

उल्लेख नाही. उलट त्यांनी आपला वंश वाढवू नये अशी त्यांना विनंती करण्यात आली. ज्ञानदेव मनात हसले असतील. अर्थात ज्ञानेशांची योग्यता कळण्याइतके पैठणचे वा आळंदीचे विप्र ज्ञानी नव्हते हा त्यांचाही दोष नाही. परंतु ज्ञानदेव व निवृत्ति, सोपान यांनाही त्यांच्यावरील ब्राह्मण्य संपले याचाच आनंद होता. मुंज होऊन जर त्यांना द्विजत्व प्राप्त झाले असते तर त्यांना गीतेच्या आधारे वेदांपासून ते शंकराचार्यापर्यंत चालत आलेले वेद, गीता, भाष्य, वाचण्याचा, समजण्याचा, स्त्रिया व अत्यंज यांचा अधिकार प्रस्थापित करता आला नसता.

मी ज्ञानेश्वर या विभूतीचे जीवनाशी संबंधित घटनांना मागोवा घेण्याचा प्रयत्न करीत आहे. नामदेवानेही ज्ञानदेवांचे चरित्र ओवीबद्ध करताना बराच कालखंड सोडून दिला आहे. 'ज्ञानेश्वरमहाराजांची आदि', तीर्थावळी ज्ञानदेवांचा समाधी महिमा, मुक्ताई समाधी व निवृत्तिसमाधी. त्यानंतर नामदेवांची ज्ञानदेवांच्या समाधीनंतर त्यांच्या भेटीची तळमळ अशा एकूण सुमारे तीनशे तेवीस अभंगातून नामदेवांनी ज्ञानदेवादि चारही भावंडाचे चरित्र वितरीत केले आहे. त्यांच्यासह त्यांच्या समकालीन श्रीनिवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताई, जनाई, गोराकुंभार, नरहरि सोनार, सेना न्हावी, चोखोबा, सोयराबाई, बंकामहार, मंजूळा, भागू महरिण यांनी ज्ञानदेवांवरील त्यांच्या भक्ती व प्रेमापोटी त्यांच्यावर अभंग रचना केलेली आहे.

या सर्व अभंगातून ज्ञानदेवांचे विभूतिमत्त्व अगदी स्पष्ट होते. माउली हे आदर्श बंधू, आदर्श शिष्य, थोर तत्त्वचिंतक, वेदापासून सर्वशास्त्रे, पूर्वसुरींच्या तत्त्वज्ञानाचे अभ्यासक व चिंतक हे सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ होते. गीतेत सांगितलेल्या निष्काम कर्मयोगाचे स्वत: पूर्णपणे पालन करून, 'मी निरीच्छ भावनेने माझे या अवतारातील कार्य पूर्ण केले', असे सांगून, पुढील कार्यविस्तार नामदेवांकडे सोपवून, अगोदरच घेतलेल्या निर्णयाप्रमाणे नामदेवाला सांगितले. त्यांचा हा विचार पांडुरंगाने व त्यांच्या श्रीगुरू निवृत्तिनाथांनी अगोदरच जाणला होता. माउलींचा संजीवन समाधीचा निर्णय पूर्ण झाला.

या सर्वांच्या अभंगातून कार्य समजले. परंतु एकवीस वर्षे तीन महिने पाच दिवस हे क्रमश: मांडायचे कसे हा प्रश्न कल्पनेवर तर सोडून देता येत नाही. जगाच्या दृष्टीने विठ्ठलपंताच्या-रुक्मिणींच्या देहविसर्जन करण्याच्या (सुमारे शके बाराशे नऊ-दहा) कालखंडापर्यंत शके अकराशे

सत्याण्णव ते शके बाराशे दहा या काळातील तेरा वर्षांचा आलेख कसा ठरवायचा. हे महत्त्वाचे आहे बाराव्या शतकानंतर दुसरे ज्ञानदेव या भारतभूमीत झाले नाहीत. यदा यदा हि धर्मस्य.... व परित्राणाय साधुनां.... असे विश्वाला अभिवचन देऊन पूर्ण करणाऱ्या केवळ दोनच विभूती या विश्वपटलावर अवतीर्ण झाल्या. त्या आहेत भगवान श्रीकृष्ण आणि विभूती ज्ञानदेव. ज्ञानदेवांनी एकवीस वर्षे पूर्ण या लहानशा वयात जे संपूर्ण विश्वाला ललामभूत झाले असे कार्य त्यांचेपूर्वी व नंतरही कोणी केले नाही. त्यांचे कार्य जगासमोर आहे, परंतु या विश्वविख्यात ईश्वरीविभूतीच्या आयुष्याच्या जीवन – खुणा माहीत नसाव्यात ही खंत ज्ञानदेवांवर केवळ नितांत श्रद्धा व प्रेम करणाऱ्या मनास वेदना देणारी आहे.

भगवान श्रीकृष्णाच्या तोडीचे ज्यांचे कार्य त्या ज्ञानेश्वरांचे जीवन पूर्णपणे आकलनात न येणे हे मनीचे शल्य फार दुःखदायक आहे. केवळ नामदेवांनेच नव्हे तर अनेक समकालीन व त्या नंतर होऊन गेलेल्या संतांनीही ज्ञानेश्वर जीवनावर सुंदर काव्यात्मक लिखाण केले. ते प्रत्ययकारीही आहे. गेल्या शंभर–दीडशे वर्षांत अनेक लेखकांनी ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेव पासष्टी, ज्ञानदेवांची अभंगवाणी यावर व संजीवन समाधीवर खूपसे लिखाण केलेले आहे. त्यामुळेच या महान विभूतीचे महान कार्य जगासमोर आले. परंतु ज्ञानदेवांच्या आयुष्याची या सर्व लिखाणातून मिळणारी तुटक तुटक माहिती, ज्ञानेश्वर त्यांच्या आई–वडिलांच्या जलसमाधी नंतर शुद्धिपत्रासाठी पैठणला जाण्यास निघाले तेव्हापासूनची आहे. त्यातही ते आळंदीहून पंढरपुरास केव्हा आले, हरिपाठ केव्हा व का लिहिला, तीर्थयात्रेचे निश्चित प्रयोजन काय, समाधीचा निर्णय केव्हा व का घेतला, हे सर्व प्रश्न अनुत्तरितच किंवा संदिग्ध राहतात. सर्वात महत्त्वाचे म्हणजे जन्मापासून ते पैठणला जाण्यास निघे पर्यंतचा तेरा वर्षांचा कालखंड अज्ञातच राहणार का? श्रीकृष्णाचे जीवन महाभारतातून समजू शकले. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।' हीच प्रतिज्ञा ज्ञानेशांनी कृतीने पूर्ण केली. श्रीकृष्ण राजयोगी तर ज्ञानेश्वर ज्ञानयोगी. श्रीराम, श्रीकृष्ण हे विभूती अवतार क्षत्रिय कुलोत्पन्न असून धर्मरक्षणाबरोबरच 'विनाशायच दुष्कृताम्' हे ही कार्य करण्यासाठी ते अवतार झाले. श्रीज्ञानेश्वर, श्रीनिवृत्ती या विभूती अवताराचे माहात्म्य धर्मरक्षणाबरोबरच, सर्व वर्णांचे अधिकार रक्षण या बरोबरच 'खळांचे निर्दालन' न करता 'खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो।' ही

मातृहृदयातून प्रकटलेली ऋजुतेची भावना आहे. या कार्यासाठीची विचारसरणी या उभय विभूर्तींची पैठणला जाण्यापूर्वीच तयार झाली आहे. आणि म्हणूनच निवृत्ति-ज्ञानदेव यांचा विचार करताना प्रत्येक वेळी मला भगवद्गीतेतील सहाव्या अध्यायाती एक्केचाळीस ते चव्वेचाळीस श्लोकांची आठवण येते. परंतु ज्ञानेश्वरांनी ज्या मोजक्या शब्दात 'योगच्युता'च्या पुढील जन्म व परिस्थितीचे वर्णन केले आहे, तसे ज्ञानदेवांच्या जीवनाचे अभंग मांडता आले तर त्यांचे एकसंध आयुष्य जगाला समजेल.

प्राप्य पुर्णकृतां लोकानुषित्वा..... ।। भ.गीता ६.४१

जयांच्या कुळी चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता ।

जयातें गृहदेवता । आदि ऋद्धि ।। ज्ञा. ६.४४६

ऐसी निजपुण्याचिया जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी ।

तिथे जन्मे तो सुरवाडी । योगच्युतु ।। ज्ञा. ९.४४७

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।..... ।। भ.गीता ६.४२

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।..... ।। भ.गीता ६.४३

जे विवेकग्रामींचा मुळीं । बैसले आहाति नित्य फळीं ।

तया योगियांचां कुळीं । जन्मपावे ।। ज्ञा. ६.४५१

मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पहाट फुटे ।

सूर्यापुढां प्रगटे । प्रकाशु जैसा ।। ज्ञा. ६.४५२

तैशी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां ।

बाळपणीच सर्वज्ञता । वरी तयातें ।। ज्ञा. ६.४५३

तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुभे ।

मग सकळ शास्त्रें स्वयंभे । निघती मुखें ।। ज्ञा. ६.४५४

पूर्वाभ्यासेन तेनैव हियते ह्यवशोऽपिस: । भ.गीता ६.४४

तैसे दुर्भेद जे अभिप्राय । कां गुरूगम्य हन ठाय ।
तेथे सौरसेंवीण जाय । बुद्धी तयांची ।। ज्ञा. ६.४५९

बळिये इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना ।
पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ।। ज्ञा. ६.४६०

ऐसें नेणों काय आपैसें । तयातोंचि कीजे अभ्यासें ।
समाधि घर पुसे । मानसाचे ।। ज्ञा. ६.४६१

भगवद् गीतेतील वरील श्लोक व त्यावरील ज्ञानदेवांच्या ओव्या उद्धृत करण्यामागे माझा निश्चित विचार आहे. कारण वरील वर्णन हे योग्यच्युताचे आहे. पूर्वजन्मी काही कारणाने ज्याला आपली साधना पूर्ण करता आली नाही त्याचा पुढील जन्म कोठे व पूर्व पुण्याईने त्याला काय काय सहज साध्य होते, त्याचे हे वर्णन आहे.

श्रीज्ञानेश्वरांचा व त्यांचे श्रीगुरू निवृत्ती यांचा अवतार हा योगभ्रष्टाचा पुढील अवतार नाही. ईश्वराचा 'यदा यदा हि धर्मस्य...।' यासाठी घेतलेले ईश्वरी मानवी अवतार आहेत. मला योगभ्रष्टाचा पुढील अवतार व त्याला जन्मत: प्राप्त होणाऱ्या दुर्लभ सर्वज्ञता यांची ज्ञानदेव अवताराशी तुलनाही करायचीच नाही. कारण योगभ्रष्टाचा पुढील जन्म व भगवंताचा विश्वोद्धारासाठीचा मानवी अवतार यांची तुलनाच होऊ शकत नाही. परंतु मला श्रीज्ञानेश्वरांच्या आपल्याला अज्ञात असलेल्या एक ते तेरा वर्षातील त्यांच्या जीवनातील काही भागाचा व पुढील काही घटनांचा अंदाज विवेकी विचाराने मांडता येईल. श्रीज्ञानेश्वर व श्रीनिवृत्तिनाथ यांच्यातील वयाचे अंतर अवघे एक वर्ष व सहा महिने आहे. विठ्ठलपंत हे व्युत्पन्न साधक, अभ्यासक व मार्गदर्शक आहेत. या उभय भावंडाना सर्वज्ञ होण्यासाठी ज्ञानप्राप्तीचे साधनांचे केवळ सहज मार्गदर्शन हवे होते. ते त्यांच्या वडिलांचेकडून प्राप्त झाले. ज्ञानदेव तीन ते पाच वर्षांचे होईपर्यंत घरातील वेदांचे, उपनिषदांचे व अन्य धर्मग्रंथांचे ज्ञान व विठ्ठलपंताचे निवृत्तिनाथांना शिकविण्याचे निमित्ताने होणारी चर्चा हेच पूर्णत्वाचे स्वरूप.

'ऐसें नेणों काय आपैसे । तयातेंचि कीजे अभ्यासें ।

समाधि घर पुसे । मानसाचे ।। ज्ञा.६.४६१

ही अवस्था आहे योगभ्रष्टाच्या पुढील जन्मीच्या अवताराची. माउली तर विभूती. यावरून हे स्पष्ट आहे की वयाच्या चौथ्या, पांचव्या वर्षीच ज्ञानदेव-निवृत्ति यांचे वेदाध्यायनच नव्हे तर सर्वज्ञान पूर्ण झाले. सहज समाधी त्या उभयतांना जन्मत:च प्राप्त झाली. लौकिक जीवनात ते सामान्य बालकांसारखे दिसले तरी ते परिपूर्णावस्थेत होते. याच वेळी नाथसंप्रदायात एक क्रांतिकारी घटना घडली. शिवाची उपासना करण्यासाठी त्र्यंबकेश्वर ब्रह्मगिरीला गेलेल्या निवृत्तिनाथांना ईश्वरी पूर्वसंकेताप्रमाणे गहिनीनाथांसमोर आणले. नाथसंप्रदायाला सर्वात लहान वयाचा म्हणजे अवघ्या सात वर्षांचा महागुरू मिळाला. ज्ञानेश्वर-निवृत्तिनाथाचे आयुष्य स्पष्ट होऊ लागले. विठ्ठलपंत-रुक्मिणीआई यांच्या बरोबर सभोवतीच्या तीर्थस्थानांच्या तीर्थयात्रा चालूच होत्या. ज्ञानदेवांच्या वयाच्या सातव्या वर्षी त्यांना श्रीनिवृत्तिनाथांकडून नाथपंथाची दीक्षा मिळाली. हीसुद्धा नाथपंथात प्रथमच घडणारी घटना होती. याच वेळी ज्ञानदेवांची अभंग रचना सुरू झाली असावी. सद्‌गुरू गहिनीनाथ या क्रांतिकारी गुरूंनी नाथपंथांच्या योगदीक्षेबरोबरच श्रीकृष्णाचा म्हणजे सगुणातून निर्गुणाच्या प्रचितीचा नाममंत्र श्रीनिवृत्तीनाथांना दिला होता. गोपाळकृष्णाच्या नामाचा जप त्यांच्या उत्तर आयुष्यातील कार्यासाठी फार महत्त्वाचा ठरणार होता. आपल्याच या आयुष्याकडे पाहून माउलींनी प्रथमत: निर्गुणाचे व नंतर सगुण-निर्गुणाचे अभंगांची रचना केली असावी. पंढरीचा पांडुरंग तर त्यांनी वडिलांचे बरोबर पाहिलाच होता. हेच आपले या युगातील अबोल स्वरूप त्यांनी जाणले. 'तुज सगुण म्हणू की निर्गुण रे' व 'रूप पाहतां लोचनी....' या सारखे व अरुपावरील 'नीळवर्ण रज । नीळवर्ण तुझे ।....' या सारखे अभंग पैठणला जाण्यापूर्वीच्या कालखंडातील असावेत. ज्ञानदेवांचे गंभीर अभंग, विरहीणी, गौळी इ. अभंग ज्ञानेश्वरीनंतरचेच असावेत. ज्ञानेश्वरांच्या अभंगात आर्तअभंग किंवा त्यांचा, त्यांच्या आई-वडिलांचा, भावंडांचा झालेला छळ, याबद्दल ज्ञानदेवांनी व त्यांच्या कोणाही भावंडानीही शब्दही काढलेला नाही. ज्ञानदेव व सोपानदेव यांचे वयात दोन वषे, दोन महिने इतके अंतर. ज्ञानदेव आत्मानंदात व समाधिसुखात असताना त्यांनी त्यांच्या वयाच्या नवव्या वर्षी शके बाराशे सहा सोपानदेवांना व शके बाराशे आठ मध्ये

मुक्ताईस नाथपंथाची दीक्षा दिली. ही दीक्षा निवृत्तिनाथांनी दिली नसावी कारण ज्ञानदेवापर्यंत एक गुरू एक शिष्य ही परंपरा चालू होती. ज्ञानेश्वरांनी ही परंपरा श्रीगुरूंच्या परवानगीने मोडून आपले ज्ञान सर्वांना वाटले. ज्ञानदेवांच्या वयाच्या दहाव्या/अकराव्या वर्षी, आता आपली दोन्ही मोठी मुले विश्वज्ञानायोग्य झाली या विचाराने विठ्ठलपंत मुलांसह श्रीगुरू रामानंदस्वामींचे भेटीस आळंदीहून काशीला गेले. दीड किंवा दोन वर्षांनी काशीहून परतण्यापूर्वी ज्ञानदेवांना सर्व चराचर विश्वाचे, विश्वपद्धतीचे, समाजजीवनाचे ज्ञान पूर्ण झाले. याचा प्रत्यय ज्ञानेश्वरीत, अमृतानुभवात, अभंगात येतो. यापुढे काय होणार हे या विभूतींना पूर्ण ठाऊक होते. म्हणूनच वेद व शास्त्रे यांना विरोधी वर्तन नसावे म्हणूनच त्यांनी विठ्ठलपंतांचे शिक्षेस प्रतिवाद केला नाही. शके बाराशे दहा आणि मातृ-पितृ वियोगाचे दुःख पचविले (वय तेरा वर्षे)

पैठण येथील शुद्धीपत्र व वास्तव्यानंतर (वय चौदा वर्षे पूर्ण) ज्ञानदेवादि भावंडे पैठण सोडून पुढील प्रवासास बाहेर पडली. आता त्यांच्या ईश्वरी कार्याचा उत्तराखंड सुरू झाला.

पैठणच्या वास्तव्यात अथवा पैठण सोडून नेवासे येथे येण्यापूर्वी ज्ञानेश्वरांनी सर्वांसह वेरूळ येथील लेण्यांचे शिल्प निश्चितपणे पाहिले आहे. कारण त्याचे निश्चित संदर्भ त्यांचे लिखाणात मिळतात.

अमृतानुभवातील नवव्या प्रकरणातील बेचाळीसवी ओवी पुढील प्रमाणे आहे.

देव देऊळ परिवारु । कीं जे कोरुनी डोंगरु ।

तैसा भक्तीचा वेव्हारु । कां न व्हावा ।।अमृ.९.४२।।

या ओवीवरून हे स्पष्ट आहे की लेणी कोरताना माथ्यापासून पायाकडे कोरीत यावे लागते. तसा स्पष्ट उल्लेख देव-देऊळ-परिवारु व 'कोरुनी डोंगरु' या शब्दांनी केलेला आहे.

पुण्याचे वेरूळ लेण्यांचे एक जेष्ठ अभ्यासक [१]श्री. उदयन इंदूरकर यांनी त्यांचे मार्गदर्शक डॉ. गो. बं. देगलूरकर यांच्या मार्गदर्शनाखाली वेरूळ लेण्यांचा सखोल अभ्यास केला आहे. त्यांच्या दृष्टीतून या लेण्या पाहण्याचा योग मलाही आला. या लेण्यातील काही शिल्पांचा उल्लेख ज्ञानेश्वरीत

---

१. श्री. इंदूरकर उदयन, अद्भुत भारतीय शिल्प वेरूळ

असल्याचे त्यांनी स्पष्ट केले आहे. त्यातील काही पुढील प्रमाणे आहेत.

१) कैलास मंदिरातील गजलक्ष्मीचे शिल्प - या शिल्पाला अभिषेक लक्ष्मी म्हणतात.

कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि धरी ।

परि परागु सेविजे भ्रमरीं । येरा चिखलुचि उरे ।। ज्ञा.९.५८

२) गजलक्ष्मी शेजारील महिषासुरमर्दिनीच्या शिल्पाच्या पुढील भिंतीवर कामदेव व रतीचे शिल्प आहे.

एकीं वयसेचे जाड बांधले । मग मन्मथाचिये कासे लागले ।

ते विषयमगरी सांडिले । चघळूनिया ।। ज्ञा.७.८५

कामदेवाच्या हातात इक्षुदंड (ऊस) आहे व त्यावर मकरध्वज आहे. प्रत्येक संयोगातून नवांकुर जन्म घेतो, म्हणून कामदेवाचे प्रतिक म्हणून ऊस व रतीच्या तडाख्यात सापडणे म्हणजे मगरमिठी.

३) मनुष्यरूपातील गरुड शिल्पाशेजारी भव्य सरिता मंदीर आहे. तेथे मध्यभागी मकरावर उभी गंगा, उजवीकडे कासवावर उभी यमुना व डावीकडे कमळावर उभी सरस्वती आहे. त्या त्रिभंगात (हात, पाय, डोके एकारेषेत नसणे) उभ्या आहेत.

मीनले गंगे यमुनेचे ओघ । तैसें रजा जाहलें प्रयाग ।

म्हणोनि सुस्नात होत जग । आघवे एथ ।। ज्ञा.११.६

माजीं गीता सरस्वती गुप्त । आणि दोनी रस ते ओघ मूर्त ।

यालागीं त्रिवेणी हे उचित । फावली बापा ।। ज्ञा.११.७

४) शेषशायी विष्णूचे शिल्प - यात काळाची कल्पना साकार करण्यासाठी सर्पाचे प्रतीक निर्माण केले आहे. काळ व अवकाश एकमेकात मिसळले असतात म्हणून क्षीरसागराची कल्पना. काळाला चौथा आयाम म्हणतात -

जो प्रळयतेजा देत मिठी । सगळिया पवनाते गिळी किरीटी ।

आकाश जयाचिया पोटी । सामावले ।। ज्ञा.१०.२७२

ऐसा अपार जो काळु । तो मी म्हणे लक्ष्मीलीळु ।

मग पुढती सृष्टीचा मेळु । सृजिता तो मी ।। ज्ञा.१०.२७३

ज्ञानदेवांनी इथे लक्ष्मीलीळु हे विशेषण दिल्यामुळे काळाच्या शिल्पाचे स्पष्टीकरण सापडले. कारण शेषशायी अनंताच्या शिल्पात लक्ष्मी पाय चेपताना दिसते.

५) सर्वात परिपूर्ण शिल्प म्हणजे कैलास पर्वत हलविणाऱ्या रावणाचे शिल्प. कैलास हलविणे अशक्य झाल्याने रावणाने शिवतांडव स्तोत्र गाईले. जीवनात येणाऱ्या हादऱ्यांना प्रज्ञावान गंभीरपणे सामोरी जातात ही या शिल्पाची शिकवण.

नाना दुःखी प्राप्तीं । जयासी उद्वेगु नाही चित्तीं ।

आणि सुखाचिया आर्ती । अडपैजेना ।। ९४

अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु सहजे नाहीं ।

आणि भयातें नेणे कहीं । परिपूर्ण तो ।। ९५

ऐसा जो रिवधि । तो जाण पां स्थिरबुद्धि ।

जो निरसूनि उपाधि । भेदरहितु ।।ज्ञा.११.९६।। स्थितप्रज्ञ लक्षण.

६) आलिंगन शिल्प-स्पर्शित, आलिंगन शिल्प-घटितक व अर्धनारीश्वर या शिल्पावर माउली सांगतात.

परि ते वेगळेपणें भोगिजे । जैसे पक्षिय फळ चुंबिजे ।

तैसे नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ।। ज्ञा.५.३१

भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अचळु लोटी ।

मग सुखेंसि घे आटी । गोढेपणें ।। ३२

तिये आलिंगन मेळीं । होय आपेआप कवळीं ।

तेथ जळ जैसे जळीं । वेगळें न दिसे ।। ३३

कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे ।

तैसे सुखचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ।।३४

ऐशी व्दैताची भाष जाय । मग म्हणों जरी एकचि होय ।

तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणते जे ।। ज्ञा.५.३५, अर्धनारीश्वर

७) महायोगी शिव - ज्ञानेशांनी सर्वेश्वरु म्हणून शंकराचे शिल्प सुचविले आहे व शिवाच्या गणांना पंचमहाभूतांचे सैन्य प्रतिनिधी म्हणून संबोधले आहे.

जैसा का सर्वेश्वरु । पाहिजे तंव निर्व्यापारु ।

परी तोचि रची विस्तारु । त्रिभुवनाचा ।। ७६

आणि कर्ता ऐसे म्हणिपे । तरी कवणें कर्मीं न शिंपे ।

जे हातु पावो न लिंपे । उदासवृत्तिचा ।। ७७

योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणाचा सळु न पडे ।

परि महाभूतांचें दळवाडें । उभारी भले ।। ७८

जगाच्या जीवी आहे । तरी कवणाचा कहीं नोहे ।

जगाचि हें होय जाये । तो शुद्धीही नेणें ।। ज्ञा.५.७९

आणखीही अनेक शिल्पांचा संदर्भ ज्ञानदेवांनी आपल्या वाङ्मयात घेतला आहे.

आता ज्ञानदेवांना प्रवरा नदी खुणावू लागली.

विभूती - परमेश्वर ज्ञानेश्वरांच्या विचारात माझी पंचावन्न पेक्षा जास्त वर्षे गुंतलेली आहेत. त्यांच्या जीवनातील ज्ञात-अज्ञात अनेक घटना माझ्या नजरेसमोर वर्षानुवर्षे तरंगत आहेत. त्यांची संभाव्य मांडणी करताना त्यांच्या श्रेष्ठतेला, विभूतित्वाला, ईश्वरी अवताराला थोडासुद्धा धक्का लागणार नाही. कारण माउली माझे वर्षानुवर्षांचे एकमेव आराध्य दैवत आहे.

**- परिशिष्ट -**

## पूर्वार्धातील कालखंड व कार्य

ज्ञानदेवांच्या आयुष्याची मांडणी (पूर्वार्ध वय ०-१४)

शके ११९७ : जन्म : श्रावण वद्य ८, गुरूवार मध्यरात्र

११९८ : वय १ वर्ष, शैशव,

११९९ : वय २ वर्षे, शैशव, ग्रहण वृत्ती, निवृत्तींचे अनुकरण. - सोपान जन्म

१२०० : वय ३ वर्षे, वास्तवतः ज्ञानदेव जन्मापासून ते संजीवनी समाधीपर्यंत सहज समाधी अवस्थेतच असावेत. ती ईश्वरीय सहज अवस्था आहे.

१२०१ : वय ४ वर्षे, वडील-आई-निवृत्ती व छोटा सोपान यांचे बरोबर यात्रा. महाराष्ट्र भ्रमण. - मुक्ताई जन्म

१२०२ : वय ५ वर्षे, वेद, भगवद्गीता इ. निवृत्तीसह पुरश्चरण आई-वडील भावंडेयांचे सह प्रथम पंढरपूर, कोल्हापूर व नंतर त्र्यंबकेश्वर यात्रा. तेथे निवृत्तींना गहिनीनाथांचा अनुग्रह.

१२०३ : वय ६ वर्षे, वैदिकवाङ्मयाची चांगली ओळख व जाणीव. निवृत्तिनाथासह योगाभ्यास व सहज समाधी.

१२०४ : वय ७ वर्षे निवृत्तिनाथांकडून नाथपंथाची दीक्षा. सहजसमाधी व नजीकच्या स्थळांची तीर्थयात्रा. जीवन पूर्णत्वाने श्रीगुरुचरणी समर्पित.

१२०५ : वय ८ वर्षे गुरुआज्ञेचे पूर्णपालन अध्ययन व समाधी व नामजप, नाथपंथीय अध्ययन ज्याची साक्ष अमृतानुभवात येते.

१२०६ : वय ९ वर्षे, सोपानदेवांना नाथपंथाचा अनुग्रह व वडील व गुरू निवृत्तीनाथ यांचेशी वेदान्त चर्चा, अध्ययन व नाथपंथाची योगिक व नामजप साधनांची परिपूर्णता सोपानदेवांना मिळवून दिली. निर्गुणाची अभंग रचना.

१२०७ : वय १० वर्षे, सर्वांसह काशीयात्रा व तेथील धर्मग्रंथाचे अध्ययन, जैन, बौद्ध, काश्मिरी शैवपंथ तत्त्वज्ञानाची जाणीव व यवनांच्या आक्रमणाचा विचार

१२०८-९ : वय ११-१२ वर्षे, काशीयात्रेहून परत रामानंदस्वामींचा आशीर्वाद व मुक्ताईस अनुग्रह. 'विश्वाचे आर्त माझे मनी प्रगटले.. इ. अभंग रचना.

१२०९ : वय १२ वर्षे, विठ्ठलपंतांचे आळंदीचे ब्रह्मवृंदास मुलांच्या मुंजीसाठी आवाहन

आळंदीकरांनी दिलेल्या शिक्षेप्रमाणे विठ्ठल-रुक्मिणी यांचा प्रयागक्षेत्री देहत्याग. मुक्ताईचे ताटीचे अभंग.

१२१० : वय १३ वर्षे, आळंदीकरांनी शुद्धीपत्रासाठी पैठणला जाण्यास सांगितले सर्व भावंडे पैठणास आली. पैठणचे शुद्धीपत्र, रेड्याचे मुखी वेद, समाजांची व पैठणकरांची बदललेली वृत्ती, श्रीनिवृत्तिनाथाकडून प्रत्यक्ष गीतार्थ समाधिधनाची प्राप्ती.

१२११ : वय १४ वर्षे, मागील वर्षापासून पैठण वास्तव्य, प्रवचन, कीर्तनाबरोबर वैदिक ग्रंथाचे अवलोकन, समाजव्यवस्थेचे अवलोकन व वर्ष संपण्यापूर्वी वेरूळ लेण्यांना भेट देऊन नेवासे येथे आगमन.

१२१२ : वय १५ वर्षे, जीवनाच्या उत्तरार्धास सुरुवात भावार्थ दीपिका-ज्ञानेश्वरी गुरूआज्ञेने संत श्रोत्यांना सांगितली.

# ज्ञानेश्वर जीवन (उत्तरार्ध)

पैठण येथे ज्ञानेश्वरांनी आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्याने व योगसामर्थ्याने जे कार्य केले, त्याने केवळ पैठणचा ब्रह्मवृंदच भारावून आश्चर्यचकित झाला असे नव्हे, तर अवघे पैठणच ज्ञानेश्वरमय होऊन गेले. पैठण येथेच विठ्ठलपंताचे मामा कृष्णाजीपंत देवकुळे राहत होते. म्हणजे पैठण हे ज्ञानेश्वरांचे विठ्ठलपंताकडून आजोळही होते. गहिनीनाथांनी निवृत्तिनाथांना अनुग्रह देताना जो आदेश दिला होता, त्याचे वर्णन माउलींनी अठरावे अध्यायात आपली नाथपरंपरा सांगताना दिले आहे –

[१]मग तिहीं ते शांभव । अद्वयानंद वैभव ।।
संपादिले सप्रभव । श्रीगहिनीनाथा ।। ज्ञा.१८.१७५६
तेणे कळि कळितु भूतां । आला देखोनि निरूता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ।।५७।।
ना आदिगुरू शंकरा – । लागोनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसारा । जाला जो आमुते ।।५८।।
तो हा तूं घेऊनि आघवा । कळी गिळितया जीवा ।
सर्व प्रकारी धावा । करी पा वेगी ।।५९।।
आधीच तव तो कृपाळु । वरी गुरूआज्ञेचा बोलु ।
जाला जैसा वर्षाकाळु । खवळणे मेघा ।।६०।।
मग आर्ताचेनि वोरसे । गीतार्थग्रंथनमिसे ।
वर्षला शांतरसे । तो हा ग्रंथु ।।६१।।
तेथ पुढा मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया ।
की या साठी येवढीया । आणिलो यशा ।।६२।।
एवं गुरूक्रमे लाधलें । समाधिधन जें आपुलें ।
ते ग्रंथे बांधौनि दिधलें । गोसावी मज ।। ज्ञा.१८.१७६३

---

१. दांडेकर शं. वा., सार्थ ज्ञानेश्वरी

यातील १८.१७६१ ते ६३ या ओव्या माउलींनी जे समाधी-धन निवृत्तिनाथांना गुरूपरंपरेने प्राप्त झाले होते, त्याचा परिपाक म्हणजे हा ग्रंथ, ही ज्ञानेश्वरी असे कृतज्ञतेने म्हटले आहे. मूळ गीतेवरून गीता संबोधनी समोर ठेवून श्रीनिवृत्तिनाथांनी पैठण येथेच श्रोतृवृंदापुढे गीतार्थ सविस्तर सांगितला. त्या वेळी ज्ञानेश आर्त चातक पक्षाप्रमाणे या समाधीधनाचे प्राशन करीत होते. व हाच विषय त्यांच्या मनी सतत रुंजी घालीत होता.

ज्ञानदेवांचे पैठण येथील ब्रह्मवृंदासमोर प्रकट झालेले वेदांचे ज्ञान व योगाचे दर्शन आश्चर्य करण्यासारखे सर्वांना वाटणे हे अगदी सहज व स्वाभाविक होते. परंतु याचे उत्तर ज्ञानेशांनीच ज्ञानेश्वरीचे सहाव्या अध्यायात गीतेच्या त्रेचाळीसाव्या श्लोकावर निरुपण करताना दिले आहे -

मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पहाट फुटे ।

सूर्यापुढां प्रगटे । प्रकाशु जैसा ।। ज्ञा. ६.४५२ ।।

तैशी दशेची वाट न पाहतां । वयसोचिया गावां न येतां ।

बाळपणीच सर्वज्ञता । वरी तयाते ।। ज्ञा.६.४५३ ।।

हीच विभूतीची कवचकुंडले. पैठणने ज्ञानेश्वरादि भावंडांना काय दिले? हेमाडपंत-बोपदेव यासारख्या विद्वानांकडून त्यांना शुद्धिपत्र मिळाले (शके बाराशे दहा) परंतू पैठणच्या ब्रह्मसभेने त्यांना व्दिजत्व येण्यासाठी आवश्यक त्या उपनयनसंस्काराच्या अधिकाराचा उल्लेखही केला नाही. उलट या चारही भावंडांनी संन्यस्त राहून आपल्या कुळाची वृद्धी होऊ देऊ नये असाच उपदेश केला. खरं तर ज्ञानेश्वरांच्या दैवी विभूतिमत्त्वासमोर सर्वजण अवाक् झाले होते. जे घडले ते त्यांच्याच काय परंतु पूर्वीच्या कोणत्याही पिढीत घडल्याचे उदाहरणच नव्हते. नामदेवांनी फारच संयत भाषेत पैठणकरांची मनस्थिती सांगितली आहे.

कर्मठ अभिमानें ठकलो देहबुद्धी । गोवियेलों विधि निःसंदेह ।।

नेणो भक्ति ज्ञान वैराग्याचा लेश । कुटुंबाचे दास होऊनि ठेलों ।।

आणिकांसी सांगो आपण नाचरों । लटिकेंचि हुंबरों प्रतिष्ठेसी ।।

धन्य यांचा वंश धन्य यांचे कुळ । धन्य पुण्यशील अवतार हे ।।

सकळ व्हिजवर करिती नमस्कार । आनंदे जयजयकार करिताती ।। ना.गा. ९०६ ।।

शुद्धिपत्राचा आशय पुढीलप्रमाणे.

[१]हे परलोकींचे तारु देवत्रय याची । प्रायश्चित्त काय यासी द्यावे कोणी ।। ना.गा. ९०७ ।।

पैठणच्या आठवणी पैठणलाच ठेवून ही चारही भावंडे परतीच्या प्रवासाला लागली, पुन्हा पैठणला परत कधीही न येण्यासाठी. ज्ञानेश्वरादि भावंडांची कीर्ती शब्दश: दशदिशात पसरली. या विभूतींच्या दर्शनासाठी व शक्य झाले तर त्यांच्या मुखातून परमार्थाचे काहीतरी ऐकायला मिळावे या लहानशा आशेने त्यांच्या परतीच्या मार्गावरील गावागावांतील जाणते-नेणते त्यांना सामोरे आले असतील. माउली तर प्रेमाची मूर्ती. या भावंडांनी निश्चितपणे कोणाही गावकऱ्यांना विन्मुख पाठवले नसणार.

गहिनी शिष्य निवृत्तिनाथ, निवृत्ती शिष्य ज्ञानदेव व ज्ञानदेवांचे शिष्य सोपान-मुक्ताई ब्रह्मानंदात वेदांतावरील गप्पा मारीत मार्गक्रमणा करीत असतील. आपल्या श्रीगुरूंविषयी ज्ञानेशांना अत्युच्यकोटीचा आदर, प्रेम आहे. त्याचे प्रत्यंतर ज्ञानेश्वरीत अनेक अध्यायांत मिळते. विशेषत: बाराव्या अध्यायात व तेरावे अध्यायाचे तीनशे अड्डसष्ट ते चारशे पासष्ट या जवळजवळ शंभर ओव्यात श्रीगुरू विषयीचे भक्तियुक्त प्रेम, समर्पण, श्रीगुरूंचे वात्सल्य माउलींनी व्यक्त केले आहे.

[२] सुंदर ते ध्यान व्यासपीठावरी । वाटे ज्ञान ईश्वरी विश्वासाठी ।।

अर्धोन्मीलित नयन शांतीने प्रसन्न । दावी अधोवदन शरणभाव ।।

प्रकाश निस्तेज ज्ञानाच्या प्रकाशाने । उजळाया त्रिभूवने आत्मज्योत ।।

बैठक साधी सिद्ध योगासनी । अवस्था उन्मनी साक्षित्वाची ।।

कुंतल काळे रुळती मानेवरी । भव्य भाळावरी लांब गंध ।।

अंगकांती दावे चैतन्य नव्हाळी । दिसे कर्णपाळी अतीमृदू ।।

मृदुता लाजवे मऊ नवनीता । निर्मळ वत्सलता माउलीची ।।

---

१. श्रीसंतनामदेवांची गाथा, अभंग - ९०६, ९०७

२. काव्यरचना : प्रा. डॉ. माधवराव दीक्षित

बोलते वैखरी शब्द जिव्हाळ्याचा । मराठ मोळ्याचा पैजा जिंकी ।।

शांती सुखा देई कारुण्याची मुद्रा । टाळोनि अभद्रा अज्ञानाच्या ।।

विष्णुच कृष्णासी सांगतो गीतेसी । प्राकृत भाषेसी योजुनिया ।।

गुरू आशीर्वाद बोलवितो वेद । अमंगळ भेदाभेद जावा म्हणुनी ।।

त्यामुळे या प्रवासात निवृत्तिनाथांनी आपला एकुलता एक शिष्य ज्ञानदेव यांस गीतेवर भाष्य करण्यास सांगितले असणार व चातकपक्षाप्रमाणे श्रीगुरूंचा शब्द झेलणाऱ्या माउलींनी हे गीताभाष्य मायबोलीत म्हणजे 'मऱ्हाठी'त करणार असल्याचे अभिवचन दिले. संस्कृत भाषेची अधिकारी व्यक्ती असूनही माउलींना आपला प्रत्येक शब्द सामान्यातल्या सामान्य माणसास व सर्व स्त्रीपुरूषास समजलाच पाहिजे हा आग्रह त्यांच्या मनी होता. ज्ञानेश्वर गीतेवर नेवासे येथे मराठीत भाष्य करणार आहेत हे ही लोकांना समजले. पुढील प्रसंग कसा घडला असावा याचे मानसचित्र अनेक वर्षे माझे मनात आहे. तेच येथे मांडले आहे.

ज्ञानेश्वर प्रवरेच्या काठावर आले. समोर सुबक नटलेले नेवासे गाव. ज्ञानेश्वरांनी विभूतीच्या तटस्थतेने त्या गावाकडे आणि समोरच्या प्रवरेच्या प्रवाहाकडे पाहिले. धूतवस्त्र काठावर ठेवून ज्ञानेश प्रवरेच्या पाण्यात उतरले. आंघोळ करून उदयाचली आलेल्या सूर्यनारायणाला अर्घ्यदान केले. पाण्याबाहेर येऊन कोरडी धूतवस्त्रे परिधान केली. शांतपणे नदीकाठावरील एका मोठ्या वृक्षाच्या सावलीत बसून, तोंडाने तीन वेळा ॐकार म्हणून, गुरूस्मरण करून ज्ञानदेवांनी डोळे अर्धवट मिटले. क्षणार्धात ज्ञानेशांची समाधी लागली. स्त्रीची कांकणे वाजल्याने माउलींची समाधी क्षणभर विचलित झाली. अनाहूतपणे त्यांचे मुखातून 'अखंड सौभाग्यवती भव, पुत्रवती भव' असा आशीर्वाद बाहेर पडला. आणि त्यापाठोपाठ ऐकू आला त्या स्त्रीचा दबका हुंदका. समाधी संपवून ज्ञानदेवांनी डोळे उघडून त्या स्त्रीकडे नेहमीच्या अभय नजरेने पाहिले. तिने फक्त डाव्या हाताने प्रवरेच्या काठाकडे निर्देश केला. ज्ञानदेवांनी मान वळवून पाहिले तो त्यांना दिसले त्या स्त्रीच्या पतीचे निर्जीव कलेवर. सौभाग्य अलंकार लेवून ती सती जाण्यास निघाली होती. आता ज्ञानदेवांना तिच्या कपाळीचा मळवट आणि गळ्यातील फुलमाळा आणि त्याखालील पतिव्रतेची हिरवी साडी

दिसली. सती जाण्यापूर्वी नदीतीरावर डेरेदार वृक्षाखाली बसलेल्या या तेजःपुंज तरुण समाधिस्थ देवस्वरुपाला वंदन करावे म्हणून ती त्यांच्या समोर आली होती. ज्ञानदेवांना सर्व प्रकार समजला. चटकन उठून त्यांनी त्या पतिव्रतेस तिच्या नवऱ्याचे नाव विचारले. हुंदके देत तिने सांगितले - 'सच्चिदानंद' तिच्याकडे बघत ज्ञानदेव म्हणाले असतील, 'अरे जो सत-चित-आनंद आहे, तो जाऊच कसा शकतो?' ज्ञानदेव त्या सच्चिदानंदाच्या जवळ जाऊन त्याच्या अंगावरून हात फिरवून म्हणाले, 'उठा! तुम्हाला अजून खूप कार्य करायचे आहे.' झोपेतून उठल्यासारखे सच्चिदानंदाने हलकेच डोळे उघडले, आणि उठून उभे राहिले. त्यांच्या सर्वांगावर तेज होते. त्या पतिव्रतेने व सच्चिदानंदाने ज्ञानेश्वरांचे पायावर लोळण घेतली. 'आई उठा', असे हलकेच म्हणून माउली मागे सरकले. तेथे जमलेल्या सर्वांच्या चेहऱ्यावर आश्चर्य, आनंद आणि डोळ्यात अश्रू होते. सच्चिदानंदाने माउलींचे नाव विचारले. हसून माउलींनी 'ज्ञानेश्वर' असे सांगितले. सर्व नेवासेकरांनी ज्ञानेश्वर-निवृत्ति-सोपान-मुक्ताई ही नावे व त्यांचे कर्तृत्व ऐकले होते. ज्ञानेश्वर गीतेवर मराठीत भाष्य करणार आहेत हेही त्यांना माहीत होते. 'यापुढील तुमच्या तेजाने प्राप्त झालेले माझे आयुष्य मी तुमच्याच चरणी अर्पण करीत आहे' असे म्हणून सच्चिदानंद ज्ञानेश्वरांचे चरणी नम्र झाला. माउलीतर केव्हाच आपल्या सहज समाधीत गेले होते. सच्चिदानंदाचा 'ज्ञानेश्वरीचा' सच्चिदानंद बा आदरे लेखकू जाहला' झाला. ही नेवासे मुक्कामाची सुरुवात होती. केवळ विभूतित्व प्रगटले एवढेच. हा प्रसंग मी माझ्या डोळ्यासमोर हजारदा पाहिला आहे. आणि दर वेळी मला ज्ञानेश्वरीतील त्या ओवीचीच आठवण होते -

तैशी दशेची वाट न पाहता । वयसोचिया गावां न येता ।
बाळपणीच सर्वज्ञता । वरी तयाते ।। तीच ही विभूती.

पैठण येथे निवृत्तिनाथांच्या मुखातून गीताभाष्य ऐकल्यापासून ज्ञानेश्वरांच्या अंतर्मनावर त्याचा ठसा किती खोलवर उठला होता हे ज्ञानेश्वरीच्या १८व्या अध्यायातील उत्तरार्धातील ओव्यातून स्पष्ट होते. माउली सांगतात -

मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थ ग्रंथन मिसे ।
वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ।।ज्ञा.१८.१७६१।।

तेथ पुढां मी बापिया । मांडला आर्ति आपुलिया ।

की या साठी एवढीया । आणिलो यशा ।।ज्ञा.१८.१७६२।।

एवं गुरूक्रमे लाधलें । समाधिधन जें आपुलें ।

ते ग्रंथे बांधौनि दिधलें । गोसावी मज ।।ज्ञा.१८.१७६३।।

श्रीगुरू निवृत्तिनाथ या विभूतीने गीतेचे केलेले अर्थघन विवरण ऐकताना ज्ञानेश्वर पूर्णतया शांतरसाच्या समाधीत गेले. गीताभाष्याखेरीज अन्य विचारच मनात राहिला नाही. पैठणहून पुढील प्रवासात हा बदल निवृत्तिनाथांना प्रकर्षाने जाणवला. ज्ञानेश्वरांना 'ज्ञानदेवा तू भगवत् गीतेवर मराठीत भाष्य करावे' हा विनंतीस्वरूप आदेश दिला. ज्ञानेश्वर अत्यंत सुखावले. म्हणूनच ज्ञानेश्वरीच्या उत्तरार्धात वरील ओव्या त्यांचे अंतर्मनातून उमटल्या आहेत.

नेवाशाला मोहिनीनाथांच्या मंदिरात माउलींना घेऊन सोपान व मुक्ताई आले. ज्ञानेश्वर पूर्णपणे भावनिक समाधीत असले पाहिजेत. समोर संत, ज्ञानी व सर्व वर्णाचे श्रोत्यांनी आवार फुलून गेले असणार. भाष्याला सुरुवात करण्यापूर्वी ज्ञानेशांनी मोहिनीराजांचे दर्शन घेतले. भक्तिभावाने श्रीगुरुंच्या चरणापाशी नमून पायी माथा टेकला. विभूती निवृत्तिनाथांचा आशीर्वादाचा शिवहस्त ज्ञानेशांच्या मस्तकी स्थिरावला, डोळ्यात होते अपार प्रेम व कृतार्थता. पैसाच्या खांबाला टेकून ज्ञानेश पद्मासनात बसले. समोरील श्रोत्यांकडे पाहून ज्ञानदेवांनी अत्यंत प्रेमाने व आदराने किंचित स्मितवदनाने हात जोडून मस्तक नमविले. श्रोते स्त्रीपुरूषांच्या असंख्य मुरवातून उत्स्फूर्त आशीर्वाद उमटले असतील. अनेकांच्या डोळ्यात या शांत विनम्रतेने अश्रू उभे राहिले. ज्ञानेशांनी एकदा एकाग्रतेने आपल्या श्रीगुरूंना डोळ्यात साठवून अभिवादिले. निवृत्तिनाथांचा 'स्वस्ति'कर आशीर्वादासाठी हलला. सुहास्य मुद्रेने ज्ञानेशांनी सोपान-मुक्ताई यांचेकडे पाहिले. त्यांनीही ज्ञानेशांना हात जोडले. उजवीकडे बसले होते श्रीगुरू. त्याचे जवळच काही अंतरावर सोपान-मुक्ताई, डावीकडे हाती बोरूची लेखणी व भूर्जपत्रे घेऊन सिद्ध होते लेखकू सच्चिदानंदबाबा, आणि समोर होता मनात अत्यंत उत्कंठा दाटलेला जाणत्या-नेणत्यांचा अफाट श्रोतृवृंद. ज्ञानदेवांनी काही क्षण नेत्र बंद केले. मनाच्या परावाणीतून व नंतर वैखरीतून धीरगंभीर ओंकार त्रिवार उमटला. त्याच अवस्थेत उमटले 'भावार्थ दीपिकेचे' पहिले गणेशवंदन 'श्रीगणेशाय नम:'। आणि त्या पाठोपाठ

ॐनमो जी आद्या । वेद प्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ।। प्रतिपरमेश्वर असलेल्या आपल्या श्रीगुरूंचे नमन.

ज्ञानेश्वरीचे हे अठरा पाकळ्यांचे कमळ अत्यंत विलोभनीय आहे. त्यातील काही पाकळ्या तर खूप गहिऱ्या रंगाच्या आहेत. ज्ञानेश्वरीचा हा गंगौघ अविरतपणे १८वे अध्यायाचे समाप्तीपर्यंत भरभरून वाहत आहे. पहिल्या अध्यायाचे पहिल्याच ओवीत श्रीगुरूंना वंदन करून सुरू झालेली ही वाक्‌गंगा श्रीगुरूंच्याच पसायदानाच्या, 'येथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दान पसावो । येणें वरे ज्ञानदेवो । सुखिया झाला ।।' या ओवीनंतर श्रीगुरू कृपेने प्राप्त झालेले समाधिधन त्यांचेच श्रीचरणी अर्पण करून, ज्ञानदेव संपूर्ण कर्तुत्वाच्या मिठीतून पूर्णतया निवृत्त (Detached) झाले. म्हणूनच त्यापूर्वीच्या ओवीत ज्ञानेश्वर म्हणतात – 'किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हे सिद्धी गेले । येथ माझें जी उरलें । पाईकपण ।।' ज्ञानेश्वरीच्या कर्तृत्वाचे सर्व श्रेय श्रीगुरू निवृत्तिनाथांना व फळ श्रोत्यांना देऊन माउली आपल्या विभूतिमत्वात एकरूप झाले. निवृत्तिनाथांनीच ज्ञानेश्वरांना आशीर्वादाचे फळ देऊन आपुल्यासारखे केले. स्वत:च्या विभूतिस्वरुपात सामावून घेतले. ज्ञानेश्वरीची प्रत्येक ओवी ही ज्ञानेश्वर या विभूतीने मांडली आहे. अन्यवेळी ते मग्न असत आपल्या समाधिधनात. ज्ञानेश्वरी हा ज्ञानेश–श्रीगुरू–संतश्रोते यांच्यातील सुसंवादाचा त्रिवेणी संगम आहे. असा दिव्य ग्रंथ त्यापूर्वी झाला नाही व भविष्यातही होणार नाही. कारण हे ईश्वरीविभूतीचे अवतार कार्य आहे. कृष्णावतारात खलनिर्दालन व धर्मरक्षण आहे. पण ज्ञानेश्वर अवतार हा प्रेमावतार आहे. यात आहे 'जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परे पडो । मैत्रजीवांचें ।।' वेदांनी कृपणता दाखविलेला स्त्रीशूद्रांचा रास्त अधिकार जो गीतेने त्यांना मिळवून दिला त्याचे पुन:प्रस्थापन व अद्वैतानुभूति ज्ञानदेवांनी दिली. सामान्यांच्या मुक्तीसाठी साध्या सोप्या नामजपाचा भगवंताचा आशीर्वाद त्यांच्यापर्यंत पोहोचविला. विभूतिमत्वाचे प्रकटीकरण ज्ञानेश्वरीत प्रत्येक अध्यायात आहे. ज्ञानेश्वरी शके बाराशेबारा मध्ये सफल संपूर्ण झाली. ज्ञानदेवांना कृतार्थ वाटले. निवृत्तिनाथ–ज्ञानेश्वर या अद्वैतातील निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांचेच आध्यात्मिक व वाङ्‌मयीन व्यक्तिमत्त्व आहे. त्यांनी भाष्यिलेली ज्ञानेश्वरी ही निरूपणाची संहिता, आणि त्यांना सुयोग्य प्रतिसाद देऊन मनापासून श्रोत्यांनी या वाग्यज्ञाचा आस्वाद घेतला आहे. ज्ञानेश्वरीला काय म्हणावे याला शब्दच

नाहीत. केवळ अतर्क्य, सर्व परिमाणांच्या मर्यादा ओलांडून उभी राहिलेली ईश्वरीय साहित्यकृती. ज्ञानेश्वरीची तुलना केवळ भगवंत कथित व व्यासांनी लिहिलेल्या गीतेशीच होऊ शकते. लिहिण्याची प्रेरणा देणारे श्रीगुरू, आस्वादक श्रोते या सर्वात वयाने लहान श्रीज्ञानेश्वर हा विचार मनात येताच ज्ञानेश्वरीतीलच विभूतीत्वाची ओवी आठवली –

मोटकी देहाकृती उमटे । आणि निजज्ञानाची पहांट फुटे ।

सूर्यापुढां प्रगटे । प्रकाशु जैसा ।।ज्ञा.६.४५२।।

तैशी दशेची वाट न पाहतां । वयसोचिया गावां न येतां ।

बाळपणीच सर्वज्ञता । वरी तयाते ।।ज्ञा.६.४५३।।

ज्ञानेश्वरी अभ्यासताना ज्ञानदेवांच्या वयाच्या, अवघ्या पंधरावे वर्षाचा विचार तात्काळ मनातून निघून गेला. श्रीराम, श्रीकृष्ण, श्रीनिवृत्तिनाथ, श्रीज्ञानेश्वर या विभूतींच्या कार्यात वयाचा विचार होऊच शकत नाही. 'विश्वाचे आर्त' एवढेच त्यांच्या जीवनकार्याचे मर्म आहे. सहज आठवले म्हणूनच ही नोंद की ज्ञानेश्वरीत श्रीगुरूंसाठी जवळ जवळ तीनशे ओव्या, श्रोत्यांसाठी अंदाजे दोनशे ओव्या व श्रीगुरूंच्या मुखीच्या सात ओव्या व संजयाच्या साडेतीन ओव्या आहेत. मराठीचा अभिमान ठाई ठाई असून प्रामुख्याने अठरा ओव्यात मायबोलीचा उल्लेख आहे. एका अत्यंत महनीय गोष्टीचा उल्लेख केलाच पाहिजे. केवळ ज्ञानेश्वरीच नव्हे तर ज्ञानदेवांच्या संपूर्ण वांङ्मयात कोठेही त्यांच्या पूर्वायुष्याचा, त्यांच्या व त्यांच्या मातापित्यांच्या छळाचा, उद्वेगाचा साध्या शब्दानेही उल्लेख नाही. ही तटस्थता केवळ विभूतीचेच अंगी दिसते. अन्य संताचे लिखाणात ही तटस्थता दिसत नाही. स्त्रीत्व, मातृत्व व पितृत्व यांचा अत्यंत आदराने उल्लेख करून ज्ञानदेवांनी आपल्या आई–वडिलांना वंदिले आहे.

ज्ञानेश्वरी या गीताभाष्याच्या पूर्ततेने ज्ञानेश्वर–निवृत्तिनाथ यांच्या मुखावर अतीव समाधान प्रकट झाले असेल. या घटनेने महाराष्ट्र भागवत धर्माला दोन भक्कम आधारस्तंभ मिळाले. दोन विभूती प्रगट झाल्या. धर्मभ्रष्ट, जातिभ्रष्टतेचा पोकळ डोलारा कोसळून पडला. याचा प्रत्यक्ष परिणाम महाराष्ट्र संत मंडळ व भक्तिवाङ्मय यावर झाल्याचे प्रत्यंतर पंढरीत उमटले. शूद्र म्हणून नाकारले

गेलेल्या संताच्या मुखातूनही भक्तीवाङ्मय उमटले. चोखामेळा, सोयराबाई, बंका, मंजूळा, भागुमहारीण इ. आजपर्यंत शूद्र, शूद्रस्त्रिया म्हणून नाकारले गेलेल्या संतांच्या भक्तीला, अभंगांना मान्यता मिळाली. ही जाती-वर्ण-भेदाची अभेद्य वाटणारी भिंत ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरीने कोसळून पडली. ज्ञानेश्वरांची ओढ साऱ्या पांडुरंग भक्तांना लागली. नामदेव तर ज्ञानेश्वरांना हृदयस्थ परमेश्वर मानू लागला असणार. भागवत धर्माचा भक्कम पाया अद्वैताच्या व जाति-भेद-विरहित विचारांच्या पायावर उभा राहिला.

आता निवृत्तिनाथ-ज्ञानदेव-सोपान-मुक्ताई ही चार नावे अगदी खेडोपाडीच्याही लोकांच्या ओठावर नाचू लागली. चारही भावंडे नेवाशाहून स्वगृही आळंदीस निघाली. ते ज्या ज्या गावातून गेले तेथे हजारो आया-बहिणी-जाणते-नेणते, या ईश्वरी स्वरूपांना पाहण्यासाठी, त्यांच्या पायी लागण्यासाठी वाट पाहत उभी असणार. आळंदीत पोहोचेपर्यंत शेकडो भगवतभक्त त्यांच्यासवे असणार, विठ्ठलाच्या व चार भावंडांच्या जयजयकारात सर्वांनी, ज्या आळंदीने त्यांना धर्मभ्रष्ठ ठरवून औरस अपत्यांचा नैसर्गिक अधिकारही नाकारला होता, त्या आळंदीत नामघोषाने प्रवेश केला असेल. इंद्रायणी या आपल्या लेकरांच्या स्वागताला उत्सुक झाली असेल. तिचा प्रवाहही काही काळ थांबला असेल. ज्ञानदेवादि भावंडांचे आजोबा-आजी, सिधोपंत व उमाबाई यांच्या उत्तर आयुष्याचा संदर्भ नामदेवांच्या अभंगात किंवा अन्यत्र नाही. ते उभयता हा हृद्य सोहळा पाहण्यास ईशकृपेने हयात असावेत असे वाटते. [१]कै. प्रा. श्री. म. माटे यांच्या 'साहित्यमंजरी' या लेखसंग्रहातील 'ज्ञानेश्वर समाधीचे लौकिक दर्शन' या लेखात ज्ञानेश्वर समाधी घेण्यासाठी आळंदीस आले त्या वेळी त्यांच्या वृद्ध आजी त्यांचे दर्शनास आल्याचा संदर्भ दिला आहे. नेवासा येथून ही चार भावंडे आळंदीस आल्यावर या वृद्ध आजी-आजोबांना आपल्या लेकीचे-जावयाचे व नातवंडाचे आळंदीतील दयनीय जीवन आठवले असणार. आज आपले उभयतांचे व विठ्ठलपंत-रुक्मिणी यांचे जगणे-मरणे कृतार्थ झाल्याचा अनिवार आनंद त्यांना झाला असणार. आळंदीने पूर्ण सन्मानाने आपल्या या चार लेकरांचे स्वागत केले. विभूतींच्या कर्तृत्वाला काळही बांधून ठेवू शकत नाही. मोरकी देहाकृती उमटे । आणि निजज्ञानाची पहांट फुटे । या माउलींच्याच ओवीची ही

---

१. कै. आ. माटे श्री. म. 'साहित्य मंजरी', ज्ञानेश्वर समाधीचे लौकिक दर्शन, पसायदान-आळंदी मधून

प्रत्ययकारी घटनाच ना ! विसोबा चाटींसारखे प्रज्ञावंत पण खरा विश्वधर्म अद्याप न समजलेले काही कर्मठ असतीलही. परंतु हे हवेच असते. कारण त्यांना योग्य ज्ञानमार्गावर आणणे हेही विभूति कार्यच ना! विसोबाही पश्चात्तापाने शुद्ध होवून ज्ञानेशांचे पायी नतमस्तक झाले व अनुग्रहितही झाले ही उत्क्रांती.

विभूतींच्या कार्याला त्यांनीच काल मर्यादा आखून घेतल्या असल्या पाहिजेत असे स्पष्ट दिसते. ज्ञानेशांनी तर आपल्या अवतार कार्यातील प्रत्येक दिवस आखलेला दिसतो. कारण त्यांच्याच [१]बाळ छंदातील ओव्यांवरून त्यांनी अवतार समाप्तीचा निर्णयही निश्चित केलेला आहे व तो त्यांनी त्याचप्रमाणे प्रत्यक्षात उतरविला हेही स्पष्ट आहे.

बापरखुमादेवीवरू तुष्टला । दान घे घे म्हणोनि वोळला ।
अजानवृक्ष पाल्हाईला । मग बोलिला विठ्ठल हरी ।
पुंडलिके केलेरे कोडें । तें तुवा मागीतलेरे निवाडें ।
मीं तुज हृदयी सांपडे । हे त्वां केलें ज्ञानदेवा ।। ८ ।।
ज्ञानदेवें घेतलें दान । हृदयीं धरूनीया ध्यान ।
समाधी बैसला निर्वाण । कथाकीर्तन करीतु ।
बाळछंदो बावीस जन्में । तोडिलीं भवाब्धीचीं कर्मे ।
चंद्रार्कतारांगणें । रश्में दान घेतला हरी ।। ९ ।। ज्ञा.गा. ७२७

आळंदीस आल्यानंतर श्रीगुरू निवृत्तिनाथ यांनी ज्ञानदेवांना स्वत:चे असे तत्त्वज्ञानात्मक ग्रंथाचे अनुयोजन करण्याचा आदेश दिला. या संबंधी [२]वै. पू. विष्णुबुवा जोग, त्यांनी विवरण केलेल्या, 'अमृतानुभवा'च्या प्रस्तावनेत लिहितात, ''ज्ञानेश्वर महाराजांनी भगवद् गीतेवर 'ज्ञानेश्वरी' नावाची प्राकृत टीका लिहून आपले सद्‌गुरू श्रीनिवृत्तिनाथ यांचे चरणी अर्पण केली.'' ती पाहून श्री निवृत्तिनाथ म्हणाले की, ''आता तू स्वत:च्या बुद्धिमत्तेने अमृत म्हणजे अखंड ब्रह्मसंज्ञित वस्तू, जी

---

१. गुरूदेव रा. द. रानडे, ज्ञानेश्वर वचनामृत, ज्ञानेश्वर चरित्र. श्रीसकलसंतवाणी ज्ञानेश्वर अभंग ७२७

२. जोग. विष्णुबुवा – अमृतानुभव सार्थ विवरण

सर्वकाळ, सर्वदेशी व सर्वावस्थेत नित्य अपरोक्ष स्वत: सिद्ध आहे, तिचा अनुवाद कर.'' आणि ज्ञानदेवांनी सद्गुरूंच्या या आज्ञेनुसार दशप्रकरणात्मक अमृतानुभव हा ८०६ ओव्याचा ग्रंथ लिहिला.

[१]मीच लिहून प्रसिद्ध झालेल्या 'प्रसाद अमृतानुभव' या सान्वय निरुपणाच्या ग्रंथाच्या अभिप्रायात [२]प्रा. शं. रा. तळघट्टी लिहितात की, ''संतश्रेष्ठ ज्ञानेश्वराच्या वाङ्मयात व एकूणच संत साहित्यात 'अमृतानुभव' या ग्रंथाचे महत्व अनन्यसाधारण आहे. ज्ञानेश्वरांनी आपल्या हाती दिलेल्या प्रासादिक अक्षरवाङ्मयांपैकी 'ज्ञानेश्वरी' हे गीतेवरील भावार्थ भाष्य आहे, 'चांगदेव पासष्टी' हे सिद्ध – भेटीचे भावपत्र आहे, तर अभंग हे स्वानुभूतीच्या जलाशयावरील भावलहरी आहेत. अखंड व एकरस अशा अमृतस्वरूप स्वानुभूतीची बैठक या सर्वांना असली तरी, निकराच्या आत्मभावाचा मुक्त अविष्कार पूर्णांशाने पाहावयाचा असेल तर त्यासाठी अमृतानुभवाकडेच धाव घ्यावी लागते. तसे पाहिले तर अमृत–तत्त्वाची अपरोक्ष अनुभूती ही शब्दातीत आहे, एवढेच नव्हे तर ती मन–बुद्धीच्याही अतीत आहे. तथापि अमृतानुभव ग्रंथात ज्ञानेश्वरांनी आपल्या अलौकिक शब्दसिद्धीने स्वसंवेद्य आत्मरुपाच्या अनुभवाचा अमृत कुंभ काठोकाठ भरून, तो मुमुक्षु साधक व अभ्यासक यांच्या स्वाधीन केलेला आहे. आणि 'बोली अरूपाचे रूप' समर्थपणे प्रत्ययाला आणून दिले आहे.''

अमृतानुभवाचा विषय जीव–ब्रह्म ऐक्याचा आहे. ज्ञानेशांचे सर्व वाङ्मय व जीवन पाहताना ठळकपणे जाणवते की अमृतानुभवाचा विषय, विचार व तत्त्वज्ञान त्यांचे मनी सातत्याने रुंजी घालीत होते. हा त्यांचा सर्व विचार केवळ विश्वासाठीच आहे, हे हरिपाठातील 'मागिलीया जन्मा मुक्त झालो' या वरून स्पष्ट होते. हे कार्य केवळ ज्ञानदेव ही विभूतीच करू शकते. हा ग्रंथ लिहितानाचे ज्ञानदेवांचे वय सोळा वर्षांचे आहे.

याच वेळेच्या सुमारास ज्ञानदेवांचे पैठण येथील महानकार्य, त्यांनी नेवासे येथील महालयाचे मंदिरात सांगितलेली भगवद्गीतेवरील टीकात्मक ग्रंथ 'ज्ञानेश्वरी' व एवढ्या लहान वयातील लोकमानसातील त्यांचे सर्वोच्च स्थान हे पाहून पुणतांबे येथे मठ स्थापून शेकडो शिष्यासह राहणारे

---

१. डॉ. साठे अ. म. प्रसाद अमृतानुभव

२. प्रा. तवघट्टी शं. रा. प्रसाद अमृतानुभव अभिप्राय

जेष्ठ, वयोवृद्ध संत चांगदेव यांना महदाश्चर्य वाटले. केवळ किंचित अभिमानापोटी ज्ञानेश्वर भेटीसाठी त्यांना काय पत्र लिहावे या संभ्रमात चांगदेवांनी ज्ञानेशास कोरेच पत्र पाठविले. चांगदेवांच्या मनीचा निष्पापपणा पाहून चांगदेव हे चांगा म्हणजे स्वच्छ मनाचे आहेत हे जाणून निवृत्तींनी ज्ञानदेवांना उत्तर पाठविण्यास सांगितले. ते पासष्ट ओव्यांचे उत्तर म्हणजेच 'चांगदेव पासष्टी'. चांगदेव पासष्टीत मुख्यत: एकच विषय आहे. 'तत् त्वम् असि'। या महावाक्याचा आत्मैक्याचा बोध ज्ञानेश्वर चांगदेवांना करतात. चांगदेव ज्ञानी होते, योगी होते, श्रीशिवाचे भक्तही होते. परंतु जो विश्वात्मक परमात्मा आहे, जो सर्वांतर्यामी आहे, तोच 'मी' आहे, तोच ज्ञानेश्वर आहे. व तोच श्रीशिवही आहे हे चांगदेवांना उमगले नव्हते. हा भक्तिसहीत ज्ञानाचा बोध [१]चांगदेव पासष्टीत आहे. इथे भक्तीही आहे व बोधही आहे. माउलींचा महाबोध असा आहे.

तया पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा ।
चांगया मज तुज आपणयाचा । बोल ऐके ।। चा. पा. ३७।।

अमृतानुभव व चांगदेव पासष्टी या दोन्हीचे लिखाण सोळावे वर्षीच (शके बाराशे तेरा) झाले असले पाहिजे. ज्ञानेश्वरांची अभंगवाणी याच कालखंडात बहरली असावी. रुपके, बाळक्रीडा, विरहिणी, सद्गुरू प्रसाद, ज्ञानेश्वर-निवृत्ति संवाद, उपदेशपर अभंग इत्यादींचे व ज्या अभंगात त्यानी स्वत:च्या 'समाधीची परवानगी पांडुरंगाला अगोदरच मागून ठेवली व ज्यास पांडुरंगाने परवानगी दिली ते 'बाळछंदांचे अभंग' ज्ञानदेवांनी याच वर्षी लिहिले असावेत. जे मनात अनुभवले ते मांडले आहे. हे आहे माझे समाधिधन.' आपल्या समाधीपूर्वीच्या उर्वरित आयुष्याच्या प्रत्येक दिवसाची आखणी ज्ञानदेव या विभूतीने सुमारे पाच वर्षे आधीच करून ठेवलेली स्पष्टपणे दिसून येते. शके बाराशे चौदा च्या आषाढी वारीचे निमित्ताने (वय सतरावे) ज्ञानदेवांनी पांडुरंगाच्या आत्मीय ओढीने सद्गुरू निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताईसह पंढरपुरासाठी प्रस्थान ठेविले असावे. ही अंतिम पाच वर्षातील कार्याची मांडणी विशेष लक्षणीय आहे. आळंदी सोडताना आपण आता आळंदीस परत येऊ ते मधून मधून, परंतु निरंतरचे येऊ ते आपल्या संजीवन समाधीसाठीच याची पूर्ण कल्पना या विभूतीस व त्यांच्या सद्गुरूंना पूर्णपणे असलीच पाहीजे. वृद्ध आजी, आजोबा यांचेही जीवन या

---

१. डॉ. साठे अ. म. श्रीज्ञानदेवांची चांगदेव पासष्टी

ईश्वरांच्या दर्शनाने सुफळ झालेच असेल, त्यांचाही मायेचा हात सर्वांच्या मुखावरून फिरला असणार. विभूतींनी नरदेह धारण केल्यावर त्या देहाची काही दु:खे, विरह, टीका सहन करण्याचे लागणे अपरिहार्य असणार. निर्लेपपणा असला तरी सुखाचे, तृप्तीचेही क्षण येऊन जाणारच.

ज्ञानदेवादि भावंडे आषाढीवारीसाठी पंढरपुरी येत आहेत हा सांगावा अनेक वारकऱ्यांनी पंढरीस पोहोचविला असणारच होता. डोळ्यासमोर तो अवर्णनीय प्रसंग उभा राहणे अपरिहार्य आहे. ज्या ज्या जीवाने ज्ञानदेव या विभूतीवर 'माउली' या श्रद्धेने व आत्मीयतेने प्रेम, भक्ती केली असेल व आहे, त्याच्या मिटल्या डोळ्यासमोर तो ईश्वरीय सोहळा जसाच्या तसा उभा राहील. ज्ञानेश्वरांच्या आयुष्यातील त्यांच्या बालपणापासून ते अंतिम संजीवन समाधीपर्यंतचे अनेक प्रसंग मी गेल्या पन्नास वर्षापेक्षाही जास्त काळ मनात अनुभवीत आहे. हा निश्चितच भाबडेपणा नाही.

ज्ञानेश आपल्या सद्गुरू व सोपान-मुक्ताईसह व आळंदीहून त्याच्या बरोबरच निघालेल्या वारकऱ्यांसह पंढरपूरच्या वेशीत आले. समोर हातात तुळशीहार घेऊन पांडुरंगाचा लाडका नामदेव, जेष्ठ संत गोरोबाकाका, चोखोबा, सोयराबाई, बंकामहाराज, मंजुळाबाई, कान्हो पात्रा, सेनामहाराज, संत सावतामाळी, नरहरी सोनार इ. आद्य जेष्ठ संत व शेकडो वारकरी टाळ-मृदुंगांच्या विठ्ठल नामाच्या घोषात भावोत्कटतेने डोळ्यात प्राण आणून या ईश्वराच्या रूपांची वाट पाहत होते. स्वत: पांडुरंग व आदिमाया रुक्मिणीसुद्धा आपलीच रुपे पाहण्यासाठी आली असतील तर नवल नाही. असा प्रसंग जन्मजन्मांतराने क्वचितच या भूमंडळीवर साजरा होत असेल. ज्ञानदेवांचे ते साजरे गोजरे प्रसन्न रूप पाहून भक्तजन वेडावले असतील. नामदेव हातातील तुळशीचा हार घेऊन प्रथम निवृत्तिनाथांचे जवळ आला व त्यांना हार घालून त्यांचे चरणी वाकला. निवृत्तींनी त्याला वरचेवर उठवून मिठीत घेतले. ज्ञानेश्वरांचे श्रीगुरू म्हणून सर्व संतमंडळात श्रीनिवृत्तिनाथांना खूप मोठा मान होता. त्यानंतर हाती तुळशीचा हार घेऊन नामदेव ज्ञानदेवाकडे धावला. डोळ्यातून आनंदाश्रूंचा महापूर ओघळत होता. अत्यानंदाने पाय लटपटत होते. दृष्टीला ज्ञानदेव धूसर दिसत होते. ज्ञानदेवांच्या गळ्यात हार घालून नामदेव वाकण्याचा प्रयत्न करीत असतानाच माउलींनी त्यांचे खांदे धरून त्यांना मिठीत घेतले. ही दोन परब्रह्मांची भेट पाहताना सर्व संतपरिवार गहिवरला. माउलींच्या मिठीत नामदेव फक्त ज्ञानदेव.. ज्ञानदेव एवढेच अस्फुट पुटपुटत होता. हा आनंदावेग आवरल्यावर

नामदेव हार घेऊन सोपानाकडे वळले. सोपानदेवांनी तो हार हातात घेऊन नामदेवांचेच गळ्यात घातला व पायी माथा टेकण्यासाठी तो नामदेव चरणाजवळ बसला. नामदेवांनी त्याला अडवून मिठीत घेतले. जनाई-सोयराबाई यांनी तर कोवळ्या मुक्ताईस केव्हाच दोघींच्या मिठीत घेतले होते. हा संतभेटीचा सोहळा अनुपम्य असला पाहिजे. विठ्ठल नामाच्या व निवृत्ति-ज्ञानदेव-नामदेवाच्या नाम गजरात सर्व संत विठ्ठल-रखुमाई वंदन भेटीसाठी मंदिरात गेले. नामदेव, गोरोबाकाका, या पाहुण्या ईश्वर रूपांना घेऊन पांडुरंगापाशी आले. पांडुरंगाचे ते समचरण सावळे गोजिरे रुप पाहून त्यांच्या पायाशी हे चारही अवतार केवळ नतमस्तकच झाले नाहीत, तर त्यांची भाव समाधी लागली. पांडुरंगाला माउलींनी लहानपणी जेव्हा ते आपल्या आई-वडिलांसह आले होते तेव्हा पाहिले होते. ते गोपवेशधारी श्रीकृष्णाचे सावळे तुळशीहार पीतांबरधारी रुप माउलींचे मनी ठसलेले होते. माउली पुटपुटले असतील "देवा खूप उशीर झाला ना भेटीला ! कार्य खूप महत्त्वाचे होते, ते पूर्ण करून तुमच्या भेटीला आलो." ती आषाढी वारी पंढरपुरी खूप रंगली असेल. या सर्व पंढरपूर भेटीचे भक्तिरसाचे वर्णन केवळ ग.दि.मा. - कुसुमाग्रज यांच्यासारखी दैवी लेखणीच करू शकेल. नामदेव, चोखोबा, गोरोबाकाका यांना ज्ञानेश्वरी कथन निवृत्ति-ज्ञानदेव यांचे मुखातून ऐकायचे होते. त्यांचे प्रवचन कीर्तन म्हणजे तर प्रत्यक्ष देववाणी. निवृत्तिज्ञानदेवही नामदेवादि संतांच्या प्रवचन-कीर्तनाने तृप्त झाले. चंद्रभागेच्या वाळवंटात ही सर्व संतांची मांदियाळी खूप रंगली. मुख्यत्वे सर्वांच्या लक्षात राहण्यासारखी घटना म्हणजे, ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीतून गीतेचा अर्थ स्पष्ट केल्यावर, देव एकच आहे व त्याचे पूजन, कीर्तन करण्याचा अधिकार चारही वर्णांना व स्त्रियांनाही आहे, हे ज्ञानदेवांच्या प्रवचनातून सर्वांना समजले. त्यांना त्यांचा अधिकार समजला. या वारीत संतांना मुक्ताई, जनाई, सोयरा, मंजूळा, भागूमहारीण यांचेही अभंग इतर संतांचे अभंगाबरोबर ऐकायला मिळाले. आणि प्रत्येकजण जाणून होता की हे सर्व केवळ ज्ञानदेव-निवृत्तिनाथ यांचेमुळेच झाले.

शके बाराशे चौदा ते शके बाराशे सोळा (वय सतरा ते एकोणीस वर्षे) ज्ञानदेवादि भावंडे आषाढी-कार्तिकी यात्रेसाठी पंढरपुरी येत राहिली. त्यांचा या काळातील मुक्काम जास्ती करून पंढरपुरातच असावा. नामदेव तर आता ज्ञानदेवाशिवाय राहूच शकत नव्हता. ज्ञानदेवांना परमेश्वराची सगुण-निर्गुण रूपे यात काहीच भेद नव्हता. माउली आपल्या अभंगात म्हणाले -

नामदेव हार घेऊन सोपानाकडे वळले. सोपानदेवांनी तो हार हातात घेऊन नामदेवांचेच गळ्यात घातला व पायी माथा टेकण्यासाठी तो नामदेव चरणाजवळ बसला. नामदेवांनी त्याला अडवून मिठीत घेतले. जनाई-सोयराबाई यांनी तर कोवळ्या मुक्ताईस केव्हाच दोघींच्या मिठीत घेतले होते. हा संतभेटीचा सोहळा अनुपम्य असला पाहिजे. विठ्ठल नामाच्या व निवृत्ति-ज्ञानदेव-नामदेवाच्या नाम गजरात सर्व संत विठ्ठल-रखुमाई वंदन भेटीसाठी मंदिरात गेले. नामदेव, गोरोबाकाका, या पाहुण्या ईश्वर रूपांना घेऊन पांडुरंगापाशी आले. पांडुरंगाचे ते समचरण सावळे गोजिरे रुप पाहून त्यांच्या पायाशी हे चारही अवतार केवळ नतमस्तकच झाले नाहीत, तर त्यांची भाव समाधी लागली. पांडुरंगाला माउलींनी लहानपणी जेव्हा ते आपल्या आई-वडिलांसह आले होते तेव्हा पाहिले होते. ते गोपवेशधारी श्रीकृष्णाचे सावळे तुळशीहार पीतांबरधारी रुप माउलींचे मनी ठसलेले होते. माउली पुटपुटले असतील "देवा खूप उशीर झाला ना भेटीला ! कार्य खूप महत्त्वाचे होते, ते पूर्ण करून तुमच्या भेटीला आलो." ती आषाढी वारी पंढरपुरी खूप रंगली असेल. या सर्व पंढरपूर भेटीचे भक्तिरसाचे वर्णन केवळ ग.दि.मा. - कुसुमाग्रज यांच्यासारखी दैवी लेखणीच करू शकेल. नामदेव, चोखोबा, गोरोबाकाका यांना ज्ञानेश्वरी कथन निवृत्ति-ज्ञानदेव यांचे मुखातून ऐकायचे होते. त्यांचे प्रवचन कीर्तन म्हणजे तर प्रत्यक्ष देववाणी. निवृत्तिज्ञानदेवही नामदेवादि संतांच्या प्रवचन-कीर्तनाने तृप्त झाले. चंद्रभागेच्या वाळवंटात ही सर्व संतांची मांदियाळी खूप रंगली. मुख्यत्वे सर्वांच्या लक्षात राहण्यासारखी घटना म्हणजे, ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीतून गीतेचा अर्थ स्पष्ट केल्यावर, देव एकच आहे व त्याचे पूजन, कीर्तन करण्याचा अधिकार चारही वर्णांना व स्त्रियांनाही आहे, हे ज्ञानदेवांच्या प्रवचनातून सर्वांना समजले. त्यांना त्यांचा अधिकार समजला. या वारीत संतांना मुक्ताई, जनाई, सोयरा, मंजूळा, भागूमहारीण यांचेही अभंग इतर संतांचे अभंगाबरोबर ऐकायला मिळाले. आणि प्रत्येकजण जाणून होता की हे सर्व केवळ ज्ञानदेव-निवृत्तिनाथ यांचेमुळेच झाले.

शके बाराशे चौदा ते शके बाराशे सोळा (वय सतरा ते एकोणीस वर्षे) ज्ञानदेवादि भावंडे आषाढी-कार्तिकी यात्रेसाठी पंढरपुरी येत राहिली. त्यांचा या काळातील मुक्काम जास्ती करून पंढरपुरातच असावा. नामदेव तर आता ज्ञानदेवाशिवाय राहूच शकत नव्हता. ज्ञानदेवांना परमेश्वराची सगुण-निर्गुण रूपे यात काहीच भेद नव्हता. माउली आपल्या अभंगात म्हणाले -

तुज सगुण म्हणु कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण एकू गोविंदु रे ।।

परंतु नामदेव केवळ ईश्वराचे पांडुरंग स्वरुपच मानीत होता. त्याला सद्गुरूंचा उपदेश होवून परमेश्वराचे सर्वाठायी असणारे स्वरूप समजणे अतिशय जरूरीचे होते. नामदेवाचा पूर्ण भक्त, ज्ञानी भक्त होण्यासाठी ते जरूर होते. ज्ञानदेवांनी नामदेवास औंढ्या नागनाथाला जाऊन विसोबा खेचर यांची गाठ घेण्याची विनंती केली. ज्ञानदेवांची इच्छा म्हणून नामदेव औंढ्यानागनाथाला विसोबांना भेटायला गेला. परत आलेला नामदेव पूर्णतया बदललेला होता. त्याला आता पांडुरंगाचे विश्वाच्या कणाकणाला व्यापून असलेले रूप समजले. विसोबांनी नामदेवाला नाथपंथाची दीक्षा दिली. नामदेवाचे विठ्ठलाच्या सगुण रूपावरील प्रेम कणभरही कमी झाले नाही. परंतु आता त्याला त्याच्या पांडुरंग विश्वाच्या अणुरेणूत दिसू लागला.

भगवंतांनी गीतेद्वारे जातिभेद हे निषिध्द असल्याचे जरी सांगितले असले तरीही पांडुरंगाच्या राऊळी सर्वांना पांडुरंगाच्या पायी मस्तक ठेवता येत नाही हे सत्य ज्ञानदेवांना स्पष्टपणे दिसून आले. हा मनीचा सल जनाई, चोखोबा इत्यादी जातिहीनांनी ज्ञानदेवासमोर व्यक्त केला असावा, याचा कधीतरी प्रकट उच्चार होणारच होता. ज्ञानदेव विभूती असूनही प्राप्तकाळी काही करू शकणार नव्हते. ती योग्य वेळही नव्हती. परंतु पांडुरंगाची मूर्ती प्रत्यक्ष दिसून त्याचे पायी मस्तक ठेविले तरच त्याची भक्ती होते असे नाही, हे या सर्वांना पटवून त्यांना भक्तीचा सहज सुलभ व निश्चितपणे पांडुरंग-प्राप्तीचा मार्ग दाखविणे जरूर होते. व हे कार्य महत्त्वाचे होते.

मला मनोमनी जे भावले, पटले ते पुढीलप्रमाणे असावे. सर्व जातिवर्णांच्या वारकऱ्यांना भक्तीचा सुयोग्य मार्ग दाखविणे हे विभूतीचेच कार्य होते. तीर्थयात्रेपूर्वी हे होणे गरजेचे होते. शके बाराशे सोळाच्या आषाढी यात्रेसाठी ज्ञानदेव, निवृत्तिनाथ, सोपान, मुक्ताई पंढरीस आले. संतांची मांदियाळी चंद्रभागेच्या वाळवंटी रंगली. काल्याचे प्रवचनास ज्ञानदेव उभे राहिले. त्यांनी सर्व संतांकडे प्रेमभरल्या दृष्टीने पाहिले. त्यांच्या लक्षात आले की चोखामेळा, सोयराबाई, बंका, जनाई यांच्या नजरेत एक विव्हळता आहे. त्यांना आपल्याला काहीतरी सांगायचे आहे. ज्ञानदेवांच्या चेहेऱ्यावर एक अस्फुट हास्य आले. ते चोखोबांच्या जवळ गेले. चोखोबा व सोयराबाई उठून उभे

राहिले. 'चोखोबाकाका तुम्हाला दोघांना काहीतरी मला सांगायचय. बोला ना!' चोखोबा अश्रुपूर्ण डोळे पुसत म्हणाले, 'ज्ञानदेवा, तू भक्तांची माउली आहेस. येथील शेकडो वारकऱ्यांना पांडुरंगाचे पायी मस्तक ठेवता येत नाही. महाद्वारातून फक्त त्याचे मुखदर्शन होते, किंवा कळसाचे दर्शन. त्यांनी देवाची भक्ती कशी करावी?' माउली म्हणाली, की 'चोखोबाकाका तुम्ही व सोयराआई पांडुरंगाचे लाडके भक्त आहात. या सर्व वारकऱ्यांना भक्तीचा मार्ग तुम्हीच दाखवायला हवा. पांडुरंगाचे पायी डोयी ठेविली म्हणजेच फक्त भक्ती होते का? भक्तीचा भगवंताने सांगितलेला सर्वश्रेष्ठ मार्ग तुम्हीच त्यांना सांगायला हवा.' 'ज्ञानदेवा, तू भक्तांची माउली आहेस. सर्व वारकरी तुला भगवंताचा अवतार मानतात. तू जे सांगशील ती वेदांची आज्ञा असेल. तूच या सर्वांना सुलभ भक्तीचा मार्ग सांग.' ज्ञानदेवांच्या हृदयात शब्द उमटले -

[१]विश्वाचे आर्त माझे मनी प्रकाशले । अवघेचि जाले देहब्रह्म ।।

आवडीचे वालभ माझेनी कोंदाटले । नवल देखिले नभाकार गें माये ।।

बापरखुमादेवीवरु सहज निटु जाला । हृदयी नटावला ब्रह्माकारे ।।ज्ञा. गा. ६६४।।

ही करुणा व करुणेतनू येणारे प्रेम सामान्य हृदयाची वेदनाच नाही का? ज्ञानदेव क्षणभर डोळे मिटून उभे राहिले. मग समोरच्या शेकडो वारकऱ्यांशी ते बोलू लागले. प्रत्येकास माउली जणू आपल्याशीच बोलत आहे, असे दूरवर बसलेल्या वारकऱ्यांसही वाटले. माउली बोलू लागले - "माझ्या वारकरी मायबाप हो ! देव केवळ देवळातच आहे का? पांडुरंग तुमच्या, माझ्या प्रत्येकाचे हृदयात आहे. त्याला आठवा. त्याचे नामस्मरण करा. तुमची वारीची दिंडी तुमच्या गावातून निघाली की तो दिंडीच्या मागे उभा असतो. पंढरपुरात तो देवळात नसतो. तुमच्या संगे तो इथेच, या चंद्रभागेच्या वाळवंटात असतो. तुम्ही वारी करून परत जाताना तो प्रत्येकासोबत त्याच्या त्याच्या घरापर्यंत असतो. तुम्ही सुखरूप घरी पोहोचल्यावर तो आपला अंश तुमच्या देवघरात ठेवून परत येतो, तुम्ही परत पंढरपूरला येण्याची वाट पाहत असतो. तुमच्या प्रत्येकाच्या तो मनात आहे. त्याला प्रेमाने, आर्ततेने हाक द्या. तो धावून येईल. त्याने तुमच्या प्रत्येकाच्या हृदयात आपले पंढरपूर उभे केले आहे. आषाढी-कार्तिकीला पंढरपुरात यायचे ते संतांच्या पायी नम्र होण्यासाठी.

---

१. श्रीसकलसंतगाथा खंड-१ ज्ञानेश्वरांचे अभंग, श्री सकलसंतवाणी खंड-१ श्रीज्ञानेश्वर गाथा.

कारण ते पांडुरंगाचे चालते बोलते अवतार आहेत. सर्वात पुण्याचा मार्ग म्हणजे त्या भगवंताचे, त्या श्रीहरीचे नाम-स्मरण, त्याचा नाम-घोष आहे. हे पुण्य कधीही कमी होणारे, क्षयाला जाणारे नाही. या नामस्मरणाने तुम्हाला याच जन्मात भगवंताचे दर्शन घडेल. या जन्म-मरणाच्या फेऱ्यातून मुक्त व्हाल. ज्ञानदेव क्षणभर थांबले व त्यांच्या मुखातून हरिपाठ बाहेर पडला. पांडुरंग स्वतः ज्ञानदेव स्वरूपातून सांगू लागला -

[१]देवाचिये द्वारी उभा क्षणभरी । तेणे मुक्ति चारी साधियेल्या ।

हरिमुखे म्हणा हरिमुखे म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।।

असोनि संसारी जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ।

ज्ञानदेव म्हणे व्यासाचिया खुणा । व्दारकेचा राणा पांडवा घरी ।।हरिपाठ अभंग १ ।।

सत्तावीस ओव्यांचा हरिपाठ सलग माउली मुखातून आशीर्वादासारखा बाहेर पडला. माउली म्हणतात, 'मी तुम्हाला भगवंताचाच निरोप सांगितला आहे. पांडुरंगाला हृदयात ठेवून आपला करा. त्याला तेथेच बंदिस्त करा. तो तुमचाच होऊन तुमच्या घरी राहील.' माउलींनी प्रेमाने सर्वांकडे पाहून स्मितहास्याने हात जोडले. चोखोबा, जनाई, सोयरा, बंका या सर्व संतांनी धावत येऊन ज्ञानदेवांचे पाय धरले. माउली संकोचून गेली. चोखोबांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहत होत्या. ते म्हणाले - 'ज्ञानेश्वरा, तुझ्या मुखातून आज स्वत: पांडुरंगच बोलत होता. माझी आण आहे सर्व वारकऱ्यांना की या ज्ञानेश्वर माउलीने सांगितलेला भक्तीचाच मार्ग यापुढे प्रत्येकाने मरेपर्यंत अनुसरला पाहिजे. माउलीचे शब्द आठवा - 'ते नाम सोपेरे । राम कृष्ण गोविंद ।' निवृत्तिनाथांच्या चेहेऱ्यावर अतीव आनंद व समाधान होते. आषाढी वारीचे सार्थक झाले होते. हरिपाठ भक्तांना सांगण्याची हीच योग्य वेळ होती असे मला निश्चितपणे जाणवते. ज्ञानेश्वरांचा अवतारच बहुजन कल्याणासाठी होता. हरिपाठ याच कारणाने ज्ञानदेवांनी सांगितला याबद्दल कोणाच्याही मनांत शंका येऊच शकत नाही. म्हणूनच आजही 'हरिपाठ' संध्येसाखा प्रत्येक वारकऱ्यांच्या मुखी आहे. ती त्यांची गीता आहे.

ज्ञानदेव कार्तिका वारीपर्यंत पंढरपुरातच राहिले. सर्व संतांनाही त्यांचा सहवास मिळाला. वारी

१. श्रीसकल संतवाणी, श्रीसकल संतगाथा

संपताच ज्ञानेशांनी तीर्थयात्रेसाठी नामदेवाने आपल्या बरोबर यावे असा त्याला आग्रह केला. नामदेव तर विठ्ठलाला सोडून एक दिवसही दूर राहण्यास तयार नव्हता. तो म्हणाला की मी विठ्ठलाचा पाइक, त्यालाच मी विकला गेलो आहे. तू त्याचीच परवानगी काढ. ज्ञानदेवांनी पांडुरंगाची परवानगी मागितली व दोघेही तीर्थयात्रेला बाहेर पडले. हा ज्ञानेश्वर या विभूतीच्या योजनेतला शेवटचा टप्पा होता. नामदेवाशी सगुण भक्तीबद्दल बोलणे, त्याच्याकडून त्या भक्तीचे मर्म जाणून घेणे ही ओढही ज्ञानदेवांना होती. दोघेही निघाले. त्यांच्याबरोबर अन्य जेष्ठ संत व निवृत्तिनाथ-सोपानदेव-मुक्ताई होते का नाही याचा स्पष्ट उल्लेख नामदेव गाथेत नाही. पूर्ण उत्तरभारताची व पंजाब यांची यात्रा या दोघांनी केली. ज्ञानदेवांचा मुख्य हेतू साध्य झाला. उत्तरेकडे यावनी सत्तेने मांडलेला धुमाकुळ व वैदिक (भागवत) धर्माला येत असलेली अवकळा त्यांना नामदेवाला दाखवायची होती. ज्ञानदेवांनी ती त्याच्या या पूर्वीच्या काशीयात्रेत पाहिली होती. ज्ञानेशांच्या समाधीपर्यंत महाराष्ट्रात यावनी सत्ता उतरली नव्हती. परंतु त्यांच्या समाधीनंतर महाराष्ट्रावरही आक्रमण झाले. परंतु महाराष्ट्रात भागवत धर्माची मुळे इतकी खोलवर रुजली होती की कोणतीही परकीय सत्ता, परकीय धर्म, भागवत धर्म उखडू शकला नसता.

तीर्थयात्रेहून परतताना एका संध्याकाळी ज्ञानदेव नामदेवाशी मनीचे गुह्य बोलण्यासाठी बसले. नामदेवाचा हात हाती घेऊन ज्ञानेश्वर त्याला म्हणाले - ''नामदेवा ! ही तीर्थयात्रा संपवून आपण दोन वर्षांनी कार्तिकी यात्रेला पंढरपुरी जाणार आहोत. मी घेतलेल्या निर्णयाप्रमाणे पांडुरंगाच्या परवानगीने मी एकादशीच्याच दिवशी समाधी घेणार आहे.'' हे ऐकताच नामदेवाच्या डोळ्यांना धारा लागल्या. ज्ञानेश्वर हा तर नामदेवाचा प्राण होता. परंतु ज्ञानेश्वर शब्द कधीही बदलणार नाही, हेही त्याला ठाऊक होते. ज्ञानदेव पुढे म्हणाले - ''नामदेवा, तुला उत्तरेला नेण्यामागे माझा विशिष्ट हेतू होता. यवनांनी उत्तरेची केलेली दैना तू समक्ष पाहिलीस. शीख, व उत्तरेकडील कबीरासारखे संत व सर्व आचार्यकुले भागवतधर्म रक्षणाची पराकाष्ठा करीत आहेत. त्यांना तुझ्या मदतीची खूप गरज आहे. तू लोकसंत आहेस. सामान्यांचीसुद्धा कीर्तनातून नस पकडण्याची तुझी हातोटी आहे. तुझ्या इतका समर्थ संत अन्य नाही. क्रूर यावनी सत्ता व धर्मभ्रष्टता याखेरीज अन्य धर्मांची भीती मला नाही. कारण त्यांची संस्कृती याच भूमीतील आहे. महाराष्ट्राची काळजी करू नकोस. कारण

आपले सर्व वर्णाचे संतमंडळ भक्कम आहे. माझ्या समाधीनंतर तू उत्तरेस जा. माझ्या मागे माझे श्रीगुरू व भावंडे फार काळ या भूतलावर राहणार नाहीत. त्यांचेही अवतार कार्य ते संपवतील. मुख्य म्हणजे माझ्या समाधीपर्यंत तू माझ्याबरोबर रहा. मला समाधी तू द्यावीस. मला तू उत्तरेकडे जाशील हा शब्द दे.' नामदेव रडवेला झाला होता. त्याला एकच आशा होती की पांडुरंग ज्ञानदेवाच्या समाधीला परवानगी देणार नाही. परंतु नामदेवाने ज्ञानेशांना उत्तरेकडे जाण्याचा शब्द दिला. आपल्या समाधीची तिथीसुद्धा ज्याच्या मनात निश्चित होती त्या विभूतीचे समाधीपूर्वी केवळ तीर्थयात्रा या कारणासाठी नामदेवाला उत्तरेस नेले ही गोष्ट मनास पटत नाही व ती तर्कसंगतही नाही. या देवभूमीवर उद्या कोसळू लागणाऱ्या विनाशाचा विचार हाच ज्ञानदेव या विभूतीचा विचार होता. ([१]प्रा. श्री. म. माटे यांचे लेखात माझ्याचप्रमाणे ज्ञानदेव – नामदेव यांचे समाधीबद्दलचे बोलणे झाल्याचा विचार आहे. परंतु त्याचे लिखाणाप्रमाणे हे बोलणे चंद्रभागेच्या वाळवंटात नदीकाठी झाले) पंढरपुरी कार्तिकीचे शुद्ध दशमीस शके बाराशे अठरा परत येताच दोघेही राऊळात पांडुरंगाकडे गेले. ज्ञानदेवांनी आपली एकादशीस पंढरपुरी समाधिस्त होण्याची इच्छा पांडुरंगास सांगितली. पांडुरंगांनी समाधीस परवानगी दिली, परंतु ती समाधी ज्ञानदेवांनी कार्तिक शुद्ध एकादशीस न घेता, कार्तिक वद्य एकादशीचे पारणे झाल्यावर त्रयोदशीस आळंदी क्षेत्री घ्यावी असे सांगितले. नामदेवास खूप दुःख झाले. पांडुरंग परवानगी देणार नाही असे त्यास वाटत होते. समाधान एवढेच वाटले की अजून पंधरा दिवस माउलीचा सहवास मिळणार होता.

नामदेव व सर्व संतांच्या उपस्थितीत कार्तिक वद्य त्रयोदशी शके बाराशे अठरा या दिवशी मध्यान्ह समयी ज्ञानदेवांनी आळंदीस संजीवन समाधी घेतली.

ज्ञानेश्वर नावाची विभूती आपल्या मूळ निर्गुण स्वरूपात मिसळून गेली. पुढील प्रत्येक शतकातील भगवत्भक्तांना भागवतधर्माची पताका स्वकर्तृत्वाने पुढे नेण्याचा राजमार्ग ज्ञानदेवांनी सर्वांसमोर उभा केला. 'संभवामि युगे युगे' असे आश्वासन देणाऱ्या भगवंताचे ज्ञानेश्वर हे रूप हे जनमानसावर आपल्या चिरंतन अस्तित्वाचा ठसा उमटवून अलंकापुरीत खऱ्या भक्तांची वाट पाहत उभे आहे. केवळ पंढरीला जाणे म्हणजे भक्ती नाही. मी जनासाठी काय केले याचे उत्तर प्रत्येकाला

---

१. कै. प्रा. माटे श्री. म. 'साहित्यमंजरी' ज्ञानेश्वर समाधीचे लौकिक दर्शन, पसायदान–आळंदी मधून

आपल्या जीवनात व जीवन अंतानंतर त्या विभूतीस द्यावयाचे आहे. अन्यथा ती केवळ दिखाऊ भक्ती होईल आणि हे 'इदं न मम' या श्रेयत्यागातून हे कार्य उभे करायचे आहे. वारकरी हा भगवंताचे नावाने क्रियाशून्य होतो आहे हा आक्षेप बदलणे तुमचे कर्तव्य आहे. लक्षावधी वारकरी आषाढी/कार्तिकीच्या वारीत लक्षावधी तासांचा कार्य कालावधी (Manhours) नाहक वाया घालवितात हा विकल्पयुक्त संदेश समाजात पसरणे माउलीस निश्चित आवडणारे नाही. संत-वारकरी प्रत्येक क्षेत्रात समाजाचे निस्वार्थी, स्वच्छ चारित्र्याचे क्रियाशील कार्यकर्ते व मार्गदर्शक आहेत हे ज्ञानदेवांनी प्रत्यक्ष स्वत:च्या आदर्श उदाहरणाने सर्व भक्तांना दाखविले आहे. ज्ञानेश्वरांवर खरे प्रेम व भक्ती असेल तर तसे स्वकर्तृत्वाने दाखवून देणे हे प्रत्येकाचे कर्तव्य होत नाही का !

– परिशिष्ट –

## उत्तरार्धातील कालखंड व कार्य

नेवासे येथे सच्चिदानंदास प्राणदान

शके १२१२ वय १५ वर्षे – नेवासे येथे महालसा मंदिरात भावार्थ दीपिका सांगितली.

शके १२१३ वय १६ वर्षे – आळंदीत अमृतानुभव चांगदेव पासष्टी व अभंग रचना, बालछंदाचे अभंग.

शके १२१४ वय १७ वर्षे – पंढरपुरी आषाढी यात्रेस आगमन, बापरखुमादेवीवरू ही मुद्रा येथील रचित अभंगापासून असावी.

शके १२१५ वय १८ वर्षे – नामदेवास विसोबांचा अनुग्रह, पंढरपुर, आळंदी अभंग.

शके १२१६ वय १९ वर्षे – पंढरपुरी आषाढी यात्रेचे प्रवचनात वारकऱ्यांना हरिपाठ दिला.

शके १२१७ वय २० वर्षे – कार्तिकी यात्रेनंतर नामदेवासह उत्तरेकडील यात्रा.

शके १२१८ वय २१ वर्षे – नामदेवाकडून उत्तरेत भागवत धर्म प्रचारासाठी जाण्याचे वचन घेतले. नामदेवास कार्तिकी एकादशीस स्वत: संजीवन समाधी घेणार असल्याचे सांगितले त्यासाठी त्याने स्वत: हजर रहावे.

पंढरीस पांडुरंगाने वद्य एकादशीचे नंतर त्रयोदशीस आळंदी येथे समाधीस परवानगी दिली.

शके १२१८ वय २१ व ३ म. ५ दि. – कार्तिक वद्य त्रयोदशी – आळंदीस इंद्रायणी तीरी सर्व संतांचे उपस्थितीत संजीवन समाधी. दुपारी १२ वाजता.

# ज्ञानदेवांचा विज्ञान-विचार,
# पसायदानाचा प्रसाद व
# चैतन्याच्या अनाकलनीय घटना

# ज्ञानदेवांचा विज्ञान-विचार, पसायदानाचा प्रसाद व चैतन्याच्या अनाकलनीय घटना

ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदासस्वामी यांसारख्या महान संतांच्या जीवनातील चमत्कार हे नमस्कारासाठी नसून त्यामागे त्यांची भक्ति, साधना, ईश्वरनिष्ठा यांची ती दृश्य परिणती असते. कोणत्याही संताने चमत्कार ठरवून केलेले नाहीत. प्राप्त प्रसंगी ते घडून गेले. [१]डॉ. अरूणा ढेरे यांनी त्यांच्या 'अर्ध्या वाटेवर' या ग्रंथात, 'चमत्कार-सत्यता, असत्यता' या लेखात त्याचा ऊहापोह केलेला आहे.

ज्ञानेश्वर व त्यांची भावंडे यांना सामान्य माणसांचे मापदंड लावणे, त्यांना इतरांना लाभणारे शिक्षण कधी व कोठे मिळाले? त्यांनी योगाची, भक्तीची साधना केव्हा, कोठे व कोणाच्या मार्गदर्शनाखाली केली, असे प्रश्न जर चिकित्सकांनी उभे केले तर त्यांची कीव करावीशी वाटेल. त्यांना ज्ञानेश्वरादि भावंडे समजलीच नाहीत असे म्हणावे लागेल. [२]वै. वा. शं. वा. दांडेकर यांनी आपल्या 'सार्थ ज्ञानेश्वरी' या ग्रंथात ज्ञानेश्वरांचे जीवनदर्शन मांडताना पुढील गोष्टींचा उल्लेख केला आहे. १) "ज्ञानेशादि भावंडांनी आपल्या मार्गदर्शक पित्याबरोबर अनेक तीर्थयात्रा केल्या असाव्यात. कारण विठ्ठलपंतांना लग्नाचे पूर्वीपासूनच तीर्थाटनाची हौस होती." (मुले समज येण्याचे वयात येताच त्यांच्या भविष्याच्या व ज्ञानार्जनाच्या मदतीसाठी विठ्ठलपंतानी मुलांना पंढरपूर, कोल्हापूर, महाराष्ट्रातील प्रमुख दैवते व काशी या ठिकाणांच्या तीर्थयात्रा करवून आणल्या असल्याच पाहिजेत असा माझा विश्वास आहे. कारण या यात्रा त्यांच्या बहुश्रुततेसाठी अत्यावश्यक होत्या, व विठ्ठलपंतांचे हाती फारच थोडा कालावधी होता.) २) पैठणला रेड्यामुखी वेद व त्या म्हैशियास मारलेल्या आसूडाचे वळ ज्ञानेशांच्या पाठीवर उठणे (नामदेव गाथा) ३) सच्चिदानंद बाबा यांना उठविणे. कै. मामासाहेबांच्या ग्रंथात सच्चिदानंदांचा संदर्भ आहे, परंतु त्यांच्या जीवनदानाचा उल्लेख नाही. नामदेव गाथेतसुद्धा उल्लेख नाही. परंतु नामदेव गाथा पैठणनंतरच्या कार्याचा उल्लेख करीत नाही. गीता माहात्म्यात (अभंग ९१२) नामदेव ज्ञानेश्वरीचा गौरवाने उल्लेख करतात. ४) तापीतीरीचे संत चांगदेव यांना सामोरे

---

१. डॉ. देरे अरूणा. 'अर्ध्यावाटेवर', 'चमत्कार-सत्यता, असत्यता.

२. वै. दांडेकर शं. वा. - सार्थ ज्ञानेश्वरी, प्रस्तावना पान ४, ६

जाताना चालविलेली जड भिंत. आणखीनही काही चमत्कार ज्ञानदेवांचे नावावर आहेत. वै. वा. मामासाहेब दांडेकर हे गतशतकातील प्रत्यक्ष ज्ञानेश्वर मानले गेले आहेत. ते केवळ तत्त्वज्ञच नव्हते, तर जेष्ठ योगाभ्यासी व मर्मज्ञ अभ्यासू होते. वरील संदर्भ लिहिण्यापूर्वी कै. ती. मामासाहेबांनी त्यावर निश्चित विचार केला असणार. कारण त्यांनी सच्चिदानंद यांना माउलींनी दिलेल्या प्राणदानाबद्दल लिहिलेले नाही.

ज्ञानेश्वरांचे वेद-वेदांताचे शिक्षण विठ्ठलपंताकडून झाले. संत ज्ञानेश्वर व निवृत्तिनाथादी भावंडे ही सामान्य मानवी अवतार नाहीत. हा भगवंताचाच कृष्णावताराचा उत्तरार्ध आहे. गीतेच्या ६ व्या अध्यायात योगभ्रष्टाचे पुढील अवताराचे वर्णन आहे. अनेक जेष्ठ संतांनी, विचारवंतांनी माउली हे भगवंताचे, श्रीविष्णूचे, श्रीकृष्णाचे अवतार आहेत असे आग्रहाने सांगितले आहे. विशिष्ट कार्यासाठीच हे या भावंडांचे अवतार आहेत व ते कार्य संपताच ते देहरुपातून संजीवन अवस्थेत गेले. म्हणून माउलींनी रेड्यामुखी वेद वदविले, असे म्हणण्याचे ऐवजी ज्याला भाषाच नाही त्याला देववाणी दिली असे म्हणूया. माउलींनी सच्चिदानंदांना जिवंत केले असे म्हणण्याऐवजी त्याची प्राणशक्ती प्रज्वलित केली असे म्हणूया. विज्ञान आज इतके पुढे गेले आहे की सजीव-निर्जीव या प्रत्येकात अणु-रेणूची क्रियाशक्ती तीव्र असते. याचा प्रत्ययकारी अनुभव जगाने घेतला आहे. म्हणून ज्ञानदेवांनी भिंत चालविली न म्हणता त्या जडाची चेतना जागृत केली असे म्हणावे लागेल.

यौगिक ज्ञानाच्या, शक्तीच्या, प्रभावाच्या कक्षा जाणणारे जर कोणी जेष्ठ साधक, ऋषी असतील त्यांनाच याची महानता समजेल हे मान्य. परंतु आज ते समजावून देणारा समर्थ ज्ञानी आमच्यासमोर नाही म्हणून या सर्वांना थोतांड म्हणणे हा योगविद्येचा, पातंजल ऋषींचा, कणद ऋषींचा, महर्षी अय्यंगार योगाचार्यांचा अपमान आहे. माउली या मानापमानाच्या पलीकडे आहेत. त्यांना तुमच्या – माझ्या प्रशस्तीची गरज आहे का?

गीता – ज्ञानेश्वरीचे पांचव्या (योगगर्भयोग) सहाव्या (आत्मसंयम-ध्यान योग) व सातव्या (ज्ञान-विज्ञान योग) व अठराव्या अध्यायात दिलेल्या विवरणातून 'योग' माहात्म्य स्पष्ट होते. कोणताही योगी आपल्या यौगिकसामर्थ्यांबद्दल केवळ आपल्या योग्य शिष्याशिवाय अन्य कोणासही सांगणार नाही. सहज प्रसार करावा इतके ते सामान्य शास्त्र नाही. मन-बुद्धी-शरीर याची ती महान कसोटी असते. आणि म्हणूनच नाथपंथात एक गुरू एक शिष्य ही परंपरा चालत आली आहे. हा योगविद्येचा 'डंख', 'आज्ञा'

सर्वोपलब्ध नाही. वरील अध्याय सूक्ष्म विचारांनी (Read inbetween the lines) वाचल्यास याचा अर्थ कळेल. म्हणून ज्ञानेश्वर जीवनातील या घटनांना चमत्कार म्हणून अंध:श्रद्धेने त्याची हेटाळणी होऊ नये. त्यामागे हजारो वर्षांची यौगिक तपश्चर्या आहे. चालू युगातील Electron Microscope, अणु विच्छेदनातून मिळणारी प्रचंड शक्ती, चुंबकीय शक्ती व विद्युत शक्ती न दिसणाऱ्या असूनही त्यांचे अस्तित्व आपल्याला ठाऊक आहे. क्लोन, स्टेम सेल, रॉकेटस्, रोबोट ही वैज्ञानिक सत्ये आहेत. पुण्याचे योगाचार्य बी. के. अय्यंगारमहर्षी वयाच्या एक्याण्णव वर्षांनंतरही तरुणांना लाजविणाऱ्या निष्ठेने योगाचे शिक्षण व उपचार देत आहेत, हे बोलके उदाहरण आहे. 'पातंजल-योग-दर्शन' १९७२ या आपल्या पातंजल योग सूत्रावरील महान ग्रंथात ऋषितुल्य लेखक [१](कै) कृ. के. कोल्हटकर यांनी या योगाभ्यासाचा त्यांनाच झालेल्या उपयोगाबद्दल प्रस्तावनेच्या पान ६६-६७ वर स्पष्ट उल्लेख केला आहे. हा त्यांचा अनुभव पंचमहाभूतांवरील संयमाचा असल्याचे त्यांनी स्पष्ट केले आहे. कृपया योग जाणून घेण्यासाठी, योगाच्या शक्तीची जाणीव होण्यासाठी तरी वाचावे. या ग्रंथास गुरूदेव रानडे यांची प्रस्तावना आहे.

ज्ञानदेवांचा ज्ञान - विज्ञान विचार : ज्ञानाधिष्ठित कर्म + श्रद्धानिष्ठित उपासना - भक्ती व भक्तियुक्त कर्मातून खऱ्या विरक्तीचे ज्ञान हे ईश्वरोपासनेचे वर्तुळ ज्ञानदेवांनी अध्याय पाच ते बारा पर्यंत मांडले आहे. हा आहे समुच्चय सिद्धांत (Cohesive theorem of Gita Dnyneshwari) गीतेत भगवंताने अर्जुनाला आत्मज्ञानासाठी विज्ञानाची जाण ठेवण्यास सांगितले आहे. तेच ज्ञानदेवांनी साध्या समर्पक शब्दात मांडले आहे. या संबंधी १९९६ साली आळंदी येथे भरलेल्या ६९ व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनात स्वागताध्यक्षाचे आपले भाषणात[२] प्रा. वि. दा. कराड यांनी आपले मार्मिक विचार मांडले आहेत. ते म्हणतात, "दुर्दैवाने ज्या ज्ञानेश्वर - तुकारामांनी जीवनाचे व निसर्गाचे म्हणजे निसर्गरुप देवतेचे संपूर्ण ज्ञान, विज्ञानासहित सांगितले, त्याच ज्ञानबातुकारामाची नकळत आपल्याकडून टिंगळटवाळी झाली. त्यांनी लिहिलेल्या सर्व गाथा ज्ञानेश्वरी, वैयक्तिक मोक्षाचे साधन म्हणून त्यांच्याकडे पाहिजे गेले. हे आपले खरे अज्ञान. वास्तविक ज्ञानेश्वरी, गाथेसारखे जीवनस्पर्शी विज्ञाननिष्ठ ग्रंथ जगाच्या पाठीवर झाले नाहीत."

"आपल्या महाराष्ट्रातील ज्ञानेश्वरीच्या, वेदांच्या अभ्यासकांनी व संस्कृत पंडितांनी जाहीरपणे असे

---

१. (कै) कृ. के. कोल्हटकर, पातंजल योगदर्शन १९६६ पान ६६-६७

२. डॉ. वि. दा. कराड, स्वागताध्यक्ष, ६९वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, १९९६ 'पसायदान' पान ६-७

म्हटले आहे की वेदांतामध्ये, गीता ज्ञानेश्वरीमध्ये विज्ञान शोधणे हे चूक आहे. कृपया असा चुकीचा युक्तिवाद समाजासमोर मांडू नका. ज्ञानेश्वरीचा प्रारंभच –

ओम नमोजी आद्या । वेद प्रतिपाद्या ।

जयजय स्वसंवेद्या । आत्मरुपा ।।

याने झालेला आहे. कोणतं आद्य आणि स्वसंवेद्य ते काय (अल्टीमेट स्टेट ऑफ मॅटर कॉन्शसनेस) त्या आत्यंतिक ग्रंथाला अवैज्ञानिक मानणे ही फार मोठी चूक झाली आहे.''

सातव्या अध्यायात भगवान अर्जुनाला सांगतात –

आइका मग तो अनंतु । पार्थातें असे म्हणतु ।

पैं गा तूं योगयुक्तु । जालासि आता ।। ज्ञा.७.१ ।।

मज समग्रातें जाणसी ऐसें । आपुलिया तळहातीचे रत्न जैसे ।

तुज ज्ञान सांगेन तैसें । विज्ञानेंसीं ।। ज्ञा.७.२ ।।

एथ विज्ञाने काय करावे । ऐसें घेसी जरी मनोभावें ।

तरी पैं आधी जाणावे । तेंचि लागें ।। ज्ञा.७.३ ।।

मग ज्ञानाचिये वेळे । झाकती जाणिवेचे डोळे ।

जैसी तीरीं नाव न ढळे । टेकली सांती ।। ज्ञा.७.४ ।।

तैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुतां पाउलीं निघे ।

तर्कु आयणी नेघे । आंगीं जयाचां ।। ज्ञा.७.५ ।।

अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंचु हे विज्ञान ।

तेथ सत्यबुद्धि ते अज्ञान । हें ही जाण ।। ज्ञा.७.६ ।।

आता अज्ञान अवघे हरपे । विज्ञान नि:शेष करणे ।

आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाईजे ।। ज्ञा.७.७ ।।

ऐसें वर्म जें गूढ । तें कीजेल वाक्यरुढ ।

जेणे थोडेन पुरे कोड । बहुत मनींचे ।।८ ।। ज्ञा. ७–८ ।।

प्रा. कराड पुढे म्हणतात, ''श्रीकृष्णासारखा गुरु आणि अर्जुनासारखा शिष्य यातील संवाद माझ्या शिकलेल्या मित्रांना व विशेषत: विज्ञान शाखेतील जाणकरांना चिंतन करायला लावणारा असाच आहे. कृष्ण अर्जुनाला सांगतो आहे, हे अर्जुना, तुला जर खरं ज्ञान प्राप्त करून घ्यायचं असेल तर तू प्रथम विज्ञान समजून घे. सायन्स म्हणजे विज्ञान नव्हे व नॉलेज म्हणजे ज्ञान नव्हे.'' ज्ञानाला सुपर कॉन्शन्सनेस व विज्ञानाला मॅटर कॉन्शसनेस असे म्हणावेसे मला वाटते. ज्ञानेश्वर म्हणतात - 'प्रपंच ज्ञान ते विज्ञान । स्वरुप ज्ञान ते ज्ञान ।' म्हणजे प्रपंच ज्ञानालाच खरे ज्ञान समजणे हे अज्ञान आहे. प्रपंच ज्ञान म्हणजे विशेष ज्ञान व स्वरुप ज्ञान म्हणजे समष्टी ज्ञान. ''ज्ञान विज्ञानाची इतकी शास्त्रशुद्ध व पूर्ण व्याख्या जगाच्या पाठीवर संत ज्ञानेश्वरांशिवाय कोणीही, कधीही दिली नाही.''

ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेणाराला ज्ञान-कर्म-योग-उपासना-भक्तीयुक्त ज्ञान - वैराग्य या क्रमाने साधना करून त्या सर्वेश्वराला जाणता येते. ज्ञानेश्वरांनी चौथ्या अध्यायात उपासना कांडाला सुरुवात केली. निष्काम कर्मयोग येथे सांगितला. तेच विस्ताराने पाचव्या योगगर्भ अध्यायात सांगितले व योगाचा 'दंश' सांगितला. सहाव्या अध्याय हा गीतार्थाचे सार व योगविभवभांडार आहे. योगमार्गावरून कसे जावे याचे पूर्ण निरुपण हा अध्याय करतो. हे योगविज्ञान अत्यंत महत्त्वाचे आहे. सातव्या अध्यायात ज्ञान-विज्ञान याचा विचार व अभ्यास आहे. संपूर्ण ज्ञानेश्वरीत, अमृतानुभवात ज्ञानेश्वरांनी ज्ञान व विज्ञान यांचा मागोवा घेतच आपले तत्त्वज्ञान सांगितले आहे.

[१] ज्ञान-विज्ञानाबद्दल ज्ञानेश्वरीत जे विस्तृत विवरण आहे, त्यातील महत्त्वाचा भाग कै. शं. वा. दांडेकर यांच्या 'सार्थज्ञानेश्वरी'त पुढील प्रमाणे आहे.

''ही दृश्य सृष्टी ज्या माझ्या मायेमुळे उत्पन्न होते तिला प्रकृती म्हणतात आणि ती अपरा व परा अशी दोन प्रकारची आहे. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि व अहंकार अशा आठ भागांनी व्याकृत झालेली ती अपरा प्रकृती व हे आठ भाग ज्या ठिकाणी लीन होऊन राहतात ती पराप्रकृती. पराप्रकृती जेव्हा अष्टधा प्रकृतीच्या परिणामाला पावते तेव्हा अंडज, स्वेदज, जारज व उद्बीज असे निरनिराळ्या आकाराचे परंतु एकाच योग्यतेचे असंख्य प्राणी निर्माण होतात व त्यांच्याकडून पुढे कर्माचे व्यवहार होतात. तीच प्रकृती पुन्हा साम्यावस्थेला आली म्हणजे हा विश्वाकार सर्व लयाला जातो. हे सर्व जे

[१]. दांडेकर शं. वा., सार्थ ज्ञानेश्वरी, पान १८०

दिसते ते मृगजळाप्रमाणे फक्त भासमान आहे, त्याला सत्यअधिष्ठान सर्व मीच आहे. सृष्टीतील पदार्थात विशेषत्त्वाने भासणारे गुण-पाण्यातील रस, चंद्र सूर्यामधे तेज, बळवानातील बळ, प्राणिमात्रांच्या ठिकाणी असणारा शास्त्राने नियमन केलेले काम वगैरे सर्व मीच आहे. सत्त्व, रज, तमादि गुणांनी युक्त असे विश्वाच्या आकाराला आलेले पदार्थ हे जरी सर्व माझ्यापासून झालेले आहेत, तरी त्या पदार्थात मात्र मी नाही.'' (सार्थ ज्ञानेश्वरी, पान १८०)

## पसायदानाचा प्रसाद

तत्त्वज्ञ संत श्रीज्ञानेश्वर माउलींच्या आळंदीच्या तीर्थक्षेत्रात माउलींच्या ७१३ व्या संजीवन सोहळ्याचे औचित्य साधून ९ नोव्हेंबर २००९ रोजी विश्वशांती केंद्र, आळंदी या संस्थेने विश्वरुप दर्शन मंचावर 'इथे साकारिले पसायदान' या ग्रंथाचा लोकार्पण सोहळा साजरा केला. या ग्रंथाच्या निर्मितीची संकल्पना [१]प्रा. डॉ. विश्वनाथ दा. कराड (माईर्स MIT) यांनी साकार केली. थोडक्यात या ग्रंथाचे महत्त्व असे सांगता येईल की ज्ञानेश्वरांनी, विश्वात्मक देवाने त्यांच्या वाग्यज्ञाने संतुष्ट होऊन जो प्रसाद संपूर्ण विश्वाला दिला त्याचे वाटप ज्ञानेश्वरांनी सर्व प्राणिमात्रांना केले. या घटनेच्या अनुभवाची प्रत्यक्ष प्रचिती देणारा हा पवित्र ग्रंथ आहे. सर्वात्मक सर्वेश्वराची सत्ता व भक्तावरील त्याची कृपा हे सांगोवांगी किंवा कपोलकल्पित नसून याचा प्रत्यक्ष साक्षात्कार कसा घडतो याचा पुरावा देणारा हा ग्रंथ आहे. भक्ताने पवित्र भावनेने व भोळ्या भक्तीने विश्वात्मक देवाला म्हणजेच ज्ञानेश्वरांनी शरणागत होऊन प्रेमाने जो संकल्प बोलला त्याला ज्ञानेश्वरांच्याच कृपा प्रसादाने प्रत्यक्ष आकार कसा मिळतो याचा बोध देणारा ''इथे साकारिले पसायदान'' हा ग्रंथ आहे.

ज्ञानेश्वर, त्यांनीच म्हटल्याप्रमाणे, सद्गुरु कृपेने ज्या संतांच्या पायाजवळ आले त्या संतांचा अधिकार ईश्वरापेक्षा मोठा आहे. कोणत्याही जीवाची हुंडी ईश्वर संतांच्या सही शिवाय पास करीत नाही. संतजन हेच या विश्वातले चालते बोलते ईश्वर आहेत. याच महान संतांच्या नावाने श्रीक्षेत्र आळंदी देहू परिसर विकास समितीच्या वतीने अलंकापुरीत अनेक पवित्र प्रकल्प राबविण्याचा संकल्प सोडला गेला. सौंदर्य शिल्पयुक्त घाट, तीर्थकुंड, स्वच्छ शुद्ध परिसर असे प्रकल्प ज्ञानेश्वरांच्या प्रेमसत्तेने व विश्वात्मक देवाच्या आणि सद्गुरू निवृत्तिनाथांच्या आशीर्वादाने पूर्ण झाले. हे संकल्प सत्याधिष्ठित असल्यामुळे 'सत्य संकल्पाचे

---

[१]. डॉ. कराड वि. दा., येथे साकारले पसायदान, २००९, पान ११५-१२२

दाते'[१] भगवान ग्यानबा व तुकाराम आहेत याचा साक्षात्कार भक्तिसंप्रदायातील ईश्वर भक्तांना आला. या संकल्प सिद्धीच्या आठवणी 'आठवणींची सुवर्णपिंपळपाने' या शीर्षकाने प्रा. विश्वानाथ कराड या ज्ञानेश्वरभक्ताने त्यांच्या लेखात वर्णन केल्या आहेत. 'तीर्थक्षेत्राकडून ज्ञानतीर्थ क्षेत्राकडे' नेणाऱ्या प्रकल्पाद्वारे ज्ञानदेवांचे पसायदान या ग्रंथातील लेखाद्वारे भाविक, भक्त जन जनलोकांपर्यंत कसे पोचवले गेले याचे प्रत्यक्ष अनुभूतीचे दर्शन घडविणारे साहित्य या ग्रंथात आहे. या पवित्र कार्यासाठी अनेक ऋषितुल्य अधिकारी पंडितांचे, ऋषींचे, शास्त्रज्ञांचे, सत्यव्रती सौजन्यमूर्ती संतांचे आशीर्वाद या ग्रंथाला लाभले आहेत.

आळंदीच्या शिवभूमीत ब्रह्मचैतन्य ओतप्रोत भरलेले आहे. या भूमीत ज्ञानदेवांची संजीवन समाधी आहे. या भूमीत आलेल्या भक्त भाविकांचा पवित्रभाव हाच आहे.

अलंकापुरी पुण्यभूमी पवित्र । तिथे नांदतो ज्ञानराजा सुपात्र ।

तया आठविता महापुण्यराशी । नमस्कार माझा सद्गुरू ज्ञानेश्वरासी ।।

म्हणजे ज्ञानेश्वरांच्या पुण्यभूमीमध्ये ज्ञानेश्वरांची आठवण होऊन पाय ठेवणाऱ्या ज्ञानेश्वर भक्तांच्या पुण्याईची कमाई मोजताच येणार नाही. याच श्रद्धेने संत तुकाराम महाराज म्हणतात –

चला आळंदीला जाऊ । ज्ञानदेव डोळा पाहू ।

होतील संतांचिया भेटी । सांगु सुखाचिया गोष्टी ।

ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखी म्हणता चुकती फेर ।

जन्म नाही रे आणीक । तुका म्हणे माझी भाक ।।

## चैतन्याच्या अनाकलनीय घटना

श्री ज्ञानेश्वरांना समाधिस्थ होऊन सातशे वर्षांपेक्षा जास्त कालावधी झालेला आहे. शरीराने ते समोर दिसत नाहीत. आणि तरीही त्यांचे अस्तित्व मनाला, शरीराला जाणवते. हा अनुभव एकट्या दुकट्याचा नाही. ज्यांचा विश्वास नाही ते याला भाबडेपणा असेही म्हणतील. कारण खरा अनुभव येण्यासारखे सरळ, निष्पाप मनच हटवादीपणाने हरवून गेलेले असते. मी आळंदीला जातो तेव्हा माउली दर्शनाला मी रात्री

---

[१]. डॉ. कराड वि. दा., इथे साकारिले पसायदान. 'सत्य संकल्पाचे दाते'

दहाचे नंतर जातो. समाधी गाभाऱ्यात गर्दी नसते. समाधीला दोन्ही हातांनी मिठी मारून समाधीवर दोन मिनिटे पूर्ण आत्मभावाने व शांतपणे डोके टेकता येते. या वेळची अनुभूती प्रत्येक व्यक्तिसापेक्ष वेगळी असेलही. परंतु प्रत्येकाला अत्यंत समाधान मिळत असणार. कारण ते त्यांच्या चेहेऱ्यावरून सहज समजते. गुरुवारी व रविवारी आळंदीला खूप गर्दी असते. कारण ते सुट्टीचे दिवस आहेत. अनेक नोकरदार आपल्या पत्नी–मुलांसह येतात. पण या मागचे कारण असते एक छोटी सहल व जाता जाता समाधी दर्शन. उलट पालखी प्रस्थान, कार्तिकीचा समाधीसोहळा या वेळी येणाऱ्या भाविकांना मिळणारे दर्शन काही क्षणांचेच असते. परंतु त्यासाठी ते बारीत कित्येक तास उभे असतात. ही बारी ग्यानबा–तुकारामांच्या गजराने व अभंगांनी दुमदुमत असते. कंटाळलेपणाचा लवलेशही नसतो. मिळणाऱ्या काही क्षणांच्या समाधीदर्शनाने वारकरी तृप्त असतो. बाया–बापड्या डोक्यावर ओल्या कपड्यांचे गाठोडे व कमरेवर लहानमूल अशा काहीही तक्रारी न करिता तासन्‌तास मुखी ज्ञानोबा माउलीचे नाव घेत उभ्या असतात. त्यांना होणारे माउलींचे दर्शन खरेच साक्षात्कारी असले पाहिजे.

श्रीज्ञानेश्वरांच्या समाधीची जागा ही खरोखर चैतन्याने भरलेली आहे. हा अंधविश्वास नाही. कारण अनेकांना त्याची प्रचिती आलेली आहे. सर्वजणच ती सांगतील असेही नाही. कारण तो प्रत्येकाच्या जाणिवेचा भाग आहे. परंतु काही जाणत्यांच्या प्रतिक्रिया लिहिल्याही गेल्या आहेत. त्यावर कोणी अंधश्रद्धा असा आक्षेपही घेतलेला नाही. त्यातील मोजक्या प्रचिती मांडीत आहे. या आहेत त्या दिव्य विभूतीच्या साक्षात्कारी खुणा.

पुढील प्रसंग विख्यात शास्त्रज्ञ डॉ. आर. एन. शुक्ल[१] यांनी आपल्या 'विश्व चैतन्याच्या अनुभूती' या ग्रंथात दिला आहे. समाधी स्थानावरील चैतन्याच्या त्यांच्या आणखीही खुणा या ग्रंथात आहेत. त्या प्रसंगातील काही व्यक्ती हयातही आहेत. ग्रंथाच्या अवृत्त्याही निघाल्या आहेत.

वै. शं. वा. तथा मामासाहेब दांडेकर[२] व कै. डॉ. वाय्. व्ही. फाटक हयात असतानाचा हा प्रसंग आहे. वै. मामासाहेब दांडेकर व कै. डॉ. फाटक यांच्याशी डॉ. शुक्ला यांचा दृढ परिचय होता. डॉ. शुक्ल यांनी प्रसंगाचा कालखंड १९७२ चा दिला आहे. परंतु अनेकांनी असा प्रसंग होऊन गेल्याचे

---

१. डॉ. शुक्ल आर. एन्., पान ९४–९८

२. डॉ. शुल्क आर. एन., विश्व चैतन्याच्या अनुभूती, पान ९४–९८

सांगितले आहे. एके दिवशी वै. मामांनी डॉ. शुक्ल यांना संध्याकाळी फोन करून, दुसऱ्या दिवशी पुण्यातील काही अंध:श्रद्धा निर्मूलन कायकर्ते आळंदीस जाऊन माउलींच्या समाधी स्थानी खोदून माउलींच्या अस्तित्वाच्या काही खुणा (अस्थि वगैरे) मिळतात का हे पाहण्यासाठी येणार असल्याचे सांगितले. डॉ. शुक्ल यांनी वैज्ञानिक दृष्टिकोनातून संजीवन समाधी म्हणजे काय हे त्या कार्यकर्त्यांना समजावून देण्याची जबाबदारी घेतली. दुसऱ्या दिवशी सकाळी डॉ. शुक्ल, मामासाहेब दांडेकर व डॉ. फाटक लवकरच आपल्या साहित्यासह समाधी मंदिरात पोहोचले. डॉ. शुक्ल यांनी गीगर म्यूलर स्किंटीलेशन काउंटर (अल्फा, बीटा, गामा इ. प्रावरणे मोजण्यासाठी), थर्मिस्टर बोलोमिटर (अल्ट्राव्हायोलेट, इन्फ्रारेड साठी) व फ्रिकेन्सिरडार मिटर अशी तीन सक्षम उपकरणे व लोखंड, पितळ व जस्त यांची समाधी चौथऱ्यावर घालण्याची वेष्टने बरोबर आणली होती. जेव्हा अंधश्रद्धा निर्मूलनाचे कार्यकर्ते आले तेव्हा त्यातील जाणकारांना वरील उपकरणांची व आवरणांची माहिती दिली. व प्रयोग कसे करावेत हेही समजावून सांगितले. त्या कार्यकर्त्यांच्या सहज लक्षात आले की समाधीतून चेतना प्रवाह बाहेर येत होता. वेगवेगळ्या आवरणातून बाहेर पडताना तो कमी अधिक होत होता. संजीवन समाधी म्हणजे काय हे त्यांना समजावून सांगितल्यावर त्यांना समाधीचे ठिकाणी निश्चित चैतन्य असल्याचे स्पष्ट झाले व त्यांचा विश्वास बसला. हे चैतन्य दिसत नसले तरी त्याचे अस्तित्व यंत्रावर पाहता व मोजता येते. वैज्ञानिक दृष्टिकोनाने त्यांचा संभ्रम दूर झाला. येथे अंधश्रद्धेला जागा नव्हती. माउलींच्या चैतन्यमय चिंरतन अस्तित्वाची ती निश्चिती होती.

माउलींच्या चैतन्य अस्तित्वाचा दुसरा दाखला डॉ. शुक्ला यांनी 'आळंदीचे बोलणारे वृक्ष' या लेखात दिलेला आहे. यातील माहिती व डॉ. विश्वनाथ कराड यांनी नोव्हेंबर २००९ मध्ये त्यांची संकल्पना व निर्मिती असलेला ग्रंथ 'इथे साकारले पसायदान' या अत्यंत माहितीपूर्ण व माउलींच्या आशीर्वादाने निर्माण केलेल्या महान कार्याची माहिती देणाऱ्या ग्रंथातही मिळते. २४ ते ३० नोव्हेंबर १९९७ ला पुण्यात एम्. आय. टी. मध्ये विश्वशांती विश्वविद्यालयाची स्थापना करण्याकरिता प्रो. क्लाईस नोबेल (अल्फ्रेड नोबेल यांचे नातू) आले होते. त्यांनी पुण्यात येण्यापूर्वी डॉ.शुक्ल यांना आळंदी भेटीसंबंधी कळविले हाते. या आळंदी भेटीत डॉ. नोबेल यांच्या बरोबर सहा नोबेल विजेते शास्त्रज्ञ होते. डॉ. शुक्ल यांचे बरोबर प्रा. कराड व डॉ. बाचल होते. डॉ. नोबेल व त्यांच्या सहकाऱ्यांनी ज्ञानदेवांच्या समाधीला व नंतर अजान

वृक्षाला व सुवर्ण पिंपळाला मिठ्या मारल्या. त्यांना या तीनही ठिकाणी उर्जा स्त्रोताचा अनुभव आला. त्याचे वैज्ञानिक स्पष्टीकरण डॉ. शुक्ल यांनी दिले आहे.

डॉ. शुक्ल[१] व प्रा. कराड[२] यांच्या 'इथे साकारले पसायदान' या ग्रंथातील माहितीतील फरक असा – प्रा. कराड यांचेसह समाधीस भेट देताना डॉ. नोबेल यांच्या बरोबर त्यांच्या पत्नी सौ. मार्गारिथा व श्री. कुलकर्णी (अमेरिकास्थित भारतीय) होते. समाधीची पूजा करताना उभयतांच्या डोळ्यात अश्रू होते. कारण ज्ञानेश्वरादि भावडांचे चरित्र त्यांना सांगताना प्रा. कराड यांच्या डोळ्यातून अश्रुधारा राहत होत्या. डॉ. नोबेल यांनी त्यांना दिलेले अजान वृक्षाचे पान श्रद्धेने जवळ ठेवले. डॉ. नोबेल सुवर्ण पिंपळाला मिठी मारून दोन मिनिटे स्तब्ध होते. या पवित्र भावनेतून विश्वशांती विद्यापीठाची संकल्पना प्रत्यक्षात आली. या प्रसंगांचे प्रत्यक्ष छायाचित्रणही 'इथे साकारले पसायदान' या ग्रंथात आहे. माउलींनी विश्वेश्वराकडे मागितलेले पसायदान डॉ. कराड, पू. साखरे महाराज, डॉ. माशेलकर, डॉ. विजय भटकर, डॉ. कराडांचे संपूर्ण कुटुंब, ज्ञानेश्वरप्रेमी त्यांचे जिवलग सहकारी, मार्गदर्शक व हजारो ज्ञानेश्वर – तुकाराम यांच्यावर अलोट प्रेम करणारे वारकरी यांच्या श्रद्धेने साकारलेले आळंदी–देहू येथे दिमाखाने उभे आहे. माउलीच्या असलेपणाची आणखी कोणती ओळख जगाला हवी आहे?

[१]चैतन्याच्या पुढील दोन अनुभूती डॉ. शुक्ल यांच्या 'विश्वचैतन्याच्या अनुभूती' या पुस्तकात पान २६ व २७ वर आहेत. त्या त्यांच्याच शब्दात सांगतो. पैकी पहिली करवीरच्या पू. शंकराचार्यांनी ही माहिती दिली आहे. उत्तर यात्रेचे वेळी ज्ञानेश्वर शिव दर्शनाकरिता काशी–विश्वेश्वराला गेले. तेथील पंडे लोकांनी ज्ञानेश्वरांची महानता जाणून घेण्यासाठी त्यांची परीक्षा घ्यायचे ठरविले. त्यांनी सांगितले 'तुम्ही रेड्याकडून वेद वदवून घेतले, मान्य आहे. आमचा विश्वास आहे तुम्ही सांगता म्हणून. पण इथे प्रत्यक्षात आम्हाला काही तरी करून दाखवा.'

काशी विश्वेश्वराचे मंदिरात सगळे पंडे एकत्र आले. त्यांनी ज्ञानेश्वरांना सांगितले, 'आमची एकच इच्छा आहे. विश्वेश्वरासमोरचा जो नंदी आहे त्याला तुम्ही ह्या चाऱ्याच्या पेंड्या खाऊ घाला. तो खातोय हे सिद्ध करा. तुम्ही रेड्याकडून वदवून घेतलंय. नंदीने हा चारा खायला पाहिजे. तुम्ही जर नंदीला सजीव

[१]. डॉ. शुक्ल आर. एन्. 'विश्व चैतन्याची अनुभूती', पान २९–३३

[२]. डॉ. वि. दा. कराड, 'इथे साकारले पसायदान', पान ११९, १२२

करू शकत असाल, तर त्याने चारा खाल्ला पाहिजे.' ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले, 'तुम्ही जे म्हणता ते अघटित आहे. मी काहीही केलेले नाही. माझ्याकडून करवून घेणारे दुसरेच होते. त्यांनी जर मला परवानगी दिली तर करायला माझी काही हरकत नाही.' ते निवृत्तिनाथांकडे वळले. त्यांनी होकार दिला. 'ते म्हणाले त्यांची जर इच्छा असेल तर करायला हरकत नाही. त्यांना नमस्कार कर आणि सुरुवात कर!' पंड्यांनी ज्ञानेश्वरासह सर्व भावंडांच्या हातात एक एक पेंडी दिली. प्रथम ज्ञानेश्वर आले आणि त्यांनी पेंडी नंदीच्या मुखाजवळ धरली आणि ती मागे मागे घेतली. नंदीने पेंडीच्या दिशेने तोंड वळविले. काशी विश्वेश्वरासमोरच्या नंदीचे तोंड वळलेले आहे. (भारतात कोणत्याही अन्य शिव मंदिरातील शिवासमोरच्या नंदीचे तोंड असे वळलेले नाही.) या नंदीने सर्वांच्या हातातील पेंड्या खाल्या.

या चमत्कारानंतर त्यांचा (ज्ञानेश्वरांचा) सत्कार करण्याकरिता तिकडच्या पद्धतीप्रमाणे ज्ञानेश्वरांना पंड्यांनी पगडी (मंदील) अर्पण केली. ज्ञानेश्वरांच्या डोक्यावर आपण जी पगडी (मंदील) बघतो ती तिकडच्या सत्कारातून आलेली आहे. त्या पूर्वी इकडे त्यांच्या मस्तकी मंदिल नव्हता.

पुण्यात बेडेकर नावाचे प्रसिद्ध चित्रकार होते. त्यांनी ज्ञानेश्वर माउलींचे चित्र काढले ते प. पू. वै. गुलाबराव महाराजांनी पहावे असा त्यांचा आग्रह होता. प. पू. गुलाबराव महाराज जन्मांध परंतु प्रज्ञाचक्षु होते. ''आपण बघून काही सूचना असेल तर सांगा. त्याप्रमाणे मी बदल करीन.'' प. पू. गुलाबराव महाराज बेडेकरांच्या दारा समोर आले आणि म्हणाले, ''मी दाराच्या आत येणार नाही; कारण तू जे चित्र काढले आहेस ते चुकीचे आहे.'' बेडेकर म्हणाले की, ''त्याकरिताच मी आपल्याला इथे बोलावले आहे. चुका असतील तर त्या मी दुरुस्त करतो. मला माहीत नाही. मी ज्ञानेश्वर पाहिलेले नाहीत.'' श्री. बेडेकर यांनी चित्रात ज्ञानेश्वराना जानवे दाखविले होते; पण ज्ञानेश्वरांची तर मुंज झालेली नव्हती. त्यामुळे जानवे असणे शक्य नव्हते.

वै. प. पू. गुलाबराव महाराज जन्मांध होते तरीही प्रज्ञाचक्षु होते. ते स्वत:ला माउलींची कन्या मानीत असत. जन्मांध असूनही त्यांनी अध्यात्मावर, वेदांवर वगैरे खूप लिखाण करून ठेवले आहे. असे सांगतात की, ज्ञानेश्वरांचे प्रत्यक्ष दर्शन व्हावे म्हणून ते माउलीजवळ हट्ट धरून बसले. उपोषणही केले. माउलींनी त्यांना प्रत्यक्ष सगुण दर्शन दिले. त्या नंतर पुण्यामुंबईकडील प्रख्यात चित्रकार त्यांच्या भोवती जमले व तुम्ही माउलींचे वर्णन करा, आम्ही त्यावरून माउलींचे चित्र तयार करतो, असा त्या सर्वांनी

आग्रह धरिला वै. प. पू. गुलाबराव महाराजांनी माउलींच्या बैठकीसह त्यांच्या सर्व शरीराचे व अंगावरील वस्त्रांचे, डोक्यावरील मंदिलाचे, गळ्यातील हाराचे वगैरे अगदी बारीक सारीक सर्व छटांचे, जणू माउलीच त्यांच्या समोर बसली आहे, इतक्या बारकाव्यासह तपशीलवार वर्णन केले. सर्व चित्रकरांनी त्याप्रमाणे माउलींचे चित्र रेखाटन केले. गुलाबराव महाराजांनी प्रत्येकाचे चित्र हातात घेऊन त्यावर हात फिरवून परीक्षण केले. त्यापैकी एक त्यांनी निवडले. असे सांगतात की सध्या आळंदीला समाधी मंदिरात माउलींचे म्हणून जे छायाचित्र मिळते ते गुलाबराव महाराजांनी निवडलेल्या चित्रावरून केलेले आहे.

ज्ञानेश्वरांचे लक्षावधी भक्त जगभर पसरलेले आहेत. शेकडोंच्या जवळ आपापल्या अनुभूती असतील व त्या त्यांना खऱ्या व आनंद देणाऱ्या आहेत. म्हणून आता एकच अनुभूती देतो.

ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास यांचे चरित्रकार व या संतांच्या वाङ्मयाची यथार्थ ओळख करून देणारे (कै) ल. रा. पांगारकर सर्वांच्या परिचयाचे आहेत. त्यांना आलेली ही माउलींची अनुभूती.

[१]पांगारकरांना लहानपणी मिर्गी (fits) चा आजार होता. त्यांना रोज फेपरे येत असत. त्याने ते अगदी बेजार झाले होते. त्या काळी शक्य होते ते सर्व उपचार करून झाले. त्यांच्या आईने त्यांना पुण्यास नेऊन चांगल्या डॉक्टरला दाखविण्यास पांगारकरांच्या काकांना (ज्यांना ते पुढे दत्तक गेले) सांगितले. काकांनी पांगारकरांना बैलगाडीत घालून ते मार्गी लागले. त्यांचे राहण्याचे ठिकाण हे आळंदी–पुणे मार्गाजवळ असावे. काकांनी त्यांना पुण्यास नेण्याचे ऐवजी गाडी आळंदीकडे वळविली. पांगारकरांचे काका माउली भक्त होते. आळंदीला गेल्यावर काकांनी त्यांना गाभाऱ्यात नेऊन त्यांच्याकडून समाधीची पूजा करून घेतली व माउलींना त्यांचा आजार बरा करण्याची विनवणी केली. पांगारकर आपल्या ग्रंथात लिहितात की त्या दिवसानंतर आयुष्यात पुन्हा केव्हाही त्यांना फेपरे आले नाही. (हे दुर्मिळ पुस्तक पुण्याच्या सिटी पोष्टाजवळील 'नगर वाचन मंदिरा'च्या ग्रंथालयात आहे.)

सर्वेश्वराच्या अनेक विभूती हे त्या सर्वेश्वराचेच विश्व कल्याणासाठी घेतलेले मानवी अवतार आहेत. प्रत्येक युगात हे अवतार झाले व हे विश्व आहे तोपर्यंत धर्मरक्षण, साधूंचे परित्राण व अन्यायाच्या

---

[१]. कै. पांगारकर ल. रा. 'चरित्रचंद्र' पांगारकरांचे आत्मचरित्र, प्रकाशक पांगारकर ल. रा. १९३७ पान १७

पराकोटीला पोहचलेल्या दुष्कृत्यांच्या विनाशासाठी ईश्वरी विभूती अवतार घेणारच. आपणच निर्माण केलेल्या जिवांचे रक्षण हे त्याचे ब्रीद आहे. ईश्वराच्या सामर्थ्याबद्दल आपल्याला कधी शंका येत नाही. मग विभूतींच्या अवतारातील घटनांची चिकित्सा का? खरे तर पृथ्वीवर जन्मलेला प्रत्येक जीव, प्रत्येक वस्तू, ईश्वरनिर्मित आहे व तेच महान आश्चर्य आहे. कारण कोणतेही दोन जीव एकसारखे नाहीत. पृथ्वीवरील इतक्या प्रचंड लोकसंख्येपैकी कोणत्याही दोन व्यक्ती सारख्या नाहीत. विश्वातील कोणत्याही दोन व्यक्तींच्या अंगठ्यांचे ठसे (thumb prints) सारखे नाहीत. हा तर ईश्वर निर्मित अद्वितीय चमत्कार आहे. अंधश्रद्धा तर निश्चितच नसावी परंतु ज्या प्रश्नांना उत्तरे नाहीत त्याबद्दल थोतांड असा शिक्का सुसंस्कृत नाही. विश्वास ठेवा कोणत्याही संताने – विभूतीने 'मी हा चमत्कार केला आहे' असे सांगितले नाही. त्या श्रद्धा आपल्या आहेत.

# ज्ञानेश्वरांचा आदर्श आणि आदर्शवादी तत्त्वज्ञान

ज्ञानदेवांनी आपल्या निरूपणातून आदर्शवादी तत्त्वज्ञान कसे मांडले आहे व ते त्यांनी स्वतःच्या जीवनात, वाङ्मयात अंगिकारले आहे. ते पाहणे जरूर आहे. आदर्श याचा मूळ अर्थ आहे – [१]A mirror, A looking glass, ('आत्मानमालोक्य च शोभमानमादर्शबिंबे स्तिमितायताक्षी'), The original manuscript from which a copy is taken, a pattern, a model or Type, 'आदर्श शिक्षितानां गुणानाम्' a commentary सर्व गुणांचा, षड्शास्त्रांचा आरसा, यांचा संयोग ज्ञानदेवांच्या विभूतिमत्वात झालेला आहे. वरील संदर्भातील एकही संदर्भ ज्ञानेशांनी आपल्या जीवनकार्यात सोडलेला नाही. ते त्यांच्या विवरणात आहे, काव्यात आहे आणि हे त्यांनी षड्शास्त्रांचे वर्णनात ज्ञानेश्वरीच्या पहिल्याच वीस ओव्यात स्पष्टपणे सांगितले आहे. अठराव्या अध्यायाच्या अखेरीस व्यासांबरोबर शंकराचार्यांचाही उल्लेख करताना 'तैसा व्यासांचा मागोवा घेतु । भाष्यकारांते वाट पुसतु । अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ।।' ज्ञा. १८.१७२२ असे सांगताना 'मी ज्ञानेश्वरी सांगताना व्यासांबरोबरच श्रीमत् शंकराचार्यांच्याही विचारांसह आपले भाष्य मांडलेले आहे असे ज्ञानेश्वर म्हणतात. ज्ञानेश्वरीत ज्ञानेशांनी वेदव्यास, शंकराचार्य यांच्या प्रमाणेच रामानुजाचार्य, अभिनवगुप्त इ. गीता भाष्यकारांच्या विचारांचाही मागोवा घेतला आहे. गीताभाष्य प्राकृतात मांडताना हा शंकराचार्यांबद्दलचा संदर्भ 'भाष्यकाराते वाट पुसतु' याला एक वेगळेच परिमाण प्राप्त होते. पूर्वसूरींच्या विचारांना महत्त्व देऊन त्यांचा विचार करूनच मी माझी मते प्रस्थापित करीन असे ज्ञानेश्वर म्हणतात. हे सर्व सांगताना नम्रता व स्पष्टता अशी की हे सर्व मी करीत नाही – 'मज हृदयी सद्गुरु ।' असे सांगून त्यांचेच समाधिधन मी त्यांच्याच आदेशाने माय मराठी बोलीत मांडतो आहे, हे ज्ञानेश्वर पुन्हा पुन्हा सांगतात. पुढच्या पिढीतील आत्मज्ञान अभ्यासकांना ज्ञानदेवांनी हा आरसा दिला आहे. म्हणून आग्रहाने सांगावेसे वाटते की आदर्शाचा, आदर्श तत्त्वज्ञानाचा ज्ञानेश्वर आरसा आहेत. संत, महंत, ऋषी, मुनी

---

१. Apte, V. S. : The student's Sanskrit - English Dictionary, page. 79

यांच्या व्यक्तिमत्त्वात आढळून येणारी सर्व वैशिष्ट्ये परिपूर्ततेने ज्ञानदेवांनी आपल्या अवघ्या एकवीस वर्षांच्या आयुष्याच्या आचरणातून दाखविली आहेत. मूर्तिमंत वैराग्य, सहिष्णुता, अपरिग्रहता, विनम्रता त्यांच्यात एकवटली आहेत. तसेच शुद्ध, अविकारी, अमर्याद, निर्मळ, सम्यक विश्वात्मक तत्वज्ञान (Universal applicable), पारदर्शी, वस्तूनिष्ठता या सर्व गुणसमुच्चायामुळे ज्ञानेश्वरांचे तत्वज्ञान आदर्श आहे. व ते मतांतरांच्या पलीकडे आहे कारण तो ज्ञानदेवांचा परावाणीतील स्फूर्तिविलास आहे. तरी सुद्धा ज्ञानेश्वरांचे ज्ञानेश्वरपण – माउलीपण कमळपत्राप्रमाणे निर्लेप राहिले आहे. म्हणूनच ज्ञानेशांचा आदर्श म्हणजे सर्व पांडुरंग भक्तांना सर्वगुण व सर्वशास्त्र संपन्नतेचे प्रतीक आहे. ज्ञानेश्वर हे आत्मानुभवी आदर्श संत आहेत. आपल्या वाङ्मयात बोली अगर नागर (प्राकृत) भाषा आग्रहाने वापरणारे ज्ञानदेव हे लहान वयापासून आपल्याच समाधिधनात – निजानंदात नेहमीच होते. माउलींच्या हृदयात तर लहानपणापासून उपेक्षितांची कणव होती. ज्ञानदेवांचे अंतरंग उपेक्षितांचे अंतरंग होते.

विश्वाचे आर्त माझे मनी प्रकाशलें । अवघेचि जाले देहब्रह्म ।। ज्ञा. गा. ६६४,

ज्ञानदेवांचे आयुष्य अवघे एकवीस पूर्ण वर्षांचे होते. या आयुष्यात त्यांनी आपल्या तत्त्वनिष्ठ व आत्मनिष्ठ तत्त्वज्ञानातून, आपल्या अक्षर वाङ्मयातून महाराष्ट्राच्या भागवतधर्म आचरणारांच्या समोर दैदिप्यमान आदर्श उभा केला. आई–वडिलांचा लाडका ज्ञानदेव, सद्गुरू निवृत्तिनाथांचा नाथपंथीयाप्रमाणे असणारा एकमेव शिष्योत्तम, भागवतधर्माचा महाराष्ट्रात पाया रचणारा पहिला आचार्य, सोपान–मुक्ताईंचा श्रीगुरु व मोठा भाऊ, गीता–ज्ञानेश्वरीतून वारकऱ्यांना अद्वैताचा संदेश देणारा तत्त्ववेत्ता होता. केवळ आपल्याच तत्त्वांचा आग्रह न धरता, पूर्वसुरींच्या तत्त्वज्ञाच्या विचारांचा सुयोग्य विचार करणारा क्रांतदर्शी ही सर्व विशेषणे ज्ञानदेवांना लागू पडतात. ज्ञानदेवाच्या पूर्वायुष्याबद्दल नामदेवांच्या आदि, तीर्थावळी, समाधी याभागात असणाऱ्या ओव्याखेरीज व समकालीन संतांच्या अभंगाशिवाय इतिहासातून काहीही माहिती मिळत नाही. 'विश्वाचे आर्त' ज्याच्या मनात उभे राहिले त्यांचे जीवन–कार्य त्यांनीच लिहिलेल्या व सांगितलेल्या वाङ्मयावरूनच समजावून घ्यावे लागते.

ज्ञानेश्वराचे आदर्श स्वरूप तत्त्वज्ञान प्रसंगानुरूप प्रकट होत गेले. संपूर्ण तटस्थता (total detachment) व वेदनिष्ठा हा ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानाचा पाया होता. ते आपल्या विचारांपासून विचलित झाले नाहीत. हेच त्यांचे विभूतिमत्त्व. ज्ञानेश्वरांची वेद, शास्त्रे यांवर नितांत श्रद्धा होती. म्हणूनच ज्ञानेश्वरीत ज्ञानदेव म्हणतात–

शास्त्र म्हणेल सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।

जें घेववी तें न म्हणावें । विषही विरुद्ध ।। ज्ञा. १६.४६०

ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।

तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ।। ज्ञा. १६.४६१

इतकी माउलींची वेद, शास्त्र यांच्या विषयी निष्ठा होती. शास्त्राने आपल्या आई – वडिलांना अन्यायकारक वाटावे असे मृत्युदंडासारखे कठोर शासन करूनही ज्ञानेश्वर या विभूतींच्या मनात शास्त्रांबद्दल अनादर उत्पन्न झाला नाही.

पैठणला शुद्धिपत्रासाठी जाण्यापूर्वीही निवृत्तिनाथ – ज्ञानदेव – सोपान यांच्यातही शुद्धीपत्राच्या योग्यायोग्यतेबद्दल चर्चा झालीच होती. निवृत्तिनाथांना हे शुद्धिपत्र म्हणजे कर्मबंधन वाटले होते. कारण आपण नामरुपातीत असताना देहाश्रित वर्णाश्रम धर्माची जरूरी त्यांना वाटत नव्हती. सोपानदेवांचेही मत असेच होते. त्यांनी ज्ञानदेवांना विचारले की, 'दुर्वास, वसिष्ठ, व्यास, वाल्मिकी यांचे कूळ कोणते?' परंतु ज्ञानदेवांचा जन्मच जनसामान्यात वर्णाश्रमधर्माची घडी बसविण्यासाठी होता. म्हणून तर त्यांनी पुढे वर्णाश्रमधर्माचे महत्त्व सांगणाऱ्या गीतेवर टीका लिहून जनसामान्यांना व विचारवंताना ज्ञानेश्वरी दिली. यासाठी ज्ञानदेवाच्या विचारांचा [१] नामदेवाने दिलेला अभंग महत्त्वाचा आहे –

विधि वेदविरुद्ध संपर्क संबंध । नाहीं भेदाभेद स्वस्वरूपीं ।।१ ।।

अविधि आचरण परम दूषण । वेदोनारायण बोलियेला ।।२ ।।

स्वधर्म अधिकार जातीपरत्व भेद । उचित ते शुद्ध ज्याचें तया ।।३ ।।

म्हणोनियां संतीं अवश्य आचरावें । जना दाखवावें वर्तोनियां ।।४ ।।

कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा । सर्वथा न करावा अनाचार ।।५ ।।

प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां । पावन अवस्था जरी झाली ।।६ ।।

ज्ञानदेव म्हणजे ऐकाजी निवृत्ति । बोलिली पद्धती धर्मशास्त्रीं ।।७ ।। ना.गा. ९०३

वरील अभंगातील चौथी व पाचवी ओवी या ओव्या ज्ञानदेवांचा वेदशास्त्र निष्ठेचा आदर्श सांगणाऱ्या

---

१. श्रीनामदेवांची गाथा, गीता प्रेस, गोरखपूर

आहेत. कारण संत हे सामान्यांचे मार्गदर्शक असतात. सामान्यजन संतांना अनुसरतात, म्हणून मार्गदर्शकानेच धर्मशास्त्रांचे उल्लंघन करणे योग्य नाही.

विठ्ठलपंतांनी ज्ञानदेवांना वेद, उपनिषदे, योगवाशिष्ठ, ब्रह्मसूत्रे, महाभारत याद्वारे धर्मज्ञान दिले. निवृत्तिनाथांनी नाथपंथाचे योग व भक्तीचे ज्ञान दिले. ज्ञानदेव स्वत: तर जीवनमुक्त व विभूतिरूप होते, म्हणूनच त्यांनी मुक्ती व भक्तिमार्गाचा उपदेश ज्ञानेश्वरीतून सर्व विश्वाला केला. म्हणूनच नामदेव म्हणतात-

ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणे निगमवल्ली प्रगट केली ।।

ज्ञानेश्वरांनी अवतार घेण्यापूर्वी महाराष्ट्राची स्थिती कशी होती याचा थोडक्यात परामर्ष घेणे जरूर आहे. कारण महाराष्ट्राची राजकीय परिस्थिती वरवर चांगली दिसत असली तरी ती तशी नव्हती. रामदेवराव यादव हे राजे देवगिरी येथे राज्य करीत होते. त्यांचे पूर्वज खूप कर्तृत्ववान होते. त्यामुळे राज्य समृद्ध होते. या समृद्धीचा तपशील ज्ञानेश्वरीत मिळतोच. परंतु ज्ञानेश्वरांच्या समाधीनंतर थोड्याच काळात म्हणजे शके बाराशेचाळीसमध्ये या राज्याचा ऱ्हास झाला. शके बाराशेसोळामध्येच अल्लाऊद्दीन खिलजीची स्वारी झाली होती, परंतु त्यास भरपूर नजराणा देऊन तह केला गेला.

[१,२]या कालखंडात वैदिकधर्म काहीसा टिकून होता. पूर्वीचे आचारविचार पाळले जात नव्हते. साम्राज्याचे वैभव व सुरक्षितता यामुळे लोकांचे लक्ष धर्मापेक्षा ऐहिकाकडेच जास्त होते. वेदोपनिषदावर आधारलेले भगवद्‌गीतादि धर्मग्रंथांचे महत्त्व मागे पडून भागवतपुराणातील व्रते, मंत्रतंत्र, तीर्थयात्रा, बहिरोबा, सटवाई, भुतेखेते यांच्या तांत्रिक-मांत्रिक पूजांना गावोगावी महत्त्व आले. यांचबरोबर महत्त्वाचे म्हणजे, इस्लाम जरी महाराष्ट्रापासून थोडा दूर असला तरी जैन, लिंगायत, महानुभाव व काही प्रमाणात बौद्ध धर्माची पकड महाराष्ट्रावर जबर बसू लागली होती. वैदिक धर्मातीलही उपपंथ त्या काळीही होते. ते म्हणजे रामानुजांचा विशिष्टाद्वैतवादी पंथ, नाथपंथ व पंढरपूरचा भागवतधर्म. रामानुजीय भागवतधर्माने वैदिकधर्मातच द्वैत निर्माण करण्याचे कार्य केले. लिंगायत व महानुभाव या पंथांना व बौद्धपंथाला महत्त्व येण्याची महत्त्वाची कारणे म्हणजे ते जातिसंस्था मानीत नव्हते व त्या पंथात स्त्रियांनाही बरोबरीचे स्थान होते. परंतु जैनधर्म राजाश्रयामुळे फोफावला. परंतु जैनधर्मातील पोकळपणाबद्दल ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरीत सांगतात-

---

१. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी, प्रस्तावना पान ७९,

२. वै. डॉ. पेंडसे शं. दा. ज्ञानदेव आणि नामदेव, प्रकरण पाहिले, पान१

नास्तिका द्यावया तोंड। वेदांचें गाढें बंड।

ते देखोनि पाखांड। आनचि वाजे ।। ज्ञा.१३.१९

म्हणे तुम्ही निर्मूळ। लटिंके हें वाग्जाळ।

ना म्हणसी तरी पोफळ। घातलें आहे ।। ज्ञा.१३.२०

पाखांडांचे कडे। नागवीं लुंचिती मुंडें।

नियोजिलीं वितंडें। ताळासि येती ।। ज्ञा. १३.२१

निरुपणांसाठी ज्ञानदेवांनी भगवद्गीताच का निवडली याबद्दल अनेक जेष्ठांनी खूप लिहून ठेवले आहे. वेद, भगवद्गीता व ब्रह्मसूत्रे ही भागवतधर्माची प्रस्थानत्रयी आहे. [१]वेदापेक्षा गीतेला दुय्यम स्थान होते. कारण वेद म्हणजे श्रुती व गीता म्हणजे स्मृती. स्मृती या वेदांवर आधारलेल्या असे मानीत असत. ही दुय्यम स्थानाची परंपरा आद्यशंकराचार्यांपर्यंत चालू होती. ब्रह्मसूत्रकार रामानुजसुद्धा गीतेला स्मृती असे मानीत असत. ज्ञानदेवांनी या विचारांना कलाटणी दिली. वेद हे जर भगवंताच्या नि:श्वासातून प्रगट झाले तर गीता ही तर भगवंताने स्वत:च सांगितली आहे. त्यामुळे गीतेचे स्थान वेदापेक्षाही श्रेष्ठ आहे. म्हणूनच ज्ञानदेवांनी गीता ही पाचवा वेद आहे असे आग्रहाने प्रतिपादिले आहे. वेद कृपण आहेत, कारण वेदात स्त्रीशूद्रांना स्थान नाही. परंतु गीता ही स्त्रीशूद्रासकहित चारही वर्णांची मोक्षदायिनी आहे. ज्ञानदेव गीतेला आगळा, स्वतंत्र वेदच मानीत असत. गीता हा पाचवा वेद आहे. कारण गीता वेदापेक्षा उदार आहे. वेद पठणाचा अधिकार स्त्रीशूद्रांना नाही. परंतु गीतेने इतर तीन वर्णाबरोबरच स्त्रीशूद्रांनाही हा अधिकार दिला आहे. ज्ञानदेवांनी गीता ही वेदांवर आधारित नसून ती स्वतंत्र आहे व गीता हेच वेदांचे मूळ आहे व सर्व वेदांचे सार गीतेत सामावलेले आहे असे आग्रहाने प्रतिपादिले आहे. गीतेला स्वप्रामाण्य आहे असेही आग्रहाने सांगितले आहे. माउलींनी स्पष्टपणे अठराव्या अध्यायात सांगितले आहे की –

वेदु संपन्नु होय ठाईं। परी कृपणु ऐसा आनु नाहीं।

जे कानीं लागला तिहीं। वर्णांचांचि ।। ज्ञा. १८.१४५७

येरां भवव्यथां ठेलियां। स्त्रीशूद्रादिकां प्राणियां।

अनवसरु मांडूनियां। राहिला आहे ।। ज्ञा. १८.१४५८

---

१. कॅ. जोशी लक्ष्मणशास्त्री, ज्ञानेश्वर चिंतन–प्रस्तावना पान–२

तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें ।
वेदु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ।। ज्ञा. १८.१४५९
परी आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया ।
रविदीप्ती राहाटावया । आवारू नभ ।। ज्ञा. १८.१४६३
तेवीं उत्तम अधम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे ।
कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ।। ज्ञा. १८.१४६४
यालागीं मागिली कुटी । भ्याला वेदु गीतेचां पोटीं ।
रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला । ज्ञा. १८.१४६५
म्हणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता ।
श्रीकृष्णें पांडुसुता । उपदेशिली ।। ज्ञा. १८.१४६६
परी वत्साचेनि वोरसें । दुभतें होय घरोद्देशें ।
जाले पांडवांचेनि मिषें । जगदुद्धरण ।। ज्ञा. १८.१४६७

वेदांचेच प्रयोजन, गीतेमुळे संपुष्टात आले आहे, असे सांगताना ज्ञानदेव म्हणतात –

येथ गीता मूळ वेदां । ऐसें केवी पां आलें बोधा ।
हें म्हणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगो ।। ज्ञा. १८.१४२७
तरी जयाचां निश्वासी । जन्म झालें वेदराशी ।
तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं । बोलिला स्वमुखें ।। ज्ञा. १८.१४२८
म्हणौनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित ।
आणिकही येकी येथ । उपपत्ति असे ।। ज्ञा. १८.१४२९
जें न नशतु स्वरुपें । जयाचा विस्तारू जेथ लपे ।
तें तयाचें म्हणिपे । बीज जगीं ।। ज्ञा. १८.१४३०
तरी कांडत्रयात्मकु । शब्दराशी अशेखु ।
गीतेमाजीं असे रुखु । बीजीं जैसा ।। ज्ञा. १८.१४३१

म्हणौनि वेदांचे बीज । श्रीगीता होय हें मज ।

गमे आणि सहज । दिसतही आहे ।। ज्ञा. १८.१४३२

जे वेदांचे तिन्ही भाग । गीते उमटले असती चांग ।

भूषणरत्नीं सर्वांग । शोभलें जैसें ।। ज्ञा. १८.१४३३

तियेंचि कर्मादिकें तिन्हीं । कांडे कोणकोणे स्थानीं ।

गीते आहातिं तें नयनीं । दाखऊं आईक ।। ज्ञा. १८.१४३४

वेदांच्या शिकवणुकीविरुद्ध कोणीही वागू नये हा ज्ञानदेवांचा आग्रह होता. वेदानुसार कर्मे करणे हेच जनांच्या आत्मकल्याणाचे आहे हा ज्ञानेश्वरांचा विश्वास होता.

या कारणें पैं बापा ।जया आथी आपली कृपा ।

तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ।। ज्ञा. १६.४५५

आणि म्हणून वेद हेच विश्वतारक आहेत –

पैं अहितापासून काढिती । हित देउनि वाढविती ।

नाही श्रृतीपरौती । माउली जगा ।। ज्ञा. १६.४६२

वेदांतील कर्म–उपासना–ज्ञान भगवंताने गीतेतही सांगितली असल्याने गीताच वेदांचे मूळ बीज आहे. हे वरील ओव्यातून स्पष्ट होते. माउलीनी ज्ञानेश्वरीत, ''भाष्यकाराते वाट पुसतु'' असे जरी म्हटले असले तरी [१,२] डॉ. शं. दा. पेंडसे यांनी भाष्यकार म्हणजे आद्य शंकराचार्य असे म्हणून माउलींनी त्यांचा मायावाद स्वीकारला असे म्हटले आहे. परंतु शंकराचार्यांची श्रुती–स्मृती विषयक प्रमाणपद्धती माउलींनी स्पष्टपणे नाकारली आहे. शंकराचार्यांचे इतर जे विचार श्री ज्ञानेश्वरांनी नाकारले आहेत, त्यापैकी प्रमुख म्हणजे संन्यासाश्रम जी अंतिम श्रेष्ठ ज्ञानसाधना असे शंकराचार्य मानतात, ते माउलींना मान्य नाही. संन्यासापेक्षा माउलींना वैराग्य श्रेष्ठ वाटते. तसेच भक्ती हे ज्ञानाचे साधन म्हणून शंकराचार्य मान्य करतात. परंतु ज्ञानदेवांनी ज्ञानमय व ज्ञानोत्तर भक्ती हीच अंतिम निष्ठा हेच सांगितले आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे दृश्य विश्व ही माया नसून ईश्वररूप दृश्यविश्व हे परमार्थ सत्य असल्याचे माउली आवर्जून सांगतात. हाच

---

१. कै. डॉ. पेंडसे शं. दा. ज्ञानदेव आणि नामदेव, प्रास्ताविक पान–२

२. वै. दांडेकर शं. वा. स्वार्थ ज्ञानेश्वरी, प्रस्तावना पान–४९

आहे ज्ञानेश्वरांचा चिद्‌विलास. ज्ञानेश्वरीच्या सुरुवातीस असलेल्या "ॐ नमोजी आद्या...." या वचनातून शैव तत्त्वज्ञान व नाथपंथीय योग या संबधीचे विवेचन ज्ञानेश्वरांनी गणेश रूपाने दाखविले आहे. गीता हा भारतीय तत्त्वज्ञानाचा विकास आहे हे ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या पहिल्या व अठराव्या अध्यायात सांगितले आहे. आत्मा हे जीवनाचे अंतिम सत्य व साध्य आहे हे सांगणारी भगवद्‌गीता ही आत्म-विद्या आहे. हे ज्ञानेश्वरांनी वर लिहिल्याप्रमाणे श्रीगणेश हे भारतीय संस्कृतीचे रुपक मांडून त्यांच्या मंगलाचरणाने स्पष्ट केले आहे. या ओवीतील "हे शब्दब्रह्म अशेष....यांतील शब्दब्रह्म म्हणजे ओंकार व श्रीगणेश. या ओंकार स्वरूप श्रीगणेशात सर्व वेद, उपनिषदे, स्मृती, पुराणे, षड्‌दर्शने, तर्कशास्त्र व वेदांचे प्रामाण्य न मानणारा बौद्ध मत प्रदर्शित करणारा वार्तिक ग्रंथ इत्यादींचा समावेश करून त्यास नमिले आहे. गणेशाचे विशाल कर्ण म्हणजेच षड्‌दर्शनातील पूर्वोत्तर मीमांसा आहे. तर्क हा गणेशाचा हातातील परशू आहे. विसंवादी षड्‌दर्शने या गणेशांच्या सहाभुजांच्या रुपाने भक्तीने पूजिली आहेत. म्हणून ज्ञानेश्वरीचे व ज्ञानदेवांचे असे व्यापक वैशिष्ट्य सांगता येईल की, ज्ञानेश्वरांव्यतिरिक्त ही भारतीय तात्त्विक भूमिका अन्य कोणी त्यापूर्वी व नंतर कोण्याही तत्त्वज्ञाने मांडली नाही. महाभारत हे व्यासांनी निर्माण केलेले विश्व आहे व त्यात सर्व विद्या, शास्त्रे, नवरस असून यात "चातुर्य शहाणे झाले" "प्रमेयाला रूचि आली"-"महाबोधाची कोवळीक दुणावली", हे ज्ञानेश्वरांचे काव्य (रसात्मक वाक्य) म्हणजे, "अंगनेच्या अंगावर पहिल्या वयातील प्रकट झालेले लावण्य आहे. हे व्यासांनी शब्दब्रह्माचा सागर मंथून काढलेले नवनीत आहे." असे ज्ञानेश्वर आग्रहाने सांगतात.

केवळ "भाष्यकाराते वाट पुसतू" एवढेच ज्ञानेश्वरीत नसून ज्ञानेश्वरांनी एक आगळी-वेगळी विचारसृष्टी ज्ञानेश्वरीच्या रूपाने उभी केली आहे. या कर्तृत्वाचे श्रेय वारंवार ते आपले सद्‌गुरू श्रीनिवृत्तिनाथ यांना देतात.

माउली म्हणतात,

"मजलागीं ग्रंथाची स्वामी। दुजी सृष्टी जे हे केली तुम्हीं।
तें पाहोनी हांसो आम्ही। विश्वामित्रातेंही ।। ज्ञा.१८-१७८६ ।।

कारण विश्वामित्रांची सृष्टी शुद्ध भावनेतून उभी राहिलेली नव्हती. परंतु ज्ञानेश्वर या विभूतीने उभी केलेली ही वाङ्मयसृष्टी ज्यांना संस्कृत भाषेचे ज्ञान नाही व वेदाधिकार नाही अशा सामान्यांकरिता निर्माण

केलेली आहे. म्हणून माउली अकराव्या विश्वरूप दर्शन अध्यायात म्हणतात–

तीरें संस्कृताची गहनें । तोडोनी मऱ्हाठियां शब्द सोपानें ।

रचिलीं धर्मनिधानें । निवृत्तीदेवें ।। ज्ञा. ११-९ ।।

संस्कृत आणि मराठी या दोनही भाषा माउलींना सारख्याच आपलेपणाच्या आहेत. परंतु मराठी ही मायबोली सामान्यांची भाषा आहे. म्हणून मराठीबद्दल माउली म्हणतात –

मूळग्रंथीचिया संस्कृता । वरि मऱ्हाठी नीट पढतां ।

अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हें न चोजवे ।। ज्ञा. १०-४३

जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणियासी अंगचि होय लेणें ।

अलंकारीसें कवण कवणें । हें निर्वचेना ।। ज्ञा. १०.४४

तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाचां सोकासनीं ।

शोभती आयणी । चोखट आइका ।। ज्ञा. १०.४५

तैसे देशियेचें लावण्य । हिरोनी आणिलें तारुण्य ।

मग रचिले अगण्य । गीतातत्व ।। ज्ञा. १०-४७

ज्ञानेश्वरीचा अठरावा अध्याय संपण्यापूर्वी माउली म्हणतात –

तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांते वाट पुसतु ।

अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ।। ज्ञा. १८.१७२२

म्हणजेच व्यासांचा मागोवा घेत व भाष्यकारांना वाट पुसत पुसत गीतार्थाच्या ठिकाणी मी अयोग्य वाटत असलो तरी गुरूकृपेने तो मला योग्य ठिकाणी प्राप्त न होता मी कुठे जाईन? अशी ज्ञानेश्वरांची त्यांच्या श्रीगुरुंवर निष्ठा व विश्वास आहे. अनेक उपमांच्या व रूपकांच्यासह ज्ञानदेवांनी श्रीगुरुंचे स्तवन केलेले आहे. साधारणत: अध्यायाच्या सुरवातीस किंवा शेवटी येणारे उद्‌गार तेराव्या अध्यायात "आचार्योपासनम्" हा विषय सांगताना गुरूस्तवन अध्यायाचे मध्यातही आले आहे. ही गुरू विषयीची इतकी उत्कटता असण्याचे कारण माउलींनी अठराव्या अध्यायांत नाथपंथाची गुरूपरंपरा सांगताना निवृत्तीनाथांसंबंधी आदराने पुढील ओव्या मांडिल्या आहेत. श्री गहिनीनाथांनी निवृत्तीनाथांना अनुग्रह दिल्यानंतर

त्यांना ''हा बोध तुला प्राप्त झाल्यावर तो घेऊन तू कलीकडून गिळल्या जाणाऱ्या जीवांना संकटमुक्त होण्यासाठी त्वरित मदत कर'' असा आदेश दिला. या संबंधी माउली म्हणतात –

तेणें कळि कळितु भूतां। आला देखोनि निरूता।
ते आज्ञा श्रीनिवृत्तीनाथा। दिधली ऐसी ।। ज्ञा.१८.१७५७
ना आदिगुरू शंकरा–। लागोनि शिष्यपरंपरा।
बोधाचा हा संसारा। जाला जो आमूतें ।। ज्ञा.१८.१७५८
तो हा तूं घेउनि आघवा। कळीं गिळितयां जीवां।
सर्व प्रकारी धांवा। करीं पां वेगीं ।। ज्ञा.१८.१८५९
आधींच तंव तो कृपाळु। वरी गुरुआज्ञेचा बोलु।
जाला जैसा वर्षाकाळु। खवळणें मेघां ।। ज्ञा.१८. १७६०
मग आर्ताचेनि वोससें। गीतार्थग्रंथनमिसें।
वर्षला शांतरसें। तो हा ग्रंथु ।। ज्ञा.१८.१७६१
तेथ पुढा मी बापिया। मांडला आर्ती आपुलिया।
कीं यासाठी एवढिया। आणिलों यशा ।। ज्ञा.१८. १७६२
एवं गुरूक्रमे लाधलें। समाधीधन जें आपुलें।
ते ग्रंथें बांधौनि दिधलें। गोसावी मज ।। ज्ञा. १८.१७६३

ज्ञानेश्वर प्रत्येक वेळी आपण सांगत असलेल्या ज्ञानेश्वरीचे श्रेय ते आपल्या श्रीगुरूंना देतात. ही माउलींची लीनता किंवा विनय नसून वरील ओव्यावरून हे स्पष्ट होते की, 'ज्ञानेश्वरांना निवृत्तीनाथांनी पैठण येथे सर्व श्रोत्यांसमोर गीतार्थ स्पष्ट सांगितलेला आहे. आणि तो गीतार्थ ऐकताना ज्ञानेश्वर बापिया पक्षाप्रमाणे जीव एकवटून ते समाधीधन आपल्या अंतर्मनात साठवून ठेवीत होते. म्हणूनच ज्ञानेश्वरीच्या सुरुवातीला गणेश व शारदा स्तवनानंतर माउलींनी श्रीगुरूंची पूजा मांडिली आहे. माउलींची तटस्थता किंवा अलिप्तता हा त्यांचा स्थायीभाव असून हा गुण फक्त विभूतीचे अंगी अस्तित्वात असतो. ज्ञानेश्वरीत माउलींनी श्रीगुरूंना ईश्वर मानून गीताख्यानाचे श्रेय त्यांना अर्पण केले आहे. तसेच काही ठिकाणी त्यांनी श्रोत्यांना

ईश्वर मानून गीताख्यानाचे श्रेय त्यांनाही अर्पण केले आहे. हा मोठेपणा मराठी काव्य-वाङ्मयात अन्य कोठेही दिसून येणार नाही कारण ही शालीनता अध्यात्माच्या उच्च कोटीतच प्राप्त होउ शकते. संपूर्ण ज्ञानेश्वरीत निवृत्तीनाथांच्या मुखीच्या फक्त सात ओव्या आहेत. त्यापैकी पुढील ओवी म्हणजे विश्वात्मक सर्वेश्वर श्रीनिवृत्तीनाथ यांनी आपल्या प्रिय शिष्याला म्हणजे ज्ञाननाथांना प्रसाददानाचा वर आहे. माउली म्हणतात-

येथ म्हणे श्रीविश्वेश्वरावो। हा होईल दानपसावो।

येणें वरें ज्ञानदेवो। सुखिया झाला।। ज्ञा. १८.१८०१

आपले श्रीगुरू हेच विश्वात्मक विश्वेश्वर आहेत हे ज्ञानेशांनी पंधरावे अध्यायाचे शेवटचे ओवीत सांगून याच विश्वेश्वराला पसायदान मागितले आहे -

आतां विश्वात्मकु हा माझा। स्वामी निवृत्तिराजा।

तो अवधारू वाक्यपूजा। ज्ञानदेवो म्हणे।। ज्ञा. १५.५९८

संपूर्ण ज्ञानेश्वरीत माउलींनी सुमारे दोनशे ओव्यातून श्रोत्यांशी संवाद साधला आहे. ज्ञानेश्वरांचे आपल्या मऱ्हाठी भाषेवर इतके प्रेम आहे की त्यांनी यासाठी ज्ञानेश्वरीत अठराव्या अध्यायात पुढील ओव्या वापरल्या आहेत. त्यापैकी पहिली व शेवटची पुढील प्रमाणे -

म्हणोनी आईकें देवा। हा भावार्थु आतां न बोलावा।

मज विवेकू सांगावा। मऱ्हाटा जी।। ज्ञा. ३.१७

तो मी येकुसर्वमुका। बोलोनी मऱ्हाठीया भारवा।

करी डांळेवरी लोकां। घेवों ये ऐसें जें।। ज्ञा. १८.१७७९

भावार्थदीपिका ही केवळ संस्कृत गीतेची मराठीत रूपांतरित केलेली टीका नाही. तसे असते तर गीतेच्या सातशे श्लोकांसाठी नऊ हजारपेक्षाही जास्त ओव्यांची रचना ज्ञानेशांनी केली नसती. विद्वानांपासून ते ज्याला मराठी लिहायला, वाचायला समजते व ज्यांच्यात हृदयस्थ परमेश्वर जागा आहे, त्या प्रत्येकाच्या अंत:करणात गीतेचा प्रत्येक अर्थगर्भित शब्द पोहोचलाच पाहिजे, ही या ज्ञानेश्वर नावाच्या भगवंताची इच्छाच नव्हे तर ध्यास आहे. जे गीतेत अध्याहृत आहे ते ज्ञानदेवांनी सूर्यप्रकाशाइतके सर्वांसमोर स्पष्ट केले आहे. ही दिव्यता केवळ त्यांचीच एकट्याची आहे. अन्य त्यासम काहीही वाचायला मिळणे अशक्य

आहे. नाथजोगी पंथांच्या शांकरी विद्येच्या परिपूर्ण ज्ञानामुळे बालवयातच ज्ञानेश्वरांनी सर्वेश्वराचे निराकार, निर्गुण, निर्मम स्वरूप जाणले व आत्मसात केले. गीतेतून भगवंताने जे संस्कृतातून आपल्यासमोर मांडले ते या योग्यांच्या महायोग्याने मायबोलीतून ते अरुपस्वरुप आपल्या सर्वांच्या समोर, जणू काय ते स्वरुप त्यांच्याप्रमाणेच आपल्यालाही प्रत्येकाला जाणवत आहे अशा सहज सुंदर प्रासादिक शब्दात मूर्तिमंत आपल्या समोर उभे केले आहे. आणि ही तर माउलींची किमया व प्रतिज्ञा आहे. म्हणूनच ज्ञानेश्वर दोनच ओवीत भगवंताच्या बोलांचे निरुपण करतात –

सात शतें श्लोक। अध्यायां अठरांचें लेख।
परी देवो बोलिले एक। जें दुजें नाहीं।। ज्ञा. १८.५८

आणि म्यांहीं न सांडूनि ते सोये। ग्रंथा व्यक्ती केली आहे।
प्रस्तुत तेणें निर्वाहें। निरुपण आइका।। ज्ञा. १८.५९

ज्ञानेश्वरीत ज्ञानेशांनी सहाव्या अध्यायात दोन प्रतिज्ञोद्गार काढले आहेत –

माझा मराठाचि बोलु कौतुकें। परि अमृतातेंहीं पैजासी जिंके।
ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन।। ज्ञा. ६.१४

जें दिठीही न पविजे। तें दिठीविण देखिजे।
जरी अतींद्रिय लाहिजे। ज्ञानबळ।। ज्ञा. ६.३३

तैसी सद्गुरूकृपा होये। तरी करितां काय आपु नोहे।
म्हणऊनि ते अपार मातें आहे। ज्ञानदेवो म्हणे।। ज्ञा. ६.३५

तेणें कारणें मी बोलेन। बोलीं अरुपाचें रुप दावीन।
अतींद्रिय परि भोगवीन। इंद्रियांकरवीं।। ज्ञा. ६.३६

परंतु यासाठी श्रोता कसा हवा हे सांगताना म्हणतात –

तरी अवधान एकवेळें दीजे। मग सर्वसुखासि पात्र होइजे।
कें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड ऐका।। ज्ञा. ९.१

हे शब्देविण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।

बोलाआदि झोंबिंजे । प्रमेयासी ।। ज्ञा. १.५८

आणि भक्त श्रोता कसा असावा हे सांगताना म्हणतात –

अहो अर्जुनाचिये पांती । जे परिसणया योग्य होती ।

तिहीं कृपा करूनि संती । अवधान द्यावें ।। ज्ञा. १.६२

तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा ।

अति हळुवारपण चित्ता । आणूनियां ।। ज्ञा. १.५७

नाथपंथाच्या गुरूसंप्रदायाची परंपरा पाहिल्यानंतरही काहींच्या मनात ज्ञानदेव आपल्या ग्रंथात किंवा अभंगात जेथे स्वत:चा उल्लेख ज्ञानदेव असा न करीता आपले उपास्य दैवत अथवा गुरूंचा निवृत्तिनाथसुत किंवा बापरखुमादेवीवरू या शब्दसमुच्च्यायाने करतात याबद्दल विकल्प येतो. नाथ संप्रदायाचे गुरूपरंपरेप्रमाणे एक गुरू व एक शिष्य ही परंपरा आदिनाथांपासून ज्ञाननाथापर्यन्त चालत आलेली आहे. माउली आपल्या श्रीगुरूंनाच माता–पिता या आदराने मानीत होते. याचा अर्थ ते निवृत्तिनाथांचेच पुत्र आहेत, विठ्ठलपंतांचे नाहीत हा शब्दच्छल आहे. त्याच बरोबर बऱ्याच ठिकाणी अभंगाचे शेवटी 'बापरखुमादेविवरु असा शब्दसमुच्चय वापरतात. त्यांचे उपास्य दैवत जे पंढरीचा पांडुरंग व रखुमाई यांचा उल्लेख अभंगाचे शेवटी करणे हे त्या दैवताबद्दलची ज्ञानेश्वरांची कृतज्ञताच दर्शवितात. आणि 'बापरखुमादेविवरु' याचा संबंध त्याचे वडील विठ्ठलपंत व आई रुक्मिणी यांचेशी मानला तरीही त्यात गैर काहीच नाही. माउलींचे आई–वडील हे त्यांचे पहिले गुरू व जन्मदाते आहेत, त्यामुळे आपल्या अभंगांच्या अंती आपल्या वडिलांचा व आईचा उल्लेख करणे माउलींनाही प्रेमाचे, आदराचे वाटले असेल. मला तर स्पष्टपणे सांगावेसे वाटते की 'बापरखुमादेविवरु' या शब्दाने माउलींनी आपल्या दोन आराध्य दैवतांना वंदिले आहे.

ज्ञानेशांचे आदर्श विभूतिमत्त्व साकारण्यात लहानपणी विठ्ठलपंत–रखुमाई व पुढील आयुष्यात निवृत्तिनाथ यांचे योगदान अतिशय महत्त्वाचे आहे. रखुमाईने आई म्हणून त्यांना शिवसंस्कार व तपस्विनीचे आशीर्वाद दिले. विठ्ठलपंत स्वत:च पूर्ण ब्रह्मज्ञानी असल्याने त्यांनी आपल्या सर्व मुलांना वेदोपनिषदे, ब्रह्मसूत्र, इ. वैदिकधर्मीय ग्रंथांचे पूर्ण ज्ञान त्यांच्या ज्ञानाच्या झोळीत टाकले. विठ्ठलपंताचे आजोबा–

आजी व आई-वडील यांना नाथपंथाचा अनुग्रह लाभला होता व पंढरीच्या विठ्ठलाचेही ते भक्त होते. स्वत: विठ्ठलपंताची पंढरीची आषाढी-कार्तिकी वारी कधी चुकली नाही. त्यामुळे माउली व भावंडे यावर भागवतधर्म किंवा वैष्णवपंथ व नाथपंथ यांचे संस्कार लहानपणीच झाले. त्याचा परिपाक म्हणून ईश्वरीप्रेरणेने निवृत्तिनाथास गहिनीनाथांकडून नाथपंथीय 'दंश' किंवा 'शांकरी' विद्येची 'आज्ञा' मिळाली व निवृत्तिनाथांकडून ती ज्ञानेशांना प्राप्त झाली. निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांची आध्यात्मिक शक्ती ठरले. माउली म्हणतात-

पिंडे पिंडाचा ग्रासु। तो हा नाथसंकेतीचा दंशु ।। ज्ञा. ६.२९१

आपल्या आईवडिलांच्या आध्यात्मिक जीवनाचा ज्ञानेश्वरांना अर्थ समजला. आई-वडिलांनी व सर्व भावंडांनी भोगलेल्या प्रच्छन्न सामाजिक छळाचा, व त्या पायी झालेल्या त्यांच्या जीवनांताचा अर्थ समजला. त्यांच्याच विषादापायी मुक्ताईने सांगितलेल्या ताटीचे अभंगाचा आंतरिक भाव समजला. विवेकाचे महत्त्व समजले. अज्ञान व अविवेक यांचा समाजावरील परिणाम समजला. म्हणूनच ज्ञानेश म्हणतात -

मी अविवेकाची काजळी। फेडूनि विवेकदीप उजळी।

तैं योगियां पाहे दिवाळी। निरंतर ।। ज्ञा.४.५४

ज्ञानदेवांनी आयुष्याचे प्रयोजन जाणून गीता प्रणित सामान्य जनांचा व धर्मांधाचा विवेक जागृत करण्याचे आदर्श कार्य उभे केले. त्यांना हें पटवून द्यायचे होते की धर्म हा अंधश्रद्धेवर कधीच उभा राहू शकत नाही. तो विवेकनिष्ठ आत्माविष्कारावर व डोळस भक्ती-ज्ञान-कर्मावर उभा असतो. हा विवेक त्यांना त्यांचे श्रीगुरूंनी शिकविला. विवेकावर माउली प्रकर्षाने ज्ञानेश्वरीत लिहितात -

मज हृदयीं सद्गुरू। तेणें तारिलों हा संसारपुरु।

म्हणऊनि विशेषें अत्यादरू। विवेकावरी ।। ज्ञा.१.२२

हा विवेक आठवत असताना माउलींना त्यांच्या आयुष्यात एकदाच घडून गेलेल्या प्रसंगाची आठवण निश्चित झाली असेल. ते भिक्षेला गेले असताना त्यांचे समाधीघन लोकांच्या कमालीच्या निर्दयतेने भंग पावले. त्यांच्या मनाची, विवेकाची साम्यबुद्धी भंग पावली. ईश्वरीअवतार असला तरी शारीरिक दु:ख मानवाचेच होते. ते अनावर झाल्यावर ज्ञानदेव विषण्ण होऊन झोपडीत आले व ताटी बंद करून, कां? या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी त्यांनी श्रीगुरूंना मनोमनी साद घातली. त्यांची ही अवस्था आदिमाया मुक्ताईने

ओळखली. मुक्ताई ही तर माउलींची आदिशक्ती होती. तिने या अवस्थेतून त्यांना त्वरित बाहेर काढण्यासाठी [१]'ताटीचे अभंग' ऐकवले –

योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा ।।

विश्वरागें झाले वन्ही । सन्तीं सुखें व्हावें पाणी ।।

शब्द शस्त्रें झालें क्लेशा । संतीं मानावा उपदेश ।।

विश्व पट ब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।

इतुकें टाकूनी शांति घरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।

आप आपणां शोधूनि घ्यावें । विवेक नांदे त्याच्यासवे ।

आशा दंग अवघे आवरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।

संत तोचि जाणा जगीं । दया क्षमा ज्याचें अंगी ।

मिथ्या कल्पना मागे सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।

लडिवाळ मुक्ताबाई । जीव मुद्गल ठायींचें ठायीं ।

तुम्ही तरोनि विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।। मु.ता.अ.

ज्ञानराज माउली या शब्दांनी त्वरित सावरली असेल. 'लोकांना, ब्रह्मवृंदाना समतेचा सांगावा सांगणारा मी, मीच कसा भावनावश झालो?' या विचारांनी माउलींनी आदिमाया चित्कलेला मनोमनी नमस्कार केला असेल. असा भावना विवशतेचा प्रसंग माऊलींच्या आयुष्यात त्यांचे आई-वडिलांचे आत्मार्पणाचे वेळी किंवा स्वतःच्या समाधीच्याही वेळी आला नाही. निर्ममत्व-तटस्थता-लीनता हा त्यांचा स्थायी भाव होता. ज्ञानदेवांनी जगासमोर उभे केलेले आदर्श किंवा त्यांचे आदर्शवादी तत्त्वज्ञान जर जाणून घ्यावयाचे असेल तर प्रायतः त्यांच्या अक्षरवाङ्मयाकडेच जावे लागेल. एक व्यक्ती म्हणून त्यांचे आदर्शत्व पाहणे असेल तर त्यांच्या अक्षर वाङ्मयाबरोबरच त्याच्या ज्ञातजीवनाचे अवलोकन व अज्ञात जीवन साक्षीभावाने ज्ञात करून घेण्याचा प्रयत्न करणे हेच आवश्यक आहे. मागील शंभर सवाशे वर्षात ज्ञानदेवादि संताची चरित्रे, अभंग यांचा अभ्यास शेकडो विचारवंतानी, इतिहासकारांनी, वाङ्मयीन अभ्यासकांनी, तत्त्वज्ञान्यांनी, टीकाकारांनी व अनेक ज्ञानेश्वरप्रेमी सारस्वतांनी केलेला आहे. ज्ञानेश्वरांवरील

---

१. पू. साखरे किसनमहाराज, सार्थ ताटीचे अभंग, २००५

नितांत श्रद्धा, भक्ती व प्रेम या भावनेतून मी माउलींच्याकडे पाहतो. त्यामुळे संतसाहित्य व संतवाङ्मय, संतजीवन यावरील खंडन-मंडळ पद्धतीच्या लिखाणापासून मी खूप दूर आहे.

ज्ञानदेवांचे संबंधी इतिहास काही सांगत नाही. जे काही माहीत आहे ते मुख्यत्वे नामदेवांचे अभंगगाथेतील 'आदि', 'तीर्थावळी' व 'समाधी' या तीन भागातील अभंगावरून उपलब्ध आहे. म्हणून ज्ञानदेवांनी आपल्या जीवनातून आपल्या समोर जे आदर्श ठेवले आहेत. त्यांचा शोध आणि बोध त्यांच्याच लिखाणातून घ्यावा लागेल. सोबतीला आहेत नामदेवांचे अभंग. ज्ञानदेवांचे लिखाणाचे चार प्रमुख भाग आहेत. ज्ञानेश्वरी हा श्रोतृसंवाद आहे. अमृतानुभव हा आत्मसंवाद किंवा सिद्धानुवाद आहे. चांगदेव पासष्टी हा मित्रसंवाद किंवा 'ये हृदयीचे ते हृदयी' असे आत्मज्ञानाचे बोलांचा संवाद आहे. बोलणारे एकटेच आहेत ज्ञानदेव. अभंग हे जनसंवादी आहेत किंवा सर्वेश्वराशी साधलेला संवाद आहे. हरिपाठ हा भक्तजनांशी केलेला मार्गदर्शक संवाद आहे.

[१]ज्ञानेश्वरांचे व्यक्तिमत्त्व मृदू, सत्त्वशील, समंजस, उदार, भावगर्भ आणि सौंदर्यासक्त आहे. या सर्व गुणात मी आणखी एका गुणाची वाढ करीन. He is totally detached. सर्वात असूनही ते कोठेही गुंतलेले नाहीत. ते विरागी योगी आहेत. ही अलिप्तता हा माउलींचा स्थायीभाव आहे. 'विश्वाचे आर्त माझे मनी प्रगटले' असे म्हणून त्या सर्वात्मक विश्वेश्वराकडे विश्वासाठी पसायदान मागणारे माउली स्वत:मात्र कोठेही गुंतत नाहीत, अगदी समाधीचे वेळीसुद्धा पूर्ण अलिप्त रहातात. आता माझे अवतारकार्य संपले. आता या पुढे या जगात एकही दिवस राहणे नाही. ही ती अलिप्तता. ((detached) म्हणजे कोणात न मिसळणारे, एकांडे असा अर्थ नाही.) ज्ञानेश्वर सर्वात आहेत पण केवळ 'साक्षी' म्हणून नामदेव, चोखोबा, गोरोबा हे तर त्यांचे जीवीचे जिवलग होते. अन्यत्र कोठेही बघायला मिळणार नाही इतकी गुरूनिष्ठा होती. त्यांना श्रीगुरू देवापेक्षाही श्रेष्ठ होते परंतु माउली 'स्वतंत्र' आहेत. कोणत्याही गुणाच्या, व्यक्तीच्या ते अधीन नाहीत. अगदी सर्वस्व असणाऱ्या श्रीगुरू निवृत्तिनाथांच्याही नाही. त्यांनी आपले 'ज्ञानेश्वरपण' अगदी समाधीपर्यंत स्वतंत्र ठेवले होते. माउलींचे व्यक्तिमत्त्व भावगर्भ आहे. परंतु भावनाप्रधान नाही. तसे पाहिले तर ही चारही भावंडे 'स्वतंत्र' आहेत. सर्वांनी जन्मापासून लहानपणी खूप सोसले आहे. त्या सोसण्यालाही मर्यादा नव्हती. परंतु मुखातून, लिखाणातून एका शब्दानेदेखील त्याचा उच्चार केला नाही. ज्ञानदेवांच्या

---

१. डॉ. कुलकर्णी द. भि., ज्ञानेश्वरांची प्रतीतिविश्रांती

अभंगातून जाणवते ती त्यांची सततची, निरंतरची 'सहजसमाधी'– स्थिती . ज्ञानेश्वरी सांगून झाल्यावरही त्याचे पूर्ण श्रेय त्यांनी श्रोत्यांना व श्रीगुरूंना दिले आहे व स्वत:कडे घेतले फक्त पाईकपण. लीनता हा ज्ञानदेवांचा सर्वश्रेष्ठ गुण आहे.

ज्ञानदेव स्वत: ज्ञानी, योगी, भक्त, आणि क्रियावान होते. आणि म्हणूनच त्यांनी आचार संपन्नतेवर भर दिलेला होता. ईश्वरार्पण बुद्धीने केलेले कर्म किंवा सर्वात्मक ईश्वराला अर्पण केलेली स्वकर्मकुसुमांची पूजा हीच खरी ईश्वरीपूजा आहे. या विषयी उदाहरण देताना माउली म्हणतात, ''पतिव्रता स्त्री जशी आपल्या पतीबरोबर संसार करताना तो संसार न मानता तीच मोठी तपश्चर्या मानते, त्याचप्रमाणे ईश्वरार्पण बुद्धीने केलेले कर्म हीच ईश्वराची परम सेवा होय. माउली म्हणतात–

हें विहित कर्म पांडवा। आपुला अनन्य वोलावा।

आणि हेचि परम सेवा। मज सर्वात्मकाची।। ज्ञा.१८.९०६

पैं आघवांचि भोगेंसीं। पतिव्रता क्रीडे प्रियेंसीं।

कीं तयाचीं नामे जैसीं। तपें तियां केली।। ज्ञा. १८.९०७

ज्ञानेशांचा भक्तीयोग हा माउलींनी महाराष्ट्रातील भागवतधर्माचे जे वेगवेगळे पंथ आहेत त्यातील विशेषत: नाथवारकरीपंथ समोर ठेवून मांडला आहे म्हणून हा वारकरी संप्रदाय ज्ञानेश्वरीस व ज्ञानदेवास 'माउली' असेच संबोधतात.

माउलींनी भक्तीरसाचे वैभवशाली वर्णन ज्ञानेश्वरीत केले आहे. गीतेने कर्म, भक्ती, योग व ज्ञान यांचा इतका सुंदर समन्वय केला आहे की, या वेगवेगळ्या मार्गावर लक्ष ठेवून उपासना करणाऱ्या प्रत्येकास गीता ही माझ्याचकरिता आहे असे वाटते. म्हणून कर्म, ज्ञान, योग या प्रत्येक विषयास माउलींनी भक्तीचे अस्तर लाविले आहे. ज्ञानेश्वरीच्या तिसऱ्या अध्यायात जरी कर्माचे वर्णन केले असले तरी, सर्वात्मक ईश्वराची पूजा, ''मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य...'' या श्लोकातून कर्माचा शेवट भक्तीतच झालेला दिसून येतो. सहाव्या अध्यायात माउली सांगतात की, जो भगवंताला (मला) सर्व भावे भजतो तोच खरा योगी. गीतेतील योग, पातंजल योगसूत्रापेक्षा वेगळा आहे. गीतेतील ज्ञानयोग माउलींनी असा मांडला आहे की, ज्ञानाचीही परिणती भक्तीतच होते. म्हणून माउलींनी असे दाखवून दिले आहे की, कर्म, ज्ञान व योग हे स्वतंत्र नसून त्या भक्तीच्याच कक्षा आहेत. म्हणून गीता प्रत्येक साधनाची 'ईश्वरभक्ती' हाच

पाया असल्याचे सांगते.

[१] माउलींच्या ठिकाणी भक्ती, ज्ञान, कर्म व योग यांचा सुंदर मिलाफ झालेला दिसतो. कारण माउली स्वत: श्रेष्ठ, ज्ञानी, योगी, क्रियावान व भक्त होते. माउलींच्या ज्ञानेश्वरीचे भक्ती स्वरूप, भक्तिसूत्रांतील प्रमेयांप्रमाणे नाही. माउलींनी भक्तिचे वेगवेगळे आविष्कार दाखविले आहेत. या सर्वांचा विचार करता भगवंत हाच भक्तीचा एकमेव विषय माउली मानतात. म्हणून भक्तीची व्याख्या, ''अस्मिन् परमप्रेमरूपा'' हीच होते, कारण देवाविषयी प्रेम नसेल तर. भक्तीला काहीही किंमत राहणार नाही. भक्तीचे वर्णन करताना ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात 'पत्रंपुष्पं फलं तोयम्'.... या श्लोकावर भाष्य करताना माउली म्हणतात, की भक्ताला माझी भक्ती करताना स्वत:चे सर्वस्व मला अर्पण करावे असे वाटते. पान, फुल, फळ हे तर नुसते निमित्त. परंतु भक्ताच्या ह्या नितांत प्रेम भावाने, त्याने अर्पण केलेल्या आत्मभावाने मी इतका संतुष्ट होतो की, त्याने प्रेमभक्तीने जे अर्पण केले ते मी प्रेमाने स्वीकारतो. म्हणून भगवंत म्हणतात की, 'मी भक्ताचा भक्तिभावच पाहत असतो.' म्हणून माउली म्हणतात, ''निखळ भक्ती म्हणजेच प्रेम.'' देवावरील भक्ती म्हणजे आपले सर्वस्व त्याला अर्पण करणे. निर्गुण उपासना हे जरी ईश्वरी उपासनेचे अंतिम लक्ष्य असले तरी माउलींनी सगुणोपासना कधीही कमी मानली नाही. हे माउलींनी ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायात व हरीपाठात व अभंगात स्पष्ट केले आहे. ज्ञानेश्वरीच्या अकराव्या अध्यायात गीतेच्या त्रेचाळीसाव्या श्लोकावरील भाष्य करताना माउलींनी ईश्वराच्या सगुण रूपाचे वर्णन केलेले आहे. त्याचप्रमाणे माउली एकेश्वरवादी किंवा बहुदेवतावादी नव्हते. माउली म्हणतात –

परी ज्ञानेविण नाशिले। जे बुद्धीभेदासी आले।
तेणेंचि या कल्पिलें । अनेकत्व ।। ज्ञा. ४.६८

ज्ञानेश्वरांची ईश्वर विषयक कल्पना संकुचित नाही. ''एकं संत बहुदा कल्पयन्ति''यावर आधारित असून येथे श्रीशंभू व श्रीहरी ही एकाच परमेश्वराची रुपे असल्याचे माउलींनी सांगितले आहे. सगुणोपासनेतील कीर्तन भक्ती माउलीस अतिशय प्रिय होती. याबद्दल माउली नवव्या अध्यायात चौदाव्या श्लोकावरील निरुपणात म्हणतात –

---

१. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी आध्याय ११, १६

'सततं किर्तयन्तो माम्' – याबद्दल लिहिताना –

तरी किर्तनाचेनी नटनाचें। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे।

जे नामचि नाहीं पापाचे। ऐसें केलें ।। ज्ञा. ९.१९७

कैसे माझां गुणीं धाले। देशकाळातें विसरले।

कीर्तनसुखें झाले। आपणपांचि ।। ज्ञा. ९.२०९

कृष्ण विष्णु हरी गोविंद। या नामाचे निखळ प्रबंध।

माजी आत्मचर्चा विशद। उदंड गाती ।। ज्ञा. ९.२१०

माउली ज्ञानेश्वरीत सांगतात की, ही कीर्तनभक्ती जगातील सर्व दोष नाहीसे करून जगाला सुखी करणारी आहे.

कर्माच्या बाबतीत माउली सांगतात की, स्वकर्माची फळे मला अर्पण करून जो भक्ती करतो तो माझा श्रेष्ठ भक्त आहे –

हे विहित कर्म पांडवा। आपुला अनन्य वोलावा।

आणि हेचि परम सेवा। मज सर्वात्मकाची ।। ज्ञा.१८.९०६

तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्म कुसुमांची वीरा।

पूजा केली होय अपारा। तोषालागीं ।। ज्ञा. १८.९१७

माउली म्हणतात भक्तीची सुरुवात जरी मूर्तिपूजेने झाली तरी शेवट मात्र ज्ञानी भक्तीत झाला पाहिजे कारण या अवस्थेत भक्त आणि देव हे एकच झालेले असतात. असा ईश्वराशी एकरूप झालेला भक्त भक्तिसुखाचा खरा आनंद उपभोगू शकतो. याचे उत्तम उदाहरण माउलींनी बाराव्या अध्यायात दिलेले आहे.

कीं भक्तीसुखालागीं। आपणपेंचि दोही भागीं।

वाटूंनीया आंगीं। सेवकै बाणी ।। ज्ञा. १२.१८६

माउली भक्तीची विविध रूपे सांगतात, जसे अनन्यभक्ती, अव्यभिचारी भक्ती, गुरवी भक्ती, आणि ज्ञानोत्तर भक्ती, कर्मयोग, भक्तियोगाइतकेच महत्त्व माउली ज्ञानयोगालाही देतात. माउली गीतेला ज्ञानप्रधान शास्त्र असे मानतात. परंतु या ज्ञानप्राप्तीसाठी कर्मयोगाचे पूर्ण ज्ञान असले पाहिजे. कर्मयोगातून वैराग्य प्राप्ती

होते व या विरक्तीतून ज्ञानाची प्राप्ती होते. व ज्ञानातून मोक्ष प्राप्त होतो. पंधराव्या अध्यायात माउलींनी याचे उदाहरण दिले आहे.

जें ज्ञान जयाचां हातीं । तोचि समर्थु मुक्ती ।

जैसा शतमख संपत्ती । स्वर्गींचिये ।। ज्ञा.१५.३०

म्हणून माउली सांगतात साधनेतील कर्मयोग ही पहिली पायरी असून ज्ञानयोग ही शेवटची पायरी आहे.

जेथ प्रवृत्ती पांगुळ जाहली । तर्काची दिठी गेली ।

जेणें इंद्रियें विसरली । विषयसंगु ।। ज्ञा.४.१६२

मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचे बोलपण ठेलें ।

जयामाजी सांपडलें । ज्ञेय दिसे ।। ज्ञा.४.१६३

ज्ञानेश्वरीच्या सातव्या व अठराव्या अध्यायात माउलींनी ज्ञानयोगातील मुख्य पायऱ्या सांगितल्या आहेत. सातव्या अध्यायात माउली म्हणतात –

जे तो विषयांची मोट झाडी । मार्जी कामक्रोधांचीं सांकडीं ।

चुकावूनि आला पाडीं । सद्वासनेचिया ।। ज्ञा.७.१२७

मग साधुसंगें सुभटा । उजूं सत्कर्माचिया वाटा ।

अप्रवृत्तीचा आव्हांटा । डावलूनि ।। ज्ञा.७.१२८

तैसी गुरूकृपाउरवा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली ।

तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ।। ज्ञा.७.१३१

## तत्त्वज्ञान

माउली आपले तत्त्वज्ञान मांडत असतांना उपनिषदांचा मागोवा नेहमी घेतात, माउलींच्या लिखाणातून काश्मिरी शैवनाथपंथीय, शांकरीय व गौडपादीय तत्त्वज्ञानांचा त्यांनी केलेला विचार दिसून येतो. माउलींची प्रज्ञा ही स्वतंत्र प्रज्ञा आहे. उपनिषदे, जसे आत्म्याला सर्वोच्च स्थान देते, तसे माउलींच्या तत्त्वज्ञानाचा 'आत्मा व आत्मानुभूति' हा गाभा आहे.

माउलींच्या ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी या ग्रंथाचाही गाभा आत्मा व आत्मानुभूति हा आहे.

म्हणोनी जगीं गीता। मियां आत्मेनि पतीव्रता।

जें हे प्रस्तुत तुवां आतां। आकर्णिली।। ज्ञा.१५.५७५

सांचचि बोलणे नव्हे हें शास्त्र। पैं संसारु जिणतें हें शस्त्र।

आत्मा अवतरविते मंत्र। अक्षरें इयें।। ज्ञा.१५.५७६

तया आत्मयाच्या भाखा। न पडेचि दुसरी रेखा।

जरी विश्वा अशेखा। भरला आहे।। अनुभवामृत प्र. ७-१४६

तियेपरी जो ईया। दर्पण करील ओंवीया।

तो आत्मा एवढीया। मिळेल सुखा।। चांगदेव पासष्टी

माउली म्हणतात की, 'देह व आत्मा यांच्या स्वरुपात मूलभूतच अंतर आहे. अध्याय सहाव्यात माउली म्हणतात की आत्म्याच्या सत्तेवर देह स्फुरत असतो. परंतु अज्ञानी मात्र त्याला ''मी आहे'' असे मानतो.'

कां कवण एकुभ्रमलेपणें। मी तो नव्हें गा चोरलों म्हणे।

ऐसा नाथिला छंद अंत:करणें। घेऊनि ठाके।। ज्ञा.६.७४

एरव्ही होय तें तोचि आहे। परी काई कींजे बुध्दि तैशी नोंहे।

देखा स्वप्नींचेनि घायें। कीं मरे साचें।। ज्ञा.६.७५

जैसी ते शुकाचेनि आंगभारें। नळिका भोविन्नली एरी मोहरे।

तरी तेंणें उडावें परि न पुरे। मनशंका।। ज्ञा.६.७६

या नंतर माउलींनी आत्मा इंद्रिय नाही, शून्य नाही, विज्ञान नाही, हे अनेक उदाहरणांनी तेरावे अध्यायात स्पष्ट केले आहे.

माउलींच्या ग्रंथसंपदेचा व तत्त्वज्ञानाचा पाया म्हणजे[१] आत्मसाक्षात्कार, तो प्राप्त झाल्यानंतर मिळवण्यासारखे काहीही उरत नाहीं.

दिसो परतत्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।

रिघो महाबोधसुकाळा । माजीं विश्व ।। ज्ञा.१३.११६१

हा आत्मसाक्षात्काराचा ठेवा सर्वांच्या हाती देण्यासाठीच माउलींनी गीतेवरील मराठी टीकेचा महायज्ञ मांडला. याचे सविस्तर विवेचन अश्वत्थ वृक्षाच्या रुपकाने पंधरावे अध्यायात माउलींनी केलेले आहे.

अध्याय तीन, नऊ व तेरा यामध्ये याचे विविध रूपके देऊन स्पष्टीकरण मांडले आहे. नवव्या अध्यायात माऊली म्हणतात की, देवाचे भक्तावर इतके प्रेम असते की तो त्याचे सर्व योगक्षेम वाहतो.

माउलींच्या तत्त्वज्ञानात ईश्वराइतकेच महत्त्व गुरुकृपेला आहे. ज्ञानेश्वरीत सद्गुरूंसाठी ज्ञानेशांनी सुमारे तीनशे ओव्या लिहिल्या आहेत. शिष्य गुरूला शरण गेल्यावर साधकाच्या इच्छेप्रमाणे अगर त्याची इच्छा नसतानाही अनुभव येतच राहतात, श्रीकृष्णाने अर्जुनाला अकराव्या अध्यायात हेच सांगितले आहे. दहाव्या अध्यायात हेच गुरूप्रेम सविस्तरपणे मांडले आहे.

म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो ।

एक मीवांचूनि वावो । येर मानिलें जिहीं ।। ज्ञा.१०.१४१

तयां तत्वज्ञां चोखटां । दिवी पोतासाचि सुभटा ।

मग मीचि होऊनी दिवटा । पुढां पुढां चाले ।। ज्ञा.१०.१४२

[२] आत्मसाक्षात्कार म्हणजे काय हे माउलींनी विविध रुपकांनी पंधरावे व अठरावे अध्यायात दर्शविले आहे.

मग इदंतेसि वाळले । जें मीपणेंवीण डाहारलें ।

तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ।। ज्ञा.१५.२६७

---

१. वै. दांडेकर शं. वा., सार्थ ज्ञानेश्वरी, पान ४९८

२. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी अ. पंधरा, अठरा. पान ५६०, ७८०

परी दर्पणाचेनि आधारें। एकचि करून दुसरें।

मुख पाहाती गव्हारें। तैसें नको हें।। ज्ञा.१५.२६८

समु तेथ सामावला। विश्रामु विश्रांति आला।

अनुभव वेडावला। अनुभूतिपणें।। ज्ञा.१८.१२१७

ज्ञानेश्वरांच्या विचारांचा येथपर्यंत मागोवा घेतल्यावर हे तत्त्वज्ञान पूर्णपणे आत्मसाक्षात्कारी असल्याचे माउलींचे आग्रहाचे सांगणे मनाला सहज समजून जाते.

भगवंतांनी अर्जुनाला केलेला उपदेश विविध अध्यायातून ज्ञानयोग, कर्मयोग, ध्यानयोग, भक्तियोग इत्यादी माध्यमातून मांडला आहे. परंतु भगवंताच्या सर्व उपदेशाचे सार म्हणजे भगवंताने अर्जुनाला आत्मयोग सांगितला व त्याला आपल्या सारिखे केले. भगवंताने गीतेच्या शेवटी अर्जुनाला जीवनाच्या चरणसीमेवर आणून लढण्यास उद्युक्त केले, पण त्यापूर्वी त्यास समाधीघनाची प्राप्ती करून दिली.

ज्ञानेश्वरीच्या सुरुवातीस ज्ञानदेवांनी श्री गुरूप्रसादासाठी व परमेश्वराच्या आशीर्वादासाठी नमन केले आहे. त्याचप्रमाणे अध्याय संगतीसाठी ही त्यांनी नमनाचा उपयोग केलेला आहे. पूर्वसुरींप्रमाणे गीतेच्या कांडत्रयात्मक टीकेसाठी गीतेच्या अठरा अध्यायांची सहा-सहा-सहा अशी विभागणी (कर्म, उपासना व ज्ञान) न करता त्यांनी त्यांच्या पद्धतीने ही विभागणी केली आहे. पहिला अध्याय ''शास्त्र, प्रवृत्ती प्रस्तावो।'' हा भगवंताने गीता का सांगितली यासाठी आहे. दुसरा अध्याय ज्ञानप्रधान शास्त्राकरता असून तिसरा अध्याय हा कर्म प्रतिष्ठेसाठी आहे. अध्याय चौथा ते बाराव्या अध्यायातील ''श्रेयो ही ज्ञानमभ्यासात्''- या तेराव्या श्लोकापर्यंत भगवंताने उपासना सांगितली आहे. याच बाराव्या अध्यायातील तेराव्या श्लोकापासून ''अद्वैष्ठा सर्व भूतानाम्'' बारावा अध्याय पूर्ण व तेरा, चौदा, पंधरा हे ज्ञानकांडाचे अध्याय आहेत. माउलींच्या मते ज्ञानकांडाचे शेवटी गीताशास्त्र पूर्ण होते. पुढील सोळा, सतरा, अठरा हे अध्याय हे विशेष माहितीकरता आहेत. ज्ञानाला पूरक अशा दैवी संपत्ती व विरोधक अशी असुरी संपत्ती याचे विश्लेषण सोळाव्या अध्यायात आहे. प्रत्येक साधकास जीवनात साध्य काय व त्याज्य काय हे ठरविण्याचा निर्णय तीन प्रकारच्या श्रद्धा दर्शवितात व त्याचे विश्लेषण सतराव्या अध्यायात आहे. अठरावा अध्याय हा कलशाध्याय असून पूर्वीच्या सर्व अध्यायाचा मागोवा व माउलींच्या नाथपंथाची परंपरा व शिक्षा याची समग्र माहिती आहे. याच अध्यायाचे शेवटी माउलींनी विश्वेश्वर श्रीगुरू निवृतीनाथ यांचेकडे

पसायदान मागितले आहे. म्हणून हा अध्याय म्हणजे एकाध्यायी गीताच आहे. गीताध्यायावर टीका करताना श्लोकसंख्येच्या प्रमाणात ओवीसंख्या नसून जे अध्याय माउलींना विशेष भावले आहेत तेथे विस्ताराने भाष्य केलेले आहे. नवव्या अध्यायात (राजविद्याराजगुह्ययोग) चौतीस श्लोक असून त्यावरील टीका पाचशेपस्तीस ओव्यांची आहे. तसेच विश्वरुपदर्शन या अकराव्या अध्यायाच्या पंचावन्न श्लोकांवर सातशेआठ ओव्या लिहिल्या आहेत. क्षेत्र क्षेत्रज्ञ, किंवा प्रकृती पुरूष विवेक या तेरावे अध्यायातील चौतीस श्लोकांवर  अकराशे एकोणसत्तर ओव्यांचे विवेचन आहे. तसेच पुरुषोत्तमयोग या पंधराव्या अध्यायाच्या व दैवासुरसंपतविभाग या सोळाव्या अध्यायाच्या अनुक्रमे वीस व चोवीसव्या श्लोकांसाठी पाचशेनव्व्याण्णव व चारशेत्र्यहात्तर  ओव्यांचे विवरण आहे. व अंतिमत: सर्वगीतार्थसंग्रह या अठराव्या अध्यायाच्या अठ्याहत्तर श्लोकांसाठी अठराशे दहा ओव्यांत मांडणी केली आहे. अशाप्रकारे गीतेच्या सातशे श्लोकांकरिता नऊहजार तेहेतीस ओव्यांची रचना माउलींनी केलेली आहे.

ज्ञानेश्वरीतील काव्य, उपमा, दृष्टांत, निसर्ग, सजीव, निर्जीव, प्राणी, वनस्पती, दऱ्या, डोंगर या सर्व उपमानांचा उपयोग माउलींनी ज्ञानेश्वरीत मुक्तहस्ते केलेला आहे. काव्य सौंदर्यात अधिकारी असणाऱ्या अनेक मान्यवरांनी त्यावर सविस्तर लिहिलेले आहे.

ज्ञानेश्वरीच्या गीतेवरील समग्रटीकेत काही पौराणिक कथानके  ज्ञानेश्वरीत वर्णिली आहेत. गुरूवंदन, श्रोतृवंदन, भाष्यमहिमा, त्याचप्रमाणे श्रीकृष्णभक्त संजय याच्या अष्टसात्त्विक भावाचे वर्णन माउलींनी रसाळपणे केलेले आहे. श्रीगुरू व गुरूभक्ती हा ज्ञानेश्वरांच्या जीवनाचा व लिखाणाचा सर्वोच्च बिंदू आहे. (श्रीगुरूस्तवनासाठी माउलींनी ज्ञानेश्वरीत सुमारे तीनशे ओव्या) व ज्ञानेश्वरीच्या शेवटी श्रीगुरूच आर्तांसाठी गीतार्थरुप शांतरसाचा वर्षाव करत आहेत असे श्रद्धेने सांगितले आहे.

श्रीगुरुंच्या खालोखाल माउली श्रोतृवंदनेला खूप महत्त्व देतात. ज्ञानेश्वरी ही बंदिस्त जागेत श्रीगुरूंसमोर सांगितली नसून श्रीगुरू व सर्व श्रोते यांच्यातील तो मुक्तसंवाद आहे. श्रोत्यांशी माउली अतिशय लडिवाळपणे वागून वारंवार त्यांना अवधान देण्याचे आवाहन करतात. ज्ञानेश्वरीत माउलींची सर्वांत मोठी प्रतिज्ञा म्हणजे "बोली अरुपाचे रूप दाविन। अतिन्द्रिय परीभोगवीन इंद्रियाकरवी।।" ही आहे.

माउलींचा श्रद्धाभाव व लीनता इतक्या उच्चकोटीची आहे की ज्ञानेश्वरी लिहिण्याच्या कर्माचे सर्व श्रेय ते आपले श्रीगुरू निवृत्तीनाथ व रसिक श्रोते यांना आलटून, पालटून देऊन स्वत: मात्र या श्रेयकर्मापासून

अलिप्त राहतात. माउलींच्या पुढील ओव्या या दृष्टीने अतिशय बोलक्या आहेत.

गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय ।

ते मायापूता भेटी होय । हा धर्म तुमचा ।। ज्ञा.१८.१७८२

तुम्हां सज्जनांचें केलें । आकळुनी जी मी बोलें ।

ज्ञानदेव म्हणे थेंकुलें । तैसें तें नव्हे ।। ज्ञा.१८.१७८३

काय बहु बोलों सकळां । मेळविलों जन्मफळा ।

ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जों हा ।। ज्ञा.१८.१७८४

मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा ।

ते पुरवुनि जी बहुवसा । आणिलों सुखा ।। ज्ञा.१८.१७८५

म्हणौनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथ रुप जो हा त्रिजगती ।

उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ।। ज्ञा.१८.१७९१

किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें ।

येथ माझें जी उरलें । पाईकपण ।। ज्ञा.१८.१७९२

माउलींनी श्रीकृष्णार्जुनसख्य म्हणजेच श्रीगुरू व भक्त यांचे एकमेकांवरील प्रेम हे इतक्या जिव्हाळ्याने दाखविले आहे की त्याची तुलना फक्त माउली व त्यांचे श्रीगुरू यांचेशीच करता येईल.

ज्ञान, योग, भक्ती व आत्मबोध हे गहनविषय माउलींनी इतके रोचक केले आहेत की, त्याचा अवघडपणा वाचणाऱ्या भक्ताच्या मनाला कधीही येत नाही. या मराठीमातीत जन्म घेतलेल्या माउलींचे मराठी भाषेवरील प्रेम हे मायलेकरांच्या प्रेमासारखे आहे. म्हणूनच माउली प्रतिज्ञा करतात की –

माझा मराठाचि बोलू कौतुकें। परि अमृतातेंही पैजासीं जिंकें।

ऐसीं अक्षरें रसिकें । मेळविन ।। ज्ञा. ६.१४

संस्कृत या भाषेबद्दल माउलींच्या मनात आस्था आहे परंतु सामान्य वाचकालाही समजेल अशा मायभाषेत माउलींना ज्ञानेश्वरी सांगणे आवडले म्हणून माउली म्हणतात –

मूळग्रंथींचिया संस्कृता– । वरि मऱ्हाटी नीट पढतां ।

आभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हें न चोजवे ।। ज्ञा.१०.४२

तीरें संस्कृताची गहनें । तोडोनि मऱ्हाटीयां शब्द सोपानें ।

रचिलीं धर्मनिधानें । निवृतीदेवें ।। ज्ञा.११.९

माउलींनी संपूर्ण ज्ञानेश्वरीत जवळ जवळ अठरा वेळा 'मऱ्हाटी' या शब्दाचा उल्लेख केला आहे. ज्ञानेश्वरीच्या जवळपास सर्व अध्यायातून स्त्रीविषयक वर्णनाच्या ओव्या आलेल्या आहेत. माउलींनी लिहिलेल्या सुमारे सत्तर स्त्री वर्णनात्मक मातेच्या उपमानाच्या सुमारे पंचवीस ओव्या किंवा अभंगातील प्रियेचे दर्शन सुमारे पंधरा ओव्यात आहेत. यासर्व ठिकाणी ज्ञानदेवांनी लवमात्रही स्त्रीत्वाचा अधिक्षेप केलेला नाही. स्त्रीत्व-मातृत्व याला माउलींचे हृदयी खूप आदरणीय स्थान आहे.

माउलींच्या पसायदानाची तुलना करण्यासारखे दुसरे पसायदान या विश्वात किंवा भारतीय लिखाणातही अन्य दुसरे मिळणार नाही. हे एका विश्वात्मक शिष्याने आपल्या विश्वात्मक श्रीगुरूंना मागितलेले पसायदान आहे. 'विश्वाचे आर्त माझे मनी प्रगटले। अवघेचि झाले देह ब्रह्म ।।' ही आतर्ता आयुष्यभर हृदयी असलेल्या या विश्वआर्तनेने हळव्या झालेल्या माउलींची ही आपल्या श्रीगुरूंना विनवणी आहे. ज्ञानेश्वरीचे फलीत म्हणून माउलींनी स्वत:साठी काहीही मागितले नाही. मागितले ते विश्वातील प्रत्येक प्राणिमात्रांसाठी. पसायदानावर कितीही लिहिले तरी माउलींच्या मनातले भाव स्पष्ट करण्याची ताकद कोणाच्याच लेखणीत नाही.

असेच पसायदान संततुकारामांनीही विठ्ठलाकडे मागितले आहे -

हेची दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा ।।

गुण गाईन आवडी। हेची माझी सर्व गोडी ।।

न लगे मुक्ती आणि संपदा। संतसंग देई सदा ।।

तुका म्हणे गर्भवासी। सुखे घालावे आम्हासी ।।

## १,२ अमृतानुभव

ज्ञानेश्वरीनंतर माउलींनी 'अनुभवामृत' या आठशेंपांच ओव्यांच्या स्वतंत्र ग्रंथाची रचना केली. ज्ञानेश्वरी-अमृतानुभव-चांगदेव पासष्टी, अभंग या सर्वांमधून ज्ञानेशांनी आत्मा, आत्मानुभव व अद्वैत यांचेच विचार मांडले आहेत.

आत्मानुभवाचा मुक्त अविष्कार अनुभवामृतातच मिळतो. अमृत-तत्त्वाची अनुभूती ही केवळ शब्दातीत आहे, एवढेच नसून ती मनबुद्धीच्याही अतीत आहे. परंतु माउलींनी आपल्या शब्द-सिद्धीने स्वसंवेद्य आत्मरूपाच्या अमृताच्या अनुभवाचा अमृतकुंभ आपल्याला दिला आहे. हा सिद्धानुवाद आहे असेही माउली सांगतात -

म्हणोनि हा उचितुचि। अनुवाद सिद्ध।। अमृ.१०.१३

अनुभवामृतातील अज्ञानखंडन हा विषय माउलींनी अतिशय विस्ताराने मांडला असून त्यासाठी आठशेपाच ओव्यापैकी दोनशेपंच्चाण्णव ओव्या मांडल्या आहेत.

अनुभवामृताची दहा प्रकरणे आहेत. परंतु या विषयाला सुरुवात करण्यापूर्वी माउलींनी पाच संस्कृत श्लोकातून आपल्या श्रीगुरुंना वंदन केले आहे. तिसऱ्या व चौथ्या श्लोकात शिव-शक्तीचे महात्म्य व स्तवन, पाचव्यात व तसेच या दहा प्रकरणात येणाऱ्या विषयांची ओळखही करून दिलेली आहे. शिवशक्ती समावेशन या पहिल्या प्रकरणात शिव-शक्ती, प्रकृती-पुरुष, परमेश्वर-आदिमाया अशा अनेक नावांनी आपण ज्यांना संबोधतो त्या परब्रह्माच्या सापेक्ष कल्पनांचे विवेचन आहे.

जयां येक सत्तेचें बैसणें । दोघां येका प्रकाशाचे लेणें ।
जें अनादि येक पणें । नांदती दोघें । अमृ. १.८

शिवाने शिवेच्या माध्यमातून विश्वाची उत्पत्ती केली, तेवढाच त्यांच्यात लौकिक भेद.

गुरुस्तवनाच्या दुसऱ्या प्रकरणात शुद्ध ब्रह्मविचार मांडलेला आहे. निवृत्तिनाथांनी ज्ञानेशांना सर्व काही दिले आहे, त्यांच्या या अद्वैत संबंधाला तोड नाही. माउलींनी ही गुरुभक्ती, नम्रता, अनन्य शरणागती, अद्वैताच्या भाषेत व्यक्त केली आहे. माउली असे मांडतात की परब्रह्मानेच गुरु-शिष्य रूपाने स्वतःला

---

१. ब्रह्मश्री साखरे दादामहाराज, सार्थ अमृतानुभव.,

२. डॉ. साठे अ. म. प्रसाद अमृतानुभव, सान्वय-सार्थ निरुपण)

प्रगट करून स्वतःच शिष्य होऊन गुरु-रूपात आपल्यालाच शरण जाऊन, आपल्यालाच बोध करून आत्मस्वरूप समजावून घेतले. प्रकरणाचे शेवटी माझे गुरु निवृत्तिनाथ हे प्रवृत्तीचा निरास करणारे निवृत्ती आहेत असे सांगून अविद्यात्मक चारी वाणीतून मुक्तता मिळावी म्हणून सद्गुरुंना अभेदत्वाने वंदन केले आहे.

जयाचेनि कृपासालिलें । जिउ हा ठाववरी पाखाळे ।

जें शिवपणहि वोंविळें । अंगी न लावो ।। अमृ.२.११

आतां ज्ञानदेवो म्हणे । श्री गुरुप्रणामें येणें ।

फेडिर्ली वाचाऋणें । चौही वाचांर्ची ।। अमृ.प्र.२.८०

तिसऱ्या प्रकरणात माउलींनी चारही वार्णीचे ऋण श्री गुरूस शरण जाऊन फेडिले आहे. वाणीचे परा-पश्यन्ती-मध्यमा व वैखरी असे प्रकार आहेत. यातील वैखरी वाणीचा उपयोग बोलण्यासाठी होतो, परा ही ज्ञानप्रधान, पश्यंती ही मनप्रधान व मध्यमाही बुद्धिप्रधान आहे. या चारही वाचांचे परब्रह्माशी मीलन म्हणजेच वाचा ऋण-परिहार. परंतु ते सोपे नाही म्हणून सद्गुरुंनाच शरण जाणे प्राप्त आहे.

तें ऋणशेष वाचा इया । न फेडवेचि मरोनियां ।

ते पायां पडोनि मियां । सोडविलें ।। अमृ. ३.३२

चौथे प्रकरण ज्ञानाज्ञानभेद कथनाचे आहे, वस्तूच्या किंवा विषयाच्या अज्ञानाचा नाश करण्याच्या निमित्ताने ज्ञान आपलाही पूर्ण नाश करून घेते व फक्त अधिष्ठान रुप स्वरूपज्ञान उरते. आहे किंवा नाही हे बोलणे संपून उरते फक्त शुद्ध असणे. हा सर्व परमात्म्याचा विलास आहे, जेथे भेदाचा संबंध नाही.

पाचव्या सच्चिदानंद पदत्रयविवरण प्रकरणात वेदातील सत्ता, प्रकाश आणि सुख (सत् चित् आनंद) या पदांनी असत् जड आणि दुःख यांची व्यावृत्ती होऊन सच्चितानंद हे पदही ज्ञात्याला आपले यथार्थ परमार्थरूप दाखवून मुके होते. परमात्म्याला प्रमेयत्व नसल्याने त्याची सिद्धी प्रमाणांनी होत नाही.

सत्ता प्रकाश सुख । या तिहीं ती उणे लेख ।

जैसें विखपणेंची विख । विखा नाहीं ।। अमृ. प्र. ५.१

सहावे प्रकरण शब्द खंडनाचे आहे. शब्दाची ताकद अनन्य साधारण आहे आणि तितकीच ती भयंकरही आहे. शब्दाविणा सामान्य व्यवहारही ठप्प झाले असते. ज्ञानाची कवाडे बंद झाली असती.

म्हणजेच शब्द हे दुधारी हत्यार आहे. म्हणून शब्दखंडन प्रकरणांतील पहिल्या अकरा ओव्यात माउलींनी शब्दाची स्तुती केली आहे. परंतु लगेचच माउली म्हणतात की परमेश्वराच्या अनुभूतीला शब्द निरुपयोगी आहेत. कारण ती अनुभूती परब्रह्म श्रीगुरुंकडून मिळवावयाची असते.

बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरणदानीं प्रसिद्धु ।

अमूर्ताचा विशदु । आरिसा नव्हें ।। अमृ. ६.१

किंबहुना शब्दु । स्मरणदानीं प्रसिद्धु ।

परि ययाही संबंधु । नाहीं येथें ।। अमृ. ६.१२

या शब्दाचा निमाला । महाप्रळयो हो सरला ।

अभ्रासवें गेला । दुर्दिनु जैसा ।। अमृ. ६.१०३

सातवे प्रकरण अज्ञान खंडनाचे असून माउलींनी अतिशय सविस्तरपणे याचे विवेचन दोनशेपंच्चाण्णव ओव्यात केलेले आहे. या विषयाची सुरवात माउलींनी सहावे प्रकरणाच्या शेवटच्या ओवीत केली आहे. परमात्म्यापेक्षा भिन्न असे जग अस्तित्वात नसून सर्वत्र केवळ तोच आहे हा अद्वैत विचार या अज्ञान खंडनात आहे. परमात्मा जर ज्ञान स्वरूप आहे तर येथे अज्ञान राहूच शकत नाही. म्हणजेच अज्ञान अस्तित्वातच नसते. अज्ञान कोणत्याही प्रमाणांनी अथवा त्रिपुटींनी सिद्ध करता येत नाही. परमात्माच दृश्य होऊन आपल्याला विविध रूपांनी दिसत असतो. दृश्याला स्वयंप्रकाश परमात्म्यावाचून भिन्न सत्ताच नाही.

भलतेन विन्यासें । दिसत तेणेंचि दिसे ।

हा वांचूनि नसे । येथें काहीं ।। अमृ.प्र.७.२३५

लेणें आणि भांगारें । भांगारचि एक स्फुरे ।

का जेथें दुसरें । नाहींचि म्हणोनि ।। अमृ.प्र.७.२३६

जळ तरंगीं दोन्ही । जळां वांचूनि नाहीं ।

म्हणौनि आन कांहीं । नाहीं ना नोहे ।। अमृ.प्र.७.२३७

या लागीं वस्तुप्रभा । वस्तुचि पावे शोभा ।

जात असे लाभा । वस्तुचियां ।। अमृ.प्र.७.२९१

वरील ओव्यांच्या रूपाने ज्ञानदेवांनी चिद्विलासवाद किंवा स्फूर्तिवाद मांडला आहे.

आठवे प्रकरण हे ज्ञानखंडनाचे आहे. चौथ्या प्रकरणात माउलींनी जेथे अज्ञान नाही तेथे ज्ञान स्वयंभू आहेच व आत्म्याचे स्वरूपही स्पष्ट केले आहे. हा आत्मा दिसतही नाही मग त्याला समजायचे कसे? तो भावजाणिवेने व गुरुकृपेने जाणवतो. श्रीगुरुंनी आम्हाला परमात्मस्वरूपात एकरूप केले आहे.

तैसे आमुचेनि नांवे । अज्ञानाचें ज्ञानही नव्हे ।

आम्हांलागीं गुरुदेवें । आम्हीच केलों ।। अमृ.प्र. ८.१

ही आहे भक्ताची, माउलींची आत्मस्थिती. ज्ञान अज्ञानापाशी आले किंवा अज्ञान ज्ञानाकडे गेले तर दोन्हीही नाहीशी होतात. स्वस्वरूप आत्मज्ञान प्रकाशापुढे ज्ञानही नाही आणि अज्ञानही नाही.

एवं ज्ञानाज्ञाने दोन्ही । पोटीं सूनी अहनी ।

उदेला चिद्गगनी । चिदादित्यु हा ।। अमृ.प्र. ८.१९

नववे प्रकरण हे जीवनमुक्तदशाकथनाचे आहे. परमेश्वर प्राप्तीच्या मार्गातील शब्द, वाचा, ज्ञान, अज्ञान हे सर्व अडसर जीवभावात परमेश्वर स्वरूपाच्या जाणिवेच्या आड येत होते ते तर संपले. अनुभवाच्या अमृताचा घोट ओठी आल्यावर प्राप्त होते ती जीवनमुक्तदशा. जीवनमुक्त ईश्वरस्वरूप आहे परंतु मिळालेल्या जन्मातील भोग किंवा कर्तव्ये तो ईश्वरी सेवा म्हणूनच पूर्ण करतो. या जीवनमुक्ताचा देवभक्त होतो व ज्ञानवानाची उपासना घडते. देवच देवरूपाच्या साहित्याने देवाचीच पूजा करतो. माउली म्हणतात–

आतां आमोद सुनास जालें । श्रुतीसि श्रवण रिघाले ।

आरिसे उठिले । लोचनेसी ।। अमृ.प्र.९.१

तैसे भोग्य आणि भोक्ता । दिसे आणि देखतां ।

हें सरलें अद्वैता । अफूटामाजीं ।। अमृ.प्र.९.७

अद्वैत दशेचें आंगण । अद्वैत वोळगे आपण ।

भेद तंवतंव दूण । अभेदासी ।। अमृ.प्र.९.२९

देवाचिया दाटणी । देऊळा झाली आटणी ।

देशकालादी वाहाणीं । येईचिना ।। अमृ.प्र. ९.३७

देव देऊळ पारिवारू । कीजे कोरूनी डोंगरु ।

तैसा भक्तीचा वेव्हारु । कां न व्हावा? ।। अमृ.प्र.९.४३

आम्हीं निखळ मा तुझें । वरीं लोभें म्हणसी माझें ।

हें पुनरुक्त साजें । तूंचि म्हणोनी ।। अमृ.प्र.९.६७

दहावे ग्रंथमहिमा प्रकरण हे ज्ञानेश्वरीतील अठराव्या अध्यायाप्रमाणेच आहे. श्रीगुरुकृपेने

स्व-स्वरूपाशी अभेदत्व पावलेल्या भक्ताकडून काही अस्वाभाविक वाटणारी कृत्ये झाली तरी ती ज्ञानी भक्ताची सिद्ध भक्तीच असते. स्वतःबद्दल बोलताना माउली म्हणतात –

परी गा निवृत्तिराया । हातातळीं सुखविलें तूंया ।

तरि निवांतचि मियां । भोगावें कीं तें ।। अमृ.प्र. १०.१

जेथें शिवशक्ती एकरुप होतात तेथे परावाणीही लुप्त होते, श्रीगुरुंच्या औदार्याने झालेला लाभ इतरांना देण्यासाठी हा शुद्ध सिद्धानुवाद आहे आणि अनुभवामृतामुळे तो अधिक सुरस झालेला आहे. या अमृताच्या आस्वादाने मुक्त – मुमुक्षु – बद्ध हे सर्वच शिवरूप होतात. म्हणून ग्रंथाचे शेवटी माउली म्हणतात की या श्रीमंत अनुभवामृतपानाने सर्व जीवनमुक्त अमृतरुप होवोत व त्यांच्या या सोहळ्याचा आनंद सर्व जगाने घ्यावा.

म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृतें येणें ।

सणु भोगिजे सणें । विश्वाचेनि ।। अमृ.प्र.१०.३१

हे माउलीचे अनुभवामृताचे आदर्श अमृत-स्वरूप असे आहे.

## चांगदेव पासष्टी

चांगदेव हे महान योगी तर होतेच, परंतु त्यांनी अनेक वर्षे वेद, उपनिषदे, योग यांचा सखोल अभ्यासही केलेला होता. माउलींनी पैठण येथे रेड्यामुखी वेद वदविले व तेथील महापंडितांचे समोर वेद, उपनिषदे यांवर निरूपण केले. 'मला सर्व काही अवगत आहे, मी ऋद्धिसिद्धींना हवे तसे वापरू शकतो'. हा चांगदेवांचा अभिमान गळून पडला. माउलींच्या समोर जाण्याचेही त्यांना अवघड वाटू लागले. म्हणून

चांगदेवांनी माउलींना पत्र पाठविण्याचे ठरविले. माउलींना चिरंजीव संबोधावे का तीर्थरूप म्हणावे हा अहंकाराचा दंभ मनात उभा राहिला. काहीच निर्णय करता येईना. म्हणून कोरे भूर्जपत्र पत्र म्हणून पाठविले. माउलींचे श्रीगुरू श्रीनिवृत्तिनाथ यांचे हृदय किती दयार्द्र व ऋजु आहे याची प्रचिती येथे येते. ते म्हणाले चांगदेवांचे कोरे पत्र याचाच अर्थ ते मनाने अगदी निर्मळ–चांगा आहेत. ज्ञानदेवा, तू त्यांच्या पत्राचे उत्तर पाठव, माउलींचे पासष्ट ओव्यांचे उत्तर म्हणजे – चांगदेव पासष्टी.

चांगदेव खरोखरीच ज्ञानी असले पाहिजेत म्हणून तर माउलींनी त्यांना उपदेशपर मार्गदर्शनाचे भाव–पत्र पाठविले. चांगदेव पासष्टीत मुख्यत: एकच विषय आहे. ''तत् त्वम् असि।'' या महावाक्याचा बोध माउली चांगदेवांना करतात. चांगदेव ज्ञानी होते, योगी होते, श्रीशिवाचे भक्त होते. परंतु जो विश्वव्यापक परमात्मा आहे, जो सर्वांतर्यामी आहे, तोच 'मी' आहे, तीच 'माउली' आहे व तोच श्रीशिवही आहे हे चांगदेवांना उमगले नव्हते. हा भक्तिसहित ज्ञानाचा बोध चांगदेव पासष्टीत आहे. इथे भक्तीही आहे व बोधही आहे, म्हणून माउली प्रेमाने चांगदेवांचा उल्लेख वटेश, वटेश्वराचा पुत्र, चांगया, सखया, चक्रपाणी असा करतात. 'तत् त्वं असि'। या महाबोधातील 'तत्' पदाचे विवरण पहिल्या छत्तीसव्या ओव्यात आहे व सदतीसाव्या ओवीत महाबोधाचा उपदेश केलेला आहे.

तया पुत्र तूं वटेश्वराचा। रवा जैसा कापुराचा।

चांगया, मजतुज आपयाचा बोलु ऐके ।। चां.पा. ३७

या ओवी पासून 'त्वं' पदाचे येथून पुढे विवरण केले आहे. छप्पनाव्या ओवी पासून पुढे 'असि' पदाचे विवरण केले आहे. नाथसंप्रदायाचा हाच महाबोध आहे. आपल्याच ठिकाणी आपण आपलीच भेट घ्यायची हे चांगदेव पासष्टीचे गर्भसूत्र आहे. हा बोध केवळ चांगदेवासाठी नसून प्रत्येक ईश्वरभक्तासाठी आहे. म्हणून माउली म्हणतात –

तिथे परी जो इया। दर्पण करील ओंविया।

तो आत्मा एवढिया। मिळेल सुखा।। चां.पा.६३।।

आणि यासाठी साधकाने काय करावे हे शेवटच्या दोन ओव्यात सांगतात –

नाहीं तेची काय नेणों असे। दिसें तेंचि कैसे नेणों दिसे।

असे तेंचि नेणों आपैसें। तें कीं होईजे।। चां.पा. ६४।।

निदेपरौतें निदैजणें। जागृति गिळोनी जागणें।

केलें तैसें गुंफणें। ज्ञानदेवो म्हणे।। चां.पा.६५।।

चांगदेव पासष्टीच्या ओव्यांमधील प्रत्येक शब्द अत्यंत सोपा आहे, तरीही त्या समजायला सहज सोप्या नाहीत. सूत्रासारखी त्यांची मांडणी आहे. ब्रह्मसूत्रात ज्याप्रमाणे अगदी मोजक्याच शब्दांत खूप मोठा गर्भित अर्थ असतो तशी ही वेदांत, भक्ति, योग यांची पासष्ट सूत्रे आहेत. पासष्टीतील तत्त्वज्ञान निश्चयात्मक स्वरूपाचे आहे. माउलींनी चांगदेवांना परमेश्वर-तू-मी एकच आहोत, पूर्वीही होतो, आजही आहोत, युगानुयुगेही एकच राहणार आहोत हेच सांगितले. कारण या विश्वात व त्या बाहेरही त्या सर्वात्मक ईश्वराशिवाय काहीही नाही. प्रत्येक वस्तू ही ईश्वरमय आहे.

चांगदेवाला आत्मज्ञान प्राप्त करून देणे हे चांगदेव पासष्टीचे मुख्य कार्यकारण आहे. त्यासाठी या पासष्ट ओव्या. ईश्वरी ज्ञानाशिवाय सर्व ज्ञान व विद्या फोल आहेत, हे माउली आग्रहाने सांगतात.

चांगदेव हे साधनचतुष्ट मुमुक्षु असल्याने श्रीगुरू निवृत्तिनाथांनी माउलींना चांगदेवांना 'तत्त्वं असि।' या महाबोधाचा उपदेश करण्याची आज्ञा दिली. चांगदेव पासष्टी हे माउलींचे श्रेष्ठ दर्जाचे तत्त्वज्ञान विषयक कार्य आहे. पासष्टीत कमी ओव्या असल्याने माउलींनी अत्यंत महत्त्वाच्या तत्त्वज्ञान विषयावरच मन केंद्रित केले आहे. तरीही त्यातून ज्ञानदेवांनी थोडक्या शब्दात आपले तत्त्वज्ञानाचे सिद्धांत मांडले आहेत.

पासष्टीत माउलींनी थोडक्या शब्दांत परमेश्वर, विश्व व जीव तसेच परमात्म्याचे स्वरूप, इंद्रीयगोचर विश्व आणि जीवात्मा यांचे स्वरूप व परस्पर संबंध याबद्दल भारतीय तत्त्ववेत्त्यांच्या भाषेत सांगितले आहे. विश्वाच्या विषयाला अधिक महत्त्व देऊन त्यासाठी जास्तीत जास्त ओव्यांत मांडणी केली आहे. माउली पूर्णाव्दैती असून, परमेश्वर हा एकमेव असून 'सच्चिदानंद' हेच त्याचे स्वरूप आहे हे त्यांनी स्पष्ट केले आहे. पासष्टीत परमेश्वरालाच 'वटेशु' संबोधले आहे. माउली ज्या भगवान विष्णूचे अवतार आहेत त्या स्वत:ला व चांगदेवांना 'जीव' म्हणून संबोधले आहे. माउली अद्वैत वेदांती असून त्यांनी वेदातील पुढील तीन सिद्धांत मांडले आहेत. १) परमेश्वर एकमेव असून त्याचे स्वरूप 'सच्चिदानंद' असून तो शब्दांच्या व मनाच्या अतीत आहे. २) आपल्या सभोवती असलेले सर्व भौतिक विश्व हे केवळ त्याचेच विराट स्वरूप असून त्याचेच प्रकटीकरण आहे. म्हणजेच आपल्याला दिसणारे सर्व शुद्ध ब्रह्म आहे. ३) प्रत्येक जीव हा परमेश्वराचेच स्वरूप म्हणजेच 'ब्रह्म' आहे. 'जीवः ब्रह्मैव नापर:।' माउलींच्या सर्व वाङ्मयातही माउलींनी

याच सिद्धांताचा मागोवा घेतला आहे. पासष्टीचा महाबोध 'तत् त्वं असि । हे चांगदेवांना माउलींनी 'तेया पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापराचा । चांगया मज तुज आपणयाचा । बोलू ऐके ।। चां.पा.३७ ।। या शब्दात बोधिले आहे. पासष्टीचे वैशिष्ट्यच हे आहे की माउली दोन जीवातील आत्म्यांचे अद्वैततत्त्व उघडपणे मांडतात. पासष्टीत माउली स्वत: व चांगदेव यांचे व्यक्तिगत संबंधांचे दृष्टीने हे अद्वैत अत्यंत महत्त्वाचे आहे. 'जे जे भेटे भूत । त्यासी मानी भगवंत ।।' हा पासष्टीचा विचार अद्वैताचा असून माउलींनी श्री वटेश(परमात्मा) आणि जगत्, वटेश आणि चांगदेव (जीव) आणि माउली व चांगदेव या दोहोतील अद्वैत स्पष्ट केले आहे. माउली अद्वैताच्या याच अन्वयावर जोर देतात की हे सर्व पूर्णतया ब्रह्म आहे. माउली पासष्टीच्या बाराव्या ओवीत म्हणतात -

तेंवी शिवोनि पृथ्वीवरी । भासती पदार्थांचिया परी ।

प्रकाशे तें एकसरी । संवित्ति हे ।। चां.पा.१२

माउलींच्या या तत्त्वज्ञानास 'चिद्‌विलासवाद' असे संबोधले आहे. ज्याचा स्पष्ट अर्थ हाच आहे की जाणवणारे सर्व विश्व हा त्या सत्‌चा म्हणजेच ईश्वराचा (सत्-चेतनेचा) विलास आहे. पासष्टीतील आणखी एक उल्लेखनीय गुण असा आहे की ज्ञानेश्वरांनी दृष्यादि त्रिपुटीच्या सापेक्ष-ज्ञानाचे कथन केले आहे. (द्रष्टा- दृष्य-दर्शन) या बहुविश्व दृश्यामधून आत्म्यैक्य किंवा स्वानुभूती हे ध्येय आहे. कारण पासष्टीच्या चोपन्नाव्या ओवीत माउलींनी द्रष्टा व दृष्य यांच्या सापेक्ष भावाने दर्शन व्यवहार होतो, हे स्पष्ट केले आहे. पासष्टीच्या त्रेसष्ठाव्या ओवीत माउली आपल्याला आश्वासन देतात की या पासष्टीच्या प्रकाशात जे आपुले आयुष्य पाहतील व त्याप्रमाणे वागतील त्यांना परमसुख प्राप्त होईल. माउली म्हणतात -

तियेपरी जो इया । दर्पण करील ओविया ।

तो आत्मा एवढिया । मिळेल सुखा ।। चां. पा.६३ ।।

माउलींना चांगदेवांना अपेक्षित शारीरिक भेटीत स्वारस्य नव्हतेच. त्यांना हवी होती दोन आत्म्यांची, दोन ईश्वर स्वरूपांची भेट.

ज्ञानेश्वरीच्या शेवटी पसायदानात माउलींनी मागितलेल्या आशीर्वादाने व अमृतानुभवाच्या शेवटच्या ओवीत मागितलेल्या अमृतप्रसादाप्रमाणेच चांगदेव पासष्टीत माउली मागतात की -

तियेपरी जो इया। दर्पण करील आवियां।

तो आत्मा एवढिया। मिळेल सुखा ।चां.पा.६३।

येथ म्हणे श्रीविश्वेश्वरावो। हा होईल दान पसावो।

येणें वरे ज्ञानदेवो। सुखिया झाला ।। ज्ञा.१८.१८०१

म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे। अनुभवामृतें येणें।

सणु भोगिजे सणे। विश्वाचेनि ।। अमृ.१०.३१

## अभंग

माउलींनी त्यांच्या पंढरपुरातील वास्तव्यात जे अभंग लिहिले त्यात त्यांनी 'बापरखुमादेवीवरू' ही मुद्रा लिहिली असावी. पंढरीच्या विठ्ठल-रखुमाई इतकीच त्यांची श्रद्धा, भक्ती व आदर त्यांच्या आई - वडिलांचेबद्दल त्यांना होता. त्याच श्रद्धेने, भक्तिभावाने त्यांच्या आई - वडिलांचीही जी नावे होती त्या विठ्ठल - रखुमाई यांची काममुद्रा त्यांनी धारण केली असणे गैरही नाही, उलट ते योग्यच आहे. ज्ञानदेव व तुकाराम यांचे शेकडो अभंग वारकऱ्यांना मुखोद्गत असतात. त्यांचे पुढील अभंग तर नेहमीच गायीले जातात -

रूप पाहतां लोचनीं । सुख जालें वो साजणी ।। ज्ञा.गा. १

देवाचिया द्वारी उभा क्षणभरी ।। (हरिपाठ)

माझे जीवींची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ।। ज्ञा.गा.६१

अवघाची संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्हीं लोक ।। ज्ञा.गा. ५४

घनु वाजे घुणघुणा । वारा वाजे रुणझुणा ।। ज्ञा.गा.१९० विरहिणी

पैल तो गे काऊ कोकताहे । शकुन गे माये सांगताहे ।। ज्ञा.गा.१८८ विरहिणी

इवलेंसें रोप लावियलें द्वारीं । तयाचा वेलू गेला गगनावरी ।। ज्ञा.गा.२३४

विश्वाचे आर्त माझे मनीं प्रकाशलें । अवघेचि जालें देहब्रह्म ।। ज्ञा.गा.६६४

गाथेतील अभंग वाचण्यास सुरूवात केली की प्रथम समोर येणारे अभंग विश्वचैतन्याच्या सगुण -

निर्गुण स्वरुपाकडे आपले लक्ष वेधतात. ज्ञानदेवांना सर्वत्र सगुणात निर्गुण परमात्मा आणि त्याच वेळी निर्गुणात परमात्म्याचे सगुणत्व प्रत्ययास येते. ज्ञानेश्वरीप्रमाणेच अरूपाला वेगवेगळ्या रूपकांनी सरुप करण्याची प्रज्ञा अनेक अभंगातून दिसते. ही किमया ते कृष्णरूपाचे, विठ्ठलरूपाचे प्रमाण घेऊन समर्थपणे मांडतात. अव्यक्त व्यक्त रूपात मांडताना ज्ञानेश सांगतात -

[१]निळिये मंडळी । निळवर्ण सांवळी ।

तेथें वेधिलिसे बाळी । ध्यानरूपा ।।

वेधु वेधला निळा । पाहे घननीळा ।

विरहणीं केवळा । रंग रसनें ।। ज्ञा. गा. ८

निळिये पेरणी । निळिये वाहाणी ।

गुणाचीं लेणीं । कृष्णवर्ण ।।

नवलाव गे माय । नवलाव चोज ।

निळीं निळीमा काज । आकारलें ।। ज्ञा. गा. १०

निळें हे व्योम निळें हें सप्रेम । निळेंपणें सम आकारलें ।।

नीळवर्ण ब्रह्म नीळवर्ण कर्म । नीळवर्ण आश्रम गुरु देखे ।। ज्ञा. गा. ३०

सांवळियाचें तेज सावळा श्रीहरि । शेज बाज वोवरी ब्रह्मांडाची ।।

गृहदारा दिनमणि तेज देऊनि मेदिनी । मेरु प्रदक्षणि आप होय ।। ज्ञा. गा. ३१

अव्यक्ताला व्यक्त करताना निळा, सावळा, काळा ही रूपके व्यक्तातील श्रीकृष्ण, पांडुरंग यांचीच (श्रीरंगाची) स्वरूपे मांडतात. ज्ञानेश्वरीप्रमाणेच अरूपाचे रूप इंद्रियगोचर करण्यासाठीही अरूपाच्या रंगमूर्तीमध्ये रंगांची उधळण आहे. निळवर्ण, निळेव्योम वाचताच डोळ्यासमोर उभा राहतो सावळा घननीळ श्रीकृष्ण आणि गोपवेषधारी सावळा विठ्ठल. अशा प्रकारच्या अनेक अभंगातून ही अनाम अव्यक्त अनुभूती व्यक्तात उभी राहाते. आणि हे अनाम अव्यक्त 'विठ्ठल' 'गोविंदु', 'गोपाळु' या शब्दांनी व्यक्त होते.

ज्ञानदेवांची 'डौर, सौरी, फुगडी, पांगुळ, आंधळा, धोंगडी' इत्यादि लोकजीवनावरील अभंग रचना

---

१. श्री. कुलकर्णी वा. ल., ज्ञानेश्वर चिंतन, ज्ञानेश्वरांची अभंगवाणी, पान ६०

करून रूपका द्वारे अध्यात्म सामान्यांपर्यंत नेले आहे. पुढील काळात एकनाथांनी जन-जीवनावर जी अनेक भारुडे लिहिली त्याची ही पायाभरणीच मानावी लागेल.

तूं माझा स्वामी मी तुझा रंक । पाहतां न दिसे वेगळिक ।।

मी तूं पण जाऊंदे दुरी । एकचि घोंगडें पांघरुं हरी ।।

रखुमादेविवरा विठ्ठलराया । लागेन मीं पाया वेळोवेळां ।। ज्ञा. गा. १२१

असे वरवर साधे दिसणाऱ्या परंतु सामान्यांच्या जीवनात अंतरंगात प्रवेश करणारे अनेक अभंग ज्ञानेशांनी मांडले आहेत.

तुझीये निढळीं कोटि चंद्र प्रकाशे । कमल नयन हास्य वदन हांसे ।। ज्ञा. गा. ९९

कोंवळें ठुसठुसित मोतियांचे घड । शृंगारिलें गूढ जया लेणीं ।। ज्ञा. गा. १००

अशा सारखे अभंग परमस्वरूपाबद्दल सांगतातच, पण त्याच बरोबर ज्ञानदेवांच्या शब्दब्रह्माची जाणीवही करून देतात. हे आहे ज्ञानेशांच्या प्रतिभेचे अमोलत्व.

[१]ज्ञानदेवांच्या गौळणी व विरहिणी यांना संत साहित्यात तोड नाही. ज्ञानेश्वरांच्या गौळणी कृष्णप्रेमाने वेड्या होतात परंतु त्यात वासना नाही. आहे ते निखळ कृष्णभक्ती. 'ज्ञानेश्वरांच्या गौळणींचा आणि विरहिणींचा इतर संतकवींच्या गौळणी विरहिणीपेक्षा असणारा वेगळेपणा आपणांस ठिकठिकाणी जाणवल्याखेरीज राहात नाही इतकी ती कृष्णरूप झालेली आहे.'

मनें करुनि कुटिल उकलुनि श्रृंगारें । ते लावण्याच्या अपारें पडिलें वो माये ।।

माझें कुटिळपण गेलें कुटिळपण गेलें । गोविंदें वोजाविलें निजरूप वो माये ।।

बापरखुमादेविवरू माझें कुटिल फेडूं आला । विटेवरी मालाथिला निजरूपें वो माये ।।

ज्ञा.गा.१७४

कृष्णें वेधली विरहिणी बोले । चंद्रमा करितो उबारा गे माये ।।

न लावा चंदनु न घाला विंझणवारा । हरिविणें शून्य शेजारू गे माये ।।

माझे जिवींचें तुम्हीं कां वो नेणा । माझा बळिया तो पंढरीराणा वो माये ।। ज्ञा. गा. १७६

---

[१]. श्री. कुलकर्णी वा. ल., ज्ञानेश्वर चिंतन, ज्ञानेश्वरांची अभंगवाणी, पान ५७

ज्ञानदेवांच्या गौळणी भक्तीने भारावलेल्या आहेत आणि विरहिणीत आहे.

हे सर्व भक्तीमय काव्य ईश्वरचरणी समर्पण केले आहे. शृंगारात वैषयिकतेचा लवलेशही नाही. आपण ज्ञानेशांच्या पुढील विराण्या रोजच ऐकतो.

पैल तो गे काऊ कोकताहे । शकुन गे माये सांगताहे ।। ज्ञा. गा. १८८

घनु वाने घुणघुणा । वारा वाजे रुणझुणा ।

भवतारकु हा कान्हा । वेगीं भेटवां कां ।। ज्ञा. गा. १९०

या विराण्या स्त्रीत्वाचे सर्व पैलू दाखवितात पण ते आहे समर्पिततेचे लक्षण, सर्वेश्वराच्या पायीचे समर्पण.

ज्ञानदेवांच्या सर्व अभंगातून ते आपल्याला विश्वेश्वराशी, विश्वचैतन्याशी सर्वभावे एकरूप करतात. ईश्वराची आठवण, प्रार्थना करताना ते आपल्यात व ईश्वरात वेगळेपण ठेवत नाहीत. त्यांचा प्रत्येक अभंग जरी त्यांनी स्वतःसाठी लिहिला असला तरी तो आपल्यासाठी मात्र शब्दसोपान आहे.

ज्ञानेश्वरांच्या अभंगांची अनुभूती घेताना ते वाचणाऱ्याला सामान्य जगापासून अलगद उचलून विश्वचेतनेच्या प्रांगणात नेतात. कारण तिथे आहे पूर्ण विमुक्तीचा आनंद. हे सर्व लिहित असताना त्यांच्या मनातील 'विश्वाचे आर्त' विसरलेले नाही, आणि त्याच बरोबर विसरले नाही त्यांचे श्रीगुरू प्रेम.

[१,२] मी माझें द्वैत अद्वैत होउनि ठेलें । सद्गुरू एका बोलें ठेविलें ठायीं ।।

द्वैत गिळी अद्वैत मेळीं । चित्ताची काजळी तोडी वेगीं ।।

ज्ञानदेव म्हणे निवृत्ति उदार । दीपीं दीप स्थिर केला सोयी ।। ज्ञा. गा. २४०

ज्ञानदेवांची अभंगवाणी वाचताना तोंडात हळुवारपणे विरघळणारा खडीसाखरेचा खडा जसा आनंद देतो, तितकीच ज्ञानेशांच्या अभिव्यक्तीची प्रसन्नता जाणवते. ही श्रेष्ठता, ही शब्दांची ऋजुता, स्नेहलता केवळ ज्ञानेशांचीच. या परीस अन्य होणे नाही.

ज्ञानदेव अभंगात सांगतात की पंढरी, भीमा, पुंडलिक आणि विठ्ठल यांचे दर्शन घेणाऱ्यास मरण नाही.

---

१. श्रीसकलसंतगाथा, खंड १ ज्ञा. गा.,

२. श्रीसकलसंतवाणी, खंड १ ज्ञा. गा.

बापतीर्थ पंढरी । भूवैकुंठ महीवरी ।।

भक्त पुंडलिकाचे द्वारी । कर कटावरी राहिला ।।

आड वाहे भीमा । तारावया देह आत्मा ।।

पैलथडीस परमात्मा । मध्य राहिला पुंडलिक ।।

या तिहींचें दरूशन । प्राण्या नाही जन्म मरण ।। ज्ञा. गा. ६४

सर्वात महत्त्वाचे म्हणजे माउलींनी आपल्या 'बालछंदाचे' अभंगातील नव्वदाव्या ओवीत श्रीहरीकडे समाधीची परवानगी पूर्वीच मागितली आहे व श्रीहरिने ती त्यांना दिली आहे हा ज्ञानदेवांचा आदर्श अवर्णनीय आहे.

''ज्ञानदेवें घेतलें दान । हृदयीं धरुनिया ध्यान ।

समाधि वैसला निर्वाण । कथा कीर्तन करीतु ।।

बालछंदो बावीस जन्में । तोडिर्ली भवाब्धिर्ची कर्मे ।

चंद्रार्कतारांगणें । रश्में दान घेतला हरि ।।'' ज्ञा. गा. (बाळछंद)७२७

श्रीमाउलींच्या आदर्शाला व आदर्श तत्त्वज्ञानाला अंत नाही. कारण कितीही लिहिले तरी मनात ओढ शिल्लक असतेच की, अजून खूप सांगण्यासारखे आहे. अर्थात हा कर्तृत्वाचा आदर्श व तत्त्वज्ञान सिमीतात मांडण्याचा प्रयत्न आहे.

## हरिपाठ

शके बाराशे बारोत्तरे भगवद्गीतेवरील टीका 'भावार्थ दीपिका' पंधरावे वर्षी पूर्ण झाली. सोळाव्या वर्षी सद्गुरू आज्ञेने 'अनुभवामृतही' पूर्ण झाले. निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताई आळंदीस आले. आळंदीस शुद्धिपत्राची गरजच लागली नाही. प्रचंड जनसमुदाय या सर्वांच्या दर्शनास लोटला. म्हातारी गोविंदपंत व नीराबाई डोळ्यात प्राण आणून आपल्या ईश्वर स्वरूप नातवंडाची वाट पाहत होते. विठ्ठलपंत व रुक्मिणी यांच्या आत्मत्यागाचे दु:ख या भावंडांना बघून कमी झाले असेल. त्यांनाही जीवन कृतार्थ झाले असे वाटले असेल. (गोविंदपंत व नीराबाई यांचा मृत्यू या पूर्वीच किंवा नंतर झाल्याचा उल्लेख

कोठेही नाही.) पैठणास त्यांचे मामा कृष्णाजीपंत देवकुळे यांनी मुलांना ब्रह्मसभेपुढे नेल्याची नोंद [१] कै. भिंगारकरांचे ग्रंथात आहे. आळंदीस आल्यावर संत चांगदेवांचा भ्रमनिरास झाला व त्यांच्या कोऱ्या पत्रास गुर्वाज्ञेने माउलींनी पासष्ट ओव्यांची चांगदेव पासष्टी लिहिली. ज्ञानदेवांचे अवतार्य माहात्म्याचा प्रत्यय येवून विठोबा चाटी ज्ञानदेवांचे चरणी लागले. विठोबा वेदवेत्ते पण कर्मठ सनातनी, म्हणून त्यांनी प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे विठ्ठलपंत-रुक्मिणी व चारही भावंडांना छळले. परंतु त्यांचा पश्चाताप खरा होता. यावर रागावला तर तो ईश्वर कसला? माउली पूर्वीचे सर्व विसरली. क्षमा करण्यापेक्षा त्यांनी विठोबा चाटींना प्रेमाने जवळ केले व गुरूपदेश केला व नाथसंप्रदायात घेतले, व भागवतधर्म प्रसारासाठी औंढ्या नागनाथला पाठविले. याच काळात त्यांनी श्रीहरीकडे समाधीची परवानगी मागणारे 'बालछंदाचे' अभंग लिहिले असावेत. पैठणला शुद्धिपत्रासाठी जाण्याच्या कालखंडापासून ज्ञानेशांनी आपल्या पुढील आयुष्यातील प्रत्येक दिवसाचे नियोजन आपल्या मनी निश्चित केले असले पाहिजे. अगदी पूर्ण योजनाबद्ध. कारण अंतिम समाधीचा काळ, दिवसही निश्चित झालेला होता. म्हाताऱ्या आजी-आजोबांनाही भेटून त्यांचे शेवटचे आशीर्वाद घेतले असतील.

आळंदीतील समाधीपूर्वीचे कार्य पूर्ण झाले होते. आता ज्ञानेशांना पंढरपूरची ओढ लागली असावी. नाथपंथात क्रांतिकार्य करणाऱ्या गहिनीनाथांनी नाथपंथात केवळ योगाच्या साधनेवर न थांबता त्याबरोबर श्रीकृष्णाच्या नामजपाचा अनुग्रह आपला शिष्य निवृत्तिनाथांना दिला. श्रीनिवृत्तिनाथांनी आपल्या एकुलत्या एक शिष्यास ज्ञानदेवास अनुग्रह देतांना नाममंत्र दिला. ज्ञानदेवांनी योगसाधनेबरोबरच नामजपाचाही थोर अभ्यास केला. त्यांना भगवान कृष्णाचे नामजपाने सगुण व योगाने परमेश्वराच्या निर्गुण स्वरूपाचेही दर्शन झाले. भगवंत प्रत्येकाचे हृदयात असून या सहज सोप्या नामस्मरणाने त्याचे दर्शन होते हे ज्ञानेश्वरांनी पूर्णपणे अनुभविले होते.

पंढरपुरी सर्व भक्तांना केवळ पांडुरंगाचे मुखदर्शन किंवा कळसाचे दर्शन घेऊन समाधान मानावे लागत होते. सर्व भक्तांना भक्तीचा सोपा मार्ग हरिपाठातून ज्ञानदेवांनी दाखविला. तो प्रसंग चंद्रभागेच्या वाळवंटी कसा उभा राहिला असेल याचे माझ्या मनातील दृश्य मी गेली पन्नास वर्षे अनुभवीत आहे. ते तसेच येथे मांडले आहे. ज्ञानदेवांचा हरिपाठ वारकऱ्यासमोर येण्यास यापेक्षा सुयोग्य वेळ नसावी.

---

१. वे. शा. सं. भिंगारकर श्री. र. महासाधु श्रीज्ञानेश्वर चरित्र. पान.५२

## विठ्ठल विठ्ठल गजरी । अवघी दुमदुमली पंढरी ।

पंढरपुरात संत नामदेव, चोखोबा, गोरोबाकाका, सावतामाळी, सेना, जनाई, सोयरा, मंजुळा, बंका हे सारे ज्येष्ठ संत या बालयोग्यांची आतुरतेने वाट पाहत होते. सोळावे वर्ष संपलेले असावे. या संतांची पंढरपूरच्या चंद्रभागेच्या वाळवंटात भरलेली मांदियाळी म्हणजे ईश्वरानेही हेवा करावा असे दृश्य. विटेवरचा पांडुरंगही आनंदाने गहिवरला असेल. निवृत्तिनाथांचे प्रवचन व ज्ञानदेवांचे कीर्तन, किंवा ज्ञानदेवांचे प्रवचन व नामदेव, गोरोबा, चोखा यांचे कीर्तन ऐकताना सारी पंढरी चंद्रभागेकाठी अवतरली. चंद्रभागेच्या वाळवंटात भाविकांचा महापूर लोटला. साधारणपणे अडीच तीन वर्षे या भावंडांची पंढरी व महाराष्ट्रातील अन्य गावे येथे प्रवचन-कीर्तन यासाठी जाणे झाले असावे. प्रत्येक ज्येष्ठ भक्तास माउली आपले गावी यावी ही ओढ असणारच. पुंडलिकानंतर असे भाग्य पंढरीला व आसमंताला प्रथमच लाभले होते. माउली व भावंडे सर्व ज्येष्ठ संतांपेक्षा वयाने लहान म्हणून ज्येष्ठांचा मान त्यांनी राखला. परंतु आषाढी-कार्तिकी मात्र पंढरपूरातच. पंढरपुरात माउलीचे ध्यानी आले की वारीच्या सर्वांसच पांडुरंगाचे दर्शन घेण्याचा अधिकार नाही. राउळाच्या पायरीवरच त्यांनी मस्तक ठेवायचे. हेच त्यांच्या लाडक्या विठुरायाचे दर्शन. माउलींनी हेही जाणले की चोखोबा, बंका, सेना, जनाई, सोयरा, मंजुळा यांची भक्ती खूप श्रेष्ठ आहे व त्यांनी नामजपाने पांडुरंगाचे ध्यान जाणले आहे व त्यांना भगवंताची कृपापण मिळालेली आहे. पण बहुजन समाजातील भक्तांचे (वारकऱ्यांचे) समाधान कोण करणार? त्यांची ही खंत चोखोबांसारखी, नामदेवांच्याही डोळ्यातून दिसत असावी. आषाढीस विठ्ठलदर्शन न मिळाल्याने केविलवाण्या नजरेने कळसाचे दर्शन घेणारे बहुजन वारकरी माउलींनी पाहिले. माउलीसुद्धा मनी कळवळली. देवा तुझ्या व्दारी आलो तुला पाहण्याला । तुझे मुख पाहूनि जातो माघारा।। हे ज्ञानदेवांनाही पाहवले नाही. त्यांना आठवण झाली गहिनीनाथांची व आपल्या सद्गुरू निवृत्तिनाथांची. त्यांना आठवण झाली त्यांनी दिलेल्या नामजपाच्या माहात्म्याची. सोयरा, चोखा हे जाणकार श्रेष्ठ भक्त असूनही त्यांच्या तोंडून सामान्यांना विठ्ठल दर्शन न झाल्याची खंत बाहेर पडताच, ज्ञानदेवांसारखा स्थितप्रज्ञ, समाधीघनात रमणारा संतही हेलावला. त्यांना जाणवले की या सर्व बहुजन वारकऱ्यांना खऱ्या नामजपाचे महत्त्व समजलेच पाहिजे. त्यांच्या हृदयीचा पांडुरंग त्यांना 'याची देही याची डोळा' दर्शन देईल.

चोखोबा म्हणतात –

वारंवार किती करूं करकर । माझा तंव आधार खुंटलासे ।।१ ।।

न बोलावें आतां हेंचि शहाणपण । होऊनि पाषाण पडे द्वारीं ।।२ ।।

केंव्हां तरी आम्हां होईल आठव । हाचि एक भाव धरूं आतां ।।३ ।।

चोखा म्हणे मग येशील गिवसित । तोंवरी हें चित्त दृढ करूं ।।४ ।। चो. अ. १०९

संत चोखोबांची पत्नी संत सोयरा म्हणते –

माझें मन तुमचे चरणीं । तूंचि माझा देवा धणी ।।१ ।।

धरणें घेऊनी दारांत । बैसलेंसे नाम गांत ।।२ ।।

दुजा धंदा कांहीं नेणें । तुमचे कृपेचें पोसणें ।।३ ।।

व्दारीं बैसोनी हांका मारी । म्हणे चोख्याची महारी ।।४ ।। सो. अ.२७

मग 'विश्वाचे आर्त माझे मनी प्रकाशले । अवघेचि जालें देह ब्रह्म ।' असे ज्याचे हृदय ती ज्ञानेश्वर माउलीही कळवळली यात नवल ते काय?

या सर्वांना मुक्तीचा मार्ग उघड झालाच पाहीजे.

निवृत्तिनाथ, माउली, सोपानदेव व मुक्ताई आपल्या प्रवचन कीर्तनातून गावोगावी नामजपाच्या भक्तीचे माहात्म्य सांगत होते. नामदेव, गोरोबाही सांगत. शके बाराशेपंधराची आषाढी वारी असावी. अवघी पंढरी टाळ मृदुंगांच्या नादाने व विठ्ठलनामाच्या गर्जनेने निनादत होती. अनेक वारकरी, माउली त्यांचे सद्गुरू, सोपानदेव व चित्कला मुक्ताई यांना प्रथमच पाहत होते. सर्वांना ते पंढरीनाथाचेच दुसरे रूप माउली रूपाने पाहात आहेत इतका आनंद झाला. पांडुरंगाच्या नामगजराबरोबरच ज्ञानेश्वर माउलींचा नाम गजर आसमंतात निनादला. 'माउली' 'माउली' ही हाक पंढरीभर दुमदुमली. एकादशीला चंद्रभागेच्या वाळवंटी ज्ञानोबांचे प्रवचन आहे व त्यानंतर स्वामी निवृत्तिमहाराज यांचे कीर्तन आहे ही वार्ता सर्व वारकऱ्यात पसरली. ज्यांना पांडुरंगाचे दर्शन झाले व ज्यांना ते झाले नाही त्यांनी कळसाचे दर्शन घेतले. चंद्रभागेचे वाळवंट विठ्ठलभक्तांच्या गर्दीने तुडुंब भरून गेले. माउलींना ऐकण्यासाठी चंद्रभागेचा खळखळणारा प्रवाह शांत झाला असेल.

ज्ञानदेवादि चारही भावंडे, नामदेव, गोरोबा काका, चोखोबा इत्यादी सर्व जेष्ठ संत प्रवचन स्थानी आले. जनाई, सोयरा, मंजुळा या श्रेष्ठ भक्त मुक्ताईजवळ येऊन बसल्या. सारा आसमंत स्तब्ध झाला. एकादशी असूनही पांडुरंगसुद्धा आपल्याच या स्वस्वरूपाला पाहण्यासाठी तिथेच रूक्मिणीसह आला. प्रत्येकाला दिसले की आपण बसलो आहोत तेथून अगदी जवळ माउली बसली आहे. सर्व संत बसले आहेत.

माउली प्रवचनासाठी उभे राहिले. ते तर सुहास्य मुद्रेने सर्वांकडे पाहत होते. त्यांनी हात जोडले. सर्व वारकऱ्यांनी पांडुरंगाच्या नामाचा व माउलींच्या नावाचा गजर केला. माउलीनी नमस्काराने सर्व वारकऱ्यांच्या हृदयाचा ठाव घेतला. शांतपणे जाऊन आपल्या सद्गुरूंच्या पायी मस्तक ठेवले. निवृत्तिसद्गुरूंनी आपला आशीर्वादाचा हात त्यांचे मस्तकी ठेवला. त्या नंतर माउलींनी ज्येष्ठ वयोवृद्ध संत गोरोबाकाका यांचे पायी मस्तक ठेवले. गोरोबांच्या डोळ्यातून आनंदाश्रूंची नदी वाहत होती. त्यांनी भक्तीने उठून ज्ञानोबांना छातीशी कवटाळले. ज्ञानदेवांनी पुढे जाऊन ते नामदेवांपुढे वाकणार तेवढ्यात भरल्या डोळ्यांनी उठून नामदेव ज्ञानेशांचे मिठीत शिरला. चोखोबांचे समोर ज्ञानदेव येताच त्यांना प्रत्यक्ष परब्रह्मच आपले समोर उभे असलेले दिसले. त्यांनी ज्ञानदेवांच्या पायांना मिठी मारली. ज्ञानदेव शांतपणे प्रवचनासाठी उभे राहिले. ज्ञानदेवांनीच 'पुंडलीकवरदा हरि विठ्ठल' ही नामांजली पांडुरंग चरणी वाहिली. ज्ञानदेवांचा प्रत्येक शब्द या हजारो वारकऱ्यांपैकी प्रत्येकाला अगदी जवळून ऐकू येत होता.

ज्ञानदेव आपल्या अमृतवाणीने बोलू लागले. ''माझ्या संतांनो व मायबाप वारकऱ्यांनो, तुम्ही धन्य आहात. कारण तुम्ही वारीसाठी पांडुरंगाचे घरी पंढरीला येता. तो सांभाळून तुम्हाला घेऊन येतो. भगवंताचे नाम घेत घेत तुमच्या दिंड्या पंढरपुरात येतात. त्याच्या नामस्मरणाने भगवंताचे अनुसंधान तुम्ही ठेवीत असता. या अनुसंधानाचेच पर्यावसान भगवंत दर्शनात होते. माझे सद्गुरू निवृत्तिनाथ यांना नाथपंथाचा अनुग्रह देताना त्यांचे श्रीगुरू गहिनीनाथ यांनी नाथपंथाची दीक्षा देतानाच श्रीकृष्णाचे नावाचा नाममंत्रही दिला. माझे श्रीगुरूंनी मला अनुग्रह देतानाही दीक्षे बरोबरच नाम मंत्र दिला. आम्हाला दोघांनाही भगवंत दर्शन झाले. तोच मंत्र मी तुम्हाला सर्वांना 'हरिपाठा'तून देत आहे. संतश्रेष्ठ नामदेव, गोरोबा, चोखोबा यांनी भगवंताच्या म्हणजे पंढरीनाथाच्या नामाचा नाममंत्र घेतला. व त्या सर्व श्रेष्ठ संतांना साक्षात् विठ्ठल दर्शन झाले. भगवंताच्या खऱ्या स्वरूपाचे दर्शन झाले. तुमच्यापैकी कोणीही विठ्ठलमूर्तीचे दर्शन झाले नाही

म्हणून मनी खट्टू होऊ नका. तो भगवंत कणाकणात भरला आहे. तुमच्यातही आहे. त्याला आठवा. संसारात, शेतात अगर कोठेही काम करताना मुखाने अथवा परावाणीने मनातल्या मनात त्या भगवंताचे नाम घ्या. अन्य यज्ञयाग, तीर्थयात्रा यांनी मिळणाऱ्या पुण्याचा क्षय होतो. परंतु नाम जपाचे पुण्य कधीही लय पावत नाही. त्या पुण्याची गणनाच करता येत नाही. असे म्हणून माउलींचे तोंडून हरिपाठाचा पहिला अभंग बाहेर पडला –

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ।

हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।।

असोनि संसारी जिव्हे वेगू करी । वेदशास्त्र उभारी बाह्यासदां ।

ज्ञानदेव म्हणे व्यासचिया खुणां । द्वारकेचा राणा पांडवांघरीं ।।१ ।। हरिपाठ–१, ज्ञा.गा.७३७

'हरि' म्हणजे हरण करणारा. तुमची दु:खे, हालअपेष्टा, दैन्य वगैरे जे काही असेल ते त्याच्या स्वाधीन करा. तुम्ही मात्र नित्य त्याचे नाव मनी धारण करा. भगवंत हाच पांडुरंग, कृष्ण, राम, गोपाळ, मुरारी, शिवशंकर या वेगवेगळ्या नावांनी ओळखला जातो. याबद्दल मनात कसलेही द्वैत धरू नका. भगवंत एकच आहे व तो चराचराच्या रूपाने, तुमच्या माझ्या रूपाने नटला आहे. भक्ताच्या इच्छेप्रमाणे तो सगुणही आहे व निर्गुणही आहे. नित्य नामस्मरणाची सवय लावून घ्या. तुम्ही झोपलात तरी जीव जागा असतो. त्याला सवय लावलीत तर झोपेतही तुमचे नामस्मरण तुटणार नाही. आपण पांडुरंगाचे दर्शन घेतो तेव्हा तो समोर उभा असतो, परंतु नामस्मरण करताना तो तुमच्या हृदयात असतो. स्वत:ला एकटे कधीही समजू नका. कारण तो नेहमी तुमच्याच बरोबर असतो. देवाची नावे अनेक असली तरी तो एकच आहे. जसे तुमच्या लेकीला जन्मानंतर तुम्ही एक नाव देता, ती कोणाची ताई असते, माई असते, मैत्रीणींची सखी आदीमाया  असते. लग्नानंतर तिला सासरचे नाव मिळते. ती सूनबाई होते, कोणाची वहिनी होते, मामी होते, आत्या होते. तिच्याच मुलांची आई होते. कालांतराने सासू व आजी होते. ही सर्व नावे धारण करणारी मात्र एकच आदिमाया असते. त्याचप्रमाणे भगवंत एकच आहे. याला अनेक नावांनी ओळखले जाते. हे ऐकून सर्व वारकऱ्यांच्या मुखावर अपार आनंद प्रगटला. माउलींचे अमृतमय मधाळ शब्दांची तृप्तता सर्वांचे चेहेऱ्यावर प्रकटली.  ज्येष्ठ संतांच्या डोळ्यात तर अश्रू दाटले.

'हरिपाठ' सोहळा काल्याचे कीर्तनापर्यंत चालू होता. 'हरिपाठात' एकूण सत्तावीस अभंग आहेत.

प्रत्येक अभंगात ज्ञानदेवाने अध्यात्मातील एक एक संकेत, खूण, फायदा सांगितला आहे. या नामस्मरणाचे माहात्म्य भगवंतांनी गीतेत व वेदांनीही सांगितले आहे हेही ज्ञानदेवांनी स्पष्ट केले. काल्याचे दिवशी प्रवचनात ज्ञानदेव समाधानी परंतु गंभीर होते. ते सर्व वारकऱ्यांना म्हणाले की आता आपली भेट कार्तिकीला. तो पर्यंत हा नामजप हृदयात रुजवा व वाढवा. पांडुरंग तुमची सर्व काळजी घेईल. कार्तिकी नंतर मी तीर्थयात्रेला जाईन. सर्व वारकऱ्यांनी विठ्ठल नामाचा व माउलीचा गजर केला.

# 'ग्यानबा-तुकाराम' भागवत-धर्माचा महामंत्र आणि वारकरी संप्रदाय (धर्मातील स्थित्यंतरे)

मी मराठी भाषेचा कोणी लहान-मोठा लेखक नाही. वाङ्मयीन भाषेचा जाणकार नाही. भाषेवर प्रभुत्व असलेला वेत्ता नाही. आहे एक सामान्यच. पण हृदयात आहेत ज्ञानदेव, नामदेव, चोखोबा, सावता, एकनाथ, तुकोबा ते गाडगेबाबा, सोनुमामा, धुंडामहाराज. त्यांना वाचतो, अनुसरतो अन् हृदयाला जे भावले ते लिहितो. भाषा मला वळविता येत नाही. परंतु संतांची, भगवंताची भाषा जाणण्याचा मनोभावे प्रयत्न करतो. संतांशी, वारकऱ्यांशी मनातून बोलतो.

ग्यानबा-तुकाराम हा महामंत्र आणि वारकरी संप्रदाय म्हणजे काय आहे? आणि संप्रदाय म्हणजे तरी काय? मंत्र म्हणजे मननेन त्रायते ।. मनाने चिंतन व विचार केल्यावर संसारातून जो तारतो तो हा वारकरी मंत्र. पंढरीची आषाढी-कार्तिकी वारी करा, ग्यानबा-तुकाराम हा मंत्र म्हणा, विठ्ठल प्रेमाची आवडी मनी जपा, असे सांगणारा हा वारकरी पंथ म्हणजे ईश्वरभक्तांचा संप्रदाय. हा भक्तिमार्गावर आधारलेला आहे. बहुजन समाजासाठी हा मंत्र दिलेला आहे. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, गाथा इत्यादि, यातील सखोल ज्ञान व तत्त्वज्ञान बहुतांश बहुजन समाजाला समजत नाही. विठ्ठल हा सर्वात्मक देव कसा, हे तर स्वयं नामदेवालाही विसोबा खेचरांकडून श्रीगुरुकृपा होईपर्यंत समजलेले नव्हते. कारण तो पंढरीच्या पांडुरंगाच्या मूर्तीत देव बघत होता. तुकोबांनी ज्ञानदेवांचे शिष्यत्व पत्करले नाही, पण त्यांचे अद्वैताचे तत्त्वज्ञान व भागवत धर्मावरील निष्ठा जाणून एक व्रत म्हणून माउलींचे मोठेपण त्यांना मान्य झाले. माउलींचे श्रेष्ठत्व तुकोबांना माउलींच्या लिखाणातून अनेक पैलूतून दिसून आले. आणि तुकोबांनी सामान्यांकरिता ज्ञानदेवाप्रमाणेच भागवत धर्माची पताका खांद्यावर घेतली. [१,२]तुकोबा म्हणतात -

---

१. श्रीसकलसंतवाणी खंड - २, पान ७८८

२. श्री सकलसंतगाथा खंड - २, पान ८९१

काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविले धरणें ।।

ऐकोनियां लिखित । म्हूण जाणविली हे मात ।।

जरी जाणे धणी । वदे सेवकाची वाणी ।।

तुका म्हणे ठेवा । होतां सांभाळावा देवा ।। तु.गा.३३८७

ज्ञानियांचा राजा गुरु महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें ।।

मज पामरा हें काय थोरपण । पायींची वाहाण पायीं बरी ।।

ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळगणें । इतर तुळणे काय पुढे ।।

तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली । म्हणोनी ठेविली पायी डोई ।। तु.गा.३३९८

तुकोबांच्या पूर्वी तेराव्या शतकात या भागवत धर्माचा पाया ज्ञानदेवांनी घातला. भागवतधर्माचा प्रमुख ग्रंथ भगवद्गीता. त्याचा भावार्थ भावार्थदीपिकेतून ज्ञानदेवांनी सर्वांसाठी स्पष्ट केला. तुकोबा या भक्तिमंदीराचे कळस झाले. अशी ही शतकानुशतकांची परंपरा आहे. तुकोबांची सत्शिष्या [१,२]संत बहिणाबाई आपल्या अभंगात म्हणतात–

संतकृपा झाली । इमारत फळा आली ।।

ज्ञानदेवे रचिला पाया । उभारिले देवालया ।।

नामा तयाचा किंकर । तेणें रचिलें तें आवार ।।

जनार्दन एकनाथ । खांब दिधला भागवत ।।

तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ।।

बहिणी म्हणे फडकती ध्वजा । निरुपणा केलें वोजा ।। ब.गा.३२

ग्यानबा–तुकाराम हा मंत्र भागवत संप्रदायाचे–वारकरी संप्रदायाचे बळ आहे. तो एक महारुद्र आहे. रुद्राची ताकद या ग्यानबा–तुकाराम मंत्रात आहे. सामान्य दुःखी जनांचे दुःख निवारण्यासाठी हा मंत्र आहे. ज्ञानेशांनीसुद्धा या ज्ञान प्रसारासाठी श्रीगुरुंची परवानगी घेतली असावी. कारण त्यापूर्वी नाथ संप्रदायात एक

---

१. श्रीसकलसंतवाणी खंड – २, ब.अ. ३२

२. श्रीसकलसंतगाथा खंड – २, ब.अ. ३२

गुरु एक शिष्य ही परंपरा होती. ज्ञानेशांनी श्रीगुरुंना सांगितले असेल की, मी तुमचा एकुलता शिष्य आहे. तर मी तुमच्याकडे अशी परवानगी मागतो की हे अद्वैताचे ज्ञान आता एका शिष्यापुरते किंवा नाथसंप्रदायापुरतेच मर्यादित राहू नये. ते बहुजनसमाज व स्त्रीशूद्रासही मिळावे. जनसामान्यांस संस्कृत समजत नाही म्हणून ज्ञानदेवांनी सामान्यांच्या मराठी भाषेची निवड केली. या सोप्या उपदेशाचे मूळसूत्र असे की, संसार सोडू नका. संसारापासून पलायन नाही.

हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा

पुण्याची गणना कोण करी।

असोनि संसारी जिव्हे वेगू करी

वेदशास्त्र उभारी बाह्या सदा।। हरिपाठ ओवी १

माउली या भौतिक संसारात कधीच पडले नाहीत. परंतु त्यांनी उपदेशिले की, संसार करुनही परमार्थ करता येतो. तुकोबांनीदेखील संसारात अलिप्त राहून पांडुरंग ध्याईला आहे. पैठण येथे ज्ञानदेवांनी जे दिव्यत्वाचे दर्शन घडविले, त्यापूर्वी माउली ज्या जनांच्या संसारात राहिले तेथे त्यांच्या आई-वडिलांनी, त्यांनी व त्यांच्या भावंडांनी अपरिमित जननिंदा व अपमान, हालअपेष्टा भोगल्या. कारण ते संन्याशाची मुले म्हणून जातिभ्रष्ट होते परंतु त्यांच्यापैकी कोणीही पुढील आयुष्यात अथवा आपल्या वाङ्मयात त्याचा साधा उल्लेखही केलेला नाही. विठ्ठलपंत-रुक्मिणी यांनी तर देहत्याग स्वीकारला. चारही भावंडांच्या मनावर चरा उमटला असेल. परंतु त्यांनी समाजाचा, ब्रह्मवृदांचा तिटकारा वा राग केला नाही. अपमान सोसूनही ज्ञानेशांनी इतरांना मात्र हाच उपदेश केला की, संसार न सोडता, त्याचा त्रागा न करता संसारात राहूनच साधना करा, नामभक्ती करा. तुम्ही सामान्य असा अथवा विद्वान असा, परंतु. नामसाधना सोडू नका -'असोनि संसारी जिव्हे वेगु करी'। भक्तीला मानसिक शक्तीचे पाठबळ हवे ते यासाठीच.

हरिपाठात माउली म्हणतात -

हरिउच्चारणी अनंत पापराशी। जातील लयासी क्षणमात्रें।

तृण अग्निमेळें समरस झालें। तैसे नामें केलें जपतां हरि।। ज्ञा.गा.७४७ (हरिपाठ-११)

या हरिउच्चारणामुळेच तुमचे सर्व दोष निघून जातील, पाप धुवून जाईल. हे नाम संकीर्तन अखंड चालू ठेवा व त्याचे आचार विचारामधे मर्म काय आहे हे जाणून घ्या. सर्वांसाठी प्रेमभाव ठेवा. कोणाचीही

अवहेलना करु नका. सर्वांशी लीनता ठेवा. 'सर्वात पाहूनी देव सर्वांच्या पाया पडावे', 'जे जे भेटे भूत। त्यासि मानी भगवंत।।' हेच ज्ञानतत्व भागवत धर्माचे आहे. भागवत म्हणजे काय? जो भगवंताचा, किंवा जे भगवंताने भागवतात (गीतेत) सांगितले त्याचे आचरण करणारा तोच भागवत. भागवत धर्म हे वैदिक धर्माचेच अधीक प्रगल्भ असलेले स्वरुप आहे. हा भागवत धर्म जसा तेराव्या शतकात ज्ञानदेवांनी सांगितला आहे. ज्याचा वारसा नामदेवाने महाराष्ट्रात व पंजाबात चालविला, व एकनाथांनी सोळाव्या शतकात महाराष्ट्राला आपल्या प्रदीर्घ वाङ्मयातून दिला आहे. त्याचाच वारसा पुढे तुकारामांनी सतराव्या शतकात चालविला. म्हणून ग्यानबा-तुकाराम हा मंत्र आहे. श्रीविष्णूला जसे जय-विजय तसे पांडुरंगाला ग्यानबा-तुकाराम आहेत. या भागवत मंदिराबद्दल तुकाराम शिष्या संत बहिणाबाई यांचा अभंग पूर्वी आलेलाच आहे.

ग्यानबा-तुकाराम हा मंत्र वारकऱ्यांच्या हृदयाला भिडला आहे. विठाई हे मूळ दैवत व ग्यानबा-तुकाराम हे त्यांचे पायीक आहेत. मूळ मंत्र विठाई-माउली. पुढे या मूळ दैवतास अनेक नावें मिळाली आहेत. जशी पांडुरंग, पुंडलीकवरदा, बापरखुमादेवीवरु वगैरे. विट्टल-विठ्ठल म्हणजे वीट हेच ज्याचे स्थल आहे तो विठ्ठल. पुंडलीकाच्या भक्तिभावातून 'पुंडलीकवरदा' हे नाव आले. विठ्ठल हे वारकऱ्यांचे आदिदैवत व रखुमाई ही आदिमाया-आदिशक्ती आहे. ज्ञानोबा-तुकारामांचे एक एक अक्षर हे ब्रह्मवाक्य आहे. भक्तीप्रेमाशी संबंध नसलेल्या अनेकांनी त्यात अनेक बदल व अपभ्रंश केले. परंतु मूळ लिखाण हे अक्षय आहे. गाथा, ज्ञानेश्वरी जशी मूळ आहे तशीच ठेवावी. इतरांनी केलेले बदल शुद्ध करण्याचा अधिकार एकनाथांसारख्या श्रेष्ठ संतांचा आहे. म्हणूनच त्यांना 'ज्ञानाचा एका' म्हणतात. अन्य बदलाने अर्थाचा अनर्थ होतो.

यत् गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमंमम। हे जे विठ्ठलाचे धाम आहे ते पंढरपूरला आहे. या विठ्ठलाचा जर इतिहास पाहिला तर तो विष्णुस्वरुप आहे, श्रीकृष्ण स्वरुप आहे, गोपवेषधारी आहे, कारण तो सावळा घननीळ आहे. तो कर्नाटकातून इकडे आला, म्हणून 'कानडा विठ्ठलू' - 'कानडा विठ्ठलू कर्नाटकी। तेणे मज लावियेला वेधु'।। तसेच त्याने मस्तकी शिवाला धारण केले आहे. याचा उल्लेख ज्ञानेश्वरीत आहे, म्हणून पांडुरंग हा वैष्णव व शैवांचा एकच देव आहे.

मग याहिवरी पार्था। माझ्या भजनीं आस्था।
तरी तयांतें मी माथां। मुकुट करीं।।ज्ञा.१२. २१४

उत्तमासिं मस्तक। खालविजे हें काय कौतुक।

परी मानु करिती तिन्ही लोक। पायवणियां।। ज्ञा.१२. २१५

तरि श्रद्धावस्तूसि आदरु। करितां जाणिजे प्रकारु।

जरीं होय श्रीगुरु। सदाशिवु।। ज्ञा.१२. २१६

परि हें असो आतां। महेशातें वानितां।

आत्मस्तुति होतां। संचारू असे।। ज्ञा.१२.२१७

ययालागीं हें नोहे। म्हणितलें रमानाहें।

अर्जुना मी वाहें। शिरीं तयातें।। ज्ञा. १२.२१८

भक्ताला जशी विठ्ठलाची आंस असते तशी विठ्ठलाला भक्ताची आंस आहे, म्हणून तर ही ज्ञानोत्तर भक्ती आहे. विठ्ठलाला जाणून घेऊन केलेली भक्ती. विठ्ठल म्हणतो, 'मला ज्ञानाची पोकळ चर्चा नकोच आहे. माझे नाम घ्या आणि माझे लाडके हे जे ग्यानबा-तुकाराम आहेत त्यांचेही नाम घ्या. तुम्ही माझ्या हृदयात स्थान मिळवाल.' हे ईश्वरी आश्वासन आहे. तत्त्वज्ञान, चर्चा ही बहुजन समाजातील वारकऱ्यांसाठी नाही. भक्तीने 'ग्यानबा-तुकाराम' हा मंत्र म्हणा, याने काय होते हे विचारू नका. हा वारकरीपंथाचा आदेश आहे. भगवंताच्या वैकुंठ धामाला मृत्यूनंतर प्राप्त करून घेणे हे बहुतांश साधकांचे उद्दिष्ट असते. परंतु मरणापूर्वीच मुक्ती हवी असेल, पांडुरंगाच्या हृदयात जागा हवी असेल तर, वारकरी होऊन वारीला पंढरपूरला जा व हे 'ग्यानबा-तुकाराम' नामाचे व्रत चालू ठेवा. हे नामव्रत असे आहे की, देवाला रोज जाण्याची गरज नाही. ठरावीक आषाढी-कार्तिकीचे दिवस या वारीसाठी नेमलेले आहेत. 'ग्यानबा-तुकाराम' व वारी ही जी उपासना पद्धती आहे, ती या वारकरी संप्रदायात सांगितलेली आहे. वारकरी संप्रदाय हे एक स्वरुप आहे. स्वरुप कसे तर यात निजबोध सांगितलेला आहे. आपण कोण, आपले खरे स्वरुप काय आहे? ते या देहापुरतेच मर्यादित आहे का? हा आत्मबोध होण्यासाठी, अंतरी बोध होण्यासाठी फक्त विठ्ठलाचे नाम घ्या. त्याचाच ध्यास घ्या. म्हणजे हा आत्मबोध होतो. ही या संप्रदायाची फलश्रुती आहे. आणि शेवटी माझ्या आयुष्यात जे काही घडले आहे ते सर्व विठ्ठलाच्याच इच्छेने घडते आहे, हा शरणभाव या संप्रदायात आहे. काही विद्वान म्हणतात तशी ही निष्क्रीयता नाही. त्यांनाही हे मान्य आहे की कोणती तरी अनामिक शक्ती विश्वाचे नियंत्रण करीत आहे. कोणाही व्यक्तीला आपला जन्म, मृत्यू, जीवनातील घडामोडी यांची पूर्व

कल्पना नसते. या शक्तीला ते 'निसर्ग' म्हणतात. भाविक त्यालाच विठ्ठल म्हणतो.

ज्ञानेश्वर आणि तुकाराम हे दोघेही वैश्विक प्रेमाचे अवतार आहेत. म्हणूनच पसायदानात व तुकोबांच्या 'हेची दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा'। या त्यांच्या पसायदानातून हे प्रेम प्रकट झाले आहे. माउली आपल्या अभंगात 'विश्वाचे आर्त माझे मनी प्रगटले। अवघेची झाले देह ब्रह्म'। म्हणतात. पसायदानातील शरणभाव ज्ञानेशांच्या हृदयातून उठलेला आहे. विश्वातील चराचरामध्ये सर्व प्राणीमात्रांच्या हृदयांत ईश्वर भरून राहिलेला आहे. म्हणून सर्व चराचरावर प्रेम केले तर प्रेम वाढते हा पसायदानाचा, तुकोबांच्या अभंगाचा प्रेमाचा संदेश आहे. शांती ही तितकीच महत्त्वाची आहे. ती ज्ञानोबा–तुकारामांच्या अभंगातून, ज्ञानेश्वरीतून प्रगट होते. शांतरस हा ज्ञानेश्वरीचा प्राण आहे. तुम्ही स्वत: शांत व्हा आणि इतरांनाही शांत करा.

श्रद्धा व ज्ञान कसे निर्माण होते? 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्'। ही श्रद्धा म्हणजे 'विष्णुमय' जग हे तुकारामांनी सांगितले. परस्पर सामंजस्य असल्याकारणाने हे जे वारकऱ्यांचे व्रत आहे ते विठ्ठलाच्या आशीर्वादाने, विठ्ठलाच्या संरक्षणाने, संसारात कितीही अडचणी आल्या तरी, निष्ठेने पूर्ण केले जाते. ही निष्ठा या संप्रदायात सांगितली आहे. [१,२]तुकोबा आपल्या अभंगात म्हणतात –

सदा माझे डोळा जडो तुझी मूर्ती। रखुमाईच्या पती सोयरिया।।
गोड तुझें रुप गोड तुझें नाम। देई मज प्रेम सर्व काळ।।
विठो माउलिये हाचि वर देई। संचरोनि राहीं हृदयामाजी।।
तुका म्हणे कांहीं न मागे आणिक। तुझे पायीं सुख सर्व आहे।। तु.गा.१५
विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें। येरांनी वहावें भार माथां।।
साधन संकट सर्वांलागीं शीण। व्हावा लागे क्षीण अहंभाव।।
भाव हा कठीण वय हे भेदवे। परि न छेदवे मायाजाळ।।
तुका म्हणे वर्म भजनेचि सांपडे। येराशी तो पडे ओस दिशा।। तु.गा.६४४

ज्याला ज्ञान घ्यायचे आहे, जो मुमुक्षु आहे, त्याने ग्रंथ वाचावेत. परंतु सर्व वारकरी कुठे मुमुक्षु आहेत? ते कुठे ग्रंथ वाचतात? तरीही या संप्रदायाचे, संतांचे जे अभंग आहेत त्यापैकी अनेक आपल्यालाही माहीत

---

१. श्रीसकलसंतवाणी खंड – २, तु.गा. १५,६४४

२. श्रीसकलसंतगाथा खंड – २, तु.गा. १५,६४४

नसतात. परंतु कीर्तनश्रवणाने वारकऱ्यांचे मात्र ते पाठ असतात. कीर्तनाला वारकरी बसतात त्यावेळी कीर्तनकारावर जबाबदारी असते की अभंगात चूक होऊ देऊ नये. कारण चूक असली तर वारकरी लगेचच सांगतात की 'हे असे नाही तर असे आहे'. ही समज या संप्रदायात मोठी आहे. कीर्तनात वारकरी 'तुकोबा असे म्हणालेले नाहीत', 'ज्ञानोबा असे म्हणालेले नाहीत' हे दाखवून देतात. हा डोळसपणा हे या संप्रदायाचे वैशिष्ट्य आहे. आणि जे समजायला अवघड आहे ते सोपे करून सांगणे, हे ज्ञानोबा-तुकोबा व संतांचे कार्य आहे. हा डोळसपणा हा या संप्रदायाचा घटक आहे. आपणही या संप्रदायाचे घटक आहोत, ही त्यांची पक्की भावना असते. तुकोबा एकांतासाठी भंडाऱ्याच्या डोंगरावर गेले म्हणून प्रत्येकाने गेलेच पाहिजे असे नाही. उलट जनसमुदायात जेवढे रहाल तेवढी विचारांची देवाणघेवाण होईल, भेदाभेद होणार नाहीत. मुख्य म्हणजे कोणीही कोणाची अवहेलना करणार नाही. नम्रता हा ईश्वराला आवडणारा सर्वात मोठा गुण आहे. म्हणून संतांचे अनुकरण करा, त्यांचे पायी शरण जा. संतसमागम ही मोठी प्रेरक शक्ती आहे. संतच सांगतात की, या गुणांनी समाजात भेदाभेद असणार नाहीत व सर्वजण प्रेमाच्या रेशीम धाग्यांनी जोडले जातील. तुकाराम म्हणतात -

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ।।

आइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ।।

कोणाही जीवाचा न घडावा मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ।।

तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुखदुःख जीव भोग पावे ।। तु.गा.२१

प्रेमाचा उगम हा ज्ञानोबा-तुकारामांच्या लिखाणाचा स्थायीभाव आहे. म्हणून 'प्रेमरुपे अवतरती'. मिळणारा प्रसाद हा सर्व जीवांच्यासाठी आहे. प्र-सा-द म्हणजे प्रत्यक्ष-साक्षात-दर्शन मिळणे म्हणजे विठ्ठलाचा प्रसाद मिळणे आहे. पंढरपूरला जायचे कशासाठी? केवळ बुक्का चुरमुऱ्यासाठी नव्हे तर विठ्ठलाचे साक्षात् दर्शन घेण्यासाठी. प्रत्यक्ष दर्शन म्हणजे अंतर्मनाला 'तो' जाणवणे. विठ्ठलाची तसबीर घरात असते. परंतु विठ्ठलाचा प्रसाद म्हणजे विठ्ठलाच्या साक्षात् दर्शनाशिवाय, तेथे त्याचे पायी डोके ठेवल्याशिवाय प्रसाद पूर्ण होणार नाही. अगदी विठ्ठलानेच सांगितले आहे की, माझे निर्गुण निराकार रुप तुम्हाला समजत नसेल तर मी पंढरपुरात सगुण रुपांत उभा आहे, कमरेवर हात ठेवून समचरणाने उभा आहे. तिथे माझे दर्शन घ्यायला या. माउलींनी परमात्म्याचे निर्गुण रुप लहानपणीच जाणले, पाहिले होते. म्हणूनच ते म्हणतात - 'तुज सगुण

म्हणू की निर्गुण रे। सगुण निर्गुण एक गोविंदु रे ।' नामदेव, एकनाथ, तुकाराम यांनी सगुणाची भक्ती केली आहे. निर्गुणरुपही त्यांना भक्तीनंतर ज्ञानाने समजले. हा विठ्ठल स्वयंभू आहे, म्हणून त्याच्याबरोबर रखुमाई नाही. ती मागे आहे. विठ्ठल म्हणतो की, 'माझे जे कार्य आहे ते आदिमाया शक्तीच्या पार्श्वभूमीवर आहे. ती आदिशक्ती मला साहाय्य करते, म्हणून मी आहे व मी तिचा पती म्हणून कार्य करतो.' अशीच शिवामागे पार्वती आहे. म्हणून शिवाचे कार्य होते. 'एरवी मी निर्गुण-निराकार आहे. ही शक्ती माझी प्रेरणा आहे व ती मला कार्य करायला लावते.' वारकरी विचारतो की देवा, या संतांची जात कोणती? भेदाभेद अमंगळ म्हटल्यावर, संतांचीही जात आमच्या सारखीच कळवळ्याची आहे. कारण ग्यानबा-तुकाराम सांगतात की विठ्ठल भजनात देहभाव विसरा. वारकरी म्हणतो की हा देह म्हणजे माझा देव नव्हे. परंतु देव या देहात आहे तोपर्यंतच या देहाचा उपयोग आहे. शिवच नसेल तर राहिलेले केवळ शव आहे.

श्रीसाईबाबा म्हणायचे की, 'तुमच्या देहाचे सार्थक केव्हा आहे, तर तुम्ही ईश्वरसेवेसाठी देह झिजवाल तेव्हा.' देहभाव पूर्णतया विसरल्याशिवाय हे व्रत पाळले जात नाही. वारी करताना ऊन लागो, पाऊस पडो, कष्ट पडोत, हे सर्व ओलांडूनसुद्धा वारी चालूच असते. वारीच्या तंद्रीत रंगलेल्या वारकऱ्यांना हे अडथळे जाणवतच नाहीत. ध्यान असते टाळ मृदुंगाच्या ठेक्यावर रंगलेल्या अभंगाचे किंवा 'ग्यानबा-तुकाराम' व 'विठोबा-रखुमाई' या नामस्मरणाचे. हीच ताकद आहे वारकऱ्यांची. प्रा. डॉ. माधवराव दीक्षित यांचे अध्यात्मगुरू काटेमहाराज सांगायचे की आपल्या भक्तांना पंढरपूरला जाता यावे, त्यांना काही त्रास होऊ नये, काही विपरीत घटना घडू नयेत, म्हणून देहू आळंदी येथून जेव्हा पालखीची वारी निघते त्यावेळी विठ्ठल म्हणतो की, 'माझे ज्ञानोबा-तुकाराम ही माझीच रुपे आहेत. त्यांच्या भक्तांची वारी सुखरुप होण्यासाठी या दोघांचे नाम घेत जी वारी पंढरपूरला येते त्या वारीच्या मागे मी विठ्ठल स्वत: उभा असतो, अगदी सुरुवातीपासून ते वारी पंढरपूरला पोहोचेपर्यंत.' म्हणूनच लक्षावधींच्या वारीत काहीही विपरीत घडत नाही. हे त्या ग्यानबा-तुकाराम मंत्राचे सामर्थ्य असते. ज्या वेळी वारी पंढरपूरचे प्रवेशद्वारात येते, त्या वेळी विठ्ठल वारी सोडून देवळात जाऊन उभा राहतो, समचरण व कटीवर हात ठेवून किंवा तो असतो चंद्रभागेच्या वाळवंटी संतांच्या-भक्तांच्या मांदियाळीत. वारीचा सोहळा हा असा आहे. सर्वांना आश्चर्य वाटते की, लाखो लोक निघाले आहेत, अगदी कोणाचाही आधार नसताना यांचे रक्षण कोण करणार आहे? यांना आधार कोण देणार आहे? तिथे प्रत्येकाचे पाठीशी असतो ग्यानबा-तुकाराम हा मंत्र व श्रीविठ्ठल.

वारी संपल्यावर विठ्ठल स्वत: प्रत्येक वारकऱ्याला त्याच्या घरी पोहोचवितो आणि सर्वांना सांगतो की, आषाढी–कार्तिकी पुरी केलीत ना! आता अगदी बिनधास्त संसार करा. म्हणून विठ्ठले निधान! आणि याच भागवत धर्माची गुढी ज्ञानदेव–नामदेव–एकनाथ–तुकाराम यांनी भारतभर पसरविली. लाखोंच्या वारीत प्रत्येकाला काल्याचे कीर्तनापर्यंत विठ्ठलमूर्तीचे दर्शन होईलच असे नाही. त्यांना तो सांगतो की 'वारीत तुमचे लक्ष होते का? मी तर तुमच्याच बाजूने चालत होतो. आता तुम्हाला घेऊन मी तुमच्या घरी जाण्यापूर्वी कळसाचे मनोभावे दर्शन घ्या. ती माझीच प्रभा आहे. तुमचे वारीचे पुण्यात तसूभरही उणे राहणार नाही. तुम्ही घरी माझी पूजा कराल तेव्हा विश्वास ठेवा की, तुम्ही वाहिलेल्या तुळशी, फुले मी मस्तकी धारण करीन. तुम्ही माझी लाडकी लेकरे आहात. हिरमुसु नका. पुढील वारीलाही मी तुमच्याच बरोबर असेन' आता पुढील अभंग पाहू.

## [१]श्री ज्ञानदेव–तुकाराम महात्म्य

प्रपंच रचिला विठ्ठलाने । तो भोगिला त्यागून ।

वैराग्यकळा लेवून । जाळूनिया देहबुद्धी ।।१ ।।

केले सर्व कष्टा । साहील्या हालअपेष्टा ।

दाविली वैराग्यनिष्ठा । अनुतापी तुकयाने ।।२ ।।

चालताना संसार । वाटेत सर्व अंधार ।

उडी टाकाया विहीर । खोल जी मायेची ।।३ ।।

बनून विरागी विदेही । करुन वैकुंठागमन सदेही ।

स्वत: साठी उरवे न काही । राही उपकारापुरता ।।४ ।।

आपुल्या अभंग गाथेत । भागवत धर्म केला प्रतिष्ठीत ।

सर्वांना केले उपकृत । अपकारालाही ।।५ ।।

जगाने तुकयास न ओळखिले । स्वामी समर्था बहूत छळीयेले ।

तेंव्हा विठ्ठलही कळवळले । यातना तुकयाच्या देखुनिया ।।६ ।।

---

१. काव्यरचना: प्रा.डॉ. माधवराव दीक्षित.

संसारात लाही लाही । विठ्ठल स्पर्शे उरे न कांही ।

धावून येई लवलाही । उद्धारासाठी ।।७ ।।

केली प्रीती अभेद । अमंगळ म्हणती भेदाभेद ।

खंत आणि खेद । इतरा विषयी ।।८ ।।

तुकया राही साक्षी । वेद मूर्ती हृषिकेशी ।

म्हणती रामेश्वर तुकयासी । विष्णुरुप म्हणूनि ।।९ ।।

ज्ञाना तुका अवतारी । विष्णु आणि कृष्ण मुरारी ।

त्या विठ्ठलाची पंढरी । मुक्ति परमधाम कृष्णाचे ।।१० ।।

ज्ञाना देई ज्ञान । तुका देई नामसंकीर्तन ।

जे सोपे सहज साधन । विठ्ठल भक्तीचे ।।११ ।।

उद्धारावे बहुजन । त्यांचाच कळवळा म्हणून ।

ज्ञानोत्तर भक्ति साधन । परमार्थ दोघांचे ।।१२ ।।

अगा वैकुंठीच्या राया । श्रीविठ्ठल सखया ।

कान्होपात्रा म्हणे सदया । राखी आता ।।१३ ।।

तोची विठ्ठल ज्ञाना तुकयाचे निधान । त्याचेच नामसंकीर्तन ।

विठ्ठल करी नर्तन । ज्ञाना तुकया पुढे ।।१४ ।।

तुका म्हणजे विठ्ठलासी । दाखीव तुझ्या समचरणांसी ।

उभा राहून कीर्तनासी । सामोरी माझ्या ।।१५ ।।

ज्ञाना-तुका दोघेही । आले नाही गेले नाही ।

सर्व विश्वांत विदेही । दशांगुळे ओलांडुनी ।।१६ ।।

नको ज्ञान नको मोक्ष । तुझा केवळ प्रेम कटाक्ष ।

भाबड्या भक्तीची साक्ष । ऐसी देई ।।१७ ।।

माता विठ्ठल पिता विठ्ठल। तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल।

सर्व विश्व विठ्ठल। अवघे विठ्ठल रुप।।१८।।

## धर्मातील स्थित्यंतरे

ज्ञानेश्वरांच्या पूर्वी काही शतकांपासून म्हणजे सुमारे हजार-बाराशे वर्षापूर्वीपासून महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून व दक्षिणेकडील राज्यांतून गावोगावातून वारकऱ्यांच्या लहान लहान दिंड्या विठ्ठल गजरात पंढरपुरी चंद्रभागेच्या वाळवंटात एकत्र येत असत. त्याकाळी वारकऱ्यांचा मंत्र 'पुंडलीकवरदा हरीविठ्ठल, पंढरीनाथ महाराज की जय' किंवा 'विठ्ठल-रखुमाई' हा असावा. ज्ञानदेवांनी व समकालीन संतांनी पंढरपूर हे भागवत धर्माचे आदिपीठ बनविले होते. तरीसुद्धा ज्ञानेश्वरपूर्व काळात वैदिक धर्माची अतिशय पीछेहाट झालेली होती. तेव्हा महाराष्ट्रात यावनी सत्ता नव्हती. लोकांची भौतिक सुखलोलुपता वाढलेली होती. निरनिराळी व्रते. मंत्रतंत्र, तीर्थयात्रा, गावोगावची दैवते व देवता, भुतेखेते यांच्या पूजा याचा सुळसुळाट झालेला होता. माउली ज्ञानेश्वरीत याबद्दल म्हणतात -

तुम्ही व्रतें नियमु न करावे। शरीरातें न पीडावें।

दुरी केंही न वचावें। तीर्थासी गा।। ज्ञा.३.८९।।

योगादिकें साधनें। साकांक्ष आराधनें।

मंत्रयंत्र विधानें। झणीं करा।। ज्ञा.३.९०।।

देवतांतरा न भजावें। हें सर्वथा कांही न करावें।

तुम्ही स्वधर्मायज्ञीं यजावे। अनायासें।। ज्ञा.३.९१।।

वरील कारणांमुळे मूळ वैदिक धर्म विसरला गेला. याच बरोबर काही अवैदिक पंथ धर्म पोखरीत होतेच. बौद्ध, जैन, महानुभाव, लिंगायत हे धर्म जरी भारतीय संस्कृतीतून निर्माण झाले होते तरी भागवत धर्माला विकृत स्वरुप आणणारे होते. बौद्ध धर्म त्यापूर्वी खूप फोफावला होता. परंतु कुमारिल भट्ट व आद्य शकंराचार्य यांनी याचा प्रसार रोधला होता. जैन धर्म मात्र फोफावला होता. याचे मुख्य कारण म्हणजे त्यांचे 'अहिंसा' तत्त्व. ज्ञानदेवांनी जैन पंथाचा अवैदिकाग्रणी असा उल्लेख करून त्यांची विफलता ज्ञानेश्वरीत अ.तेरा मध्ये एकोणीस ते एकवीस ओव्यात स्पष्ट केली आहे. इतर दोन पंथ म्हणजे लिंगायत व महानुभाव. हे पंथ तर शिव व कृष्ण यांची उपासना करतात. परंतु ज्ञानेशांनी या दोनही पंथांचा निर्देश करण्याइतके त्यांना महत्त्व

नव्हते. शिवाय पांडुरंग हे शिव व कृष्ण यांचे एकत्रित स्वरूप आहे. माउली सांगतात –

रुप पाहतां तरी डोळसु । सुंदर पाहतां गोपवेशु ।

महिमा वर्णिता महेशु । जेणे मस्तकी वंदिला ।। ज्ञा.गा.८९

पांडुरंगाने मस्तकी शिवाला स्थान दिलेले आहे. ज्ञानेशांना वेदांचे श्रेष्ठत्व मान्य होते. परंतु त्यांचा कर्मठपणा मान्य नव्हता. म्हणून त्यांनी वेदाऐवजी गीतेवर टीका लिहिली. गीतेत चारही वर्णांना व स्त्रियांना स्थान आहे. वैदिक पंथातील रामानुजीय वैदिक विचारांनी वैदिक धर्मास तडा गेला होता. नाथपंथ व वारकरी पंथ हे दोन्ही ज्ञानदेवांना प्रिय होते. नाथपंथ आजोबा हरिपंत यांच्या घराण्यातून मिळालेला होता. वैष्णवपंथ खुद्द जन्मदात्याकडून मिळाला होता. नाथपंथ आत्मसाक्षात्कारावर व योगसाधनेला महत्त्व देणारा व शिव–विष्णु यांचे ऐक्य मानणारा आहे. तर वेदप्रामाण्याबरोबरच त्यातील कर्मठता दूर करून सुलभ भक्तिमार्गाने जाणारा भागवत किंवा पंढरीचा वारकरी पंथ आहे.

ज्ञानदेवांनी जरी गीता प्रणित ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यांइतकेच अधिकार स्त्रीशूद्रांनाही आहेत हे आग्रहाने प्रतिपादिले आहे. तरीही पंढरीसारख्या तीर्थक्षेत्रीही शूद्रांना विठ्ठलदर्शनाचा अधिकार नव्हता. स्त्रियांना धर्मग्रंथ वाचता येत नव्हते. तरीही चोखोबा, बंका, जनाई, सोयरा, मंजुळा या सारखे अस्पृश्य संतही महान कार्य करून गेले व विठ्ठलाचे महान भक्त झाले. हे चालू राहिले एकोणीसशे सत्तेचाळीस पर्यंत. जेव्हा सानेगुरुजींनी शूद्रांच्या मंदिर प्रवेशासाठी आमरण उपोषण मांडले होते. तेव्हा पांडुरंग सर्व जातींसाठी मुक्त झाला. आता तर केवळ अन्यधर्मीयच नव्हे तर परदेशी भक्तसुद्धा ग्यानबा–तुकारामांचा गजर करीत वारीतून पंढरीला येतात.[१] ह.भ.प.कै. मामासाहेब दांडेकर लिहितात त्यानुसार ''जसे गीतेचे औदार्य तसेच ज्ञानदेवांचे''. ज्ञानदेवांच्या शब्दात सांगायचे म्हणजे, ''जैसा समर्थ दाता कोण्हाते नास्ति न म्हणे।'' अथवा ''समर्थाचिये पंक्तिभोजने। तळिल्या वरिल्या एकचि पक्वान्ने।।'' असेच ज्ञानदेवांच्या मनात सर्वांस मुक्तद्वार होते. तुकोबांच्या भाषेत बोलायचे म्हणजे 'ज्ञानदेवांनी मुक्तीची गवादीच घातली आणि सर्वांस तृप्त होऊन जाण्याबद्दल पाचारण केले.'

ज्ञानदेव, त्यांच्या पूर्वीचे व त्यांच्याहून वयाने जेष्ठ असणाऱ्या गोरा कुंभार, सावतामाळी चोखोबा, नामदेव या संताच्या विठ्ठल नामघोषाने ज्ञानदेवांच्या पूर्वीच पंढरी दुमदुमवून टाकली होती. ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरीमुळे वारकऱ्यांना अद्वैताचा अर्थ स्पष्ट झाला होता. लेकुरवाळा विठू हेच त्यांचे आराध्य दैवत झाले.

---

१. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी, प्रस्तावना

साध्याभोळ्या संसारी, शेतकरी या बहुजन भक्तांचे जथे विठ्ठलनामाचा गजर करीत पंढरपुरी येत असत. लहानलहान गावांतून येणाऱ्या या विठ्ठलभक्तांना हवे असे त्यांच्या विठ्ठलाचे दर्शन. या भक्तातील पुष्कळांना त्या काळातील प्रथेप्रमाणे मंदिर प्रवेशही नव्हता. देवळातील पुजाऱ्यांपर्यंत गीतार्थ-ज्ञानेश्वरी पोहोचलीच नव्हती. त्यांना मद होता त्यांच्या ब्राह्मण्यांचा. विठ्ठलाजवळ राहूनही त्यांना विठ्ठल ओळखता आला नव्हता. या वारकऱ्यांना दर्शन मिळालेच तर महाद्वारातून मुखदर्शन मिळत असे. नाहीतर कळसाचेच दर्शन घेऊन हृदयीच्या विठ्ठलाला भेटल्याचे समाधान करून घ्यावे लागे. (ज्येष्ठ संत चोखोबा, बंका, जनाई यांचीही हीच अवस्था होती.) संसारात, शेतीत परतताना गळ्यातील तुळशीची माळ, व कपाळावरील बुक्याचा टिळा हाच पांडुरंगाचा प्रसाद मिळत असे किंवा जे काल्याचे कीर्तनापर्यंत राहतील त्यांच्या मुखी पडणाऱ्या काही लाह्या हाच प्रसाद होता. प्रवचन कीर्तनातून त्यांना विठू ऐकू येत होता, परंतु दिसत मात्र नव्हता. ही त्यांच्या हृदयीची सल माउलींनी जाणली होती. तेही विव्हळ झाले असतील. गीतेतील नामभक्ती त्यांना माहीत नव्हती. माउलींच्या मुखातून या सर्व विठ्ठलभक्तांच्या भक्ती आणि मुक्तीसाठी याच चंद्रभागेच्या वाळवंटात हरिपाठ बाहेर पडला असावा. माउली-नामदेव-एकनाथ तुकाराम यांनी या भोळ्या भक्तांना ग्वाही दिली की देव केवळ देवळात नाही. तो तुमच्या-आमच्या सर्वांच्या हृदयात आहे. वारीत तो आपल्या बरोबरच असतो. आणि तुम्ही घरी परतत असताना तो तुमच्या घरापर्यंत तुमची सोबतही करतो. मनोभावे यावर विश्वास ठेवा. वारीत पंढरपूरला येईपर्यंत त्या विठ्ठल-रखुमाईच्या नामाचा गजर करा. तो विठ्ठल ऐकत असतो. ही ज्ञानोबा-तुक्याची भाक आहे. आजही प्रत्येक वारकरी आंघोळीनंतर ब्राह्मणाला जशी संध्या तसे आठवणीने 'हरिपाठ' म्हणतो व नंतर इतर संसारिक कामे करतो. ही वारकऱ्यांच्या-संसारीकांच्या हरिभक्तीची, विठ्ठलभक्तीची 'वज्रमूठ' बांधली ग्यानबा-तुकाराम या महामंत्राने. म्हणूनच वारकरी संप्रदायाचे उपास्य दैवत आहेत-ज्ञानेश्वर-तुकाराम. त्यांच्या आषाढी-कार्तिकी वारीत असतात लक्षावधी विठ्ठलभक्त. तुकोबांची ज्ञानेशांवर निरतिशय श्रद्धा होती. ज्ञानेश्वरीतील अनेक ओव्यांची समअर्थी रचना तुकारामांनी रचलेल्या आहेत. हा वारकरी संप्रदाय ज्ञानोबा-तुकोबांना किती मानतो ते असे -

## [१] वारकरी संप्रदाय, उपासना दैवत:–विठ्ठल–ज्ञानेश्वर–तुकाराम.

## महामंत्र–ग्यानबा–तुकाराम

मंत्र ग्यानबा–तुकाराम। वारकरी संप्रदायाचे मर्म।

संप्रदायाचे बलभीम। रूपी असे ते महारुद्र।।१।।

दुःखी जनांचे दुःख निवारण। भुकेल्यांचे करणे पोषण।

कार्य करिता हरिस्मरण। करणे ते अखंड।।२।।

सर्वांत पाहून देव। सर्वांच्या पायी पडावं।

सर्वासाठी प्रेमभाव। हेची ज्ञानतत्त्व भागवतधर्माचे।।३।।

हाचि आचार विचार। सांगती ज्ञाना–तुकया धर्मसार।

पहावे सर्व चराचर। विठ्ठलरुपी।।४।।

ज्ञाना तुकयाचे एकेक अक्षर। ब्रह्मवाक्य हृदयावर।

तयात कधी फेरफार। होणे नाही।।५।।

ग्यानबा आणि तुकाराम। तयांचे वैकुंठधाम।

ते गाठणे हे मर्म। वारकरी संप्रदायाचे।।६।।

इतर संप्रदाय स–रूप। वारकरी संप्रदाय स्वरूप।

वर्तन सारे आपोआप। प्रभुइच्छेने।।७।।

ग्यानबा तुकाराम अतिप्रेमळ। उपदेश तयांचा निखळ।

भेदाभेद अमंगळ। न रूचे तयांसी।।८।।

जग होता विष्णुमय। कैसा धुराळा जातीय।

परस्पर सामंजस्य साहाय्य। सांगे संप्रदाय वारकऱ्यांचा।।९।।

तुका ज्ञाना जगद्गुरु। वटवृक्ष कल्पतरु।

मुमुक्षुंसी आधारु। अवतारी ते।।१०।।

---

१. काव्यरचना: प्रा. डॉ. माधवराव दीक्षित.

ब्राह्मणधर्म सनातन । भागवतधर्म तत्त्वज्ञान ।

रुपे दिसती भिन्न । शब्दज्ञाने ।।११ ।।

एक राही अरूप रूपे । त्यासच करी सहज सोपे ।

जनसामान्यासाठी रोपे । आध्यात्माची ।।१२ ।।

निरुपणासी भगवद्वचन । त्यातील गूढतत्त्वज्ञान ।

सांगती दोघे सोपे करून । सर्व बहुजन सुखवाया ।।१३ ।।

प्रेमरुपे अवतरत । कळवळ्यांची तयांची जात ।

विश्वात्मक देवाकडे मागत । प्रसाद सर्व जीवांसाठी ।।१४ ।।

ज्ञानीयाचे विश्वचिंतन । तुकयाचे हरिनाम संकीर्तन ।

होवावे विठ्ठल निधान । जीवन सर्व वारकऱ्यांचे ।।१५ ।।

उभारून भागवत धर्म गुढी । बनती जीवन नौकेचे नावाडी ।

हरिनाम तया आवडी । उपजविती विष्णुदासात ।।१६ ।।

भक्तीच्या मूळपीठावर ज्ञानदेव आणि तुकाराम आहेत. या देवस्वरूप, विभूतिस्वरुप ज्ञानेश्वर-तुकाराम यांना विठ्ठलाच्या भक्तांनी आवाहन केले आहे. घरात विद्युत प्रकाश केव्हा दिसतो, तर धन व ऋण ध्रुव जोडली जातात तेव्हा. आणि पांडुरंग हा प्रकाश आहे. ज्ञानेशांनीच हा वारसा नामदेव-एकनाथ-तुकाराम व अन्य संताना दिलेला आहे. ज्ञानेश्वर हे भक्ती, निवृत्ति, वैराग्य व विवेकाचे प्रतिक आहेत. 'यावे भक्तांच्या काजा' - भक्तांच्या सर्व मनोकामना पूर्ण करण्यासाठी हे आवाहन आहे. ज्ञानेशांनी या मनोकामना कशा पूर्ण केल्या, तर ज्यांना ज्ञानोत्तर भक्ती हवी ते ज्ञान त्यांना दिले. ज्ञानाच्या कक्षेत नसतील त्यांना शुद्ध भक्ती दिली. ज्ञानोत्तर भक्तीचे सामर्थ्य सांगितले. 'जो जे वांछील तो ते लाहो' असे पसायदान दिले. सर्व भक्तांचे काज पूर्ण केले. या संसारवृक्षाच्या मुळाशी जे गुरुतत्त्व आहे त्या पीठावर बसले आहेत ज्ञानेश्वर आणि तुकाराम. म्हणून ते गुरुस्वरुप आहेत. आणि गुरु म्हणजे जो अज्ञान अंध:काराचा नाश करतो तो. म्हणजेच ''उपदेश्यन्ति ते अज्ञानम् । ज्ञानिनां तत्त्वदर्शिन: ।''.

ज्ञानेश्वर हे प्रेमावतार व ज्ञानाचा सागर आहेत. शांतीरस हा ज्ञानेश्वरीचा जीवनरस आहे. म्हणून वारकरी

भक्त म्हणतो की 'हे ज्ञानेशा, मला तुला नैवेद्य द्यायचा आहे.' नैवेद्य म्हणजे 'त्याच्याकडे नेणारा'. हा त्याग केवळ वस्तूंचा नाही. तर हा देह ज्या पंचप्राण व पंचमहाभूतांनी बनला आहे, त्या या देहाचे समर्पण मी तुम्हाला करतो आहे. त्याचा मूळ भाव असतो की देवा, तुमचे स्थान माझ्या हृदयात आहे. तुमचा ठसा मी हृदयात ठेवीन. आणि हा जो वारकऱ्याचा वसा मी घेतला आहे तो मी उतणार नाही, मातणार नाही व टाकून देणार नाही. अहंकाराचा अभिनिवेश, सामर्थ्याचा खोटा बडिवार मी विसरेन कारण तुमच्याशिवाय मी कोणीच नाही. तुम्ही जी आज्ञा कराल ती मी मनोभावे पाळीन. तुम्ही व पांडुरंगाने आदेश दिला आहे की नियमित वारी करा. मी ती करीन. ज्ञानेश्वर हे माउली आहेत. पुरुष – स्वरुप असले तरी ते आदिशक्तीचे रुप आहे. तुम्ही तुमचा आशीर्वाद प्रत्येक भक्ताला दिला आहे, म्हणून तुम्ही प्रेमावतार आहात. तुम्ही तुमच्या तत्त्वज्ञानाचा सागर निर्माण केलेला आहे. आणि तुमच्याच कृपेमुळे मला या ज्ञानसागरातले मोती उचलता येतात.

वारकरी पंढरीला जाताना म्हणतात – ज्ञानदेवा ! तू सगळ्यांचा सांगाती आहेस. ''सखा सोबती जीवांचा। तुज नाही कसली आवड। मग उपकाराची कसली फेड।।'' तुम्ही माझा संसार सुखाचा केलेला आहे. तुमचे व्रतच सगळ्या विश्वात आनंद भरण्याचे आहे. मग हा आनंद मिळाल्यावर त्याची परत फेड कशी करायची? हेच आहे तुमचे निरपेक्ष प्रेम. ज्ञानदेवा तुमची प्रेमसत्ता ही विभूति स्वरुप आहे. पण तुम्ही सांगता की विठ्ठलाची प्रेमसत्ता आणि कृपा ओळखा. मी तुम्हाला ज्ञान देतो पण तो तर श्वासोच्छ्वास चालवतोय. तो प्राण आहे. प्राणच नाहीसा झाला, शिव नाहीसा झाला तर उरेल फक्त शव. 'देह जावो अथवा राहो। पांडुरंगी दृढ भावो।' म्हणून मी तुम्हाला सांकडे घालीत आहे की तुमच्या उपकाराची फेड मी कशी करू ते सांगा.'' माउली म्हणतात, की 'मला कुठे कशाची परतफेड हवी आहे'. तुकोबा म्हणतात की, 'उरलो उपकारापुरता', उपकारापुरते उरणे ही विभूति. तुम्ही विश्वात्मक देवाला, तुमच्या सद्गुरूंना सांकडे घातलेत, तर मी तुम्हाला सांकडे घालीत आहे. विश्वाच्या कार्यामागील कारण तुम्हीच आहात. आणि तो जो कारण आहे तोच नारायण आहे. तुम्ही तर देवांचे देव आहात. तुमचे वात्सल्य आईचे आहे, म्हणून तुम्हीच आमची 'माउली'. तुम्ही प्रेम देत आहात, तर आम्हीही सर्वांना प्रेम दिले पाहिजे. [१] श्री श्रीपरमहंस योगानंद म्हणत – I want unconditional love from you. Are you ready to give it? 'मला तुझ्याकडून निखळ प्रेम हवे आहे. तू

---

१. श्री श्रीपरमहंस योगानंद : 'योगी कथामृत'

ते द्यायला तयार आहेस का?' साईबाबा म्हणायचे, 'तू तेरा दिल देनेकू तय्यार है या नही। दक्षिणा म्हणून तुझ हृदयच देऊन टाक ना!'

माउली, माझी जीवन नौका अज्ञानात डळमळत आहे. या संसाराच्या मायापाशात मी अडकलो आहे. म्हणून भक्तीमध्ये विक्षेप आल्याने भक्तीमधे विभक्ती आली आहे. आता तुम्हीच यातून सोडवा. वारकरी संप्रदायाची फलश्रुती काय, तर मीपण सोडून देणे. आज हाच प्रसाद मला माउलींकडे मागायचा आहे. ज्ञानेश्वर निश्चित आशीर्वाद देतील 'स्वस्ति'. तू जर वारकरी संप्रदायाचा आधार घेतलास तर या संसार सागरात तू गटांगळ्या खाणार नाहीस. मी तुला हात देतो ना! म्हणजे तुझा संसारही सार्थकी लागेल, आणि तुला परमार्थही कळेल. संसार व परमार्थ हे एकमेकास पूरकच असले पाहिजेत.

ज्ञानेश्वर व तुकाराम हे खऱ्या अर्थाने संन्यासी आहेत. दोघेही सत्-न्यासी आहेत. म्हणजे ज्यांचे अधिष्ठान अंतिम सत्यावर आहे, म्हणून संन्यासी. तुकारामांनी संसार केला तरीही ते संन्यासीच आहेत. विभूति म्हणजे ब्रह्मचारी. ब्रह्माला साक्षी ठेवून, विठ्ठलाला साक्षी ठेवून जे व्यवहार केले, आचरण केले; सद्गुरुंना साक्षी ठेवून जे आचरण केले, विचार केला ते म्हणजे ब्रह्मचर्य आहे. सच्चिदानंद सद्गुरु यांचे अधिष्ठान, म्हणजे सत्याचे अधिष्ठान ठेवून आचार आणि विचार करणे, हा धर्म आहे. व तो पाळणारा ब्रह्मचारी आहे. 'गुरु साक्षात् परब्रह्म' म्हणजे या परब्रह्माला साक्षी ठेवून मी हे कार्य केलेले आहे, हेच अंतिम सत्य आहे. यालाच साक्षी ठेवून ज्ञानदेवा-तुकोबा, मी कार्य करीत आहे असे भक्त म्हणतो आहे. हे कार्य करीत असताना माउलींना सद्गुरुंनी विचारले असेल की 'हे जे ज्ञान तू विश्वाला सांगतो आहेस, त्याचा माझ्या सहवासात तुला काही अनुभव आला का?' ज्ञानदेव म्हणाले असतील की 'मी तो विश्वात्मक सर्वेश्वर पाहिला आहे. आता त्या विश्वात्मक देवाला मी प्रार्थना करतो. ही प्रार्थना माझ्यासाठी नाही. हे जे सगळे माझे वारकरी आणि भक्तजन आहेत त्यांना सुखी ठेवा. आणि म्हणून हे जे पसायदान मी मागत आहे त्यात माझी अनुभूति सांगितली आहे.' ज्ञानेश्वरीत माउलींनी आपल्या श्रीगुरुंना सर्वेश्वर, विश्वात्मक देव मानले आहे.

आतां विश्वात्मकु हा माझा। स्वामी निवृत्तिराजा।

तो अवधारु वाक्यपूजा। ज्ञानदेवो म्हणे।। ज्ञा. १५.५९८।।

याच विश्वात्मक देवाने माउलींना पसायदान दिले आहे. ज्या श्रीगुरुंचे सत्ज्ञान संपूर्ण ज्ञानेश्वरीभर आहे, त्या सद्गुरुंचे विश्वात्मकरूप माउलींनी अनेक अध्यायात वर्णिले आहे. वारकरी पंढरपूर सोडताना राउळाच्या

कळसाला नमस्कार करतो, कारण ज्याला पांडुरंगाचे दर्शन झाले नसेल त्याला तो वारकरी असेल तर हे मर्म माहीत असते की तो पांडुरंग चराचरात भरला आहे. भक्तीमधे कधी खंत बाळगू नये. कारण कळसाचे दर्शन ही ईश्वर दर्शनाच्या व्रताची परिपूर्ती आहे. कळसाचे दर्शन म्हणजे विठ्ठलाच्या तेजोवलयाचे दर्शन आहे. कळस ही विठ्ठलाच्या भक्तिवैभवाची खूण आहे. विठ्ठलधामाची खूण म्हणजे मंदिराचा कळस आहे. विठ्ठल म्हणतो की पंढरीला ज्याचे पाय लागले त्याला विठ्ठल दर्शन झाले.

### [१] मंत्रोच्चारातून ज्ञानियास आवाहन –

हे ज्ञानियांच्या राजा। हे निवृत्ति अनुजा।
यावे भक्ताच्या काजा। प्रसन्न बनुनी।।१।।
हे वटेशु प्रेमावतारा। शांती दयेच्या सागरा।
यावे माझ्या घरा। नैवेद्य तुमचा घ्यावयासी।।२।।
सेवेस करीन उठबसा। हृदयी धरेन तुमचा पदठसा।
टाकीन मी कैसा वसा। उतुनी आणि मातुनी।।३।।
घेई शरणागती तव पाऊली। हे ज्ञानराज माउली।
माये तूच धरिसी सावली। तुझ्या भक्तांवरी।।४।।
तुझा प्रेमळ अवतार। करण्या जीवांचा उद्धार।
हाती घेऊन माझा कर। तूच लिहिसी तव गाथा।।५।।
तूच करिसी या कौतुका। अधिकार देसी तुझ्या लेका।
तुझ्या सेवक लेखका। मूर्ख जो।।६।।
ब्रह्मा विष्णु शिवशक्ती। तुझ्यातच एकवटती।
तूच अससी सांगाती। सखा सोबती जीवांचा।।७।।
तुज नाही कसली आवड। मग उपकाराची कैसी फेड।
तू स्वत:च घालिसी साकडे। विश्वात्मक देवाकडे।।८।।

---

१. काव्यरचना: प्रा. डॉ. माधवराव दीक्षित.

तू स्वसंवेद्य नारायण । भवतारण भयहारण ।
तूच कार्य तूच कारण । घटित अघटित घटनांचे ।।९ ।।
माझ्या क्षुद्रतेची मज जाणीव । तुझ्या भक्तीचा हा प्रभाव ।
तूच देवांचा अधिदेव । मायबाप ।।१० ।।
नाव माझी संसारसागरी । सापडली मधल्या धारी ।
गटांगळ्या खाऊन खालीवरी । पैलतीरी पोचेना ।।११ ।।
तुलाच स्मरणे अडचणीस । माते घेई माझा त्रास ।
भरवी लेकरा घास । पायस वासरास देई गे ।।१२ ।।

'विठ्ठल रखुमाई' व 'ग्यानबा तुकाराम' हे या भक्तिसंप्रदायाचे महामंत्र आहेत व याचे मूळ अध्वर्यू आहेत ज्ञानदेव–नामदेव. ज्ञानदेव म्हणजे ज्ञानोत्तर भक्ती व नामदेव म्हणजे शुद्ध भक्ती. याने भक्तीचा सिद्धांत सिद्ध होतो की, केवळ ज्ञान हे कोरडे असते. त्यामुळे ते देवाजवळ नेईलच असे नाही. ज्ञानेश्वर हे प्रेमस्वरुप आहेत. म्हणूनच वारकरी त्यांना 'माउली' म्हणतात. पुरुषाला माउली का म्हणायचे? ज्ञानीयांचा राजा, महाराज, योगेश्वर असं जर त्यांना म्हटलं तर ते त्यांचे अवमूल्यन (devaluation) होईल. ते ज्ञानीयांचे राजे नसून ज्ञानीयांचे ईश्वर आहेत. तुम्ही केवळ बुद्धीने त्यांचे विभूतीपण जाणण्याचा प्रयत्न केला आहेत.

केवळ ज्ञानी कोरडा असतो. निदान त्याच्या वागण्यातून तरी तसे दिसते. ज्ञानेश्वर, माउली म्हणून किडा मुंगीचेही मनोगत समजावून घेतात, म्हणूनच ते म्हणतात, 'विश्वाचे आर्त माझे मनीं प्रकाशलें। अवघेचि जालें देह ब्रह्म ।।' पितृत्वापेक्षां मातृत्व श्रेष्ठ आहे. वात्सल्य, दया, क्षमा, शांती हे आईपणाचे मर्म आहे. सहनशीलता आणि आईपण इतके भावनाशील असते की कै. राम गणेश गडकऱ्यांनी आपल्या काव्यात त्याचे हळवे वर्णन केलेले आहे. आईचे हृदय कसे असते तर – 'जे आनंदेही रडते, दुःखात कसे ते होई.' हे जे माउलीपण आहे, ती ज्ञानेश्वरांना दिलेली जगातील सर्वोच्च पदवी आहे.

तुकाराम महाराज अभंगात म्हणतात – 'ज्ञानियांचा राजा गुरु महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हा ऐसें।'. माउलीमय झाल्यावर तुकारामांना कळले की माउली हे साक्षात गुरु आहेत. गुरु म्हणजे काय? श्रीगुरुचरित्रांतही सांगितले आहे की 'अज्ञानाचा अंधार घालविणारा तो गुरु,' आत्मप्रकाश देणारा, निजबोध देणारा तो गुरु. ज्ञानेश्वरांच्या आईपणाचा अनुभव घेतल्यावर त्यांना पितृत्व द्यावेसेच वाटत नाही. म्हणून वारकरी संप्रदाय

म्हणतो, ज्ञानोबा माउली – तुकाराम. येथे माउलीपणा बरोबरच ज्ञान गृहीत धरले आहे, आणि असा ज्ञानी प्रेमळ असतो. ज्ञान आणि प्रेम एकत्र आले की पूर्णत्व आले. आणि आईपण म्हणजे आदिशक्ती. मग विठोबालासुद्धा वारकरी साद देतो – 'विठोबामाउली'. विठोबा जरी दर्शन देत असला तरी त्याच्या मागे बळ आहे आदिशक्तीचे, रखुमाईचे. आदिशंकर पार्वतीच्या आदिशक्तीशिवाय काहीही करू शकत नाही. वारकरी विठोबा माउली बरोबरच 'बापरखुमादेवीवरु' असाही घोष करतो. बापरखुमादेवीवरु याचा एक अर्थ असा आहे की, बा–अपरखुमा (बाऽपरखुमा) देवी वरु. अपरखुमा म्हणजे अपरोक्ष माता (अपरखु–मा). बाप देवळात दिसतोय पण तो अपरोक्ष 'मा' आहे. मा म्हणजे रखुमाई. ती विठ्ठलाच्या मागे आहे. ग्यानबा–तुकाराम म्हणजे ज्ञानोत्तर भक्ती. तुकाराम हे भक्तिमंदीराचे कळस. म्हणून ग्यानबा–तुकाराम मंत्रात ज्ञानाचे दर्शन, अधिकार आहे; परंतु त्याला भक्तीची जोड दिली आहे, हे हा ग्यानबा–तुकाराम मंत्र सांगतो. ज्ञानेश्वरमाउली यामधे आईपणाची सर्वश्रेष्ठ शक्ती आहे. म्हणूनच ज्ञानेश्वर म्हणजेच मूर्तिमंत आईपण. ज्ञानेश्वरांच्या मागे आईपणाचे वलय नाही. तेच आई–माउली आहेत. म्हणूनच त्यांच्या विभूतीपणात त्यांचे माउलीपण येते. अशा या देवरूपाचे पूर्णपुरुषाचे वैशिष्ट्य हेच की तो स्वयं आई–माउली असतो. हे विभूतीपण या मंत्राने व्यक्त झालेले आहे. वारकरी संप्रदायाचे हे वैशिष्ट्य आहे की त्यात नुसते ज्ञान नाही, त्यात हळवेपणाही आहे. वारीत अभंग गाताना वारकरी जसा आनंदतो तसे त्याच्या डोळ्यात आनंदाश्रूही येतात.

मागील पिढीतील न्या. म. गो. रानडे हे श्रेष्ठ विचारवंत मनाने हळवे होते. आणि केवळ ज्ञानाचे रुक्ष संशोधन करणारे वि. का. राजवाडे पूर्ण रुक्ष होते. लोकमान्य टिळक श्रेष्ठ राजकारणी होते तरी अंतरी हळवे मन होते. त्यांनी माउलींचे माउलीपण जाणले परंतु गीतेवरील टीका 'गीता रहस्य' बुद्धिवादाच्या आश्रयाने लिहिली. 'भाव तोचि देव' हे एकनाथांचे सूत्र जर मान्य केले तर ज्ञानदेवांनी गीतेला 'भावार्थ दीपिका' संबोधले तर लोकमान्यांनी गीतेला 'गीताशास्त्र' न म्हणता 'गीतारहस्य' म्हटले. न्या. रानडे बुद्धिवादी असूनही भाविक होते. त्यांनी पाहिले की ही भोळीभाबडी माणसे वर्षानुवर्षे पांडुरंग भेटीसाठी चालत येतात. त्यांची ताकद केवढी आहे! ते भक्तिभावाने परमार्थ आचरणात आणीत आहेत. त्यांच्या डोळ्यात ही भक्ती पाहून अश्रू आले. ही भक्तीची ताकद ज्ञानाला आहे. टिळकांनी सुरू केलेले गणेशोत्सव, शिवजयंती समाज प्रबोधनासाठीच सुरु केली. परंतु या प्रबोधनासाठी, समाजाची, जनांच्या मनाची वीटेवर वीट ठेवण्यासाठी मधे ज्या दरजा भक्तीने भरायच्या असतात. त्या भक्तीनेच समाजात सुसंवाद (Harmony) निर्माण होईल.

तसेच विठ्ठल कोण आहे, तो स्वयंभू आहे का, रुक्मिणीचा पती आहे, हे जरी कळले नाही तरी तो आमचा मायबाप आहे हा भक्तिभाव वारकऱ्यांच्या समुहाचा सांधा किंवा सेतु (Connecting link) आहे. हा सेतू वारकरी संप्रदायाने अतिशय सहजपणे निर्माण केला आहे. मनात आले म्हणून पाच दहा मिनिटे भक्ती केली, मग सोडून दिली असे भक्तीत चालत नाही. त्यात सातत्य लागते, तळमळ लागते. वर्षानुवर्षे अगदी आयुष्याच्या अखेरपर्यंत भक्ती सुटत नाही. आषाढी–कार्तिकी वारी आली की वारकरी बेचैन होऊन 'जाऊ दे तो संसार खड्ड्यात' असे न म्हणता, संसाराकडे पूर्ण लक्ष देऊन– 'आता झाली ना सर्व बेगमी मी परत येई पर्यंतची?, असे संसाराकडे पूर्ण लक्ष देऊन वारीची तयारी केलेली असते. म्हणजेच त्याने संसारही डावललेला नाही. मग तो सांगतो की, 'आता मी माझ्या विठूचा.' तो माझी वाट बघतो आहे. तुकोबा म्हणतात तसे – पाहतो वाटुली' आणि 'भेटी लागे जीवा। लागलीसे आस। भेटीला आंस ही महत्त्वाची आहे. वारी हे व्रत आहे, आणि हे व्रत केवळ ज्ञानी असणारी व्यक्ती हे चालवू शकणार नाही. वारकरी संप्रदायाचे जे महामंत्र आहेत– 'ग्यानबा तुकाराम', 'विठोबा माउली', व 'विठ्ठल रखुमाई', 'पुंडलीक वरदा हरि विठ्ठल', 'ज्ञानोबामाउली–तुकाराम,' हे मंत्र वारकऱ्यांच्या रक्तात मुरलेले आहेत, केवळ औपचारिकपणे उच्चारण्याचे नाहीत. वारकरी दुःखात असला तरी आर्ततेने 'माउली' म्हणून विठ्ठलाला साद देतो. आनंदानेही विठ्ठलाला हीच हाक मारतो. भक्तीमय बुद्धीच फक्त याच विश्लेषण करू शकते. हा फरक कसा, तर बैठकीत गाणे ऐकताना, गाण्याने मला आनंद झाला तर 'व्वाऽ क्या बात है !' ही दाद हृदयातून बाहेर पडते. हा गायक कोणत्या घराण्याचा आहे, याने ही तान अशी का घेतली, असे प्रश्न, असे शब्दच्छल करण्याची वृत्ती केवळ बुद्धिवाद्यांकडे असते. खऱ्या जाणकाराकडे नसते. अशी बुद्धी भक्तीत नाहीशीच होते. साक्षात प्रेम म्हणजे ज्ञानेश्वर हे भावानेच समजते. आणि ती भावनिर्मिती मंत्रामुळेच भाविकास शक्य आहे. जसे अक्कलकोट स्वामी भक्त भक्तमंदिरात पूर्ण भावाने, "श्री स्वामी समर्थ – जय जय स्वामी समर्थ" असा नामोच्चार पूर्ण देहभाव विसरून करतात – तो हा भक्तिभाव. नामोच्चार हे केवळ शब्द असले तरी त्या मागे ती आच, तो भक्तिभाव आहे, की एक क्षणसुद्धा मला तुमच्या वाचून चैन पडत नाही. लहान मूल जसे आई दिसली नाही तर कावरे बावरे होते, ती ही ओढ आहे. हीच ओढ वारकऱ्यांची विठ्ठलासाठी असते.

नुसती घरातील विठ्ठलाची तसबीर बघून हे समाधान होत नाही. ते सावळे रुप पंढरीला जाऊन, नामदेवाच्या पायरीला वंदन करून, समोरच्या चोखोबांचा आशीर्वाद घेऊन विठ्ठलाच्या पायी डोके ठेवले

तरच समाधान होते. नामदेवाची पायरी, समोरचे चोखोबांचे राउळ या विठ्ठल प्राप्तीच्या पायदंड्या (steps to God)आहेत. याचा अर्थ असा आहे की या नामा-चोखा यांचा हात धरूनच तुम्ही विठ्ठलाकडे जा.

ज्ञानदेवाबरोबर आपण नामदेवाचेही नाव घेतो. कारण ज्ञानदेव म्हणजे ज्ञानोत्तर भक्ती व नामदेव म्हणजे निर्मळ भक्ती. म्हणून भक्ती हेच त्यांचे अभेदत्व. आपण जसे नामदेव म्हणतो तसे तुकादेव का म्हणत नाही? तुका-राम याचा अर्थ राम-रमते, जो रमतो तो राम. मग वारकरी कशात रमतो, तर तुकाराम या हृदयस्थ शब्दात. तुकारामांनी जी दृष्टी दिली, जो बोध दिला, तो वारकऱ्याच्या हृदयात साठलेला असतो. म्हणून ज्ञानदेव-तुकाराम हा जो महामंत्र आहे त्यात हृदयातील असा खोल अर्थ आहे. आयुष्यात 'राम' नाही असे कधी वाटत नाही. ज्ञानेश्वर हे तुकाराम आहेत आणि तुकारामही ज्ञानदेव आहेत. तुकारामांचा देहूसंप्रदाय व ज्ञानदेवांचा आळंदीसंप्रदाय वेगळे आहेत असे कधीच झालेले नाही. दोन ठिकाणाहून जरी पालख्या निघत असल्या तरी त्यांचे अंतिम श्रेयस आणि प्रेयस पंढरपूरच आहे. आपली वारी चुकल्यावर तुकारामांनी जो विलाप केला आहे, तो विलाप या भक्तीचे सामर्थ्य दर्शवितो – 'पांडुरंगा मला मुळ पाठवा' असा निरोप तुकारामांनी वारकरी संतांबरोबर पंढरीला पांडुरंगाकडे पाठविला. ही त्यांची आर्तता त्यांच्या अभंगातून आपले हृदय विव्हळ करते.-

भेटीलागीं जीवा लागलीसे आस। पाहे रात्रंदिवस वाट तुझी ।।१ ।।
पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन। तैसें माझें मन वाट पाहे ।।२ ।।
दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली। पाहातसे वाटुली पंढरीची ।।३ ।।
भुकेलिया बाळ अति शोक करी। वाट पाहे परि माउलीची ।।४ ।।
तुका म्हणे मज लागलीसे भूक। धांवूनि श्रीमुख दावीं देवा ।।५ ।। तु.गा.११३६[१]

ज्ञानेश्वर तुकारामांनी भागवत धर्माचा झेंडा महाराष्ट्रभर फडकविला, हे या भक्तिभावाचे संप्रदायाचे वैभव आहे. या वैभवातील मूळ शक्ती म्हणजे ती विभूती – ज्ञानेश्वर, संपूर्ण अलिप्त व साक्षी. ही विभूती कशी आहे तर या विश्वाचा सर्व पसारा टाकून देऊन ते स्वत: दशांगुळे उरले आहेत. या विश्वाच्या पसाऱ्यात ते सापडणार नाहीत. वेदांनीही त्यांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला व शेवटी नेतिनेति या निष्कर्षाप्रत आले. पण ते वारकऱ्यांच्या हृदयात आहेत हे भक्तितूनच समजते. 'तत्वं त्वं असि' हे तत्व केवळ दोन डोळ्यात शिरून

[१]. श्रीसकलसंतवाणी- खंड २. तु.गा. ११३६

चालत नाही, तेथून हृदयात उतरावे लागते. हे अंतर रुक्मिणी–श्रीकृष्णात राहिले नाही. पण श्रीकृष्ण सत्यभामेच्या फक्त डोळ्यातच राहिला. म्हणूनच कृष्णतुलेच्यावेळी देवाची तुला केवळ रुक्मिणीच्या तुळशीपत्राने पूर्ण झाली. तुळशीपत्र पारड्यात ठेवल्यावर तराजू झुकला. प्रेमाला उणेपणा केवळ विकल्पाने येतो. म्हणून संत नेहमी सांगतात की देवाचा प्रसाद हातात पडला की लगेच खाऊन टाका. विचार करू नका. कारण बुद्धी विकल्प आणते. केवळ विश्लेषण हा तिचा स्थायिभाव आहे. प्रसादाला जात नसते. प्रसाद मिळण्याच्या इच्छेत गैर नाही. बुद्धी विक्षेप निर्माण करुन प्रसादाला हात कसा पालथा करावा हे शिकविते. आणि भक्ती प्रसाद कितीही येवो ही भावना निर्माण करते. आणि भावना म्हणजे ईश्वराने दिलेला कृपाप्रसाद. हा प्रसाद घेतल्याने घेणारा देव स्वरुप होतो. 'कारण तो प्रसाद मीच मला दिलेला आहे.' हेच ज्ञानदेवांनी चांगदेवांना सांगितले. 'तू आणि मी एकच आहोत. देणारा व घेणारा हे भिन्न नाहीत, दोघेही विष्णुरूप आहोत. देणारा विष्णुस्वरुप, प्रसाद विष्णुस्वरुप व घेणाराही विष्णुस्वरुपच आहे'.

हा भवसागर तरून जाण्यासाठी एकमेव आधार म्हणजे हे मंत्र. मननेन त्रायते इति मंत्रः। म्हणून मंत्र यांत्रिकपणे घ्यायचा नाही. रुक्मिणी विठ्ठलाशेजारी दिसली नाही म्हणून तिला विसरायचे नाही. वारीत आपण विठोब्बा–रखुमाई म्हणतो. म्हणजे आयुष्याचे अंतिम ठिकाण आईच्या हृदयात आहे. विठोबामाउली जवळ. इथे ज्ञानोबामाउलीसारखाच विचार येतो की, विठ्ठलालाही आम्ही विठोब्बामाउली का म्हणतो? पुरुषाला आई कसे म्हणतो? इथे विठ्ठलाचे बाह्य रूप बघायचे नाहीं. त्याचे भावनिक स्वरूप पाहतानाच आम्हाला त्याच्या प्रेमाचा अनुभव घेता येतो; तो चिकित्सेने घेता येत नाही, असे या मंत्राचे सामर्थ्य आहे. त्याला एक आंतरिक नाद आहे. पंढरपूरला पोहोचे पर्यंत 'विठोब्बा रखुमाई। विठ्ठल रखुमाइ' हा तो ध्यास आहे. यात सूर आहेत, गेयता आहे, त्याला सामवेदाचे सामर्थ्य आहे. त्यामुळे हा कधीही बेसूर, भेसूर होत नाही. संसार हा बेसूर, कंटाळवाणा होत नाही, कारण त्याला या सुरांचे सामर्थ्य आहे, मंत्राचे सामर्थ्य आहे. हा कायम टिकणारा, पाठराखण करणारा मंत्र आहे. म्हणून तो अक्षय मंत्र आहे. अक्षय का? तर जे नश्वर आहे त्याच्याबरोबर राहून आम्हाला ईश्वर गाठायचा आहे, म्हणून त्याचे सामर्थ्य अक्षय आहे. आपण नेहमी कमी शब्दात वर्णन करण्याचा प्रयत्न करतो, त्याचे थोडक्यात मर्म सांगतो, तसे 'आई' या शब्दात सगळे स्वर आहेत. माता, माताश्री हे केवळ वर्णन करणारे शब्द आहेत. पण आई या शब्दाचे महत्त्व कसे असते पहाना ! काही दुःख, इजा झाली की तोंडातून अनाहूतपणे फक्त 'आई' असेच शब्द येतात. तिच्या नावाने हाक मारली जात नाही.

उच्चारला जातो तो ध्वनी 'आई', कारण त्यात कृत्रिमता नाही. तो हृदयातून उठणारा हुंदका असतो. पण 'आई' हे जीवनाचे मूळ स्वर आहेत. पंढरीचा पांडुरंग हा विठु-आई म्हणून 'विठाई' आहे, 'विठाई माउली'. विठू हा शब्द सांगतो की हा विटस्थल विटेवर उभा आहे. ही वीट त्याला त्याच्या लाडक्या पुंडलिकाने उभे राहण्यासाठी त्याच्याकडे फेकलेली आहे. नुसते विठू, विठ्ठल हे शब्द काहीसे कर्कश वाटतात. त्याला आईची जोड दिली की विठाई या शब्दाला जिव्हाळा येतो. विठाई म्हटले की विठ्ठलाबद्दलचे, त्याच्या वात्सल्य स्वरुपाबद्दलचे, अगदी आपल्या आईबद्दलचेही प्रेमही त्या शब्दात येते. रखुमाई जवळ नसली तरी तिच्याही प्रेमाची ही आठवण आहे. असा या संप्रदायाचा गाभा व अर्थ आहे. हा आनंद चिकित्सेने घेता येत नाही. इथे प्रश्न असा येतो की बुध्यांक महत्त्वाचा की भावांक महत्त्वाचा ! प्रो. राजवाडे म्हणतात की, या वारकरी संप्रदायाने टाळकुटेपणा शिकविला. त्यांनी समाजकार्य काय केले? कोणत्याही पुढाऱ्याशिवाय, पोलिसांची काहीही मदत न घेता, पालखीच्या मागे पुढे आपापल्या नंबराने स्वयंअनुशासनाने चालणाऱ्या दिंड्या पहाव्यात. दिंडीतील प्रत्येकाची जागा ठरलेली, ध्वजधारक व वीणेकरी यांची ठरलेली जागा, संध्याकाळी दिंडीच्या मुक्कामाची समाज आरती, वारीच्या प्रमुख चोपदाराचा चोप वर जाताच होणारी संपूर्ण शांतता, या गोष्टी समाजधुरिणांनीसुद्धा खूप शिकण्यासारख्या आहेत. कारण वारीवर सत्ता चालते फक्त पांडुरंगाची. अंधश्रद्धा म्हणावी तर दरवर्षी नवीन दिंड्याची संख्या वाढतेच आहे. आता तर हजारो सुशिक्षित व परदेशी व्यक्तीसुद्धा या पायी वारीत असतात. यातून तथाकथित चिकित्सकांना शिकण्यासारखे खूप आहे. यामधे निजबोध आहे तो असा आहे की, बुद्धिवादाने तुम्ही काय म्हणता, ती बुद्धी तुम्ही कशासाठी वापरता तर साधन व्यवस्थापनासाठीच ना ! (Resourse Management) पण वारकऱ्याला संसार व परमार्थ एकमेकांना पूरक (Complementary) करायचे आहेत. पण हे एकमेकांना पूरक आपलेपणाच्या भावस्थितीत होतात. शिवाय मला सुखशांती कशासाठी हवी आहे, ती कशात आहे? यातील श्रेयस काय, प्रेयस काय याचे ज्ञान भक्तीतूनच झाले आहे. तो पांडुरंग सर्व श्रेष्ठ आहे म्हणूनच मी त्याला सांकडे घालतो आहे. आणि तो विठ्ठलही सांगतो की हे सर्व वारकरी माझी लेकरे आहेत. इतका विश्वात्मक भाव निर्माण झाल्यावर आणखी काय द्यायचे राहिले? यावर पुस्तके, ग्रंथ वाचून, चर्चा करून शेवटी विकल्पच निर्माण होतो. समाजांत पुढाऱ्यांची, मंत्र्यांची हांजी हांजीच करावी लागते. ते लाच घेऊनही काही करत नाहीत. पांडुरंगाला फक्त तुमची भक्ती व प्रेमभाव हवा आहे. तो देतो मुक्तीचे वरदान. वारकऱ्यांच्या विठाईमाउलीला विकल्पाची

कसली छटा असणार आहे? हा तर शुद्ध नामोच्चार आहे. हा नामोच्चार तुम्हाला हवे ते सर्व मिळवून देतो. मुख्य मिळवून देतो, ती चिरंतनाची मन:शांती. 'मी देवाचा, देव माझा' हा विश्वास मिळतो. म्हणूनच नामसंकीर्तन साधन पै सोपे।. पाप हे विकल्पानेच घडते व नामस्मरणाने विकल्प दूर होतात. म्हणून नाममंत्र हे सामर्थ्य आहे आणि ती संप्रदायाची शक्ती आहे. 'इसमे क्या है।' हे नाकर्त्याचे निरर्थक तत्त्वज्ञान आहे. त्यापेक्षा साधा, स्वच्छ मनाचा वारकरी श्रेष्ठ. ज्यांना काहीच करायचे नाही ते फक्त श्रद्धा-अश्रद्धा या शब्दांचे शब्दच्छल करून अवडंबर माजवतात. ही क्रूर चेष्टा आहे. या सर्वातून बाहेर पडण्यासाठी ज्ञानोबा-तुकोबांना आवाहन करायचे.

नैवेद्य म्हणजे ज्ञानोबा-तुकाराम यांच्या बोधाप्रत नेणारा मार्ग आहे. त्यागाची जी भावना आहे ती मी नैवेद्याची कृती करून दाखवीत आहे. तुमच्याकडे, तुमच्या बोधाकडे नेणारा तो नैवेद्य. तुमच्या सारखे होण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

जे कां रंजले गांजले। त्यासी म्हणे जो आपुले।

तोची साधू ओळखावा। देव तेथेची जाणावा।। तु.गा.२०४

हा संतांनी वारकऱ्यांना दिलेला भक्तीचा मंत्र आहे. नैवेद्य हा एक यज्ञ आहे. ज्याला जाणून घ्यायचे आहे (वेद्य) त्याला विनंती ही की, आता माझा स्वीकार करा. संत देवापेक्षाही श्रेष्ठ असतात. ज्ञानदेव श्रीगुरु निवृत्तिनाथांना भगवंतापेक्षाही श्रेष्ठ मानीत. तुकोबांच्या आवाहनाने, त्यांच्याशी एकरुप झाल्याने जे तुकोबांना प्राप्त झाले ते, मलाही होण्याचे भाग्य लाभेल. हा निजबोध श्रद्धा आहे. म्हणजेच तू त्यांच्यापासून वेगळा नाहीस. त्यासाठी माझी पाटी चांगदेवासारखी कोरी पाहिजे, त्यावर विकल्पाचे शेवाळे नको. ज्ञानदेव तुकोबा आपल्यातून दूर गेलेलेच नाहीत. अंत:करणातून हाक मारा ते धावत येतील. परमेश्वर तरी त्यांच्यापेक्षा कुठे वेगळा आहे? तो तुमच्या-माझ्या आगे मागेच उभा आहे. वारीत येतो ना ! घरी सुखरुप पोहोचवतो ना ! तो तर पंढरपुरी दोन्ही हात कमरेवर ठेवून, तुम्ही दिसलात की आणखी दोन हातांनी चतुर्भुज होवून तुम्हाला मिठीत घ्यायला आसूसला आहे. म्हणून "विठ्ठलमाउली".

ज्ञानदेव-तुकाराम ही विठ्ठलाचीच नाम रुपे. म्हणून ग्यानबा-तुकाराम !

## [1] तुकयांना आवाहन

तुकया देवा व्हावे प्रसन्न। तुमच्या नैवेद्यासी मिष्टान्न।
असावे घरी भरभरुन। द्यावे आशीर्वचन ऐसे मला ।।१ ।।
पूजा तुमची वैयक्तिक। तरी भक्त येती अनेक।
जे श्रद्धावंत लोक। विष्णुदास ।।२ ।।
तुमचे पूजा सत्र चालविती जीव। तैसे ऋषि-मुनी मानव।
कारण तुम्ही जगद्गुरु देव। समस्तांचे ।।३ ।।
तुकया राजा शक्तिमाना। ऐकावी आमुची प्रार्थना।
द्यावे पूजेस आशीर्वचना। मनोकामना पूर्ण करा ।।४ ।।
तुम्हा मारिता हाक। सांभाळिता आपुली भाक।
ऐसा तुमचा लौकिक। राजाधिराजा ।।५ ।।
तुम्ही साई साक्षात् ईश्वर। घेतला जीवलोकी अवतार।
ज्ञानीयांच्या नंतर। कळस मंदिरावर भागवत धर्माचा ।।६ ।।
जे अणुरेणिया थोकडे। आकाशाच्याही पलीकडले।
तुम्हा घालतो सांकडे। वैकुंठ धामी न्यावयासी ।।७ ।।
स्वीकारावी मंत्रपुष्पांजली। प्रसादासाठी पसरे झोळी।
इच्छा सर्व आता निमाली। ऐसे द्यावे आशीर्वचन ।।८ ।।
मी भाग्यवान हे जाणी। तुकयाची अभंगवाणी।
आणिता मी आचरणी। प्राप्त खाणी शाश्वत सुखाच्या ।।९ ।।
तुम्ही आणि ज्ञानदेव। तुम्हापायी सर्व वैभव।
आनंदे भरतसे विश्व। आनंदाचे डोही ।।१० ।।

---

१. प्रा.डॉ. माधवराव दीक्षित, 'तुकारामविजय' पोथी.

तुका ज्ञाना जगदीश्वर। विश्वंभर विश्वाआधार।

दैन्य करिती दूर। संसार होई परमार्थी ।।११ ।।

ज्ञानीयाच्या ओवीचा यावा अनुभव। आपुलासा व्हावा विश्वात्मक देव।

नाम संकीर्तनासाठीच जगावं। आशीर्वाद द्यावा तुकारामा ।।१२ ।।

घेई तुमचे पसायदान । माझे जीवन सुखी संपन्न।

आता इच्छा फार करून। राहिली नाही ।

वारकऱ्यांनी 'ग्यानबा तुकाराम' हा मंत्र म्हटल्यावर :

## ज्ञानोबा-तुकोबांचे पसायदान[१]

किंबहुना सर्व सुखी। पूर्ण होवूनि तिन्ही लोकी

भजी जो आदि पुरूखी। अखंडित ।।

येथ म्हणजे श्रीविश्वेश्वरावो। हा होईल दान पसावो।

येणे वरे ज्ञानदेवो। सुखीया झाला ।।......ज्ञानदेव.

[१,२,३] हेचि दान देगा देवा। तुझा विसर न व्हावा।

गुण गाईन आवडी। हेचि माझी सर्व गोडी।

न लगे मुक्ति आणि संपदा। संतसंग देई सदा।

तुका म्हणे गर्भवासी। सुखे घालावे आम्हासी ।। .....तुकाराम.

## [४] ग्यानबा-तुकाराम

### वारकरी संप्रदायाच्या वारीचे आजचे स्वरूप:

वारकरी संप्रदायाची पंढरीच्या पांडुरंगाला भेटीची आषाढी-कार्तिकी वारी ज्ञानेश्वरांच्या जन्मा पूर्वी कितीतरी वर्षापासून चालू होती. माउलीचे वडील विठ्ठलपंत हे आषाढी-कार्तिकी वारी करीत असत हे

---

१. श्रीसकलसंतगाथा खंड २ तु.गा.२२२२

२. श्रीसकलसंतवाणी खंड २, तु.गा.२२२२

३. श्रीसंत तुकाराम गाथा २२२२

४. भंडारे संदेश (आधार) वारी एक आनंदयात्रा.

नामदेवाने 'ज्ञानेश्वरांची आदि' या त्यांच्या गाथेतील भागांत लिहून ठेवले आहे. त्यानंतर ज्ञानेश्वरांच्या अवतारकार्यापूर्वी वारकरी संप्रदायाचा महामंत्र 'पुंडलीकवरदा हरिविठ्ठल, विठ्ठल-रखुमाई, विठोबा-रखुमाई' असा असावा. ज्ञानदेवांच्या पंढरीतील वास्तव्यानंतर विशेषत: त्यांच्या संजीवन समाधीनंतर सर्व ज्येष्ठ संत व वारकरी यांना अत्यंत दु:ख झाले. व त्याचवेळी माउलींचे नंतर अवघ्या सात महिन्यात सोपानदेव, चित्कला मुक्ताई व निवृत्तिनाथ यांनी अनुक्रमे सासवड, मेहूण व त्र्यंबकेश्वरी संजीवनी समाधी घेतल्या. वारकरी संप्रदाय काहीसा पोरका झाला. ज्ञानेश्वरांवरील उत्कट प्रेमाने जेष्ठ संतांनी व वारकऱ्यांनी ज्ञानेश्वरांचे नांव त्यांच्या हयातीतच महामंत्रात गोवले. 'ज्ञानोबा माउली, ज्ञानेश्वर महाराज की जय' असा घोष 'पुंडलीकवरदा' व विठ्ठल-रखुमाई' बरोबरच होऊ लागला. ज्ञानदेव-नामदेवा नंतर सोळाव्या शतकात एकनाथ महाराज आले. त्यांनी ज्ञानदेवांचे ऐक्याची व जाती-वर्ण विरहित भगवत्भक्तांची मांदियाळी चंद्रभागेच्या वाळवंटात उभी केली. 'ऐक्यपण सकळ वसे । व्दैतबुद्धी कांही न दिसे ।।' हे निवृत्तिनाथांचे वचन नाथांनी व त्यानंतर सतराव्या शतकात जगत्गुरु संत तुकारामांनी परमार्थाप्रमाणेच समाजजीवनातही रुजविले आहे. 'कुळजाती वर्ण हे अवघेची अकारण' हे ब्रीद खोलवर रुजले. संत तुकारामांनी या कुळजाती वर्ण भेदासाठी सर्व समाजावर आपल्या अभंगातून कोरडे ओढले आहेत.

ज्ञानेश्वर-नामदेव-एकनाथ इतकेच वारकरी संतानी व संप्रदायाने संत तुकारामांवर नितांत प्रेम केले. म्हणूनच या संताना मानवंदना म्हणून सर्व वारकरी संप्रदाय 'विष्णुमय जग । वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम । अमंगळ ।।' ब्रीद म्हणून मानतो.

भागवत धर्मात व वारकरी संप्रदायात झालेल्या या मंगल बदलाची दखल संत तुकारामांच्या शिष्या संत बहिणाबाई[१,२] यांनी घेतली आहे. त्या म्हणतात –

संतकृपा झाली । इमारत फळा आली ।।
ज्ञानदेवे रचिला पाया । उभारिले देवालया ।।
नामा तयाचा किंकर । तेणें रचिलें तें आवार ।।
जनार्दन एकनाथ । खांब दिधला भागवत ।।

---

१. श्रीसकलसंतगाथा, खंड२, ब. गा. ३२

२. श्री सकलसंतवाणी,खंड २ ब.गा.३२.

तुका झालासे कळस। भजन करा सावकाश ।।

बहिणी म्हणे फडकती ध्वजा। निरुपणा केले वोजा ।। ब.अ.३२

या नंतर 'ग्यानबा–तुकाराम' हा वारकरी संप्रदायाचा महामंत्र झाला ज्ञानदेवांच्या समाधीनंतर यावनी सत्तेची लाट महाराष्ट्रभर पसरली, एवढेच नव्हे तर ती दक्षिणेतही फोफावली. ती लाट महाराष्ट्रात त्या नंतर जवळ जवळ पाचशे वर्षे होती. त्यानंतर देश इंग्रजी सत्तेखाली दीडशे वर्षे भरडला गेला. इतके झाले तरीही ज्ञानदेव तुकोबांनी रुजविलेली व जोपासलेली भागवत धर्माची व वारकरी संप्रदायाची खोलवर गेलेली मुळे घट्ट होती. पंढरीची आषाढी–कार्तिकीची वारी कधीही थांबली नाही. सर्व वादळवाऱ्यात ती निष्ठेने ताठ उभी राहिली.

साधुसंतांच्या निर्वाणानंतर वारीच्या वेळी, विशेषत: आषाढी वारीच्या वेळी या संताच्या पादुका त्यांच्या समाधी गावातून अथवा जन्म गावातून पालखीतून किंवा रथातून पंढरपूरला विठ्ठल भेटीसाठी नेण्याची पद्धती बहुधा तुकाराममहाराजांचे निर्वाणानंतर महाराष्ट्रात सुरू झाली असावी. असे सांगतात की संततुकाराम महाराज आषाढी–वारीसाठी ज्येष्ठ वद्य अष्टमीला देहूहून आळंदीस येत व ज्ञानदेवांच्या समाधीचे दर्शन घेऊन नवमीस पंढरपूरसाठी आळंदी सोडीत असत.

तुकाराम महाराजांच्या निर्वाणानंतर प्रथम त्यांचे बंधू कान्होबा व नंतर त्यांचे चिरंजीव नारायण महाराज तुकोबांच्या पादुका घेऊन आळंदीस येत व त्याच पालखीत ज्ञानदेवांच्या पादुका घेऊन पंढरपूरला विठ्ठलदर्शनाला जात असत. इ.स.अठराशे बत्तिस पर्यंत ही प्रथा चालू होती. परंतु अंतर्गत काही कारणाने त्या वर्षी तुकोबांच्या पादुका आळंदीस आल्या नाहीत. तेव्हा ज्ञानदेवांचे भक्त हैबतीबाबा अरफाळकर यांनी माउलींच्या पादुका गळ्यात घालून पंढरीस नेल्या होत्या. व पुढे आळंदीहून ज्ञानदेवांची पालखी स्वतंत्रपणे पंढरपुरास जाऊ लागली. शितोळे सरकार यांनी या कामी खूप मदत केली. आजही हैबतीबाबांचे वंशज व शितोळे यांचे वंशज यांचा पालखी सोहळ्यात प्रमुख भाग असतो. आता देहू, आळंदी येथील पालख्या चांदीच्या रथातून डौलाने जातात.

## महामंत्रातून महाराष्ट्रात 'भक्तीसंस्कृती' निर्माण झाली

ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, नामदेव, निवृत्तिनाथ, सोपानकाका, मुक्ताई, चोखोबा, गजानन महाराज, स्वामी समर्थ, रामदास इ. अनेक संताच्या पालख्या आषाढीस पंढरपूरी विठ्ठल भेटीला येतात. मुख्यत्वे

आषाढीला लक्षावधी वारकरी आपापल्या संताच्या पालखीबरोबर पंढरपूराची वाट चालतात. विशेष उदाहरण द्यायचे तर या दिंड्यापैकी संत ज्ञानेश्वर व संत तुकाराम यांच्या दिंड्या सर्वात मोठ्या असतात. यातील संत ज्ञानेश्वरांची पालखी दिंडी पादुकांसह ज्येष्ठ वद्य अष्टमीस मंदिरातून बाहेर पडून आजोळघरी मुक्कामास जाते, व नवमीस पहाटे आळंदी सोडते. संत तुकारामांची पालखी अष्टमीस देहू सोडून मार्गस्थ होते. या दोनही पालख्या स्वतंत्रमार्गे प्रवास करून आषाढ शुद्ध दशमीस पंढरपूर नजीकच्या वाखरी येथे भेटून पंढरीत प्रवेश करतात.

[१] प्रत्येक वारीत शेकडो दिंड्या असतात. वर्षानुवर्षे वारीतील त्यांचे मुख्य रथाच्या पुढे किंवा मागे असलेले क्रमांक ठरलेले आहेत. एवढेच नव्हे तर दिंडीतील प्रत्येकाचे स्थानही निश्चित असते. दिंडीच्या पुढे दिंडीचा भगवा झेंडा व चोपदार असतो. त्यामागे टाळकरी, मध्याला पखवाज वादक व शेवटी वीणेकरी असतो. वीणेकऱ्याच्या मागे वारीतील स्त्रियां असतात. दिंडीत दोनशे ते दोन हजारांपेक्षांही जास्त वारकरी असतात. वीणेकरी दिंडीचे नेतृत्व करतो. पालख्या वाखरीला पोहोचेपर्यन्त वारीतील वारकऱ्यांची संख्या आठ ते दहा लाखाचे पुढे पोहोचलेली असते. दिंडी बरोबर नसलेल्या वारक्यांची संख्याही दोन/तीन लाखाचे पुढे असते. मुख्य वारीचा चोपदार सर्वावर नियंत्रण ठेवतो. पालखी सोहळा – प्रमुखांचा निर्णय सर्वांना मानावा लागतो. प्रत्येक दिंडीत गाईले जाणारे अभंगही स्वतंत्र असतात. प्रत्येक रात्री ज्या गावी मुक्काम असेल तेथील ग्रामस्थासह 'समाज आरती' होते.

हा वारकरी संप्रदाय शतकानुशतके लोकाश्रयाने मोठा झाला आहे. वारीत अगदी अपवादानेसुद्धा कोणी उपाशी राहत नाही. हा सोहळा वारीतील प्रत्येकाला आपल्या सर्व संसारिक काळज्या विठ्ठलाचे झोळीत टाकून 'ग्यानबा–तुकाराम' या महामंत्रात बांधून टाकतो. जातिभेद तर औषधालाही सापडणार नाही. वारीत श्रीमंतापासून ते दरिद्रीनारायणापर्यंत, उच्चविद्या विभूषितापासून निरक्षरापर्यंत, सर्व वर्णांचे स्त्री–पुरुष व परदेशी वारकरीही असतात. हे सर्व विठ्ठलाचे पाहुणे सर्व भेदाभेद विसरून उन्हातान्हात, पावसापाण्यात अडीचशे ते तीनशे किलोमिटरचा प्रवास बेभानपणे करीत असतात. त्यांना नशा असते विठ्ठल प्रेमाची, विठ्ठल भेटीची. हरिनामाचा व ग्यानबा–तुकारामाचा घोष करीत त्यांना तहानभूक आठवतच नाही. पांडुरंगाच्या दर्शनाने वा कळसाच्या दर्शनाने वारकरी धन्य होतो. आपल्या जीवनात नवचैतन्य घेऊनच आपल्या जगराहटीत

---

१. भंडारे संदेश, वारी एक आनंद यात्रा, मनोविकास प्रकाशन पुणे, २००८

परत येतो. पंढरीचा विठ्ठल प्रत्येक वारकऱ्याला सुखरुप घरी पोहोचवितो. संसार करता करता आपणही विठ्ठलाची भक्ती करु शकतो हा विश्वास वारकरी संप्रदायाने समाजाला दिलेला आहे. या लाखोंच्या महायात्रेला शासनाचे बजेट नाही, देणग्या नाहीत, आहे फक्त स्वयंअनुशासन. ज्याच्या पायाला स्पर्श करता येतो असा एकमेव देव आमचा विठूराया आहे. ज्ञानदेव, नामदेव इत्यादी संतांनी आपल्या अभंगातून 'ज्ञानदेव म्हणे', 'नामा म्हणे', 'म्हणे गोराकुंभार', 'सावता म्हणे', 'जनी म्हणे', 'सोयरा म्हणे', 'मुक्ताई सांगे', 'तुका म्हणे' असा स्वानुभावाचा हुंकार देत आपल्या भाषेतून जगात देव एकच आहे, व तो आहे आमचा पंढरीचा राणा, सावळा विठ्ठल हे सांगितले. हे समाजातील विशेषत: शूद्रातिशूद्रांना सांगून माणूस धर्माची व ईश्वराची कल्पना दिली. संन्यासाचा, अलिप्तेचा पुरस्कार कोणत्याही संताने केला नाही. या भागवत संप्रदायाने नामजपाने तुमची भक्ती विठ्ठलापर्यंत पोहोचते अशी शिकवण दिली. विवेक व वैराग्यही शिकविले. यासाठी महामंत्र दिला 'ग्यानबा-तुकाराम, पुंडलीकवरदा हरिविठ्ठल', या शिवाय अन्य मूर्तीपूजा, होमहवन वगैरे कर्मकांड काहीही नको. वरील मंत्राबरोबर हवे साधे, निर्मळ अंत:करण व नामजपाची निष्ठापूर्ण भक्ती. ज्ञानेश्वरकालीन वैष्णवांनी महाराष्ट्राला सर्व वर्णांचे, संत व योगिनी दिल्या. या सर्व वर्णांच्या व जातींच्या स्त्री-पुरुष संतांनी अभंग वाङ्मय भक्तिप्रधान करून येणाऱ्या अनेक पिढ्यांना चैतन्याचा मार्ग दाखविणारा विठ्ठलमार्ग तयार केला. या विवेचनाचा समारोप पुढील अभंगाने करता येईल.

[१,२] विठ्ठल विठ्ठल गजरीं । अवघी दुमदुमली पंढरी ।

होतो नामाचा गजर । दिंड्या पताकांचा भार ।।

निवृत्ती ज्ञानदेव सोपान । आपार वैष्णव ते जाण ।

हरीकिर्तनाची दाटी । तेथे चोखा घाली मिठी ।। चो.अ.६३

विठ्ठलाची दिठी व मिठी हा ज्ञानदेवांच्या भागवतधर्माचा प्रसाद आहे.

---

१. श्रीसकलसंतवाणी खंड१ चो.अ. ६३

२. श्रीसकलसंतगाथा खंड १ चो.अ. ६३.

# श्रीज्ञानेश्वरांचे गुरु श्रीनिवृत्तिनाथ
# आणि
# विभूतीस्वरूप निवृत्ती–ज्ञानदेव

श्रीनिवृत्तिनाथांचे विभूतिमत्वाचा आणि त्यांनी दिलेल्या नाथपंथी तत्त्वज्ञानाचा वारसा विभूती ज्ञानदेवांनी पूर्णत्वाने आपल्या जीवनांत अंगिकारला आहे. श्रीगुरु हे ज्ञानदेवांच्या जीवनात केंद्र स्थानी आहेत. गुरुमुखातून ज्ञान प्राप्ती झाल्याशिवाय ज्ञानाला पूर्णत्व येत नाही. ही संकल्पना मध्ययुगीन भारतात त्या वेळी व नंतरही एकनाथ, तुकारामापर्यंत होती. तरीही श्रीगुरू म्हणून ज्ञानदेवांचे हृदयी असणारे निवृत्तिनाथांचे स्थान एकमेवाद्वितीय आहे. असेच अतूट प्रेम, भक्तिभाव एकनाथांना त्यांचे श्रीगुरू श्रीजनार्दनस्वामींच्याबद्दल होता. म्हणूनच 'एकाजनार्दनी' ही त्यांच्या सर्व लिखाणाची 'मुद्रा' झाली.

निवृत्तिनाथ हे नात्याने ज्ञानदेवांचे वडील बंधू, परंतु त्यांचा ज्ञानदेवांच्या सर्व वाङ्मयात क्वचितच बंधु म्हणून उल्लेख झालेला आहे. माता–पिता, श्रीगुरू, गुरुमाउली असाच त्याचा उल्लेख झालेला आहे. या दोन भावंडातील वयाचे अंतर अवघे दीड वर्षांचे आहे. प्राप्त माहितीवरून निवृत्तिनाथांना गहिनीनाथ या त्यांच्या श्रीगुरुंपासून 'नाथपंथाची आज्ञा' किंवा गुरुपदेश निवृत्तिनाथांच्या वयाच्या अवघ्या सातव्या वर्षी मिळालेला आहे, व ते नाथपंथाचे परंपरेने सर्वोच्च आचार्य झाले. त्या वेळी ज्ञानदेवांचे वय साडे पाच वर्षाचे असावे. विभूतीत्वाशिवाय अन्य कोणतेही उपमान या घटनेला देता येत नाही. विभूती ज्ञानदेवांना सद्गुरू शोधावे लागले नाहीत. निवृत्तीनाथांच्या रूपाने अत्यंत श्रेष्ट श्रीगुरू त्यांना घरीच मिळाले. असा योग क्वचितच कोणा शिष्याचे आयुष्यात आला असेल. ज्ञानदेव निवृत्तिनाथांना ज्ञानसाधनेत व जीवनमार्गात, भविष्यातील आपले श्रीगुरु म्हणून पूर्णत्वाने त्या वयापासूनच अनुसरीत असावेत. निवृत्तिनाथांनी आपल्या या एकमेव शिष्यालाही त्यांच्या (ज्ञानदेवांच्या) वयाच्या सातव्याच वर्षी अनुग्रह दिला असावा. या सर्व भावंडांच्या जीवनातील पुढील घटनांचा विचार करताना, त्या घटनांना सामोरे जाण्यापूर्वी ही चारही भावंडे पूर्ण ज्ञानी झालेली आहेत असेच दिसते. नाथपंथीय परमेश्वर प्राप्तीचा योगमार्ग हा इतर मार्गांपेक्षा खूपच कष्टदायक आहे. म्हणूनच त्याला पूरक असा नामभक्तीचा मार्गही गहिनीनाथांनी निवृत्तिनाथांना व निवृत्तिंनी ज्ञानदेवांना सांगितला.

ज्ञानदेवांचे निवृत्तिनाथांवर प्रेम, भक्ती, जिव्हाळा आहे, 'श्रीगुरुंचेशिवाय माझे जीवनात अन्य काहीही नाही. मी जे काही बोलतो ते केवळ श्रीगुरुंच्या कृपेमुळेच आहे' ही निष्ठा अन्य कोणत्याही गुरु-शिष्य परंपरेत दिसली नाही.ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, पासष्टी व हरिपाठातील गुरुनिष्ठा ही शिष्याने सद्गुरुंना वाहिलेली सर्वस्वाची आदरांजली आहे. त्याच बरोबर श्रीगुरुंची तुलना करता येईल असा ईश्वरही नाही, इतका श्रेष्ठ दर्जाचा आदरभक्तीभावही आहे.[१] (कै.) विंदा करंदीकरांनी१ ज्ञानदेवांच्या अमृतानुभवाचे जे अर्वाचीनीकरण केलेले आहे त्याच्या 'अहो ज्ञानेश्वर' या प्रास्ताविकात निवृत्तिनाथ व ज्ञानदेव यांच्यातील गुरु-शिष्य संबंधाबद्दल 'विंदा' म्हणतात, 'तुमच्या आध्यात्मिक विकासाचा पहिला टप्पा म्हणजे निवृत्तिनाथांच्या उद्बोधनाचा व आसपासच्या नाथपंथी वातावरणाने तुमच्यावर केलेल्या संस्काराचा. अमृतानुभवाची सुरुवातच गुरुशिष्यसंबंधाचा स्वर छेडीत झालेली आहे. ब्रह्माची सगळी विशेषणे निवृत्तिनाथांना लावीत सुरुवातीलाच तुम्ही त्यांच्या आश्रयाला जाता. गुरु म्हणजेच ब्रह्म, गुरु म्हणजेच ब्रह्मविद्या ही सुरुवातीची भाषा त्या ठिकाणी थोडी सांकेतिक वाटते; पण तुमच्या मनातील अद्वैत विचाराची त्या संबंधावर पडलेली सावली लक्षात घेतली आणि 'गुरु' या संस्थेचे तुमच्या कालखंडातील केंद्रीय महत्त्व लक्षात घेतले की ते बोलणे सांकेतिक न ठरता वास्तवदर्शी ठरते. मात्र तुम्हा दोघातील गुरुशिष्यसंबंध अनोखा ठरतो तो अमृतानुभवातील पुढील अनेक प्रकरणात डोकावणाऱ्या त्या संबंधाच्या भावात्मक भारलेपणामुळे : कधी आर्तता, कधी समर्पितता, कधी आर्जव, कधी हट्टी लाडिकपणा, कधी विनोदगर्भ खेळकरपणा, कधी कृतज्ञता, कधी कृतार्थता अशा भावनेच्या अनेक छटा त्या संबंधाशी संलग्न झालेल्या आढळतात.

भावाभावातील रक्ताच्या जिव्हाळ्याची, पितापुत्रतुल्य वात्सल्याची व प्रियु-प्राणेश्वरीतुल्य प्रेम - भावाची (अमृ.८.२,३,४) डूब आपल्या दोघांतील गुरुशिष्यसंबंधाला लाभली नसती तर या संबंधाभोवती इतकी मनोज्ञ भाववलये निर्माण झाली नसती असेही वाटते. नाथपंथी वातावरणाने निवृत्तिनाथामार्फतच तुम्हाला अद्वैत सन्मुख केले. निवृत्तिनाथांनीच उपनिषदे, ब्रह्मसूत्रे व भगवद्गीता ही प्रस्थानत्रयी तुमच्या स्वाधीन केली, आणि तुमच्या पुढील प्रवासात (जिथे जिथे तात्त्विक कोंडी झाली तिथे तिथे) निवृत्तिनाथांनीच तुम्हाला आध्यात्मिक आधार दिला (अमृ.३.३२), म्हणूनच लेकराला आई आठवावी त्या सहजतेने संभ्रमात, अगतिकतेत, किंवा आनंदात तुम्हाला निवृत्तिनाथ आठवतात. तुमच्याकडून पुनःपुन्हा होणारे त्यांचे अनावर

---

१. करंदीकर विंदा, निवेदन- अहो ज्ञानेश्वर - पान ६-७.

उल्लेख आणि तुमची त्यांना उद्देशून होणारी अनिवार्य आवाहने यामुळे निवृत्तिनाथांची उपस्थिती या आध्यात्मिक आत्मचरित्रात सगळीकडे जाणवत राहते.' (पृष्ठ क्र. ६-७)

वरील लिखाणात 'विंदां'नी ज्ञानेश्वरांची जी संभ्रमावस्था व अगतिकता सांगितली आहे ती तशी नसून ज्ञानदेवांची श्रीगुरुजवळ असणारी ती संपूर्ण एकजीवता आहे. साखर जशी पाण्यात विरघळते तसे 'श्रीगुरु' या भावनेत ज्ञानदेव एकजीव झालेले आहेत. ज्ञानेशांच्या संपूर्ण वाङ्मयात त्यांनी आपले वैश्विक ज्ञानेश्वरपण, किंवा विभूतिमत्व उणावू दिलेले नाही. श्रीगुरुंशी एकजीव होऊनही ते दशांगुळे शिल्लकच आहेत. ज्ञानेश्वरांचे वाङ्मय अभ्यासताना अभ्यासकांना प्रकर्षाने जाणवते की त्यांची श्रीगुरुविषयींची विशेषणे ही सहज स्फूर्तीतून आलेली आहेत व त्यांची सहसा पुनरुक्ती नाही.

आपल्या सद्गुरुंबद्दल माउली अत्यंतिक जिव्हाळ्याने ज्ञानेश्वरीत, अनुभवामृतात, पासष्टीत पसायदानात, हरिपाठात, अभंगात भरभरून सांगतात. या सर्व कथनात माउलींनी श्रीगुरुंची स्तुती मनोभावे केली आहे. श्रीगुरुंना वंदन केले आहे. इतकी नम्रता धारण केली आहे की गुरुकृपेशिवाय मी कोणीच नाही. ही माउलींची नम्रता म्हणजे त्यांची शरणागती वा व्यक्तिनिष्ठा नाही तर लीनता आहे. गुरूचरणी लीन झाल्याशिवाय गुरू शिष्यास आपल्यात विलीन करून घेत नाहीत. माउलींसाठी निवृत्ति ही एक व्यक्ती नसून तो त्यांनी केलेला 'विश्वेश्वराचा', गौरव व प्रार्थना आहे. श्रीज्ञानेश्वरांना स्वकर्तृत्वाची पूर्ण जाणीव होती हे आपण त्यांच्या जीवनातून सहज जाणवून घेऊ शकतो.

पैठणला जाण्याचे वेळी निवृत्ती व सोपान यांना त्यांनी आपले यथार्थ मत स्पष्टपणे सांगितले व त्या दोघांनाही ते मान्य झाले. निवृत्तिनाथ हे जन्मतःच निवृत्त असल्याने शुद्धिपत्राने कर्मबंधन लावून घेणे त्यांना नको होते. सोपान तर म्हणाले की ऋषींचे कूळ कोणी विचारतो का? परंतु माउलींना वर्णाश्रमधर्माची मांडणी नीट गीतार्थाप्रमाणे हवी होती, त्यासाठी जनसंपर्क व जनसंग्रह आवश्यक होता. ते निवृत्तिनाथांना म्हणाले –

[१]विधि वेदविरुद्ध संपर्क संबध । नाहीं भेदाभेद स्वस्वरूपी ।।

अविधिआचरण परम दूषण । वेदोनारायण बोलियेला ।।

स्वधर्म-अधिकार जातीपरत्व भेद । उचित ते शुद्ध ज्याचे तया ।।

म्हणूनिया संतीं अवश्य आचरावें । जना दाखवावे वर्तोनियां ।।

---

१. श्रीसंत नामदेवांची गाथा, गीता प्रेस, गोरखपूर, ज्ञानदेवांची आदि ९०३

कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा । सर्वथा न करावा अनाचार ।।

प्रत्यवाय आहे अशास्त्री चालतां । पावन अवस्था जरी झाली ।।

ज्ञानदेव म्हणे ऐकाजी निवृत्ति । बोलीली पद्धती धर्मशास्त्रीं ।। [१]नामदेव, अ. ९०३

नम्रता हा ईश्वराला आवडणारा श्रेष्ठ गुण आहे. आपल्या धर्मशास्त्रात गुरु हाच ईश्वर मानला आहे. 'गुरुचरित्रात' तर स्पष्टपणे असे सांगितले आहे की हे गुरुतत्त्व इतके श्रेष्ठ आहे की एक वेळ ईश्वराचा कोप परवडला, परंतु गुरुचा कोप झाला तर त्याला प्रत्यक्ष ईश्वरही वाचवू शकत नाही. गुरु ही अज्ञानाचा अंधःकार नाहीशी करणारी शक्ती आहे. ती शक्ती आपल्या जवळ असल्याशिवाय नुसत्या शब्दज्ञानाने, वाचन करूनही ज्ञानाची प्राप्ती होत नाही. कारण पूर्णज्ञान हे समष्टी किंवा सम्यक ज्ञान असते.

शब्दज्ञान हे वेगवेगळ्या संप्रदायात मांडले जाते. जसे भौतिकशास्त्र हे भौतिकाला महत्त्व देते. अध्यात्मशास्त्र हे अतींद्रियाला महत्त्व देणारे आहे. असे ज्ञानाचे निरनिराळे कप्पे तयार होतात. पण हे सम्यक ज्ञान नाही. कारण हे तुकड्यातुकड्यासारखे ज्ञान (fragmentary - not cohesive) आहे. याने खंडित एकगामी सत्यदर्शन होते. आरशासमोर उभे राहिले तर पूर्ण शरीर दिसेल. परंतु तो आरसा फुटून तुकडे झाले तर प्रत्येक तुकड्यात शरीर अवयवांच्या तुकड्या तुकड्यांचे दर्शन होईल. सम्यक ज्ञान असे असते की ज्यात सर्वच गोष्टींचा, घटकांचा कार्यकारणभाव सामावलेला व समजलेला असतो.

ज्ञानदेवांच्या भोवती असणाऱ्या समाज – जीवनाचे पडसाद व संदर्भ त्यांच्या कौटुंबिक जीवनावर उठले परंतु अंतिम सत्याकडील त्यांची वाटचाल अविचल होती. 'अमृतानुभव' हा ज्ञानदेवांच्या आध्यात्मिक अनुभूतीचा स्वतःचा स्वतंत्र ग्रंथ आहे. अमृतानुभव हा 'सिद्धानुवाद' आहे. श्रीगुरुकृपेने त्यांचे आध्यात्मिक जीवन कसे कसे विकसित होऊन पूर्णत्वाला गेले याचे प्रगटन अमृतानुभवात आहे. आणि म्हणूनच श्रीगुरुविषयींचे त्यांचे विवेचन जास्त विशेषत्वाने सर्व प्रकरणात व प्रामुख्याने दुसऱ्या प्रकरणात सुस्पष्ट आहे. त्यातून उभी राहणारी गुरुकृपेची वचने ज्ञानेश्वरीतील वचनांपेक्षा वेगळे परिमाण गाठणारी आहेत. म्हणून अमृतानुभव हे ज्ञानदेवांचे आध्यात्मिक आत्मचरित्र आहे. योग व तत्त्वज्ञान या मार्गावरून जाताना झालेली त्यांची आध्यात्मिक वाटचाल प्रत्येक प्रकरणात व विशेषतः दुसऱ्यात प्रगट होत आहे. या सर्वामागील त्यांची एकमेव प्रेरणा व शक्ति आहे त्यांचे गुरु श्रीनिवृत्तिनाथ. ज्ञाननाथांचे आध्यात्मिक जीवन क्रमशः कसे

---

[१]. श्रीसंत नामदेवांची गाथा, श्री ज्ञानदेवांची आदि, गीता प्रेस, गोरखपूर.

पूर्णत्वास गेले हे त्यांनी स्वतःच त्यांच्या भाषेत [१,२]अमृतानुभवात निवेदन केले आहे.

गीतार्थ ज्ञानदेवांनी प्रथम श्रीगुरुमुखातून ऐकला आहे आणि ज्ञानेश्वरी हे भगवद्गीतेवरचे भाष्य आहे. ज्ञानेश्वरीतील गुरुविषयक भावना या जास्त भावनिक, आर्जवी व समर्पणात्मक आहेत. म्हणूनच जवळ जवळ प्रत्येक अध्यायात व विशेषतः अकरावे अध्यायात व पंधरावे अध्यायाचे शेवटचे ओवीत विशेषत्वाने प्रत्ययाला येते.

आध्यात्मिक घटनेचा अर्थ समजून घेताना घटनेचे भोवती जे रहस्य असते, गूढ असते, त्या रहस्याचे, गूढाचे आवरण गुरु काढून टाकतात. रहस्य काय आहे हे सांगत नाहीत. गीतेत सांगितले आहे की – उपदेश्यन्ति ते अज्ञानम् । ज्ञानिनां तत्त्वदर्शिनः । गुरु हा ज्ञानी आहे, तत्त्वदर्शी आहे. 'ते' तूच आहेस हे सांगणारा आहे. परंतु हे सांगण्यामधे अपुऱ्या ज्ञानाचे, अज्ञानाचे जे अडथळे आहेत, ते काय आहेत हे शिष्याला सांगितल्यानंतर शिष्याला पूर्णत्व येते. आणि हे पूर्णत्व श्रीगुरुकृपेशिवाय येत नाही. असा सद्गुरु विभूतीस्वरूप असतो. सद्गुरु निवृत्तिनाथ हे चैतन्यस्वरूपच आहेत. चैतन्याला मर्यादाच नाहीत. हे जे बहुरूप विश्व आहे त्याच्या पलिकडचे ते आहेत. असे त्यांचे ते विभूतीस्वरूप आहे. ते संपूर्णतया निवृत्तच (detached) आहेत. ज्ञानेश्वर म्हणतात की असे विभूतीस्वरूप सद्गुरू मला मिळाले हे माझे भाग्य आहे. कारण त्याचे नावच निवृत्ति आहे –

निवृत्ति जया नांव । निवृत्ति जया बरव ।

जया निवृत्तिची राणीव । निवृत्तिची ।। अमृ. २.७०

माउली म्हणतात, माझे सद्गुरु संपूर्णतया निवृत्तच आहेत (detached). त्या गुरुतत्त्वाला आकार नाही, विकार नाही, गुण नाही, त्यांना कोणतीच बंधने नाहीत. ते पूर्ण चैतन्य स्वरूप साक्षी आहेत. आणि हे चैतन्य माध्यमाचा आधार घेऊन आपल्या लीला करीत असते. सद्गुरुंची कृपा झाल्यावर श्रीगुरु–शिष्य हे द्वैतच संपून जाते. परंतु गुरूस्तवन करण्यासाठी गुरूला स्वत:पासून निराळे मानून द्वैत पत्करावे लागते. अमृतानुभवात प्रत्येक प्रकरणात, विशेषतः दुसऱ्या 'श्रीगुरुस्तवन' प्रकरणात हे ज्ञानदेवांनी सांगितले आहे

---

१. डॉ. साठे अ.म. प्रसाद अमृतानुभव.

२. ब्रह्मश्री साखरे दादामहाराज, सार्थ अमृतानुभव.

राखों जाता शिष्यातें । गुरुपणही धाडिले थितें ।

तरी गुरुगौरव जयातें । सांडीचिना ।। अमृ. २.१२

सद्गुरूंनी आपल्या सत्‌शिष्यास उपदेशामृताने कृतार्थ केल्यावर तो शिष्यही गुरुपदास प्राप्त होतो. परंतु त्यामुळे सद्गुरुंजवळ असलेले त्या शिष्याचे संबंधातील गुरुपदही संपते. परंतु अशा कारणांनी माझ्या गुरुंचा, श्रीनिवृत्तिनाथांचा गुरुमहिमा कमी होत नाही. उलट ते गुरुपण जास्तच तेजाळून येते, तेजोमय होते. व्यावहारिक उदाहरण द्यायचे झाले तर चांगला शिष्य उत्तम गुरुपासून शिक्षण घेऊन हुशार पदवीधर होऊन गुरुच्या बरोबरीची पदवी प्राप्त करून घेतो. त्यात शिष्य बरोबरीचा झाला म्हणून गुरुला कमीपणा न येता, उलट तो त्याच्या व्यासंगाचा गौरवच होतो.

सद्गुरु व शिष्य यांचे अद्वैत दाखविताना माउली लिहितात –

एकपण नव्हे सुसास । म्हणूनि गुरुशिष्याचे करुनि मिस ।

पाहणेंचि आपली वास । पाहतचि असे ।। अमृ. २.१३

माउलींची ही ओवी अत्यंत गोड आणि अंतर्मुख करणारी आहे. परमात्म्याचेच दुसरे नाव सद्गुरु. या परमात्म्याला किंवा ब्रह्मस्वरुपाला एकटेपणात करमेना म्हणून जणू त्याने गुरु – शिष्यपणांचे निमित्त करून आपणच गुरुरूपाने आपल्या शिष्यरूपाकडे गुरुकृपादृष्टीने पाहात आहेत. हे द्वैतातून दाखविलेले परब्रह्माचे अद्वैत स्वरूप मनोहारी आहे.

शिष्य सद्गुरु उपासनेने परमात्मस्वरूप कसा होतो हे सांगताना माउली म्हणतात –

उपास्तीवरी राबतिया । उपायफळीं येती मोडूनिया ।

वरिंवडिले जयाचिया । अनुज्ञा कां ।। अमृ. २.१७

शिष्य ज्यावेळी सर्वभावे आपला जीव सद्गुरुंच्या आज्ञेप्रमाणे त्यांच्या चरणी अर्पण करील किंवा आपला देहभाव सोडून देईल, तेव्हा उपासकाच्या उपायरुपी उपासनेस फळ येईल. याचाच अर्थ शिष्य जेव्हा आपल्या उपासनांनी सद्गुरुशी एकरूप होईल तेव्हा त्याला आत्मस्वरूपाची ओळख होऊन तो परमात्मस्वरूप होईल.

शिवशिवा सद्गुरु । तुजला गूढा काय करुं? ।

येकांही निर्धारा धरूं । देतासि का? ।। अमृ.२.३७

अहो, शिवरुप सद्गुरुराया, तुमचे नामरुपातीत, जे स्वरूप कशाचाही विषय होत नाही, ते गूढ रूप घेऊन मी काय करू? कारण तुमच्या या गूढस्वरूपासंबंधीचा एकही निर्धार, निश्चय तुम्ही पक्का धरू देत नाही.

कैसे आपणां आपण । दोंवीण सोयरेपण ।

हा याहूनि विलक्षण । नाही ना नोहे ।। अमृ.२.५६

श्रीगुरुंचे गुरु म्हणून स्वतंत्र स्थान आहे, जेथे ते व्यक्तिशः आपले आपण आहेत. तरीसुद्धा त्यांनी द्वैतावाचून (दोंविण) गुरुशिष्य भावाचे सोयरेपण किंवा सख्याचे – नाते कसे केले हेच कळत नाही, कारण हे सोयरेपण गुरुशिष्य नात्यापेक्षा, भावापेक्षा वेगळे आहे. असे विलक्षण गुरुपण व गुरुशिष्यभाव आजही कोठे नाही (नाही) व यापुढेही असणार नाही (नोहे). हे सर्वच विलक्षण आहे.

म्हणोनि शिष्य आणि गुरुनाथु । या दोहीं शब्दांचा अर्थु ।

श्रीगुरुचि परि होतु । दोहो ठाईं ।। अमृ.२.६१

सद्गुरु व शिष्य यांची गाठ पडल्यावर श्रीगुरुमुखातून 'तत्वमसि' हा उपदेश शिष्याचे कानी पडताच शिष्य पूर्णत्वाने बदलतो. त्याला त्याच्या आत्मस्वरूपाचा बोध होताच तो आत्मसाक्षात्कारी होतो. त्यामुळे गुरु – शिष्य हे भेद दाखविणारे शब्दांचा व शिष्य आणि गुरुनाथ या दोहोंचाही अर्थ श्रीगुरुच होतो. कारण सच्चिदानंद स्वरूपच या दोनही नावांनी नांदत आहे.

ज्ञान खंडनाच्या आठव्या प्रकरणात माउली श्रीगुरुंबद्दल म्हणतात –

तैसे आमुचेनि नांवें । अज्ञानाचे ज्ञानही नव्हे ।

आम्हांलागीं गुरुदेवें । आम्हीच केलो ।। अमृ.८.१

आमच्या श्रीगुरुनी आम्हाला ज्ञानअज्ञान वृत्तिशून्य सदा ज्ञानरूप स्वात्मभावाच्या परमपदावर स्थापित केले आहे. आम्हाला परमात्मस्वरूपात एकरूप केले आहे.

नवव्या प्रकरणात ज्ञानेश्वर श्रीगुरुंचे मोठेपण पुन्हा व्यक्त करतात.

आम्ही निखळ मा तुझें । वरीं निखळ लोभें म्हणसी माझें ।

हे पुनरुक्त साजे । तूंचि म्हणोनी ।। अमृ.९.६७

[१]चांगदेव पासष्टीत श्रीगुरुंचा मोठेपणा चांगदेवांना सांगताना माउली म्हणतात –

चांगदेवा तुझेनि व्याजें । माउलिया श्रीनिवृत्तिराजें ।

स्वानुभव रसाळ खाजें । दिधले लोभें ।। चां.पा. ६१

ज्ञानदेवांच्या अभंगवाणीत त्यांनी अनेक अभंगातून निवृत्तिस्तवन केले आहे. सद्गुरुंनी त्यांना कसे घडविले आहे याबद्दल माउली सांगतात –

मी माझे द्वैत अद्वैत होउनि ठेले । सद्गुरु एका बोले ठेविलें ठायीं ।।

व्दैत गिळी अद्वैत मेळीं । चित्ताची काजळी तोडी वेगीं ।।

ज्ञानदेव म्हणे निवृत्ति उदार । दीपीं दीप स्थिर केला सोयी ।। ज्ञा.गा. २४०

अरे अरे ज्ञाना झालासी पावन । तुझें तुज ध्यान कळों आलें ।।

तुझा तूंचि देव तुझा तूचि भाव । फिटला संदेह अन्यतत्त्वी ।।

मूरडूनियां मन उपजलासि चित्तें । कोठे तुज रितें न दिसे रया ।।

दीपकीं दीपक मावळल्या ज्योती । घरभरी वाती शून्य झाल्या ।।

वृत्तीची निवृत्ति आपणासकट । अवघेंची वैकुंठ चतुर्भुज ।।

निवृत्ति परमअनुभव नेमा । शांति पूर्ण क्षमा ज्ञानदेवो ।। ज्ञा.गा. २४५

ज्ञानेश्वरी सांगताना व अन्य ग्रंथात वेदव्यास, व्यासबुद्धी, शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, अभिनवगुप्त, वसुगुप्त यांचे विचार व योगवाशिष्ट, ब्रह्मसूत्रे यांचा मागोवा घेतल्याचे स्पष्ट जाणवते. अठराव्या अध्यायात ज्ञानेश म्हणतात –

तैसा व्यासांचा मागोवा घेतु । भाष्यकाराते वाट पुसतु ।

अयोग्य मी न पवतु । के जाईन ।। ज्ञा.१८.१७२२

हे सांगताना समर्थ श्रीगुरु पाठीशी असताना मी अयोग्य कसे सांगेन हा विश्वासही दिलेला आहे. माउलींचं एकही लिखाण असे नाही, ज्यामधे त्यांनी आपल्या श्रीगुरुच्या परमआशीर्वादाशिवाय लिखाण केले आहे. ते म्हणत की मी कठपुतळी आहे व कार्याची दोरी श्रीगुरुंचे हाती आहे. इतका समर्पित शिष्य त्यापूर्वी

---

१. डॉ. साठे अ. म. श्रीज्ञानदेवांची चांगदेवपासष्टी

झाला नाही व यापुढेही होणे नाही. गुरूकृपेने ज्ञानेश्वर म्हणू शकतात– 'सत्यं वच्मि ऋतं वच्मि', मी सत्य आणि योग्य तेच बोलेन पण बोलविता धनी सद्गुरू निवृत्तिनाथ आहेत.

सायिखडेयाचें बाहुसें । चालवित्या सूत्राचेनि चाले ।

तैसा मातें दावीत बोले । स्वामी तो माझा ।। ज्ञा. १८.१७६८

श्रीज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेव पासष्टी, हरिपाठ, अभंगगाथा यांचा अभ्यास करताना हे स्पष्ट लक्षात येते की, श्रीज्ञानेश्वर आपल्या सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथांपासून आत्मभावाने कधीही दूर गेलेलेच नाहीत. दोन दिवे एक प्रकाश, किंवा दोन प्रवाह परंतु एकच जलौध असेच त्यांचे जीवन अगदी श्रीज्ञानदेवांच्या बालवयापासून ते अंततः संजीवन समाधीपर्यंत आहे. ज्येष्ठतेनुसार श्रीनिवृत्तिनाथांनी सर्वांत अगोदर समाधी घेतली असती तर ते वास्तव दिसले असते. परंतु आपल्या तीनही भावंडांच्या अवतार कार्याचे नियंता श्रीनिवृत्तिनाथ होते. या चारही भावंडांच्या अवतार धारण करण्यामागे निश्चित वैश्विक कारणमीमांसा होती. त्यांच्या अवतारानंतर काही वर्षातच केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर संपूर्ण भारतभर विध्वंस उभा राहणार होता. या अवतार कार्यात श्रीकृष्ण भगवान या अवतारातील गीतेत सांगितल्याप्रमाणे 'खल निर्दालन' हे ध्येय नाही. 'दुरितांचे तिमिर जावो, जो जे वांछील तो ते लाहो' व 'वर्षत सकळ मंगळी । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।' व स्त्रीशूद्रासह सर्व वर्णांना गीतेने दिलेला समत्वाचा व वेदांचा अधिकार प्राप्त होणे, हे प्रमुख ध्येय आहे. माउलींनी 'विश्वाचे आर्त' लहानपणापासून पाहिले व जाणले आहे. पुढे होणाऱ्या विध्वंसात भागवतधर्म ताठपणे उभा रहावा म्हणून ही भक्कम पायाभरणी होती.

श्रीज्ञानेश्वर अगदी लहान वयापासून म्हणजे पाचव्या वर्षापासून श्रीनिवृत्तिनाथांना अनुसरित होते. प्रथम अनुकरण व नंतर जीवनसाध्य म्हणून (जीवन प्रयोजन म्हणून). विभूतिमत्त्व तेव्हाच प्रगट होत गेले. सातव्या वर्षी तर श्रीज्ञानेश्वर निवृत्तिनाथांचे एकमेव असे शिष्य झाले. विभूतीचा पूर्णावतार सुरू झाला. यामुळेच निवृत्तिनाथांचा आत्म्यैक्याचा हात त्यांच्या डोक्यावर केवळ त्यांच्याच नव्हे, तर श्रीसोपानदेव व चित्कला मुक्ताईच्या समाधीपर्यंत त्यांच्याही डोक्यावर राहिला.

श्रीज्ञानेश्वर प्रत्येक वेळी म्हणतात की असे विभुतिस्वरूप सद्गुरु मला लाभले हे माझे भाग्य आहे. कारण त्यांचे नावच निवृत्ति आहे. ते संपूर्णतया निवृत्तच (detached) साक्षी आहेत. धारण केलेले शरीर हे केवळ वरचे आवरण आहे. खरे तर त्यांना आकार नाही, विकार नाही, गुण नाही, अशी कोणतीच भौतिक

बंधने त्यांना नाहीत. ते पूर्णतया चैतन्यस्वरूप आहेत. आणि हे चैतन्य केवळ देहाच्या माध्यमाचा आधार घेऊन आपल्या लीला, कार्य करीत असते. ज्ञानेश्वरी हे गीताभाष्य हा वेदांचा, उपनिषदांचा, अध्यात्माचा मूळ पाया आहे. हा पाया घालण्यासाठी ज्ञानेश्वरांनी श्रीगुरूंनी दिलेल्या गीताज्ञानाचा आधार घेतला. श्रीज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायात आपली गुरुपरंपरा सांगताना श्रीज्ञानेश्वरांनी शेवटी सांगितलेल्या ओळी खूप महत्त्वाच्या आहेत. या ओव्यांच्या पूर्वी श्रीज्ञानेश्वर सांगतात –

वेद जेणें सुभाष । सुख जेणें सोल्लास ।
हे असो रूपस । विश्व जेणें ।। ज्ञा. १८.१७२७

तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ।। ज्ञा. १८.१७२८

आतां आयती गीता जगीं । मी सांगे मऱ्हाठिया भंगी ।
येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ।। ज्ञा. १८.१७२९

मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो दिठीवेनि आपुलां । बैसवी पदीं ।। ज्ञा. १८.१७३२

म्हणोनि माझे नीच नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे ।
गुरूकृपाय काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ।। ज्ञा. १८.१७३४

हा बहुदा पैठण वास्तवातील दिवस असावा. समोर निवृत्तिनाथ श्रीगुरू आज्ञेने हाती गीतासंबोधिनी घेऊन आषाढमेघाप्रमाणे शांत रसाची वृष्टी करीत समोरील संतश्रोत्यांना गीतार्थ सांगत होते. आणि ज्ञानेश्वर माउली शरीराच्या प्रत्येक कणाचा कान करून चातक पक्षी मेघातील पर्जन्य कण अलगद उचलतो तसे श्रीगुरू श्रीनिवृत्तिनाथांच्या वाग्गंगेतील प्रत्येक शब्द आपल्या समाधीधनात साठवीत होते. हा क्षण होता श्रीज्ञानदेवांच्या आयुष्यातील गुरूपौर्णिमेचा, श्रीज्ञानेश्वर श्रीगुरूनिवृत्तिनाथात पूर्णतया मिसळून गेले. दोन विभूतिमत्त्व एकरूप झाली. त्यांचे स्वतंत्र अस्तित्वच उरले नाही. ज्योतीत ज्योत, चैतन्यात चैतन्य एकजीव झाले.

आधीच तंव तो कृपाळु । वरी गुरूआज्ञेचा बोलु ।
जाला जैसा वर्षाकाळु । खवळणें मेघां ।। ज्ञा.१८.१७६०

मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें ।

वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ।। ज्ञा.१८.१७६१

तेथ पुढां मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया ।

कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ।। ज्ञा.१८.१७६२

एवं गुरूक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।

तें ग्रंथे बांधौनि दिधलें । गोसावी मज ।। ज्ञा.१८.१७६३

श्रीगुरू निवृत्तिनाथांनी श्रीज्ञानेश्वरांच्या गीताज्ञानाचा पाया घातला. हा अमूर्त कवळ देताना, 'आता तू परिपक्व झाला आहेस. आता श्रीकृष्णार्जुन संवादाचे जे नवनीत आहे ते तू संताना व सामान्यांना तुझ्या मायबोलीत मऱ्हाठीत सांग,' हा आदेश श्रीगुरूंकडून मिळणे हा मोठा आशीर्वाद ज्ञानदेवांना मिळाला. कारण पात्रता असल्या शिवाय गुरू हा विश्वमोलाचा आदेश कसा देतील? समर्थ श्रीगुरूंनी तो अधिकार द्यावा लागतो. म्हणून ज्ञानदेव प्रत्येक अध्यायात सुयोग्य निमित्त मिळताच श्रीगुरूंना वंदन करतात. ज्ञानदेवांना पूर्णार्थाने ठाऊक होते की, 'मी जे ज्ञानेश्वरी कथन करीत आहे, त्याचा बोलविता धनी माझे श्रीगुरू आहेत. हे समाधीधन माझ्या श्रीगुरूंनी मला दिले आहे.' हे असते चैतन्याचे विरागी व्यक्तिमत्त्व. हे विरागी व्यक्तिमत्त्व धारण करणारा गुरू शिष्याकडून कार्य करून घेतो. शिष्याला आपल्यासारखेच करून घेतो. हे माउलींच्या ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेव पासष्टी, हरिपाठ व अभंगातून जाणवते. माउली या ऋणाचा मुक्तपणे, निर्व्याजपणे उल्लेख करतात. म्हणून श्रीगुरू माउली मुखाने म्हणतात – 'तू कुठे ज्ञानेश्वरी सांगितलीस, मीच सांगितली ना ! तुझ्याकडून मीच ते करवून घेतले,' याचा अर्थ असा की मूळ जे निर्गुण निराकार चैतन्य आहे त्याच्याजवळ गुण नाहीत, आकार नाही, आणि विकारही नाही. असे चैतन्य स्वत: होऊन काही कार्य करीत नाही. जसे – वीज आहेच, परंतु तिचे प्रकटीकरण वीजवाहक तार आणि दिवा याशिवाय होऊ शकत नाही. कारण विजेला कार्यासाठी माध्यम लागते. तसेच स्वत: जे चैतन्य आहे ते गीतेवर ज्ञानेश्वरीसारखे अजरामर – चिरंजीव भाष्य सांगू – लिहू शकत नाही. जसे – शंकरमहाराज ज्या विदेही अवस्थेत होते त्या अवस्थेत त्यांनी ताईसाहेब मेहेंदळ्यांना ज्ञानेश्वरीवर प्रवचन करण्यास सांगितले. महाराजांनी स्पष्ट केले की 'मी चैतन्यस्वरूप अवस्थेत आहे. मला बोलता येत नाही. मला जे बोलायचे आहे त्यासाठी मला सुयोग्य माध्यम हवे म्हणून या ज्या ताईसाहेब आहेत त्यांच्या माध्यमातून मीच बोलतो आहे.' चैतन्यरूप निवृत्तिनाथांना गुण

घेतल्याशिवाय, विकार घेतल्याशिवाय, आकार घेतल्याशिवाय कार्य कसे करता येणार? म्हणून त्यांचेच दृष्य रूप श्रीज्ञानदेव. हे वैश्विक ज्ञानदानाचे कार्य करण्यासाठी ते चैतन्य जाणीवेत येते. त्या वेळी ते माध्यम निर्माण करते. म्हणून आपले जे विभूतिमत्त्व आहे, त्या विभूतिमत्त्वाचे प्रत्यारोपण त्यांनी श्रीज्ञानेश्वरांवर केले. निवृत्तिनाथांनी ज्ञानदेवांना शिष्य म्हणून वैश्विक अधिकार दिला व सांगितले की, 'ज्ञानदेवा, मला जे सांगायचे आहे ते विश्वाला तूच सांगणार आहेस'. वस्तुत: गुरू आणि शिष्य यातील भेद, केवळ एक अगदी झिरझिरीत पडदा असतो. म्हणजे गुरू-शिष्य हे द्वैत मुद्दाम पत्करावे लागते. आणि मग श्रीगुरू सांगतात की 'आता तू हे कार्य कर', ते कार्य त्या शिष्याची पात्रता असल्याशिवाय त्याच्याकडे कसे सुपूर्त केले जाईल? म्हणजेच ज्यावेळेस श्रीज्ञानेश्वरांचा अधिकार त्यांचे श्रीगुरू श्रीनिवृत्तिनाथ यांनी जाणला की, 'इथे बीज पेरले पाहिजे, इथे ते निश्चित उगवेल'. त्याच वेळी हे कार्य श्रीज्ञानेश्वरांकडून झाले. असेच विचार[१] विवेकानंदांनी त्यांच्या व त्यांचे श्रीगुरू रामकृष्ण परमहंस यांच्या गुरूशिष्य नात्यासंबंधी मांडले आहेत.

या गुरूशिष्य अद्वैत अनुभूतीबद्दल अमृतानुभवात ज्ञानेश्वर सांगतात –

नाही रूपाचि जेथे सोये। तेथें दृष्टीचें कांहीचि नव्हे।
आम्हा फळले हे पाये। ऐसिया दशा।। अ.मृ.२.५०

जेथे सद्गुरू हा विचारच नाही, ते निर्गुण निराकार आहेत, तेथे दृष्टीचा काहीही उपयोग नाही. अशा श्रीगुरूंचे श्रीचरण म्हणजे त्यांची परब्रह्म, स्थिती ज्याला ज्ञानदेवांनी पाय म्हटले आहे. त्याच पायाची पुण्याई फळाला येऊन आम्हाला ही स्थिती प्राप्त झाली.

किंबहुना इया भाखा। द्वैताचा जेथें उपरवा।
फेडुनिया स्वसखा। श्रीगुरू वंदिला।। अमृ.२.५४

किंबहुना ज्या ज्या बोलण्यात द्वैताची भाषा आहे, ती भाषा मी व सद्गुरू यांच्यात संभवतच नाही. म्हणून तो भेद फेडून, दूर करून मी माझा सखा जे माझे श्रीगुरू यांना वंदन केले.

ज्ञानेश्वरी हे विश्वकाव्य श्रीनिवृत्तिनाथांच्याच चैतन्याकाशातून प्रगटलेले आहे व नंतर ते श्रीज्ञानेश्वरांच्या मुखातून बाहेर पडलेले आहे. म्हणून ज्ञानेश्वरी लिहिली असे नाही, ज्ञानेश्वरी सांगितली आहे. श्रीगुरू निवृत्तिनाथांच्या चैतन्यातून स्फुरून ती श्रीज्ञानेशांच्या परावाणीतून ज्ञानेश्वरी रूपाने बाहेर पडली. जसे

---

[१]. पांगारकर ल.रा. संत तुकाराम चरित्र आवृत्ती चौथी, २००७, पान ७६

संततुकारामांच्या परावाणीतून अहर्निश अभंग बाहेर पडत होते. असे त्या विश्वसत्तेचे प्रकटीकरण म्हणजे त्याची कृपा आणि त्याची प्रेमसत्ता. त्याचे दर्शन योग्य त्या माध्यमातून त्यांच्या कार्यातून होत असते. ज्ञानेश्वरी श्रीगुरू निवृत्तिनाथांच्या चेतनेतून प्रकटली असेल तर श्रीनिवृत्तिनाथांचे विभूतिस्वरूप हे निश्चितपणे श्रीज्ञानेश्वरांना मिळाले आहे. निराकार, निर्गुण चैतन्य जाणिवेत आले. जाणिवेत आल्यावर अनुग्रहित शिष्याला जे कार्य करायचे आहे त्यासाठी गुरूकृपा पाहिजे, गुरूचा आशीर्वाद पाहिजे, तरच हे कार्य त्याच्याकडून होऊ शकेल. ज्ञानेश्वर स्वत: होऊन काही करू शकत नाहीत. म्हणून श्रीगुरू निवृत्तिनाथ म्हणतात – 'तू माझ्या समोर पाहिजेस'. गीताभाष्याचे सामर्थ्य ज्ञानदेवांना श्रीगुरूंच्या नजरेतून मिळाले. श्रीनिवृत्तिनाथ अंतरी म्हणाले असतील – 'मी काहीच करणार नाही. मी स्तब्ध आहे'. यालाच म्हणतात 'बोलकी शांतता.' (Eloquent Silence) या बोलक्या शांततेलाच शब्दांचा आधार प्रकटीकरणासाठी लागतो. ही जी 'बोलकी शांतता' आहे, तिचे स्वरूप कसे असते – 'शब्देविण संवादिजे। इंद्रिया नेणता भोगीजे।' ज्ञानेश्वरीत श्रीनिवृत्तिनाथ काहीच बोलत नाहीत. ते फक्त संमतीदर्शक अस म्हणतात, 'हं हे आहे.' संपूर्ण ज्ञानेश्वरीत श्रीनिवृत्तिनाथांच्या फक्त संमती दर्शक सातच ओव्या आहेत. निवृत्तीनाथांचा प्रत्येक बोल 'स्वस्ति' असा आहे. म्हणजे त्या उभयतात परावाणीत संवाद अगोदरच झालेला आहे. जे सांगायचे ते उत्स्फूर्तपणे सांगितलेच जात आहे. ही जी क्रिया आहे त्या प्रक्रियेमधे श्रीनिवृत्तिनाथ हे विभूतिस्वरूप आहेत. हे विभूतिस्वरूप त्यांनी आधीच ज्ञानेश्वरांना देऊन टाकले आहे. त्यामुळे आपल्या कार्याच्या शेवटी श्रीज्ञानेश्वर म्हणाले की 'धर्मसंकीर्तन हे सिद्धी गेले। येथे माझेजी उरले पाईकपण ।।' माझे काम संपले. तुमच्याच कृपेने मी ते पूर्ण केले आहे. आता मला या देहाचे ममत्त्व नाही. ज्या कारणासाठी तुम्ही मला हा मानव देह घ्यायला लावला आहे ते कार्य पूर्ण झाले. म्हणजे माध्यम (medium) नाहीसे होते, पण तत्त्व कायम राहते. म्हणून ज्ञानेश्वरानंतर श्रीनिवृत्तिनाथ उरले. श्रीज्ञानेश्वरांबरोबरच श्रीनिवृत्तिनाथांनीही समाधी घेतली नाही, तसेच ज्ञानेश्वरांनी नाथ संप्रदायाप्रमाणे एक गुरू एक शिष्य असे केले नाही. कारण ते म्हणाले की 'मला एकाच शिष्याला उपदेश द्यावयाचा नाही. मला ईश्वरीज्ञान संतजन व बहुजन समाजाला सांगायचे आहे आणि भगवद्‌गीतेत अज्ञान दूर करण्याचे जे सामर्थ्य आहे त्याविषयी मी त्यांना सांगणार आहे.' ज्ञानेश्वर माध्यम झाले आहेत, ज्ञानेश्वर स्वरूपातील गुरूतत्त्व समाधिस्थ झाले पण श्रीनिवृत्तिनाथांचे गुरूतत्व कायम राहिले. मग ते ब्रह्मचैतन्य (supreme spirit) जेव्हा जाणिवेवर येते त्या वेळी ज्ञानप्रक्रिया सुरू होते. या ज्ञानप्रक्रियेत अज्ञान काय आहे

हे दाखविले जाते. मूळ सत्य जे आहे – 'ततत्वम' ते तूच आहेस हे दाखवायचे असते. कार्यपूर्तीसाठी चैतन्याने ज्ञानेश्वरांचा देह घेतला. ते कार्य संपल्यावर ते पुन्हा निराकारात गेले. बहुजनसमाजाला ईश्वरीज्ञान देण्यासाठीच नाथसंप्रदायाची एक गुरू एक शिष्य ही परंपरा ज्ञानदेवांनी मोडली. ज्ञानदेवांनी निवृत्तिनाथांना प्रार्थना केली की 'गुरूदेव, हे जे नाथपंथीय–भागवतपंथीय ज्ञान आहे ते आजपर्यंत एक गुरू एक शिष्य अशा परंपरेने एकाच शिष्याला मिळत राहिले आहे. आता बहुजन समाजाला मी हे ज्ञान सांगतो. हे गीतेचे ज्ञान भांडार खुले करतो. जग–रहाटीसाठी ते अत्यावश्यक आहे.' मग जो आकृतीबंध तयार झाला तो असा की निवृत्ति–ज्ञानदेव–सोपान–मुक्ताई ही जी चार भावंडे आहेत त्यापैकी पहिला जो निवृत्ति तो ज्ञान स्वरूप झाला म्हणून झाला ज्ञानेश्वर. ज्ञानेश्वरांनी गीताभाष्याचे कार्य केले. त्यांच्या सर्व कार्याला गुरूकृपा ही बैठक आहे. आणि हे जे कर्म आहे ते प्रसन्नता वाढविण्यासाठी घडले. अज्ञान गेले की प्रसन्नताच येते आणि ती जी प्रसन्नता तो आहे सोपान. कार्य अखंड चालत नाही. ज्ञानेश्वरी कधी तरी सांगून पूर्ण होणार होती. मग त्या कार्याची पूर्तता झाली की कर्म करणारा त्यातून मुक्त होतो ती मुक्ताई. अशी ही या ज्ञान प्रक्रियेची चार प्रातिनिधिक स्वरुपे आहेत. म्हणून याची संगती अशी की ज्ञानदेवापासून याची सुरुवात झाली. निवृत्तिनाथांची कृपा घेतली – कार्य केले – कार्यातून प्रसन्नता वाढली – आणि कार्य संपल्यावर ज्ञानेश्वर म्हणाले की, 'मी आता प्रसन्न आहे, सुखी आहे (येणे वरे ज्ञानदेवो सुखिया जाला) आता मी मुक्त आहे, आणि मग समाधी. कारण आता मी कर्मबंधनातून मुक्त झालो आहे, ज्ञानेश्वर ही व्यक्ती नाही. ते विभूतिस्वरुपच आहेत. त्यांना कशात गुंतायचेच नव्हते. गुंतायचे असते तर निवृत्तिनाथांनी त्यांना विभूतिमत्त्वाचा अधिकार दिलाच नसता.

श्रीनिवृत्तिनाथांसारखेच श्रीज्ञानेश्वरही विभूतिस्वरूपच आहेत, म्हणूनच निवृत्तिनाथांनी त्यांना कार्य सांगितले. स्वत:च स्वत;कडून स्वत:चे कार्य करून घेतले. अशा रितीने श्रीज्ञानेश्वरांचे विभूतिस्वरुप फुलत गेले. आणि मग या सर्व प्रक्रियेत लक्षात आले की अनाम हे नामरुप होत आहे. नाम हा आधार (दत्त दत्त मूलाधार) आहे त्या अनामाचा किंवा नाम हे त्या अनामात गर्भित आहे. विभूतीलाही अनामामध्ये साधना किंवा कार्य करता येत नाही. तर त्या अनामाची साधना इतरांनी कशी करायची? ज्ञानेश्वर गुरूरूपच आहेत, त्यांना पुन्हा काही मिळवायचे नाही. पण बहुजनसमाजासाठी या अनामाला नाम द्या आणि नित्य जप करू द्या व हरिसंकीर्तनाच्या कार्याला आशीर्वाद द्या असे ज्ञानेश्वर म्हणतात. आणि कीर्तन का याचे कारण श्रीकृष्णाला सामदेव फार आवडतो. कीर्तनभक्ती सर्वांना सामावून घेते. नाम कसे घ्यायचे तर ते सुरात घ्या, नुसती घोकमपट्टी नको,

कीर्तनात देव आठवावा व आळवावा. हा जो नाथपंथ आहे त्यात श्रीनिवृत्तिनाथ अनाम आहेत. ज्ञानेश्वर नाम आहेत. ज्ञानेश्वर म्हणतात की, 'मी जे गुरूंचे कार्य करून पूर्णत्व प्राप्त करून घेतले ते तुम्ही त्याचे – हरिचे नाम घेऊन प्राप्त करून घ्या.' याचा अर्थ ज्ञानेश्वर स्वत: जरी ज्ञानदेव असले तरी तुम्ही नाम–देव व्हा. म्हणून ईश्वर प्राप्तीत ज्ञानदेव आणि नामदेव हे दोनही महत्त्वाचे घटक (अंगे) आहेत. असा जो भक्तिसंप्रदाय आहे त्यात ज्ञानोत्तर भक्तीत प्रेमाचा ओलावा आहे. कारण प्रेम हीच आत्म्याची बैठक आहे. निवृत्तिनाथांनी ज्ञानदेवांना उदंड प्रेम दिले आणि ज्ञानदेवांनीही त्यांच्यावर उदंड प्रेम व भक्ति केली. ज्ञानदेवांनी श्रीगुरूंना सांगितले की, 'तुम्ही माझे सर्वस्व आहात. मी जे धर्मसंकीर्तन करतो आहे ते तुमच्याच प्रेमळ आदेशामुळे, कृपेमुळे, तुमच्या माझ्यावरील लेकरासारख्या प्रेमामुळे केले आहे. आणि माझे कार्य तुमच्याच कृपेमुळे पूर्ण झाले.' ही नम्रता माउलींनी धारण केल्यामुळे ते निवृत्तिनाथांचे एकमेव लाडके शिष्य बनले व त्यांना अधिकार मिळाला. म्हणून विभूतीचा अर्थ असा की श्रीगुरूंनी जो अधिकार दिला, त्या अधिकाराची प्राप्ती झाली, त्यांच्या प्रेमाची प्राप्ती झाली, आणि ते प्रेम अशा करता होते की, **'अरे, तू माझ्यासारखाच आहेस, माझेच प्रतिरुप आहेस हे मी जगाला दाखविले आहे. तुझे कार्य तू म्हणजे मीच करतो आहे.' द्वैत नष्ट झाले आणि ते अद्वैतात गेले. यालाच विभूतिस्वरूप म्हणतात.**

श्रीनिवृत्तिनाथ व श्रीज्ञानेश्वर यांचे श्रीगुरु–शिष्य म्हणून असणारे अद्वैत व विभूतिस्वरुपाचा विचार केल्यावर पुन्हा एकदा त्यांच्या जीवन प्रवाहात डोकावून बघावेसे वाटते. कारण श्रीज्ञानदेवांना त्यांच्या सुमारे सातव्या वर्षी नाथपंथाचा आपला एकमेव शिष्य म्हणून अनुग्रह दिल्यानंतर ज्ञानेश्वरांच्या आध्यात्मिक प्रवासात होणारी आश्चर्यकारक प्रगती निवृत्तिनाथ बारकाईने पाहत असावेत. वेद वाङ्मयातील विविध विचारप्रणाली व पंथ हेही ज्ञानदेवांनी अभ्यासले होते. तरीही शुद्धिपत्रासाठी आई–वडिलांसह आळंदीच्या ब्रह्मवृंदासमोर उभे राहिल्यावर ब्रह्मवृंदांनी जेव्हा विठ्ठलपंतास मृत्यूदंडाची शिक्षा सांगितली तेव्हा केवळ विठ्ठलपंतांच्या इच्छेकरिता संन्यासआश्रमातून परत गृहस्थाश्रमात येण्याच्या पापाचे प्रायश्चितास, मृत्यूदंडाशिवाय अन्य पर्याय आहेत हे माहीत असूनही ज्ञानदेव शांत राहिले. कारण त्यांनाही विधिवेद विरूद्ध निर्णय स्वीकारून अविधि आचरण न स्वीकारता कुळीचा कुळधर्म पाळावा हा विठ्ठलपंतांचा विचार मान्य होता. विधिनिषेधाचे पालन हेच ज्ञानदेवांचे धर्माचरण होते. 'उचित ते शुद्ध अवश्य आचरावे। जना दाखवावे वर्तोनिया।' हा वडिलांचा विचार माउलींना मान्य होता. या निर्णयानंतर ब्रह्मसभेला निवृत्तींचा प्रश्न होता. 'आम्हा कवण गती। सांगावे श्रीमंती विचारुनी।'

त्यानंतरचा पैठण येथे शुद्धिपत्रासाठी जाण्याचा विचार झाला असावा. शुद्धिपत्राची आपल्याला आवश्यकताच काय? हा निवृत्ति-सोपानांचा प्रश्न होता.

नव्हे मी सगुण नव्हे मी निर्गुण। अनुभूतीं भजन होऊनी नव्हे ।।

निवृत्ति म्हणतसे ऐक ज्ञानेश्वरा। माझी परंपरा ऐसी आहे ।। ना. गा. ९०२

परंतु ज्ञानदेवांनी सर्व देहधारी संताची लोकसंग्रहाची पायवाट सांगितली.

म्हणोनिया संती आवश्य आचरावें। जना दाखवावे वर्तोनिया ।। ना.गा.९०३

पैठणात ज्ञानदेवांच्या ज्ञानाने पैठणचे विद्वान आश्चर्यचकित झाले. ज्ञानदेवांचे वय अवघे तेरा पूर्ण असावे. पैठणच्या वास्तव्यात श्रीगुरू गहिनीनाथ यांचे आज्ञेप्रमाणे निवृत्तिनाथांनी गीतार्थ जनसामान्यांसमोर अत्यंत प्रभावीपणे मांडला. तो ऐकताना ज्ञानदेवांची झालेली ज्ञानार्त अवस्था ज्ञानदेवांनीच अठराव्या अध्यायातील गुरूपरंपरेच्या ओव्यातील श्रीगुरूवंदनेत मांडली आहे. श्रीगुरू निवृत्तिनाथांना ठामपणे जाणवले असेल की आपला शिष्य पूर्णपणे बदलला आहे. आपल्या अवतार कार्याची सुस्पष्ट आलेखरेषा माउलींसमोर उभी राहिली असावी. श्रीनिवृत्तिनाथांशी ते अंतर्बाह्य एकरूप झाले. त्यांच्या पुढील कार्याचा मार्ग व मार्गदर्शक समोर उभा होता. माउली निवृत्तिनाथात एकरुप झाले. पैठण सोडल्यापासून ज्ञानेश्वरीचा आकृतिबंध मनात उभा राहत होता. अंतर्मनातून श्रीशारदेला आवाहन होत होते. श्रीगणेशाला वंदन होत होते. पण ज्ञानेश्वर वाट बघत होते श्रीगुरू आज्ञेची. ज्ञानदेवांची अबोल प्रार्थना सतत जाणणारे श्रीगुरू निवृत्तिनाथांनी आपला परमशिष्य ज्ञानेशांच्या पाठीवर हात ठेवून प्रेमाने आज्ञा केली असावी की, 'ज्ञानदेवा, तू भगवद्गीतेवर मराठीत, आपल्या मायभाषेत, संतांना व सामान्यांनाही सहज उमगेल अशा भाषेत भाष्य करावेस.' हे आशीर्वचन ज्ञानदेव कृतार्थ झाले. इतके दिवसांची आर्तता संपली. ज्ञानदेवांचा देहभाव लक्षावधी सूर्य एकदम प्रकाशावेत असा तेजस्वी झाला. त्यांनी गुरूचरणावर माथा टेकला. असाच माथा पुढे त्यांनी ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, व चांगदेव पासष्टीच्या पूर्ततेनंतर श्रीगुरूचरणी ठेवला. कारण हे दोनही ग्रंथ श्रीगुरू आज्ञेनेच विश्वासमोर आले. पसायदान हे पण गुरूपूजनाची फलश्रृती आहे.

ज्ञानेश्वरांच्या जीवनातील श्रीगुरूंचे स्थान सांगणे शब्दसामर्थ्याच्या पलीकडचे आहे. गंगेचा प्रवाह ओंजळीत पकडता येत नाही.सद्गुरूंचे स्थान सर्व नात्याच्या, भावबंधाच्या, आत्मभावाच्या, अध्यात्माच्या सर्व सीमारेषांच्या पलीकडे, नजरेच्या, विचारांच्या, कल्पनेच्याही मर्यादांच्या पलीकडले आहे. त्यामुळे

माउलींच्या प्रत्येक लिखाणातून ओसंडणारे सद्गुरू प्रेम ही भावुकता, विनय वगैरे निश्चित नाही. त्यांना या शब्दबंधनात अडकवून मर्यादित करताच येणार नाही. हिमालयाची तुलना हिमालयाशीच, गंगौघाची तुलना गंगौघाशीच, मातृप्रेमाची तुलना जशी मातृप्रेमाशीच करावी लागेल, तसे माउलींच्या श्रीगुरू प्रेमाची तुलना करण्याचा प्रयत्नच न करणे हीच त्याची अंतिम चरणसीमा आहे.

निवृत्तेनाथांच्या कृपेने साकार झालेले गीताभाष्य

ज्ञानेश्वरीचा वाग्यज्ञ सुरू झाला. श्रीगुरूंच्या आशीर्वादाने ज्ञानेश्वरीचे श्रीगुरू वंदनेचे शब्द आसमंताला भेदून गेले.

ॐ नमो जी आद्या। वेद प्रतिपाद्या। जय जय स्वसंवेद्या। आत्मरूपा।।

या पेक्षा श्रेष्ठ असे श्रीगुरू स्तवनाचे उच्चार यापूर्वी विश्वाने कधीही ऐकले नव्हते. चराचर विश्व या शब्दोच्चाराने क्षणभर भान विसरून जागीच स्थिरावले. श्रीगुरू समोरचे श्रोते संत-विद्वान आणि सर्व जनसमुदाय हे अनंत अमृतशब्द ऐकताच भान विसरून गेले. कोणाही शब्दप्रभूची शब्दकळा याचे यथार्थ वर्णन करू शकणार नाही.

गीता भाष्याला (अठ्ठाविसाव्या ओवीपासून) सुरुवात करण्यापूर्वी ज्ञानदेवांनी श्रीगुरूंना पुन्हा वंदिले आहे.

मज हृदयी सद्गुरू। जेणें तारिलों हा संसारपूरू।
म्हणऊनि विशेषें अत्यादरू। विवेकावरी ।। ज्ञा.१.२२

तैसा पुढतपुढती तोचि । मिया अभिवंदिला श्रीगुरुचि।
जो अभिलषित मनोरूचि। पुरविता तो।। ज्ञा.१.२७

तरी न्युन तें पुरतें। अधिक तें सरतें।
करूनि घेयावें हें तुमतें। विनवितु असें।। ज्ञा.१.८०

आत्मसंयमाच्या सहाव्या अध्यायात गीताभाष्य करण्याचे सामर्थ्य ज्या श्रीगुरूंमुळे आपल्याला प्राप्त झाले त्यांचे स्मरण अध्यायाच्या सुरुवातीस व शेवटी केले आहे.

तैसी सद्गुरू कृपा होये । तरी करिता काय आपु नोहे ।
म्हणऊनि ते अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ।। ज्ञा. ६.३५

तेणे कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ।। ज्ञा. ६.३६

ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूंनी केला कोडें ।
माथा हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ।। ज्ञा. ६.४९२

सहाव्या अध्यायापर्यंत संक्षेपाने जरी गुरूस्तवन आले असले तरी गीताभाष्य जसे जसे पुढे जाते तसे तसे श्रीगुरूप्रेम व आदर दुणावत जातो. नऊ, अकरा, बारा, तेरा, चौदा, पंधरा, सतरा व अठराव्या अध्यायात याचा उल्लेखनीय प्रत्यय येतो. विशेषत: इतर अध्यायात आरंभी व शेवटी येणाऱ्या गुरूस्तवनाच्या ओव्या तेराव्यात 'आचार्योपासनम्' म्हणजेच सद्गुरूपूजन या कारणाने गुरू -स्तवन करून माउली सुखावली आहे.

नवव्या अध्यायात केवळ तुमच्या कृपेमुळेच गीताभाष्याचे असामान्य कार्य मी हाती घेतले आहे. मी तर कळसूत्री बाहुली किंवा चंद्रकांत मणी. कार्य तुम्हीच करून घेत आहात. प्रास्ताविकाच्या ओव्या श्रीगुरू व श्रोते यांच्यासाठी लडिवाळपणाच्या आहेत व नंतर श्रीगुरूकृपेच्या आहेत.

दहाव्या अध्यायातील विभूतियोगाच्या विवरणास सुरूवात करण्यापूर्वी ज्ञानदेवांनी पहिल्या पाच ओव्यात श्रीगुरूंची स्तुती पाच संस्कृत ओव्यात केली आहे. त्यानंतर श्रीगुरूंचे सामर्थ्य व मोठेपण वर्णन केले आहे. गीता भाष्याचा लाभ मला श्रीगुरू कृपेने लाभला आहे व श्रीगुरूच्याच कृपेमुळे मी गीताभाष्य करू शकलो हे पुढील ओव्यातून सांगितले आहे. या अध्यायाच्या चाळीस ओव्यांपर्यंत अगोदर सांगितलेल्या अध्यायांचा मागोवा घेतला आहे आणि गीतेच्या सातशे श्लोकातून भगवंताला जे सांगायचे आहे ते एकट्या नवव्या अध्यायात आहे असे आग्रहाने प्रतिपादिले आहे.

आतां अठरा पर्वी भारतीं । ते लाभे कृष्णार्जुनवाचोक्तीं ।
आणि जो अभिप्रावो सातेंशतीं । तो एकलाचि नवमीं ।। ज्ञा.१०.३१

अकराव्या विश्वरूपदर्शनाच्या अध्यायात दुसऱ्याच ओवीत शांत व अद्भुत रसांचे वर्णन आहे व आठव्या - नवव्या ओवीत गुरुस्तवन आहे.

जेथ शांताचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा ।

आणि येरांही रसां पांतिकरां । जाहला मानु ।। ज्ञा. ११.२

परि शांताद्भुत बरवे । जे डोळियांचां अंजुळीं घ्यावे ।

जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेंवा ।। ज्ञा. ११.४

एथ श्रवणाचेनि द्वारे । तीर्थी रिघतां सोपारें ।

ज्ञानदेव म्हणे दातारें । माझेनि केले ।। ज्ञा. ११.८

तीरें संस्कृताची गहनें । तोडोनि मऱ्हाठियां शब्दसोपानें ।

रचिलीं धर्मनिधानें । निवृत्तिदेवें ।। ज्ञा. ११.९

बारावे अध्यायात 'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्' पर्यंत उपासना (भक्ति) कांड सांगून 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' पासून पंधरावे अध्यायाचे अखेरपर्यंत ज्ञानकांड सांगितले आहे. या अध्यायाचे सुरुवातीसच माउलींनी श्रीगुरूंच्या मातृस्वरूप प्रेमाची स्तुती केली आहे व त्यानंतर नवरसांची कीर्ती वाढून अन्य तर्कवितर्क होऊ नयेत यासाठी श्रीगुरूंना प्रार्थिले आहे व त्यांचे आशीर्वाद मागितले आहेत.

सतराविर्येचे स्तन्य देसी । अनाहताचा हल्लरू गासी ।

समाधी बोधें निजविसी । बुझाऊनि ।। ज्ञा. १२.७

अहो सद्गुरूचिये कृपादृष्टी । तुझें कारूण्य जयातें अधिष्ठी ।

तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ।। ज्ञा. १२.९

तूं आपुलेनि स्नेह पल्लवें । माते पांघरुविशील सदैवें ।

तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माये ।। ज्ञा. १२.१७

तेरावा अध्याय हा क्षेत्र क्षेत्रज्ञाचा किंवा मानवी देह व तो ज्याच्या सत्तेने चालतो त्या पुरूषाच्या विचाराचा आहे. श्रीगुरू निवृत्तिनाथांना वंदन करून अध्यायाची सुरुवात होते. कारण ते आहेत शब्दप्रभु. 'आचार्योपासनम्' यावर भाष्य करताना श्रीगुरुनिष्ठ ज्ञानदेवांच्या वृत्ति गुरुभक्तीने, त्यांच्यावरील प्रेमाने, आदराने बहरून येतात. यासाठी त्यांनी जवळ जवळ शंभर ओव्यातून आपली गुरुभक्ती व्यक्त केली आहे. अध्यायाचे शेवटी श्रीगुरूंचा आशीर्वाद घेऊन अध्याय संपतो.

श्री गुरुंचे पाय। जै हृदय गिंवसूनि ठाय।

तैं येवढें भाग्य होय। उन्मेषासी ।। ज्ञा.१३.५

गुरुगृह जिये देशीं। तो देशुचि वसे मानसीं।

विरहिणी कां जैसी। वल्लभातें ।। ज्ञा.१३.३७४

ऐसेंया गुरूग्रामीचे आलें। कां स्वयें गुरूनीच धाडिले।

तरी गतायुष्या जोडलें। आयुष्य जैसें ।। ज्ञा.१३.३७९

हा ठावोवरी मातें। पुरतया सारस्वतें।

केलें असे श्रीमंतें। श्रीगुरूरायें ।। ज्ञा. १३.११६४

चौदावा अध्याय हा गुणातीत योगाचा आहे. प्राथमिक ओव्यांत प्रज्ञाप्रधान व कारुण्यसिंधु या विशेषणांनी श्रीगुरुंची स्तुती केली आहे.

जय जय आचार्या। समस्तसुरवर्या।

प्रज्ञाप्रभातसूर्या। सुखोदया ।। ज्ञा.१४.१

आईकें गा आर्तबंधू। निरंतरकारूण्यसिंधू।

विशदविद्यावधू। वल्लभा जी ।। ज्ञा.१४.३

पंधरावा अध्याय हा पुरुषोत्तम योगाचा आहे. ज्ञानकांडाचा व गीताशास्त्राचा हा शेवटचा अध्याय आहे. जीवाला आत्मस्वरूपाची ओळख करून देणे हा याचा विषय आहे. आपण आपल्या गुरूंचे एकुलते एक शिष्य असल्याने त्याची धन्यता माउलींनी प्रथम व्यक्त केली आहे. या अध्यायाचे शेवटचे ओवीत माउलींनी श्रीगुरूंना 'विश्वात्मकु निवृत्तिराजा' असे संबोधले आहे. या अध्यायात गीताभाष्य संपले आहे.

जे तान्हेनि मिया अपत्यें। आणि माझे गुरू एकलौते।

म्हणौनि कृपेसि एकहातें। जालें तिये ।। ज्ञा.१५.१९

पाहा पां भरोवरी आघवी। मेघ चातकासी रिचवी।

मजलागी गोसावीं। तैसें केलें ।। ज्ञा.१५.२०

आतां विश्वात्मकु हा माझा। स्वामी श्रीनिवृत्तिराजा।

तो अवधारू वाक्य पूजा। ज्ञानदेवो म्हणे।। ज्ञा.१५.५९८

सोळावा अध्याय हा (देवासुरसंपद्विभागाचा) आत्मसाक्षात्काराचाआहे. ज्ञानसूर्याच्या उदयाचे महत्त्व पंधराव्या अध्यायात सांगितले. तेच रूपक घेऊन माउलींनी आपले श्रीगुरू व सूर्य यांची तुलना केली आहे. परंतु श्रीगुरुरूपी चित्सूर्याचे आत्मिक जगात काय महत्त्व आहे हे ही ज्ञानेश्वर सांगतात परंतु ही तुलना गैर आहे हे जाणून शुद्ध प्रेमाची स्तुती केली आहे. शेवटी श्रीगुरूंच्या कृपादृष्टीची प्रार्थना केली आहे.

तो अहोरात्रांचा पैलकडु। कोणें देखावा ज्ञानमार्तंडु।

जो प्रकाश्येंवीण सुरवाडु। प्रकाशाचा।। ज्ञा.१६.१६

तया चित्सूर्या श्रीनिवृत्ति। आतां नमो म्हणों पुढतपुढती।

जे बाधका येईजतसे स्तुती। बोलाचिया।। ज्ञा. १६.१७

तेवीं भेदबुद्धीचिये तुळे। घालूनि सूर्यश्लेषाचें कांटाळें।

तुकिलांसी ते येकी वेळे। उपसाहिजो जी।। ज्ञा.१६.२८

संजयें व्यासाचिया निरोपा। तो वेळु फेडिला तया नृपा।

तैसा मीहि निवृत्तिकृपा। सांगेन तुम्हां।। ज्ञा.१६.४७१

तुम्ही संत माझिया कडा। दिठीचा कराल बहुडा।

तरी तुम्हां माने येवढा। होईन मी।। ज्ञा.१६.४७२

सतरावा अध्याय श्रद्धादिनिरुपणाचा आहे. माउलींनी प्रथमत: श्रीगुरूंचे गणेश रुपकाने स्तवन केले आहे. ज्ञानेश्वर सांगतात की 'अहो गुरुदेवा, सेवक होऊन केलेली तुझी सेवाही तुम्हाला चालत नाही, म्हणून संपूर्णपणे तुमच्यात एकरूप होणे हेच योग्य आहे. मला गीताभाष्याची योग्यता तुमच्या कृपेने प्राप्त झाली त्या सामर्थ्याचे वर्णन करण्यास मी अपात्र आहे'.

जे तुझ्याविरवी मूढ। तयांलागीं तू वक्रतुंड।

ज्ञानियासि तरी अखंड। उजूचि आहासि।। ज्ञा.१७.४

हें असो विस्मो दातारा। तूं होसी जयाचा सोयरा।

सोइरिकेचिया व्यवहारा। मुकेचि तो।। ज्ञा.१७.९

तरी नुरोनि वेगळेपण। रसीं भजिन्नलें लवण।

तैसें नमन माझें जाण। बहु काय बोलों।। ज्ञा.१७.१८

तैसा तुझीया प्रणती। मी पूर्ण झालो निवृत्ति।

आता आणीन व्यक्ती। गीतार्थु तो।। ज्ञा.१७.२०

अठरावा अध्याय हा गीतेचा कलशाध्याय आहे. गीतेचा मेरूमणी आहे. ती एकाध्यायी गीता आहे. भक्त अर्जुनाच्या, भगवान श्रीकृष्णाच्या, श्रीगुरूभक्त ज्ञानदेवांच्या, ईश्वरीविभूति श्रीगुरुनिवृत्तिनाथांच्या, ईश्वरस्वरूप नादब्रह्माने तृप्त झालेल्या संतश्रोत्यांच्या आनंदाचा, अमूर्त तृप्ततेचा, परमोच्च शिखर गाठलेला हा अध्याय आहे. या अध्यायाची सुरुवात करण्यापूर्वी ज्ञानदेव आपल्या श्रीगुरुंच्या शुद्ध स्वरूपाचे वर्णन करून त्यांचे सामर्थ्य आपल्या समोर मांडतात. प्रार्थना करतात की आपल्या आशीर्वादाने माझ्या मुखातून जे बाहेर पडेल ते निश्चित सर्व संतश्रोत्यांनाही पसंत पडेल. या श्रीगुरु स्तवनाच्या पहिल्या सहा ओव्या संस्कृत आहेत. माउली श्रीगुरु स्तवनात सांगतात –

जय जय देव निर्मळ । निजजनाखिलमंगळ।

जन्मजराजलदजाळ। प्रभंजन।। ज्ञा.१८.१

या पाठोपाठ ज्ञानदेव सांगतात –

हे काय एकैक ऐसैसे। नाना परिभाषावशे।

स्तोत्र करूं तुजद्देशे। निर्विशेषा।। ज्ञा.१८.११

आणि स्तवनाचे शेवटी म्हणतात –

आतां गीतार्थाची मुक्त मुदी। लावी माझिये वागवृद्धी।

जे माने हे सभासदीं। सज्जनांचां।। ज्ञा.१८.२७

यावर श्रीनिवृत्तिनाथ अतीव समाधानाने गीतार्थ पुढे सांगण्याची प्रेमळ आज्ञा करतात. ही आज्ञाच माउलींसाठी श्रीगुरुंचा प्रेमळ प्रसाद आहे.

तेथ म्हणितलें श्रीनिवृत्ति । नको हें पुढती पुढती ।

परिसीं लोहा धृष्टी किती । वेळवेळां कीजे गा ।। ज्ञा.-१८.२८

तंव विनवी ज्ञानदेवो । म्हणे हो कां जी पसावो ।

तरी अवधान देतु देवो । ग्रंथा आतां ।। ज्ञा.-१८.२९

ज्ञानेश्वरांचे निर्व्याज श्रीगुरुस्तवन व गीताभाष्याचे श्रीगुरु आज्ञेने करीत असलेले मंगल कार्य वर्णन करीत असताना, पुढील गीताप्रसादाच्या प्रदक्षिणेच्या ओव्यांचा उल्लेख मला खूप महत्त्वाचा वाटतो. कारण याच पद्धतीने पंढरीचा वारकरी पंढरपूर मंदिरात श्रीपांडुरंगाचे दर्शन घेतो. ( ज्ञानेश्वरीत पंढरीचा व पांडुरंगाचा उल्लेख नाही असा जो आरोप केला जातो त्याला हे उत्तर आहे.[१] गुरुदेव रानडे यांनीही हे आग्रहाने लिहिले आहे.)

एक प्रदक्षिणा जपाचिया । बाहेरोनि करिती यया ।

एक ते श्रवण मिषें छाया । सेविती ययाची ।। ज्ञा.१८.४५

एक ते अवधानाचा पुरा । विडापाऊड भीतरां ।

देऊनि रिघती गाभारां । अर्थज्ञानाचां ।। ज्ञा. १८.४६

ते निजबोधे उराउरी । भेटती आत्मया श्रीहरी ।

परी मोक्षप्रसादीं सरी । सर्वांही आथी ।। ज्ञा.१८.४७

त्याग व संन्यास यांच्या विवरणाच्या अर्जुनाच्या आग्रही विनंतीतून अठरावा अध्याय उभा राहिला आहे.

श्रीनिवृत्तिनाथ व श्रीज्ञानदेव या विभूतींनी अवतार का घेतला? त्याच्या अनेक उद्देशांपैकी महत्त्वाच्या उद्देशाचे स्पष्टीकरण पुढील ओव्यात आहे. गीतार्थाचा महिमा श्रीकृष्णाने सर्वांपुढे मांडलेल्या गीतेतील अद्वैताच्या अनुभूतीवर आहे.

फुलां फुलसरां लेख चढे । द्वुतीं दुजी अंगुळी न पडे ।

श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ।। ज्ञा.१८.५७

---

१. कै. डॉ. रानडे रा. द. ज्ञानेश्वरवचनामृत

सात शतें श्लोक । अध्यायां अठरांचें लेख ।

परी देवो बोलिले एक । जें दुजें नाहीं ।। ज्ञा.१८.५८

[१]भिंगारकरबुवांच्या लिखाणाप्रमाणे पैठणला शुद्धिपत्र मिळाल्यावर तेथील ब्रह्मवृंद्धांनी या तीनही बंधूंचा व्रतबंध संस्कार करण्याची तयारी दर्शविली होती. या भावंडांनी तो प्रस्ताव नाकारला. द्विजत्व स्वीकारून ज्या कारणे अवतार धारण केला ते कार्य करण्यावर बंधन वा मर्यादा त्यांना नको होती. वेदांचे न्यून गीतास्पष्टीकरणाने त्यांना दूर करावयाचे होते. ते तर अवताराचे परम ध्येय होते. वेदांचा अधिकार फक्त ब्राह्मण – क्षत्रिय – वैश्यांना होता. स्त्रीशूद्रांना तो नव्हता. हे न्यून गीतेने घालविले आहे. माउली म्हणतात की वेदांनीच गीतेचा अवतार घेऊन ही न्यूनता दूर केली आहे. म्हणून वेद गीतेच्या पोटात आहेत.

एवं सकळसाख्यसिंधु । श्रीभगवद्गीता प्रबंधु ।

हा औदार्ये आगळा वेदु । मूर्त जाण ।। ज्ञा.१८.१४५६

वेदु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसा आनु नाहीं ।

जे कानीं लागला तिहीं । वर्णाचांचि ।। ज्ञा.१८.१४५७

येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशुद्रादिकां प्राणियां ।

अनवसरू मांडूनियां । राहिला आहे ।। ज्ञा.१८.१४५८

तरी मज पाहतां तें मागील उणे । फेडावया गीतापणें ।

वेदु वेठला भलतेणें । सेख्य होआवया ।। ज्ञा.१८.१४५९

या लागीं मागिली कुटी । भ्याला वेदु गीतेचां पोटीं ।

रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ।। ज्ञा.१८.१४६५

गीतेची महती गाताना माउली म्हणतात की गीतेचे सातशे श्लोक असले तरी तिचे सार म्हणजे गीतेचा शेवटचा श्लोक.

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।

तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।। गीता १८.७८

---

[१]. वै. भिंगारकर श्री. र. महासाधु श्रीज्ञानदेव चरित्र, पान ६३

ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायातील पंधराशेअठ्ठावन्नाव्या ओवीत अर्जुन भगवंताला सांगतो –

मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडे मोहो ।

तरी तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपुला ।। ज्ञा.१८.१५५८

ज्ञानेश्वरीच्या समापनापूर्वी ज्ञानदेवांनी पुन्हा गीतागौरव मांडला आहे. ज्ञानेशांनी आग्रहाने वेदांपेक्षा गीतेचे श्रेष्ठत्व मांडले आहे. कारण गीतेने स्त्रीशूद्रासहित सर्व वर्णांना आपल्या मायेने पोटाशी घेतले आहे. गीता–गौरवानंतर माउलींनी पुन्हा श्रीगुरु–गौरव आळविला आहे. ज्ञानेश्वरांना श्रीगुरु व भगवंतमुखीची श्रीगीता इतकी आत्मप्रिय आहे की जेव्हा आणि जेथे त्यांना संधी उपलब्ध होईल तेव्हा ज्ञानदेवांची रसवंती पान्हावते. गीता–गौरव करताना ज्ञानदेवांना आपण खुद्द भगवान श्रीकृष्णाच्या हृदयाकाशात डोकावून त्याचे भक्तप्रेम व उपेक्षितांच्या न्याय्य हक्कांचेच हृद्गत जाणून घेत आहोत असे वाटते असे म्हणता येईल.

श्रीगुरु–गौरव पुन्हा पुन्हा करताना ज्ञानदेवांच्या काव्यप्रतिभेला श्रीगुरुंच्या स्मरणाबरोबर आकाशातील अनंत तारकांप्रमाणे अनंत श्रेष्ठतम घुमारे फुटतात. चंद्र, सूर्य, सागर, वेद, परमात्मा याहीपेक्षा माझे श्रीगुरु श्रेष्ठ आहेत असे ज्ञानदेव उत्स्फूर्त प्रेमाने सांगतात. इतके ज्ञानेश्वर श्रीगुरुमय झाले आहेत. ते श्रीगुरुंच्या आत्मतत्त्वात एकरूप झाले आहेत. कापूर जसा हवेत मिसळून जातो, परंतु त्याचा सुगंध मात्र हवेत उरतो, त्याप्रमाणे ज्ञानदेवांचे आत्मरूप श्रीगुरुंच्या आत्मतत्वात एकरुप होते. परंतु ज्ञानेश्वरांचे ज्ञानेश्वरपण, माउलीपण यांचा दरवळ मात्र स्वतंत्रपणे दरवळत रहातो. गीता ही जशी भगवान श्रीकृष्णाची वाङ्मयमूर्ती आहे तशी माझी ज्ञानेश्वरी म्हणजे माझे निमित्त करून श्रीशंकराचे समाधीधन श्रीगुरुंनी विश्वाला प्राप्त करून दिले आहे. असे ज्ञानेश्वर म्हणतात. ही केवळ माझ्या श्रीगुरुंची माझ्यावरील कृपा आहे. आपली गुरुपरंपरा सांगताना ज्ञानदेवांनी आपली जात, वर्ण सांगितला नाही. सांगितली ती आदिनाथ श्रीशंकरापासून श्रीनिवृत्तिनाथांपर्यंत आलेली गौरवशाली नाथपंथाची ज्ञानपरंपरा. नाथपंथात जात आणि पंथ यांना थाराच नाही. ज्ञानेश्वरीचा जन्म कसा झाला हे सांगताना ज्ञानेश्वर म्हणतात की, 'ही तर माझ्या श्रीगुरुंना झालेली त्यांच्या श्रीगुरुंची गुर्वाज्ञा आहे. कारण एकच की सामान्यांनाही आत्मोद्धारासाठी लाभणारा गीतार्थ मला मांडावयाचा आहे'.

ज्ञानेश्वर सांगतात –

तेणें कळि कळितु भूतां । आला देखोनि निरुता ।

ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ।। ज्ञा.१८.१७५७

ना आदिगुरु शंकरा । लागोनि शिष्यपरंपरा ।

बोधाचा हा संसारा । जाला तो आमुतें ।। ज्ञा.१८.१७५८

तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जीवा ।

सर्व प्रकारी धावां । करी पां वेगीं ।। ज्ञा.१८.१७५९

मग आर्तांचेनि वोरसें । गीतार्थग्रंथन मिसे ।

वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ।। ज्ञा.१८.१७६१

तेथ पुढां मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया ।

कीं यासाठी एवढिया । आणिलों यशा ।। ज्ञा.१८.१७६२

एवं गुरुकृपे लाधले । समाधीधन जें आपुलें ।

तें ग्रंथें बांधौनि दिधलें । गोसावी मज ।। ज्ञा.१८.१७६३

या क्षणी ज्ञानदेवांनी आपले शिष्यपण श्रीगुरुंच्या आत्मतेजात एकरूप केले. तसेच निवृत्तीनाथांनीही आपल्या तेजामध्ये ज्ञानेश्वरांचे तेज सामावून घेतले. आपुणासारखे तात्काळ * करून घेतले.

परी साचचि गुरुनाथें । निमित्त करुनिं मातें ।

प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ।। ज्ञा.१८.१७६५

ज्ञानदेव आग्रहाने सांगतात की, ज्ञानेश्वरी माझ्या श्रीगुरुंची आहे. मी तर केवळ निमित्तमात्र आहे. असे श्रीगुरु आणि असा समर्पित शिष्य ही अनाकलनिय अद्भुत ईश्वरी घटना आहे. श्रीगुरु निवृत्तिनाथ व शिष्योत्तम ज्ञानदेव हे अद्वैत विश्व कल्याणासाठीच अवतार घेऊन आले.

संपूर्ण ज्ञानेश्वरीभर प्रसंग किंवा संधी मिळेल तेव्हा ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीचे श्रेय आपले श्रीगुरु निवृत्तिनाथ आणि श्रोते संत यांना देऊन आपला विनय प्रकट करून कर्तृत्वाचा लवलेशही स्वतःकडे येऊ दिला नाही. आणि शेवटी –

म्हणौनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगती ।

उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ।। ज्ञा. १८.१७९१

---

(* टीप- याठिकाणी तात्काळ म्हणजे 'ताबडतोब', विलंब न लावता असा अर्थ नाही. तात्काळ म्हणजे 'तो'योग्य समय आल्यावर)

किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हे सिद्धी गेले ।

येथ माझें जी उरलें । पाईकपणा ।। ज्ञा. १८.१७९२

असे विनंतीपूर्वक म्हणून विश्वात्मक देवाला म्हणजे आपल्या श्रीगुरुंना वंदन करून, पसायदान मागितले आहे. जे मागितले ते सर्व विश्वासाठी, आणि म्हणूनच श्रीगुरुंनी तात्काळ 'हा होईल दान पसावो' हा मंगल आशीर्वाद दिला. आणि यानेच 'ज्ञानदेवो सुखिया जाला' । कर्मफल त्यागाचे याहून श्रेष्ठ उदाहरण नसावे. ('हा' असा निवृत्तीचा उत्स्फुर्त उद्‌गार 'होय'ही पुष्टी दर्शविती.)

संपूर्ण ज्ञानेश्वरी वाचताना व विशेषतः अठरावा अध्याय पूर्ण करताना निश्चितपणे जाणवते की नवविधा भक्तीपैकी वंदनभक्तीच्या श्रेष्ठत्वाचा प्रत्यय ज्ञानेश्वरांनी 'भाष्यकाराते वाट पुसतु' या चरणात आणून दिलेला आहे, सद्‌गुरुप्रमाणेच महर्षी व्यास व व्यासबुद्धी, आणि आद्यशंकरायार्च यांनाही ज्ञानेश्वरीचे निरुपण करताना सद्‌गुरुंचा मान ज्ञानेश्वरांनी दिलेला आहे –

आणि बापु पुढां जाये । ते घेत पाउलाची सोये ।

बाळ ये तरी न लाहे । पावों कायी ।। ज्ञा.१८.१७२१

तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु ।

अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ।। ज्ञा.१८.१७२२

तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु निवृत्तिनाथु ।

राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ।। ज्ञा.१८.१७२८

अठराव्या अध्यायापर्यंत धर्मकीर्तन पूर्ण केल्यानंतर त्याचे सर्व श्रेय ज्ञानदेवांनी दैवतांना व ज्येष्ठ आणि श्रेष्ठ व्यक्तींना दिलेले आहे, ही नम्रता एका ईश्वरी नियमानुसारच आहे. कारण नम्रता व शरणभाव हा ईश्वराचा सर्वात आवडता गुण आहे – मामेकं शरणं व्रज । या भगवान श्रीकृष्णाच्या आदेशानुसारच ही ज्ञानेश्वरीची लोभस कृति व आकृति आहे.

श्रीकृष्णार्जुन संवादाचे निरुपण करताना सद्‌गुरुंची कृपा मिळवून त्यांच्या कृपा प्रसादाने 'बोली अरुपाचे रुप दावीन' ही प्रतिज्ञा किंवा संकल्प श्रीज्ञानेश्वरांनी पूर्ण केलेला आहे. या संकल्पास निवृत्तिनाथांनी ज्ञानेश्वरांना आपल्यासारखेच करून गुरुत्व बहाल केलेले आहे. हे गुरुत्व म्हणजे ब्रह्मांडाचा विस्तार होय. हाच विस्तार व त्याचे दर्शन म्हणजे ज्ञानेश्वरांना झालेले विश्वात्मक देवाचे दर्शन आहे. हे दर्शन 'योगीयांना'सुद्धा दुर्लभ आहे.

'योगीया दुर्लभ ते ज्ञानेश्वरांनी पाहिले.' ज्ञानेश्वरांना हे दर्शन मिळण्याची पात्रता का प्राप्त झाली याचे वर्णन मुक्ताईने केलेले आहे, 'ज्ञानेश्वर हे सहिष्णु विष्णु आहेत.'

विभूती म्हणजे पाषाण नव्हे, पाषाणावर भोवतीच्या जनामनाच्या आंदोलनांचा परिणाम होत नाही. म्हणून पाषाणाला विभूती म्हणायच का? विभूती स्वतःच्या सुखदुःखांनी विचलित होत नाही. पण विशेषतः सामान्यांची, दीनांची दुःखे पाहून त्याचे अंतःकरण कासावीस होतच असते. म्हणून माउली म्हणतात – 'विश्वाचे आर्त माझे मनी प्रकटले । अवघेचि झाले देहब्रह्म ।' या आर्तांचे दुःख घालवून त्यांना सुखी करावे म्हणून विभूतींची धडपड असते. विभूतिंचे असामान्यत्व अलौकीक आहे. चिरंतन व अलख (अतींद्रिय) निरंजन आहेत.

देहरूप ज्ञानेश्वरांच्या लौकीक चरित्रात चिंता, क्रोध, अवहेलना, उपेक्षा याखेरीज ज्ञानेश्वरांच्या वाट्यास काहीच आले नाही. 'आई–वडिलांनी तुम्हाला जन्म दिला हेच पाप. आई–वडिलांनी प्रायश्चित घेतले पण तुमचे काय? तुमच्या रुपाने पाप उभेच आहे.' हे रोज ऐकून ज्ञानेश्वरांचे हृदय दुखावले. विभूती असले, योगी असले तरी, संवेदनशीलता हरवली नव्हती. इतरांचे आर्त जाणले तरी मनी आर्त उभे राहिले. नाहीतर अर्जुनासारख्या भक्तासाठी भगवान श्रीकृष्ण रथचक्र घेऊन भीष्मावर धावलेच नसते. मनी आभाळ भरून आले. ते पाहून चित्शक्ती मुक्ताईचे मन विव्हळ झाले. ती ज्ञानदेवांची शिवशक्ती होती. या आठ / नऊ वर्षांच्या योगिनीच्या शब्दांचे आभाळ गडद झाले. विश्वात्मकाला समजावू लागले –

[१]योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा ।।
विश्वरागे झाले वन्हि । संती सुखे व्हावे पाणी ।।
शब्दशस्त्रे झाले क्लेश । संती मानावा उपदेश ।।
विश्व पट ब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।। ता. अ. १

'ज्ञानदादा, अरे सर्वत्र ब्रह्मच भरलेले असताना तू रागावणार तरी कोणावर? समाजाचे शब्द जरी शस्त्र झाले तरी तू तर संत आहेस, तूच त्यांचा अपराध संतवृत्तीने संपवावा. तुला जर विश्वाचे आर्त जाणवते तर लोकांच्या मनीची कृपणता जाण ना ! ते बोलत नाहीत. बोलत आहे ते त्यांचं अज्ञान.' हे आहे मुक्ताईचे विश्वमातृत्व. श्रीगुरुंचे शिष्यत्व स्वतःशीच हसले असेल. पण गुरुकृपेने बोधावस्था प्राप्त झाल्यावर उमगले

[१]. साखरे किसनमहाराज, सार्थ ताटीचे अभंग.

की, 'ईश्वर प्राप्तीचे जे तीन मार्ग सांगितले आहेत. त्यामध्ये कर्म – ज्ञान – योग या तीनही मार्गातील त्रुटी व मर्यादा लक्षात घेता, तीनही मार्ग आचरिताना भगवंताचा विसर पडणे शक्य असते.[१] नुसत्या शास्त्रजनित ज्ञानापेक्षा भक्ती श्रेष्ठ आहे. भक्ती म्हणजे परमात्म स्वरूपाचे परम प्रेम. हे प्रेम असल्याशिवाय परतत्त्व स्पर्श नाही. कर्म मार्गात कर्म योग्य करण्याच्या हिशोबात मन अडकून पडते. नुसता कर्ममार्गी कर्मठ व जड बनतो, आणि त्याला भगवंताचा विसर पडतो. योगामध्ये वृत्तीना आवर घालण्याची खटपट म्हणजेच देहशुद्धी व चित्तशुद्धीची खटपट असते. त्यामुळे वृत्ती शांत बनून मन शून्याकार बनते. त्यात भगवंत असत नाही. ज्ञानमार्गामधे बुद्धीच्या सामर्थ्यावर भर दिला जातो. अभिमानाची बाधा होते, परंतु माया फसविते. परंतु भक्तिमधे सर्व विश्वामध्यें परमात्माच भरलेला आहे व त्यावर परम प्रेम केले पाहिजे हा भाव निर्माण होतो.' ज्याने या विश्वात्मक भावातून देवाचे दर्शन घेतले आहे त्या ज्ञानदेवांची भावावस्थाही विश्वात्मक आहे. म्हणून ते विभूतिस्वरूप प्रेमावतार आहेत.

विभूती ज्ञानेश्वर व त्यांचे श्रीगुरु विभूती निवृत्तिनाथ ही जगदीश्वराची दोन रूपे त्यांच्या अवतार कार्यात केव्हा एकमेकात पूर्णतः एक रुप होतात, व केव्हा ती आपल्या स्वतंत्र दैदिप्यमान स्वरूपात आपल्यासमोर उभी राहतात हे पूर्णतया आकलन करून घेणे खूप अवघड आहे. या दोनही विभूति अद्वैतही आहेत व प्रसंगी द्वैत पत्करून स्वतंत्रही आहेत. ज्ञानदेवांच्या जीवन प्रवासात निवृत्तिनाथ हे बंधू, श्रीगुरु, सखा या विविध स्वरूपात आपल्या समोर सर्वकाळ उभे असतात. आणि तरीही त्यांना पूर्णत्वाने शब्दात मांडणे शब्दांनाही शक्य होत नाही. विभूतिमत्त्व हे शब्दातीत आहे हेच एक सत्य आहे.

---

१. कै. बेलसरे के.वि. गोंदवलेकर महाराजांचा 'ज्ञान-संवाद', पान ३०५

# ज्ञानेश्वरांचे विभूतिमत्व–
# आणि पसायदान (अ)

अवघ्या एकवीस वर्षांच्या अल्प आयुष्यात एवढे विश्वव्यापी तत्त्वज्ञान, विश्वव्यापक ममता व आत्मभाव देणारी विभूती ज्ञानदेवांच्या पूर्वीही व त्यांच्या नंतरही आजपर्यंत झाली नाही.

श्रीज्ञानेश्वरांच्या विभूतिमत्वाचा विचार करीत असताना त्यांच्या समकालीन संतांचा त्यांच्या विषयीचा आदरभाव, ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानाबद्दल त्यांना वाटणारा आदर यांचाही विचार करणे तितकेच महत्त्वाचे आहे. ज्ञानदेवांच्या ज्ञानाची, तत्त्वज्ञानाची, समाजपरिवर्तनासंबंधीचे त्यांचे उच्च विचार, सामान्यांच्या हक्कासाठी गीतार्थाची मांडणी, व आपल्या नियोजित कार्यानंतर घेतलेला समाधीचा निर्णय, यामुळे सर्व संतमंडळ केवळ अचंबितच झाले असे नव्हे तर दुःखीही झाले. ज्ञानेश्वरकालीन संतात ही चार भावंडे वयाने सर्वात लहान. त्यांनी भोगलेल्या दुःखांचे मोजमापही नाही. परंतु त्या भोगण्याचा लहानसा हुंकारही चौघांपैकी एकाच्याही आयुष्यात व कार्यात उठला नाही.

### ज्ञानदेव सर्व संतांची 'माउली'

या संतमंडळात संत नामदेव ज्ञानेश्वरांचे अतिशय प्रेमाचे, अंतरंग मित्र, सखा होते. म्हणूनच ज्ञानेशांनी आपल्या संजीवन समाधीचे गूज प्रथम नामदेवास सांगितले, व त्याला उत्तरेतील प्रत्यक्ष परिस्थिती दाखवून आपल्या समाधीनंतर उत्तरेत भागवतधर्म रक्षणार्थ जाण्याचा विनंतीस्वरूप आग्रह केला. नामदेव सुमारे ऐक्यऐंशी वर्ष जगले. त्यामुळे त्यांनी त्या कालखंडातील अनेक संतांवर अभंग लिहिले.

नामदेवांना ज्ञानदेवांबद्दल अपार प्रेम व आदर होता. त्यामुळेच ज्ञानेश्वरांच्या समाधीनंतर नामदेव कमालीचे दुःखी झाले. नामदेवांचे ज्ञानेशांची व ज्ञानेश्वरीची प्रशंसा करणारे अभंग आहेत.

[१,२] ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणें निगमवल्लि प्रगट केली ।।

गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ।।

---

१. श्रीसकलसंतगाथा खंड १,

२. श्रीनामदेवांची गाथा, गीता प्रेस, गोरखपूर.

अध्यात्म विद्येचे दाविलेंसे रूप । चैतन्याचा दीप उजळिला ।।

छप्पन भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव उभारीली ।।

श्रवणाचे मिषें बैसावें येउनी । राम राज्य भुवनी सुरवी नांदे ।।

नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवीं अनुभवावी ।। ज्ञा.गा.९१२

ज्ञानदेवांचे श्रेष्ठत्व जाणून नामदेव म्हणतात –

तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रकाशले ।।

धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव ।।

उपजतांचि ज्ञानी हे वर्म जाणोनी । आले लोटांगणी चांगदेव ।।

प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद । बोलविला वेद म्हैशीपुत्रा ।।

सोहंसुकृताच्या सोडोनियां गांठी । केलीसे मराठी गीता देवी ।।

नामा म्हणे सर्व सुकृत लाहिजे । एक वेळा जाइजे अळंकावती ।। ना.गा. ९०९

ज्ञानेश्वरांनी समाधीचा आपला निर्णय नामदेवास उत्तरयात्रा संपण्यापूर्वीच सांगितला असावा. तेव्हापासून नामदेव कासावीसच होता. ज्ञानेशांनीच त्यांना आपल्या व आपल्या तीनही भावंडाचे समाधीचे वेळी हजर राहण्यास सांगितले असावे. त्यामुळे तर या भूतलावरून सर्व ज्ञान, त्याग आणि भक्तीवैभवच नाहीसे होणार असेच नामदेवाला वाटले असणार.

समाधी प्रसंगी नामदेवाच्या मनाची खूप तडफड झाली. नामदेव म्हणतात –

नानापरी मन आवरितो भारी । कांहीं केल्या हरि विसर न पडे ।।

दृश्या अदृश्याच्या दूर केल्या गोष्टी । उघडिली दृष्टी ज्ञानदेवें ।।

गीतेवरी टीका ग्रंथ केला सार । केवळ ईश्वर ज्ञानाचा हा ।।

नामा म्हणे आतां देहासी विटला । स्वरूपी पालटला ज्ञानदेव ।। ना.गा.१०६०

कासाविस प्राण मन तळमळी । जैसी कां मासोळी जीवनावीण ।।

दाही दिशा वोस वाटती उदास । करिताती सोस मनामार्जी ।।

घातियेली घोण प्राण आला कंठीं । ज्ञानदेवासाठीं तळमळी ।।

नामा म्हणे देवा वाटतसे खंती । चालली विभूति योगियांची ।। ना.गा.१०५९

विव्हळ होऊन नामदेव विठ्ठलाची आर्त करूणा भाकतात –

ज्ञानदेव माझें सौख्यसरोवर । त्यांत जलचर स्वस्थ होतों ।।

दुर्दैव तापानें आटलें तें नीर । वर्षी रघुवर कृपामेघ ।।

ज्ञानदेवावीण व्याकुळ हे प्राण । तूं जगज्जीवन देवा होसी ।।

विठाबाई तूं जाणसी ना जाण । रक्षी मज कोण दुजें येथें ।। ना.गा.१२२४

शेवटीतर नामदेवाचा विलाप इतका वाढला की खुद्द पांडुरंगाला त्याला शांत करावे लागले.

[१] जयजय शब्दे नामा बोभाये । केशवा गा माहे त्राहे ।

मी व्याकूळ होता हे । ज्ञानदेवा कारणे ।।

नारायणा त्राहे त्राहे । कृपादृष्टी तूं रे पाहे ।

मी व्याकूळ होत आहे । ज्ञानदेवा कारणे ।।

आतां तूं मज सांभाळी । ज्ञानदेवाविण सदाकाळी ।

मज न कंठे भूमंडळी । भानुरहित वर्तता ।।

तूं माझी जनक जननी । परी ज्ञानदेवेविण मेदिनी ।

शून्य वाटे मज लागुनी । जैसे मत्स्य जीवनेवीण ।।

नामदेवाची ही विव्हळता हृदयाला पीळ पाडणारी आहे. ज्ञानदेव हा नामदेवाचा प्राण होता. वस्तुत: ज्ञानाचा देव आणि नामाचा देव अभेदच आहेत. ज्ञानदेवांचे शब्द नामदेवाला वेदाज्ञेसारखे होते. म्हणूनच ज्ञानदेवांची अखेरची विनंती किंवा आज्ञा नामदेवाने शिरोधार्य मानली व ज्ञानेश्वरादी भावंडांच्या समाधीनंतर नामदेव सर्वज्ञानी होवून, विठ्ठलवियोगाचे वीष पचवून भागवत धर्माचे रक्षणासाठी उत्तरेत गेला. तोही थोडा थोडका नव्हे, तर येऊन–जाऊन सुमारे पन्नास वर्षे असावीत.

नामदेवाची दासी जनाबाई हीसुद्धा ज्येष्ठ आणि श्रेष्ठ विठ्ठलभक्त होती. गोपाळांचा मेळा वर्णन करताना जनाबाई म्हणते[२, ३] –

---

१. श्री. बावकर रमेश, 'ज्ञान हेच देव' पान ७२९

२. श्रीसकलसंतगाथा खंड–१,

३. श्रीसकलसंतवाणी खंड–१

विठु माझा लेंकुरवाळा । संगें गोपाळांचा मेळा ।।

निवृत्ति हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी ।।

पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर ।।

गोरा कुंभार मांडिवरी । चोखा जीवा बरोबरी ।।

बंका कडियेवरी । नामा करांगुली धरी ।।

जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ।। ज.अ.३०

संत जनाबाईस नामदेव इतकीच ज्ञानदेवादी भावंडेही पूजनीय होती. जनाई म्हणते –

अहो सखीये साजणी । ज्ञानाबाई हो हरणी ।।

मज पाडसाची माय । भक्ति वत्साची ते गाय ।।

कां गा उशीर लाविला । तुजविण शिण झाला ।।

अहो बैसलें दळणीं । धांव घाली म्हणे जनी ।। ज.अ.५९

धन्य ते पंढरी धन्य पंढरीनाथ । तेणें हो पतित उद्धरिले ।।

धन्य नामदेव धन्य पंढरीनाथ । तयानें अनाथ उद्धरिले ।।

धन्य ज्ञानेश्वर धन्य त्याचा भाव । त्याचे पाय देव आम्हां भेटी ।।

नामयाची जनी पालट पैं झाला । भेटावया आला पांडुरंग ।। ज.अ.७६

ज्ञानदेवांचे कौतुकाने जनी म्हणते –

निवृत्ति पुसत । कोठें होते पंढरीनाथ ।।

खूण कळली हृषीकेशी । सांगों नको निवृत्तिसी ।।

उत्तर दिलें ज्ञानदेवें । नवल केव्हढें सांगावे ।।

शिव बंदी पायवणी । नये योगियांचे ध्यानीं ।।

द्वारीं उभे ब्रह्मादिक। गुण गाती सकळिक।।

जनी सवें दळी देव । तिचा देखोनीयां भाव ।। ज.अ.१२०

ज्ञानदेव व नामदेवाचे सख्य सांगताना जनी म्हणते –

संतभार पंढरींत । कीर्तनाचा गजर होत ।।

तेथें असे देव उभा । जैशी समचरणांची शोभा ।।

रंगभरे कीर्तनांत । प्रेमें हरिदास नाचत ।।

सखा विरळा ज्ञानेश्वर । नामयाचें जो जिव्हार ।।

ऐशा संतां शरण जावें । जनी म्हणे त्याला घ्यावें ।। ज.अ.१७७

ज्ञानेश्वरांचेविषयी वात्सल्य व्यक्त करताना जनी म्हणते–

ज्ञानाचा सागर । सखा माझा ज्ञानेश्वर ।।

मरोनियां जावें । बा माझ्या पोटा यावें ।।

ऐसें करी माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानेश्वरा ।।

जावे वोवाळुनी । जन्मोजन्मीं दासी जनी ।। ज.अ.२६८

मायेहूनि माय मानी । करी जीवाची ओंवाळणी ।।

परलोकींचें तारूं। म्हणे माझा ज्ञानेश्वरू।।

वित्त गोत चित्त पाहे । सत्य वंदी गुरूचे पाय ।।

पतिव्रते जैसा पती । जनी म्हणे सांगों किती ।। ज.अ.२६९

या चारही भावंडांचे गुण गातांना जनाई म्हणते –

सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ति दातार ।।

महाविष्णुचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ।।

ब्रह्मा सोपान तो झाला । भक्तां आनंद वर्तला ।।

आदि शक्ति मुक्ताबाई । दासी जनी लागे पायीं ।। ज.अ.२७२

नामदेवाप्रमाणेच संत जनाबाईंनीसुद्धा अनेक संतांवर अभंगातून स्तुतीसुमने गायली आहेत.

संत चोखामेळा हे संत नामदेवांचे शिष्य. हीन जातीचे असूनही चोखामेळा व त्यांची अस्तुरी संत सोयराबाई पांडुरंगाचे अत्यंत लाडके भक्त होते. असे सांगतात की सोयराचे बाळंतपणही पांडुरंगाने स्वत:

केले. चोखोबांचे नामदेवाइतकेच ज्ञानदेवावर प्रेम आणि भक्ती होती. ज्ञानदेवांनी चोखोबांच्या विनंती वरूनच सर्व वर्णांच्या लोकांना, विशेषत: ज्यांना मंदिरात जाऊन पांडुरंगाचे प्रत्यक्ष दर्शन घेता येत नाही, त्यांना भगवंताच्या नामस्मरणाने मुक्तीचा व भक्तीचा मार्ग दाखविण्यासाठी हरिपाठाची रचना केली. चोखोबांनीच आपला मेहुणा बंका यांना अनुग्रह दिला.

श्रीज्ञानेश्वर माउली व त्यांच्या भावंडांच्याबद्दल आपला असणारा आदर व्यक्त करताना[१] संत चोखा मेळा म्हणतात –

विठ्ठल विठ्ठल गजरीं । अवघी दुमदुमली पंढरी ।।

होतो नामाचा गजर । दिंड्या पताकांचा भार ।।

निवृत्ति ज्ञानदेव सोपान । अपार वैष्णव ते जाण ।।

हरि कीर्तनाची दाटी । तेथें चोखा घाली मिठी ।। चो.गा.६३

ज्ञानेश्वर व इतर संतांचा आदर करताना संत चोखोबा म्हणतात –

सप्रेमे निवृत्ति आणि ज्ञानदेव । मुक्ताईचा भाव विठ्ठलचरणीं ।.

सोपान सांवता गोरा तो कुंभार । नरहरी सोनार प्रेम भरित ।।

कबीर कमाल रोहिदास चांभार । आणिक अपार वैष्णवजन ।।

चोखा तयां पायीं घाली लोटांगण । वंदितो चरण प्रेमभावें ।। चो.गा.६४

ज्ञानेशांच्या व निवृत्तींच्या सगुण–निर्गुणभावाबद्दल चोखामेळा सांगतात –

निर्गुणा अंगी सगुण बाणलें । निर्गुण सगुण एकत्वा आलें ।।

शब्दाची खूण जाणती ज्ञानी । येरा गबाळ अवघी काहाणी ।।

निवृत्ति ज्ञानदेव सोपान भले । निर्गुण सगुण त्याही गिळियलें ।।

चोखा म्हणे त्यांच्या पायींची पादुका । वागवितो देखा ऐक्यपणें ।। चो.गा.८२

अलंकापुरी व ज्ञानदेवांच्या ईश्वरी अवताराबद्दल चोखोबा म्हणतात[२] –

---

१. श्रीसकलसंतवाणी खंड–१ पान २९९

२. श्रीसकलसंतवाणी खंड–१ चोखामेळा पुरवणी पान ३२३

सुख अनुपम संतांचे चरणीं । प्रत्यक्ष अलंकाभुवनीं नांदतसे ।।

तो हा महाराज ज्ञानेश्वर माउली । जेणे निगमवल्ली प्रगट केली ।।

संसारी आसक्त माया मोहे रत । ऐसे जे पतित तारावया ।।

चोखा म्हणे श्रेष्ठ ज्ञानदेवी ग्रंथ । वाचितां सनाथ जीव होती ।। चो.गा.१३३

ज्ञानदेवांनी संतांसाठी ज्ञानेश्वरी पंढरपुरी आणली. सर्वच संत ज्ञानेश्वरीने प्रभावित झाले. ज्ञानेशांनी वेदांचा अर्थ सोपा करून भक्तांना दिला. त्याची कृतज्ञता म्हणून ज्ञानदेवांच्या समाधीबद्दल चोखोबा म्हणतात–

उघडोनी वेदार्थाचा ठेवा । केला तरणोपाय जीवा ।।

ऐसा समर्थ ज्ञानदेव । तया चरणीं ठेवा भाव ।।

प्रत्यक्ष प्रचित लोचनीं । अस्थि विरती जीवनीं ।।

पुढें सोन्याचा पिंपळ । ऐसी साक्ष असे अढळ ।।

कर जोडोनियां दोन्ही । चोखा जातो लोटांगणीं ।। चो.गा.१३४

ज्ञानदेवांच्या अखंड समाधी अवस्थेबद्दल चोखोबा म्हणतात –

अखंड समाधि नामाच्या चिंतने । साधियेलें पेणें वैकुंठींचें ।।

तोचि योगीजाणा सिद्धांचा तो राणा । अनुभविल्याखुणा सर्व जेणें ।।

ऐहिक परत्र साधिलें साधन । तोडोनी बंधन काम क्रोध ।।

चोखा म्हणे तोचि योगीयांचा रावो । देवांचा तो देवो हृदयीं ज्याच्या ।। चो.गा.१४०

ज्ञानदेवांच्या संजीवन समाधीनंतर सर्व संत त्यांच्या चिरविरहाने विव्हळ झाले. परंतु हा मुक्तीचा सोहळा पाहिल्यावर संतांनी त्यांच्या नामगजराचा आनंद घेतला.

चोखोबांचा हा अभंग अत्यंत भावस्पर्शी आहे. आणि यात ज्ञानदेवांचे समाधी वर्णन आहे –

ज्ञानेश्वरे नामे धरिला अवतार । क्षेम अलंकापूर इंद्रायणी ।।[१]

अद्वैत ज्ञानाची करूनी उजरी । टीका ज्ञानेश्वरी ग्रंथ केला ।।

---

१. श्री. रमेश बावकर, ज्ञान तेच देव, पान ७३१

अमृत अनुभवी गुरूगम्य ज्ञान । दाउनिया जन उद्धरिले ।।

बा शत अठरा शक शालिवाहन । दुर्मुख अभिधान संवत्सर ।।

कृष्ण त्रयोदशी कार्तिक मास । बैसे समाधीस ज्ञानेश्वर ।।

जातिहीन चोखा विनवी जोडूनी कर । समाधी निर्धार संजीवनी ।।

ज्ञानदेवांनी चंद्रभागेतीरी सांगितलेल्या हरिपाठाने अत्यंत समाधानी झालेल्या चोखोबांचा शिष्य[१] बंकामहार यांनी पुढील अभंग सांगितला आहे. –

भोळ्या भाविकांसी सांपडलें वर्म । सुलभ हें नाम विठोबाचें ।।

भावाचा उतार हरिनाम सांगडी । जाऊं पैलथडी हेळामात्रें ।।

आनंद सोहळा हरिकथा माउली । भाविकां वोळली प्रेमपान्हा ।।

बंका म्हणे माझा हाचि निर्धार । येणें संसार देशधडी ।। बं.अ.३८

ज्ञानदेवापासूनची आपली शिष्य परंपरा सांगताना बंका म्हणतात –

ज्ञानियांचा राजा ज्ञानेश्वर माउली । खेचरा वोळली कृपासिंधु ।।

ज्ञानदेवा चरणीं खेचर शरण । नामदेवा पूर्ण कृपा केली ।।

नामदेवें हात चोखियाचे शिरीं । विठ्ठल त्री अक्षरीं उपदेशिलें ।।

बंका म्हणे माझा चोखा गुरू माउली । तयाचे पाउलीं लोटांगण ।। बं.अ.३९

ज्ञानदेवाकडून हरिनामाचे मर्म कळाल्यावर चोखयाची सोयरा म्हणते –

नामाचें चिंतन अखंड जया वाचे । हेंचि साधनाचें सार एक।।

मागील परिहार पुढें वारे शीण । नाम बीज खूण सांगितली ।।

अवघ्या उपाधि तुटताती नामें । भाविकांसी वर्म सोपें हेंची ।।

आणिक नका पडूं गबाळाचे भरी । म्हणतसे महारी चोखियाची ।। सो.अ.४०

याच नामजपाबद्दल सोयराबाई म्हणते –

---

१. श्री सकलसंतवाणी खंड-१ पान ३३५,३२९

सुलभ सोपें वाचे नाम गातां। पापाच्या चळथा पळती पुढें।।

वाचे हरी हरी जो कोणी उच्चारी। नर अथवा नारी पवित्र ते।।

जातवित गोत नको हा विचार। हरिनाम सार कलिमाजी।।

सोयरा म्हणे मज नामाची आवडी। जाय देशोधडी कळिकाळ।। सो.अ.४५

बंकामहाराजांची पत्नी संत निर्मळा म्हणते–

मज नामाची आवडी। संसार केला देशधडी।।

सांपडलें वर्म सोपें। विठ्ठल नाम मंत्र जपें।।

नाही आणिक साधन। सदा गाय नारायण।।

निर्मळा म्हणे देवा। छंद येव्हढा पुरवावा।। मंजुळा अ.६

ज्ञानदेवांच्या समाधीने विव्हळ झालेला नरहरी सोनार[१] उद्गारला–

सवंगडे निवृत्ति सोपान मुक्ताई। ज्ञानदेवा पायी भाव माझा।।

धन्य ते वैष्णव मिळाले सकळी। जीवभाव मी वोवाळी तया चरणी।।

अखंड ध्यानी ध्यातो हृदयी साचार। नरहरी सोनार काया मने।।

[२]संत सेना न्हावी ज्ञानदेवांचे भक्त. त्यांचा भाबडा भाव त्यांनी आपल्या अभंगात व्यक्त केला. सेना न्हावी यांनी माउलींची स्तुती अनेक अभंगात गायली आहे.

धन्य महाराज अलंकापुरवासी। साष्टांग तयासी नमन माझें।।

या ज्ञानदेवाचे नित्य नाम घेती वाचें। उद्धरती तयांची सकळ कुळें।।

इंद्रायणी स्नान करिती प्रदक्षिणा। तुटती यातना सकळ त्यांच्या।।

सेना म्हणे त्यांचें धन्य झालें जिणें। ज्ञानदेव दरुशनें मुक्त होती।। से.अ.१२१

वाचे उच्चारी जो ज्ञानदेवासी। तयाच्या सुकृतासी पार नाहीं।।

पूर्वीचें सुकृत फळासि आलें। वाचें उच्चारिलें ज्ञानदेवा।।

या अलंकापुरीं आला जन्मांसी। पूर्वज तयासी मानिती धन्य।।

---

१. श्री. बावकर रमेश, 'ज्ञान तेच देव' पान ७२१

२. श्रीसकलसंतवाणी – भाग १ पान २७७

सेना म्हणे त्यानें उद्धरिलें कुळ । पूर्वज सकळ आशिर्वाद देती ।। से.अ.१२२

विष्णुचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ।।

चला जाऊं अलंकापुरा । संतजनांच्या माहेरा ।।

स्नान करीतां इंद्रायणी । मुक्तां लागली चरणीं ।।

ज्ञानेश्वरांच्या चरणीं । सेना आला लोटांगणी ।। से.अ.१२४

ज्ञानदेव हेच सेनामहाराजांचे सर्वस्व होते. म्हणून सेना महाराज म्हणतात –

ज्ञानदेव गुरू ज्ञानदेव तारूं । उतरील पैल पारूं ज्ञानदेव ।।

ज्ञानदेव माता ज्ञानदेव पिता । तोडील भवव्यथा ज्ञानदेव ।।

ज्ञानदेव माझे सोयरे धायरे । जिवलग निर्धारि ज्ञानदेव ।।

सेना म्हणे माझा ज्ञानदेव निधान । दाविली निजखूण ज्ञानदेव ।। से.अ.१२६

श्रीज्ञानराजें केला उपकार । मार्ग हा निर्धार दाखविला ।।

विटेवरी उभा वैकुंठनायक। आणि पुंडलिक चंद्रभागा ।।

अविनाश पंढरी भूमीवरी पेंठ । प्रत्यक्ष वैकुंठ दाखविलें ।।

सेना म्हणे चला जाऊं तया ठाया । पांडुरंग सखया भेटावया ।। से.अ.१२८

गोराबाकाका हे आत्मज्ञानी व सर्वात जेष्ठ संत. ते अभंगात म्हणतात[१] –

ब्रह्ममूर्ती संत जगी अवतरले । उद्धराया आले हीन जना ।।

ब्रह्मादिक ज्यांचे वंदिती पायवणी । नाम घेता वदनी दोष जाती ।।

हो कां दुराचारी विषयी आसक्त। संतकृपे त्वरीत उद्धरती ।।

अखंडित गोरा त्यांची वाट पाहे । निशिदिनी ध्याये संतसंग ।।

संत कान्होपात्रा ही गणिका. परंतु विठ्ठल चरणी दृढ भक्तीभाव.[२] कान्होपात्रा ज्ञानदेवाबद्दल म्हणते–

---

१. श्री. रमेश बावकर 'ज्ञान हेच देव' पान ७२१

२. श्रीसकलसंतवाणी खंड–१ पान २५७

अलंकापुरीं पुण्यठाव । तेथ समाधी ज्ञानदेव ।।

पांडुरंगें दिधला वर । भेटी निर्धार कृष्णपक्षीं ।।

नित्य स्नानालागीं जाणा । भागीरथी दिधली ज्ञाना ।।

सरस्वती मनकर्णिका । त्रिसंगमीं वाहती देखा ।।

येथें स्नान करितां । वास वैकुंठीं तत्वतां ।।

ऐसें देव सांगत । कान्होपात्रा आनंदत ।। का.अ.१

ज्ञानदेवांना पाहून आनंद व्यक्त करताना कान्होपात्रा म्हणते –

शिव तो निवृत्ति विष्णु ज्ञानदेव पाही । सोपान तो ब्रह्मा मुळ माया मुक्ताई ।।

धन्य धन्य धन्य धन्य निवृत्तिराया । धन्य ज्ञानदेव सोपान सखया ।।

प्रत्यक्ष पैठणीं भटां दाविली प्रचिती । रेडियाचे मुखें वदविली वेदश्रुती ।।

चौदाशें वरूषांचे तप्तीतीर रहिवासी । गर्व हरविला चालविले भिंतीशी ।।

धन्य कान्हुपात्रा आजी झाली भाग्याची । भेटी झाली ज्ञानदेवाची म्हणुनिया ।। का.अ.२

[१]भागुमहारिण ही देवभोळी भक्त, नामदेव, चोखोबा यांच्यासह विठ्ठल भजनात रमलेला जीव होता. तिलाही ज्ञानोबांचा लळा होता. ती म्हणते –

कृपेच्या सागरा । मायबापा ज्ञानेश्वरा ।।

देहेभाव हे सोडून । बा माझे धरा ध्यान ।।

जेणें पाषाण तारिले । मुखें पशु वेद बोले ।।

भिंती चालविली । ऐसी कृपाळु माउली ।।

ऐसा कृपाळु भक्तांचा । मायबाप हा आमुचा ।।

विश्रांतीचा ठाव । भागु म्हणे ज्ञानदेव ।। भा.म.अ.३

तेराव्या शतकानंतर महाराष्ट्रात अनेक संतश्रेष्ठांनी जन्म घेतला. त्यामुळेच परकीय सत्ता असूनही भागवतधर्म व वारकरी संप्रदाय घट्ट पाय रोवून महाराष्ट्रात उभा राहिला. ज्ञानेश्वरांच्या अद्वैत विचारांचाच

---

१. श्रीसकलसंतवाणी खंड–१ पान ३४२

पाठपुरावा पुढील संतांनी केला. सोळाव्या शतकातील पैठणचे संत एकनाथ व सतराव्या शतकातील संत तुकाराम यांचे कार्य विशेष उल्लेखनीय आहे. या दोनही संतांनी खूप मोठी अभंग संपदा उभी केली. भागवतधर्म समाजाच्या तळागाळापर्यंत नेऊन पोहोचविला. संत एकनाथ व संत तुकाराम हे दोघेही ज्ञानदेवांना गुरूस्थानी मानीत होते. समाधीत ज्ञानेश्वरांच्या गळ्याला वेढणारी आजानवृक्षाची मुळी काढण्याची विनंती ज्ञानदेवांनी एकनाथांना केली. नाथांनी समाधी शोधून ती मुळी काढली. संत एकनाथांनी ज्ञानेश्वरीच्या मूळ स्वरूपात त्यांच्यानंतर निर्माण झालेले दोष शोधून काढले व ज्ञानेश्वरी शुद्धस्वरूपात मांडली. नाथांनी या शुद्धिकरणात स्वत:ची काहीही भर त्यात टाकली नाही. केवळ त्यात निर्माण झालेले पाठभेद काढून टाकले. नाथांनी ज्ञानदेव – स्तुतीपर एकूण सत्तावीस अभंग लिहिले आहेत. ज्ञानदेवांचे श्रेष्ठत्व तुकोबांनी अभंगात स्पष्ट मांडले आहेत. संत बहिणाबाई या संत तुकारामांच्या शिष्या. त्यांनी ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ व तुकाराम यांनी भागवत धर्माचे मंदिर कसे उभारले आहे यावर सुंदर अभंग लिहिला आहे. [१]पांगारकर तुकाराम चरित्रात आवर्जून लिहितात की प्रत्येक पंढरपूरवारीपूर्वी संततुकाराम आळंदीस येऊन समाधी – दर्शन घेऊन मगच पुढे पंढरपुरी जाण्याचे प्रस्थान ठेवीत.

[२]संत एकनाथांचे ज्ञानेश्वर गौरवाचे काही अभंग पुढील प्रमाणे आहेत–

विश्रांतीचें स्थान संतांचें माहेर । तें या भूमीवर अलंकापूर ।।

तये स्थळीं माझा जीवाचा वो ठेवा । नमीन ज्ञानदेवा जाऊनियां ।।

सिद्धेश्वर स्थान दरूशनें मुक्ती । ब्रह्मज्ञान प्राप्ती वटेश्वर ।।

चौऱ्यांयशीं सिद्धांचा सिद्ध भेटी मेळा । प्रत्यक्ष स्थापिला कल्पवृक्ष ।।

तयासी नित्यतां घडतां प्रदक्षणा । नाहीं पार पुण्या वास स्वर्गी ।।

अमृतमय पुढें वाहे इंद्रायणी । भागिरथी आदिकरूनी तीर्थराज ।।

ऐशिया स्थळीं समाधी ज्ञानदेवा । एका जनार्दनी ठाव अलंकापूर ।। ए.गा.३५०७

कृपाळु उदार माझा ज्ञानेश्वर । तया नमस्कार वारंवार ।।

न पाहे यातीकुळांचा विचार । भक्त करूणाकर ज्ञानाबाई ।।

---

१. वै. पांगारकर ल. रा., संततुकाराम चरित्र

२. श्रीसकलसंतवाणी खंड–२ पान ३७६

भलतिया भावें शरण जातां भेटी । पडितसे तुटी जन्मव्याधी ।।

ज्ञानाबाई माझी अनाथाची माय । एका जनार्दनीं पाय वंदितसे ।। ए.गा. ३५१४

कैवल्याचा पुतळा । प्रगटला भूतळा ।

चैतन्याचा जिव्हाळा । ज्ञानोबा माझा ।।

ज्ञानियाचा शिरोमणी । वंद्य जो कां पूज्यस्थानीं ।

सकळांसी शिरोमणी । ज्ञानोबा माझा ।।

चालविली जड भिंती । हारली चांग्याची भ्रांती ।।

मोक्षमार्गाचा सांगाती ।। ज्ञानोबा माझा ।।

रेड्यामुखीं वेद बोलविला । गर्व द्विजांचा हरविला ।

शांतिबिंब प्रगटला । ज्ञानोबा माझा ।।

गुरूसेवेलागीं जाण । शरण एका जनार्दन ।

चैतन्याचें जीवन । ज्ञानोबा माझा ।। ए.गा. ३५१६

श्रीज्ञानदेवें येऊनी स्वप्नांत । सांगितली मात मजलागीं ।।

दिव्य तेज पुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ।।

अजानवृक्षाची मुळी कंठास लागली । येऊनि आनंद स्थळीं काढ वेगीं ।।

ऐसें स्वप्न होतां आलों अलंकापुरीं । तंव नदीमाझारीं देखिलें द्वार ।।

एका जनार्दनी पूर्वपुण्य फळलें । श्रीगुरू भेटले ज्ञानेश्वर ।। ए.गा. ३५२४

एकनाथांच्या आयुष्यातील हा दिव्य क्षण त्यांनी अत्यंत रसाळपणे वर्णिला आहे.

अवतार शिवाचा । निवृत्ति साचा जप करा ।।

श्रीविष्णुचा अवतार । स्वामी माझा ज्ञानेश्वर ।।

सोपानदेव तो निर्धार । ब्रह्मयाचा अवतार ।।

मुक्ताईचें चरणीं । शरण एका जनार्दनीं ।। ए.गा. ३५२७

ज्ञानेश्वर स्तुतीच्या अखेरच्या अभंगात एकनाथ सांगतात –

भाव धरुनियां वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरी तयावरी ।।

स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णु । श्रीगीता हा प्रश्नु अर्जुनेसी ।।

तोचि ज्ञानेश्वरी वाचे वदतां साचे । भय कळिकाळाचें नाही तया ।।

एका जनार्दनी संशय सांडोनी । दृढ धरा मनीं ज्ञानेश्वरी ।। ए.गा. ३५३३

[१] संत तुकारामांना ज्ञानदेवांच्या बद्दल अत्यंत आदर आहे. ते म्हणतात –

ज्ञानियांचा राजा गुरू महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें ।।

मज पामरा हें काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ।।

ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळगणें । इतर तुळणे काय पुढे ।।

तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली । म्हणोनी ठेविली पायीं डोई ।। तु.गा. ३३९८

ज्ञानेश्वरांपुढे आपले लहानपण सांगताना तुकाराम म्हणतात –

बोलिलीं लेकुरें । वेडी वांकुडीं उत्तरें ।।

करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ।।

नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ।।

तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायापें किंकरा ।। तु.गा. ३३९९

ज्ञानदेवांबद्दलच्या शेवटच्या ओवीत तुकाराममहाराज म्हणतात –

जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ।।

करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ।।

जयानें घातली युक्तिची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ।।

तुका म्हणजे तेथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचिया ।। तु.गा. ३०४५

---

१. श्रीसकलसंतवाणी, खंड २. पान ७८९

२. श्रीसकलसंतवाणी, खंड २. पान ९००

तुकारामांची शिष्या[२] संत बहिणाबाई हे चार संत व भागवतधर्मा संबंधी सांगते –

संत कृपा झाली । इमारत फळा आली ।।

ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालय ।।

नामा तयाचा किंकर । तेणें रचिलें तें आवार ।।

जनार्दन एकनाथ । खांब दिधला भागवत ।।

तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ।।

बहिणी म्हणजे फडकती ध्वजा । निरुपणा केलें बोजा ।। ब.अ. ३२

संत निळोबा महाराज हे संत तुकारामांचे अंतरंग शिष्य. त्यांनी आळंदी व ज्ञानदेव यावर पाच अभंग, एक अभंग ज्ञानदेवांच्या परंपरेचा व ज्ञानेशांची आरती लिहिली आहे. अभंगात[१] निळोबाराय म्हणतात –

पंढरपुरी ज्ञानेश्वरीं । मुक्ति कामारी वोळंगती ।।

तेथें देव येथे भक्त । महिमा अद्‌भुत दोहींचा ।।

तेथें ध्यान येथें ज्ञान । परलोक साधन दो ठायीं ।।

निळा म्हणे तेथें गरुड । येथें झाड अजानतरु ।। नि.अ. १५६०

ज्ञानदेवांची कीर्ती गाताना म्हणतात –

वर्णितां महिमा तो अगाध । जेथें सिद्ध अवतरले ।।

पशुमुखें वदवूनी श्रृती । निर्जीव भिंती चालविली ।।

सन्मुख पुढें अजानवृक्ष । पिंपळ प्रत्यक्ष सोन्याचा ।।

निळा म्हणे ऐकोनी कीर्ती । चांगदेव येती दर्शना ।। नि.अ. १५६२

ह्या तिन्ही भावांची स्तुती करताना म्हणतात –

उभारिला ध्वज तिहीं लोकांवरी । ऐशी चराचरी कीर्ती ज्याची ।।

ते हे निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर सोपान । मुक्ताबाई ज्ञान दीप्ती कळा ।।

---

१. श्रीसकलसंतवाणी, खंड–२ पान १०८१

धरुनि सगुण रुपें केली क्रीडा । बोलविला रेडा निगम वाचे ।।

बैसूनियां वरी चालविती भिंती । चांगदेवा प्रती दिली भेटी ।।

मग वास केला अळंकापुरासी । पिंपळ द्वारासी कनकाचा ।।

निळा म्हणजे ज्याच्यानावें करितां घोष । नातळती दोष कळिकाळाचे ।। नि.अ. १५६३

ज्ञानेश्वरांबद्दल समकालीन व पुढील शतकांतील संत एकनाथ, संत तुकाराम इत्यादी संतांचा आदरभाव त्यांच्या अभंगातून पाहिल्यानंतर त्यांच्या जीवनातील काही गोष्टींबद्दल स्पष्टीकरणात्मक लिहिणे जरूरीचे वाटते. ज्ञानदेवांच्या स्वभावाचे वैशिष्ठ्य यातून स्पष्ट होणारे आहे.

वेद–उपनिषदांनी स्त्रियांना व शूद्रांना धर्माचा अधिकार नाकारला परंतु भगवतद्गीतेत भगवंतांनी सर्व वर्णांना धर्माचा अधिकार असल्याचे सांगितले आहे. म्हणजे वेद कृपण असले तरी गीता उदार व समन्वयात्मक आहे. वेद हे भगवंताचे निश्वास आहेत म्हणून श्रुतींना स्मृतींपेक्षा वरिष्ठ मानले जात होते. शंकराचार्यांनीसुद्धा हे श्रेष्ठत्व मान्य केले होते. वेद हे जर भगवंताचे निःश्वास आहेत तर गीता भगवंतांनी स्वमुखे सांगितली आहे. म्हणून गीतेचे श्रेष्ठत्व वादातीत आहे. आणि संस्कृत भाषेत अडकलेली, सामान्यांना सहज न समजणारी गीता ज्ञानदेवांनी त्यावर मराठीत भाष्य करून सामान्यांच्या घरोघरी पोहोचवली.

पैठणला जाऊन ब्राह्मसभेसमोर उभीराहीपर्यंत ज्ञानदेवादी भावंडे जगाला पूर्णपणे अज्ञात होती. संन्याशाची मुले म्हणून जन्मापासूनच जात नव्हती, धर्म नव्हता, मुंज इत्यादी संस्कारही नव्हते. श्वानापेक्षाही ते हीन मानले जात. परंतु कितीही मोठा हिरा खाणीत सापडला तरीही, जो पर्यंत त्यावर पैलू पाडले जात नाहीत, तोवर त्याची किंमत जगाला समजत नाही. या भावंडांनी, विशेषतः ज्ञानदेवांनी दक्षिण काशी समजल्या जाणाऱ्या पैठणच्या विद्वान ब्रह्मवृंदांशी केलेला वेदोपनिषदांचा व न्याय–अन्यायाचा विद्वत् संवाद परिवर्तनात्मक ठरला. ज्याला स्वतःची भाषाच नाही त्याने वेद म्हणावेत, हे सामर्थ्य केवळ विभूतीचे. या भावंडांच्या असीम विद्वत्तेपुढे ब्रह्मवृंद शरमला, नम्र झाला, [१] नामदेव आपल्या गाथेत लिहितात –

करिती आश्चर्य सकळ द्विजवर । हे तिन्ही अवतार तीन देवांचे ।।९ ।।

आदिमाता मुक्ताई मुक्तपणें अवतरली । आम्हांपासूनि झाली थोर चुकी ।। १० ।।

---

१. श्रीमदेवांची गाथा. पान ११६

कर्मठ अभिमानें ठकलों देहबुद्धि । गोवियेलीं विधि निःसंदेह ।।११ ।।

नेणो भक्तिज्ञान वैराग्याचा लेश । कुटुंबाचे दास होउनि ठेलों ।।१२ ।।

आणीकांसी सांगो आपण नाचरों । लटिकेच हुंबरों प्रतिष्ठेसी ।।१३ ।।

धन्य यांचा वंश धन्य यांचें कुळ । धन्य पुण्यशील अवतार हे ।।१४ ।।

सकळ द्विजवर करिती नमस्कार । आनंदें जयजयकार करिताती ।।१५ ।। ना.गा. ९०६

मिळोनि समस्त सोडियेलीं शास्त्रें । विचारोन पत्र लिहियेलें ।। ना.गा.९०७.१७

हे परलोकीचे तारु देवत्रय यासी । प्रायश्चित काय यासी द्यावें कोणी ।। ना.गा.९०७१८ ।।

लिहोनियां पत्र दिधले तया हातीं । समस्तांसी निवृत्ति नमस्कारिले ।। ९०७.१९

श्रीक्षेत्र पैठणच्या ब्रह्मवृंदांनी त्यांचे निर्विवाद मोठेपण मान्य करून त्यांना शुद्धिपत्र दिले. हे शुद्धिपत्र हेमाडपंताचा साहाय्यक बोपदेव यांनी स्वतः लिहिले असे काही म्हणतात. [१]भिंगारकरबुवांनी लिहिलेल्या ज्ञानेश्वर चरित्रात त्यांनी असेही लिहिले आहे की, पैठणच्या ब्रह्मवृंदांनी व महाजनांनी या तीनही भावंडांच्या मुंजीचाही आग्रह केला होता. त्याला ज्ञानदेवांनी शांतपणे नकार दिला. ज्ञानदेव वैदिक धर्मपरंपरेला अतिशय मानीत असत. त्यांनी सांगितले की संन्याशाच्या मुलांच्या या मुंजी हा अनिष्ट प्रकार वैदिक धर्मात त्यांच्यामुळे प्रचलित होऊ नये. व मुंजी नंतर त्यांना प्राप्त होणाऱ्या द्विजत्वामुळे त्यांना चारही वर्णांत त्या वेळच्या प्रथेप्रमाणे मुक्तपणे मिसळता येणार नव्हते. त्यांना तर स्त्री-शूद्रासह सर्वांनाच ज्ञानाचा - भक्तीचा मार्ग मोकळा करून द्यावयाचा होता. ज्ञानेश्वरांचे विचारानुसार जात ही जन्मानुसारिणी नसून ती कर्मानुसारिणी आहे. म्हणूनच हटवादी ब्रह्मवृंद हे जन्माने ब्राह्मण असूनही कर्माने हीन होते व या जातिबहिष्कृतांना कोरान्न भिक्षा घालणारे ब्राह्मणेतर श्रेष्ठ होते. चोखोबा, बंका, गोरोबा, जनाई इत्यादी संत ब्रह्मर्षि होते, कारण त्यांना खरा धर्म समजला होता. माणूस समजला होता, म्हणून देव समजला होता. हा भेदाभेद वेदकालात नव्हता. वाल्या कोळ्याचे वाल्मिकी ऋषि झाले. क्षत्रिय विश्वामित्र ब्रह्मर्षि झाले. पुत्रकामेष्ठी यज्ञ करणारे ऋष्यशृंग ऋषी कोणत्या जातीचे होते? प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण क्षत्रिय असून त्यांनी अर्जुनाला गीता सांगितली. ज्ञान ही केवळ ब्राह्मणांचीच मिरास नव्हती. वेदकार व्यासांचा जन्म कसा? ज्ञानाची व धर्माची उपासना कोणीही लायक स्त्री-पुरुष करू शकतो. मे.ज. अरुणकुमार ब्राह्मण असूनही त्यांनी क्षत्रियबाणा

[१]. ह.भ.प.कै. भिंगारकर श्री. र. महासाधु श्रीज्ञानदेव चरित्र, पान.६३

स्वीकारला. चिंतामणराव देशमुख वैश्य नव्हते, त्यांनी देशाचे अर्थकारण मांडले. म्हणून कर्ण म्हणतो तसे 'दैवायत्तं कुले जन्मं मदायत्ते तु पौरुषम् ।' अद्वैत ब्रह्माची भक्ती ज्ञानदेवांनी दिली. भागवत धर्मातील गावोगावच्या कनिष्ठ व कल्पित, पशुहत्येच्या प्रसाद लागणाऱ्या क्षुद्र देव-देवतांना दूर करून सर्व समाजाला विठ्ठलाच्या पायाशी भक्तिमार्गाने आणले. व यासाठी सर्व सामान्यांसह सर्वांना दिला नामजपाचा अमोल मार्ग. सर्वांना ही खात्री दिली की देव तुमच्या - माझ्या प्रत्येकाच्या अंतरी वास करीत आहे. त्याला निष्ठेने, प्रेमाने, भक्तीने आठवा. तुम्ही याच जन्मात उद्धरून जाल. आणि त्यासाठी नियत कर्मे, संसार सोडण्याची गरज नाही. म्हणून जन्म कोणत्या कुळात झाला, कोणत्या जातीत झाला याला महत्त्व नाही. नीच कर्म करणारा प्रत्येक जण अतिशूद्र व ईश्वरोपासना व ज्याचे अंगी दया, क्षमा, शांती आहे व जे नीतीने वागतात तेच खरे उच्चवर्णीय.

गीतेच्या चौथ्या अध्यायात भगवंताने आश्वासिले आहे की -

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।

अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।। गी. ४.७

परित्राणाय साधूना विनाशाय च दुष्कृताम् ।

धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।। गी. ४.८

याचा सरळ अर्थ असा की, जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानी होते, धर्माला मरगळ येते, आणि अधर्माची वृद्धी होते किंवा तो बळावू लागतो, तेव्हा मी अवतार धारण करतो ।।७।।

तसेच, साधुसज्जनांच्या संरक्षणासाठी व दुर्जनांच्या दुष्कृतीच्या (दुष्टवृत्तीच्या) विनाशाकरिता व धर्माची पुन्हा प्रतिष्ठापना करण्यासाठी मी प्रत्येक युगात अवतार धारण करतो. ।।८।।

हे भगवंताचे आश्वासन आहे. गीतेत भगवंताचा उल्लेख कोठेही श्रीकृष्ण उवाच। असा नाही. तो नेहमीच 'भगवान उवाच।' असाच आहे. भगवंताच्या श्रीकृष्ण अवताराच्या विभूतिस्वरूपात स्वतः श्रीभगवंताने दिलेले आश्वासन आहे. भगवान म्हणतात, 'विश्वाच्या पाठीवर जेव्हा जेव्हा स्वधर्माची अधोगती होईल तेव्हा तेव्हा या स्वधर्म उद्धारासाठी मी अवतार धारण करीन. साधुसंत यांचे रक्षण करून दुष्टत्वाचे निर्दालन करीन व पुनःश्च मानवासाठी ईश्वरीधर्म म्हणजेच स्वधर्म आणि सत्धर्म प्रस्थापनेसाठी प्रत्येक युगात

अवतार धारण करीन. ज्ञानेश्वरांचेच दुसरे नाव भगवंत ही त्यांचीच विभूती.

लयाला चाललेल्या, ग्रहण लागलेल्या भागवत धर्माची पुनःस्थापना ज्ञानेश्वरांनी केली. बौद्ध, जैन, लिंगायत, महानुभाव या धर्मपंथातील अधर्ममूलक तत्त्वे काढून टाकली. त्यातील अनिष्ट विचारांचा फोलपणा दाखवून दिला. भागवत धर्माचे ते अप्रत्यक्षपणे जेष्ठ आचार्य ठरले. परंतु या साठी त्यांनी विचारांची, नैतिकतेची लढत दिली. संतआचार्यांना विनयाने नमन केले. खलांचे निर्दालन केले नाही तर त्याचे खलत्व जावो, त्यांना सत्कर्मांची आवड निर्माण होवो, असे त्या विश्वात्मक सर्वेश्वराकडे पसायदान मागितले.

ज्ञानेश्वरांचे सर्व आयुष्यच अगम्य. अनंत यातना भोगूनही कधीही त्याचा उद्रेक दिसू दिला नाही. आपल्या वाङ्मयात त्याचा साधा उल्लेखही केला नाही. बहुतांश संतांनी जे भोगले त्याचे प्रतिबिंब त्यांच्या लिखाणात उमटलेले दिसते.

भगवंताची आदर्श विभूती असूनही श्रीरामांना वचनपूर्तीसाठी देहत्याग करावा लागला व त्यापूर्वी एक आदर्श शास्ता म्हणून सीतात्याग करावा लागला. श्रीकृष्णाने सज्जनांचा कनवाळू व दुष्टांचा संहारक म्हणून धर्मरक्षणाचे कंकण हाती बांधलेले होते. त्याच्या या यशाने भाग्योदयास आलेले यादवकूळ, त्याच्याच हयातीत उन्मत्त होऊन विनाश पावलेले त्यालाच बघावे लागले, व त्याचाच एक अपरिहार्य भाग म्हणून आयुष्याच्या उत्तरार्धा अखेर प्राणत्याग करावा लागला.

ज्ञानेश्वर लहानपणापासून सर्वांना प्रेम देत राहिले. ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेव पासष्टी, हरिपाठ, अभंग यासारख्या अक्षरवाङ्मयाचा वारसा त्यांची मागे ठेविला आहे. पंढरपुरी संतांची मांदियाळी उभी केली. वयाने सर्वात लहान परंतु कर्तृत्व आभाळाएवढे हे प्रत्येक संतांनी जाणले. परमेश्वराचे अद्वैत रूप समाजातील तळागाळापर्यंत पांडुरंगाच्या रूपाने पोहोचविले. शांकरपंथीय नाथसंप्रदाय व वैष्णवपंथीय वारकरी संप्रदाय यांना एकत्र आणून शिव–विष्णु ऐक्य स्वरूप म्हणजेच पंढरीचा राणा पांडुरंग, हेही सामान्यांनासुद्धा पटविले. विश्वात शिव व विष्णू अशी वेगळाली दैवते नाहीत. तो सर्वेश्वरच एकटा या तेहतीस कोटी देवांच्या रूपाने प्रत्येकाचे अंतःकरणात आहे, हे सर्वांना पटविले व वयाच्या अवघ्या बावीसाव्या वर्षी (एकवीस वर्षे तीन महिने पाच दिवस) 'आता माझे या भूतलावरील कार्य संपले', या पूर्ण समाधानाने व पूर्णोद्गाराने आळंदीस संजीवन समाधी घेतली. ती समाधीसुद्धा अशी की भक्ताने आर्त हाक मारली तर माउली त्याला प्रतिसाद देते. त्याच्यासमोर उभी राहते. परंतु हा प्रत्यय ज्याचा त्यानेच घ्यायचा

असतो. जे मला लाभले तेच प्रत्येकास मिळेल असेही नाही. आमची माउली, आमची ज्ञानाई अशी आहे. विभूती अशा असतात. आणि असे असते त्यांचे विभूतिमत्त्व. याचा अनुभव नामदेवाने घेतला, एकनाथांनी घेतला, संत तुकारामांनी घेतला, व अनेक सामांन्यानीसुद्धा घेतला. फक्त प्रामाणिक प्रेमभाव हवा. माउली हे प्रेमावतार आहेत. ज्ञानेश्वरांच्या धर्मसंकीर्तनाची व त्यांनी विश्वात्मक देवाकडे मागितलेल्या पसायदानाची ही तात्विक पार्श्वभूमी आहे.

# ज्ञानेश्वरांचे विभूतिमत्व-
# आणि पसायदान (ब)

ज्ञानदेवांची विविध रूपे आपल्या स्पर्श, रूप, गंध इत्यादी ज्ञानेंद्रियाद्वारे समोर उभी राहतात. ज्ञानेश्वरांचे अक्षरवाङ्मय केवळ भारतातील सर्व भाषांमध्येच रूपांतरित झालेले नसून विश्वातील सर्व प्रमुख भाषांत भाषांतरित झालेले आहे. मराठी भाषिकांच्या प्रत्येक घरात, त्यातील जाणत्या प्रत्येक स्त्री-पुरुषाच्या हृदयात माउलीचे अढळ स्थान आहे. ज्ञानेश्वरी वाचताना, समाधीचे दर्शन घेताना, ज्ञानेश्वरपालखी बरोबर वारीतून पंढरपुरी जाताना, भजने गाताना, ज्ञानदेवांची विविध रूपे भक्तांच्या हृदयांत उभी राहतात. प्रत्येकाची अनुभूती स्वतंत्र असते. संत गुलाबराव महाराज स्वतःला माउलींची कन्या मानीत होते. त्यांच्या हयातीत त्यांनी माउली समाधीजवळ माउलींच्या प्रत्यक्ष दर्शनासाठी आत्मयज्ञ मांडला असे म्हणतात. असे सांगतात की माऊलींनी त्यांना, प्रत्यक्ष दर्शन दिले. महाराजांना त्यांच्या ज्ञानचक्षुद्वारे हे दिव्य दर्शन घडले. साईबाबा, अक्कलकोट स्वामी महाराज, शेगांवचे गजानन महाराज, किंवा माउलींच्या नंतर संत एकनाथ, संत तुकाराम यासारख्या विभूती महाराष्ट्रात होऊन गेल्या. विभूतींचे अस्तित्व त्यांच्या समाधीनंतरही नाहीसे होत नाही. सामान्य व्यक्तीच्या मृत्यूनंतर त्याचे अस्तित्व राहत नाही, एवढेच नव्हे तर स्मृतीही राहत नाही. ती व्यक्ती इतिहासजमा होते. परंतु विभूती कधीही इतिहासजमा होत नाहीत. त्या त्रिकाल असतात. कारण त्यांनी भूत, भविष्य, वर्तमान ही काळाची त्रिपुटी सांडलेली असते. असे जे ज्ञानेश्वरांचे विभूती स्वरूप आहे त्या विषयीचे विश्लेषण या लेखांत केले आहे. ज्ञानदेवांचे विशेषत्व हे आहे की ते विभूती म्हणून संपूर्ण निःसंग, अलिप्त (totally detached) आहेत. इतरही संत असेच अलिप्त होते. परंतु माउलींचे विशेषत्व असे आहे की इतरेजनांप्रमाणे माउली काही तात्कालिक कारणांनी निःसंग (detached) झाले नव्हते. तो त्यांचा स्थायीभाव होता. आयुष्यात केवळ एकदाच माउली या जगराहटीला, त्रासले होते, दुःखीही झाले होते, कारण अंतरी उमाळा होता, 'विश्वाचे आर्ताचा' म्हणूनच चित्कला मुक्ताईला 'चिंता क्रोध मागे सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।' अशी प्रार्थना करावी लागली. माउलींना चिंता होती की मला या जगात ईश्वरनिष्ठा दिसत नाही. त्या ईश्वरनिष्ठांची मांदियाळी निर्माण व्हावी म्हणून त्यांना चिंता होती. ती चिंता असताना भोवतीच्या सामान्य लोकांनी त्यांना साधी मानवी आकृती (धर्म, जात बहिष्कृत) समजून त्रास दिला होता. सामान्य माणसाला किमान जगण्यासाठी

जे तन, मन, धन, अन्न वस्त्र, निवारा लागते, ते त्यांना समाजाकडून मिळालेच नाही. हे आघात त्यांच्यावर त्यांच्या लहानपणीच झाले. वयाचा विचार करिता दहा-बारा वर्षांचे वय हे निश्चित मोठे वय नाही. परंतु या लहान वयातही त्यांना जे क्लेश सहन करावे लागले, त्या क्लेशातून बाहेर पडण्यासाठी त्यांना अलिप्त, निःसंग (detached) व्हावे लागले. जगाशी संपर्क ठेवला तर त्यांना दुःखच भोगावे लागणार होते. त्यांना या जगरहाटीपासून दूर रहावे व हा क्लेशदायक संग्राम 'नको' असे वाटले. आणि जो 'नको' म्हणतो तोच परमेश्वर असतो. सर्वात निरपेक्ष कर्म फक्त परमेश्वरच करतो. ज्ञानेश्वरच म्हणू शकतात की ''मी या जगात आहे आणि मला या लोकांचा कळवळा आहे. मला जे या लोकांकडून दुःख होते आहे, त्याबद्दल मला काहीही वाटत नाही. कारण मी त्यांची चिंता करतो, त्यांच्या उद्धाराची चिंता करितो, मला होऊ देत क्लेश, मला होऊ दे दुःख, कारण – 'विश्वाचे आर्त माझे मनी प्रकटले । अवघेचि जाले देहब्रह्म ।' ही माझी सभोवतालच्या जगाबद्दलची भावना आहे. त्यांच्या चिंतेने मला ग्रासले आहे. मला दुःख होते, हे दुःख विसंगतीचे आहे.'' ही विसंगती का? एखाद्या जीवाची हीन जातीत, भ्रष्ट जातीत जन्माला आला म्हणून अवहेलना का? अशा तऱ्हेची ही विसंगती जगरहाटीत आढळते. त्रास देणे हाच जगाचा स्थायीभाव (destructive force) दिसतो. जगरहाटीमध्ये सर्वजण चरितार्थी असतात. ज्ञानेश्वर चरितार्थी नव्हते. मला अन्न वस्त्र कसे मिळेल हा विचारच नव्हता. कारण ते त्याच्या पलीकडचे होते. 'सहज समाधी' अवस्था त्यांना बालपणीच, त्यांच्या संजीवन समाधीच्या कितीतरी आधीच प्राप्त झाली होती. दैनंदिन व्यवहारात वावरतांनाही ते या सहज समाधी अवस्थेत असत, आणि ही अवस्था फार महत्त्वाची होती. सहज समाधीत असल्यामुळे ते समाधीत आहेत हे आजूबाजूच्या लोकांना समजलेच नाही. त्यांचे बाह्य वागणे सामान्य माणसासारखेच होते. अमृतानुभवातील जीवनमुक्तासारखे ते वागणे होते. माणसे समाधीचा देखावा करतात, डांगोरा पिटतात, स्तोम माजवितात. आपल्या समाधीचा देखावा ज्ञानेश्वरांनी कधीच मांडला नाही, कारण अलिप्तता हा त्यांचा स्थायीभाव होता. म्हणून ज्ञानेश्वर कधी आळंदीकरांना कळलेच नाहीत. जन सामान्यांची बुद्धी तरी किती असणार? विद्वान, श्रेष्ठी त्यांच्याच घमेंडीत होते. ज्ञानेश्वर म्हणत, 'माझ्या मनी विश्वात्मक देवाचे चिंतन चालू आहे. मी त्याला बघतो आहे. खरं तर त्याचे दर्शन मला अगोदरच झालेले आहे.' ज्ञानेश्वरांचे जे भावविश्व होते ते फक्त त्यांनाच माहीत होते. त्या भावविश्वात राहून त्यांनी तत्त्वज्ञान सांगितले. तत्त्वज्ञानात जे पंथ (schools of thoughts) आहेत. त्या सर्वांचा सखोल विचार करून त्यांनी आपल्या तत्त्वज्ञान विचारांची मांडणी केली. नम्रता इतकी आहे की, 'मी

तुमच्या समोर मांडतो आहे खरे, पण मी हे माझे स्वतःचे सांगत नाही. माझ्या श्रीगुरुंचे, वेदांचे आहे व 'भाष्यकाराते वाट पुसतु' असे आहे. अन्य ज्येष्ठांनी ज्याचे अगोदरच चिंतन केलेले आहे, असे शंकराचार्य व अन्यही वेत्ते आहेत. त्यांचा संदर्भ घेऊनच मी हे सगळे सांगतो आहे.' म्हणून मी स्वतःचे सांगतो आहे ही भूमिकाच नाही. इतका ज्ञानेशांचा विनय आहे. नम्रभाव इतका आहे की, 'माझा बोलविता धनी समोर बसलेला आहे.' तो निवृत्त आहे. ज्ञानेश्वरांचे श्रीगुरु निवृत्तिनाथ हेच मुळात निवृत्ततेचे प्रतिनिधी आहेत. आणि त्यांनी ज्ञानेश्वरांना आपल्यासारखे बनविले आणि त्यांना सांगितले की, 'आता तू गीताभाष्य सांग.' म्हणून ज्ञानेश्वर वारंवार सांगतात की 'माझ्या डोक्यावर हात श्रीगुरुंचा आहे. माझे बोलविते धनी श्रीगुरु आहेत,' म्हणून 'मी त्यांचे सांगतो आहे,' ही नम्रता आणि जाणीव (realisation) ज्ञानेश्वरांच्या सर्व तत्त्वज्ञान वाङ्मयात दिसते.

तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
रहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ।। ज्ञा. १८.१७२८

आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठिया भंगीं ।
येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ।। ज्ञा. १८.१७२९

श्रीगुरुंचेनि नांवे माती । डोंगरीं जयापासी होती ।
तेणें कोळियें त्रिजगती । येकवद केली ।। ज्ञा. १८.१७३०

मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो दिठीवेनि आपुलां । बैसवी पदीं ।। ज्ञा. १८.१७३२

म्हणोनि माझे नीच नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे ।
गुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ।। ज्ञा. १८.१७३४

या कारणें मियां । गीतार्थ मऱ्हाठिया ।
केला लोकां यया । दिठीचा विषो ।। ज्ञा. १८.१७३५

ज्ञानदेवांकडे उत्तुंग काव्य प्रतिभा आहे. उपमा, उत्प्रेक्षांचा वापर करून श्रोत्यांना समजेल असेच

सांगितले आहे. उदा. 'पाण्याजवळ द्वैत आहे का? ते गाईची तहान भागविते, आणि व्याघ्राचीही तहान भागविते. गाय गरीब म्हणून तिची तहान भागविली व व्याघ्र क्रूर म्हणून त्याची तहान भागविली नाही असे होत नाही,' असे सोपे दृष्टांत दिले.

गाईची तृषा हरुं । कां व्याघ्रा विष होऊनि मारुं ।

ऐसें नेणेचि कां करुं । तोय जैसे ।। ज्ञा.१२.१४७

सोपी गोष्ट अवघड करून सांगणे सोपे आहे, परंतु अवघड गोष्ट सोपी करून सांगणे अवघड आहे. ज्ञानेशांनी जे सांगितले तो त्यांचा स्फूर्तिविलास आहे. आणि हे सगळे स्फुरण सद्गुरुंच्या आशीर्वादाचे आहे. ज्ञानेश्वर गीताभाष्य श्रोत्यांना सांगत आहेत, आणि समोर श्रीगुरु निवृत्तिनाथ बसलेले आहेत. ते काहीही बोलत नाहीत. संपूर्ण ज्ञानेश्वरीत निवृत्तिनाथांच्या फक्त सात ओव्या आहेत, आणि त्याही ज्ञानेश्वरांना 'पुढे सांग' असे सांगणाऱ्या आहेत. पसायदानातील शेवटची ओवी 'दानपसावो'ची आहे. ''येथ म्हणे श्रीविश्वेश्वरावो । हा होईल दानपसावो'' हे वरदान श्रीगुरु निवृत्तिनाथांचे आहे. निवृत्तिनाथांनी ज्ञानेशांना गीताभाष्याचा आदेश दिलेला आहे. गीताभाष्यानंतर श्रीगुरु निवृत्तिनाथांनी ज्ञानेशांना सांगितले की ''या भाष्यातून गीतेत श्रीकृष्णार्जुन काय बोलले हे तू श्रोत्यांना सांगितलेस आणि मी नाथपंथीय असूनसुद्धा तुला परवानगी दिली की, हे गीताज्ञान मराठीतून तू लोकांसाठी मुक्त कर. ही प्रथा आमच्या नाथसंप्रदायात नाही. नाथ संप्रदायात एक गुरु एक शिष्य ही परंपरा आहे, तू माझा शिष्य आहेस, परंतु तू अवतारी आहेस, श्रीकृष्णाचाच अवतार आहेस, म्हणून तुझे अविनाशी अवतारी कार्य करण्यासाठीच मी तुला परवानगी दिली आहे. या विश्वातील अगदी जनसामान्यापर्यंत तुझे हे ज्ञान झिरपू दे, असा अधिकार मी तुला दिलेला आहे. आता तू बोल. तुझी जी परावाणी आहे, किंवा देववाणी आहे त्या देववाणीतच भाष्य कर.'' प्रत्येक अध्यायाचे निरुपण झाल्यावर ज्ञानेश्वर पुन्हा व्यक्तिस्वरूपात येतात. परंतु निरुपण-भाष्य सांगताना ते विभूती स्वरूपात असतात. असे त्यांचे व्यक्तिमत्त्व आहे. विभूतिस्वरूप व्यक्तिमत्त्वाची जी वैशिष्ट्ये सांगितली आहेत ती ज्ञानेश्वरांचे जवळ पूर्णत्वाने आहेत.

[१]'विभूति' याचा अर्थ – १) पराक्रम (Might), प्रचंड, अफाट, सामर्थ्य (Power), प्रभाव, अधिकार, मोठेपणा (Greatness), दिव्यत्त्व २) समृद्धी (Prosperity), संपन्नता कल्याण (welfare) ३) श्रेष्ठावस्था (Dignity), महानता श्रेष्ठस्थान (Exalted rank), उच्चश्रेणी ४) श्रीमंती (Riches), सुबत्ता (Plenty) समृद्धी (magnificence)

1. Apte V. S., Sanskrit- English Dictionary, page 513

भव्यता, भव्यदर्शन (splendour) अभिजात सौंदर्य ५) सुबत्ता (wealth), श्रीमंती (Riches) संपन्नता वैभव ६) ईश्वरी अष्टधा प्रकृती सह, पुरुषोत्तम, युगपुरुष, भगवंत (Superhuman power which consists of eight faculties).

वरील सर्व गुणविशेष केवळ सर्वेश्वराचेच द्योतक आहेत आणि अशा गुणांनी परिपूर्ण ज्ञानेश्वरांचे विभूतिमत्त्व आहे. म्हणून ज्ञानेश्वर व्यक्तिस्वरूप अत्यंत अल्पकाळ, परंतु ते शक्तिस्वरूप विभूती आहेत. ही शक्ती त्यांना त्यांच्या श्रीगुरुंपासून मिळाली आहे. निवृत्तिनाथांनी ज्ञानेश्वरांना आपल्यासारखेच केले आहे. निवृत्ती या नावातच जी अलिप्तता (detachment) आहे, ती ज्ञानेशांजवळ अगदी पूर्णपणे समाधीला बसेपर्यंत आहे (totally detached). संजीवन समाधीच्या पूर्वी ज्ञानेश्वर म्हणाले असतील की, ''माझे अवतार कार्य श्रीगुरुंच्या आशीर्वादाने संपलेले आहे. मला आता या देहाची जरुरी नाही, आता ही देहधारणा व उपाधी नको, आता संजीवन समाधी हीच माझी पूर्णावस्था. मी श्रीगुरुंच्या कृपेने कृतकृत्य झालेलो आहे. आता या मायेत पुन्हा येणे नाही. हे मायेचे नाट्य आता संपलेले आहे. लहानपणीचा समाज रोष भोगल्यानंतर, आता मला समाजाची व संतांची मान्यता मिळाली आहे. जसे मला समाजाने दिलेल्या दुःखाचा राग नव्हता, तसेच मान्यतेचेही सुख नाही, मोह तर नाहीच.'' क्षुद्र प्रापंचिक वस्तूंसाठी, मानसन्मानासाठी माउलींचा अवतारच नाही. सर्वांच्या प्रेमाचा वर्षाव होत असला तरीही पुढील आयुष्य नको, ही खरी संजीवन समाधीची भूमिका आहे. माझ्या श्रीगुरुंनी नाथपंथाच्या परंपरेच्या बाहेर जाऊन जनसामान्यांसाठी सांगितलेले कार्य पूर्ण झालेले आहे. (यदा यदा हि धर्मस्थ ग्लानिर्भवति भारत । हे पुनरुत्थानाचे माझे कार्य पूर्ण झालेले आहे.) ईश्वरी कार्य हे भावाच्या पलीकडील कार्य आहे. झाडाला पाणी घातले, अगर झाडाचे पान तोडले तरी झाड सुख-दुःख दाखवीत नाही. तसे अंगीकृत कार्य संपल्यावर या देहाची काय गरज आहे? म्हणून देहत्यागाची इच्छा व निर्णय ज्ञानेश्वरांनी घेतला. हा निर्णय घेणारा संपूर्ण निवृत्तावस्थेत गेलेला असतो. जो संपूर्ण शक्तिमान आहे, त्यालाच काही नको असते. विभूती स्वरूपात कशाचीच गरज नसते कारण ते स्वतःच पूर्ण शक्तिस्वरूप आहेत. विभूतिस्वरूपाचे सर्व गुणविशेष हेच त्यांचे वैभव आहे. ज्यांनी तो विश्वात्मक देव पाहिला आहे त्यांचे आता काय बघायचे राहिले आहे? तो विश्वात्मक देव पाहिला, तो विश्वात्मक देव काय आहे, त्या विश्वात्मकाचे वैभव काय आहे, त्या विश्वात्मकाला कुठे आणि कसे पाहायचे याची दृष्टी ज्ञानेश्वरांनी समाजाला दिली. ईश्वर प्रत्येकाच्या अंतर्यामी आहे हा विश्वास स्त्रीशूद्रासहित सर्व वर्गांना, सर्व प्रकारच्या प्रकृती धारण करणाऱ्यांना

दिला. विभूती म्हणजे कल्याण स्वरूप (welfare) आहे. विभूतिस्वरूपात क्लेश जरी झाले, आणि शाप देण्याचे सामर्थ्य जरी असले तरी ते शाप देत नाहीत. कारण जो संपूर्ण सामर्थ्यवान (powerful) आहे त्याला राग येतच नाही. कारण त्याचा राग ईश्वरही सहन करू शकणार नाही. याची अनेक उदाहरणे श्रीकृष्ण जीवनात आहेत. अनेकविध त्रास, अपमान, अवहेलना, मातृ–पितृ मृत्यूचे दुःख होऊनही ज्ञानेश्वरादी भावंडांनी ते पचविले. या चारही भावंडांच्या वागण्यातून, लिखाणातून, त्याचा उल्लेख एका शब्दानेही नाही. माउली या विभूतीजवळ राग नव्हताच, अहंकाराचा स्पर्शही नाही. गुरुचरणी शरण गेल्यावर कोणत्याही गोष्टीचे, कार्याचे श्रेय स्वतःकडे न घेता, 'हे तर सर्व माझ्या श्रीगुरुंचे आहे, व त्यांनी मला बोलते केले म्हणून मी बोललो,' असे सांगून कर्तव्य फलाचाही त्याग केला आहे. जे जे उत्तम ते ते माझ्या श्रीगुरुंचे, उणे असेल ते माझे आहे. ज्ञानेश्वर अठराव्या अध्यायात सांगतात –

[१]एवं गुरुक्रमे लाधले । समाधिधन जें आपुलें ।
ते ग्रंथें बांधौनि दधिलें । गोसावी मज ।। ज्ञा. १८.१७६३
वाचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणें स्वामीची ।
ऐसिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ।। ज्ञा. १८.१७६४
परि साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें ।
प्रबंध व्याजें जगातें । रक्षिलें जाणा ।। ज्ञा. १८.१७६५
सायिखेड्याचें बाहुलें । चालविता सूत्राचेनि चाले ।
तैसा मातें दावीत बोले । स्वामी तो माझा ।। ज्ञा. १८.१७६८
यालागीं मी गुणदोष – । विषिं क्षमाविना विषेश ।
जे मी संजात ग्रंथलो देख । आचार्यें कीं ।। ज्ञा. १८.१७६९

अर्थात माउली म्हणतात की 'गुरुकृपा असल्यावर कणसरपणा राहीलच कसा ! मी त्यांचा निरोप्या आहे. त्यांच्याकडून मिळालेली विश्वचेतना मी तुमच्यापर्यंत पोहोचवीत आहे, आणि हे सर्व सर्वभूतांच्या कल्याणासाठी आहे. यातून मला काहीही नको आहे' हे विभूतीचे वैशिष्ट्य आहे. 'मला काहीही नको – जो

---
[१]. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी

जे वांछील तो ते लाहो ।गुरुदेवा, विश्वदेवा, मी जे मागणे करतो आहे ते विश्वकल्याणासाठीच आहे.' माउली स्वतः किती कल्याणस्वरूप आहेत, ते स्वतः किती रिक्त, अलिप्त व साक्षी आहेत हेही या उद्गारातून जाणवते. वास्तवतः 'ज्ञानदेव म्हणे तेथे काय उणे' ! सगळे सौंदर्य (magnificence) ज्ञानेश्वरीत एकवटलेले आहे. ज्ञानदेवांच्या स्वरूपाची मनाशी नुसती कल्पना केली तरी ते अनुपम्य आहे. केवळ सत्यं-शिवं-सुंदरम् ! याचे ज्ञानदेव हे अंतिम स्वरूप आहे, अंतिम अवीट सौंदर्य. जगातीत जे ईश्वरी सौंदर्य आहे, ते म्हणजे ज्ञानदेव आहेत. धन्यता, सुंदरता व कनवाळूपणा (magnificent, tender and splendour) म्हणजे ज्ञानदेव – ते म्हणजे एक दिव्य विभूती आहेत. सर्व गुणांचे अंतिम परिमाण, म्हणजे ज्ञानदेव. म्हणून याच सौंदर्याची, गुणांची ते पसायदानात मागणी त्या विश्वेश्वराकडे करतात. पसायदानापूर्वी ज्ञानेश्वरी या ग्रंथाचा समाप्तीसोहळा श्रीगुरु व जाणते श्रोते यांच्यावरील विश्वासानेच पूर्ण होऊन ज्ञानदेव सुखी झाले हे सांगताना, ज्ञानेश्वर म्हणाले, ''ही ग्रंथाची सृष्टी विश्वामित्राने त्रिशंकूकरिता निर्माण केलेल्या सृष्टीसारखी नाशवंत नाही. किंवा उपमन्युकरिता शंकराने निर्माण केलेल्या सागरासारखीही नाही. कारण सागराच्या पोटात विष आहे. सूर्य अंध:काराचा नाश करतो, परंतु तोही तापदायक आहे. चंद्र चांदणे देतो, परंतु त्यावरही डागांचे लांछन आहे. म्हणून ही तीनही उपमाने तुम्हा संतांना योग्य नाहीत. तुमचे उपकार हे निरुपम आहेत.'' ही माउलींची मागणी त्यांच्या विशुद्ध सौंदर्य दृष्टीची परिसीमा आहे. मनाची अमाप श्रीमंती (riches), मानवीकक्षेबाहेरील गुण (super human qualities) हा विभूतिमत्त्वाचाच प्रभाव आहे. ज्ञानेशांच्या मनाची अथांगता किती? तर विहित कार्यानंतर पूर्ण समाधानाने संजीवन समाधी मागितली. अलिप्तता इतकी की शांतपणे लाडक्या भावंडांना, अंतरीचा सखा असलेल्या नामदेवाला; एवढेच नव्हे तर सर्वस्व असलेल्या श्रीगुरूंचाही शांतपणे, पूर्ण समाधानाने अलिप्ततेने निरोप घेतला. म्हणूनच ते मूर्तिमंत भगवंत आहेत (He is absolute God). मायेचा (Relativity), खेळ त्यांच्याजवळ नाही. मायेला आयुष्यात स्थानच दिले नाही. ते निरपेक्षपणे निरोप घेतात, हे त्यांचे विभूतिमत्त्व आहे. 'आता जीवनातील लोकेषणा नको. माझ्याजवळ जे होते ते सर्व मी तुम्हाला देऊन टाकले आहे. मी पूर्ण समाधानाने समाधिस्थ होतो.' हे विभूतिस्वरूप ज्ञानेश्वर म्हणतात. सामान्य माणसाचा मृत्यू त्याच्या हातात नसतो, परंतु विभूती मृत्युंजय असते. म्हणून ज्ञानदेवांच्या शारीरिक देहाची निवृत्ती ही त्यांची समाधी आहे. म्हणून अशा तऱ्हेच्या संजीवन समाधी घेणाऱ्या विभूतीचा हा परमोत्कर्ष आहे. संजीवनी समाधी ही ज्ञानेश्वरांच्या अस्तित्त्वाची सांगता आहे. भक्ताने पूर्ण भावाने आवाहन केले तर ते पंचमहाभूतातून पुन्हा

देहाकार धारण करून भक्तासाठी धाव घेतात. कारण ही संजीवन समाधी चिरंतनाची आहे, ही जीवन संगती आहे. अशा विभूती काळालाही पुरून उरतात, कारण त्यांना अंतच नाही. त्या निर्गुण, निरामय असतात. विरागी, नि:संग, 'अलिप्त झालो, निवृत्त झालो' (detached) असे सांगतांना त्यांनी कार्य टाकून विरक्ती घेतली असे नाही. हा निष्काम कर्मयोग आहे. ते खरेखुरे तत्त्वज्ञानी संत व मार्गदर्शक आहेत. (He is a real saint of Principles. He is a Principal) हेच त्यांचे विभूती स्वरूप आहे. ईश्वरी अष्टधा प्रकृतीतून अवतरलेला मानवावतार (Superhuman power consisting of eight faculties). माउलींचा जन्म गोकुळअष्टमीचा व मध्यरात्री. हे विश्व म्हणजे गोमातेचे कूळ. त्या गोकुळात अष्टधा प्रकृतीला सहाय्याला घेऊन अंध:कारातून धर्मसंभ्रमित सामान्यांना पुन्हा भागवत धर्माचा उदयसूर्य दाखविण्यासाठी हा विभूति अवतार आहे. म्हणून भगवंतानेच, श्रीकृष्णानेच या कलियुगी पुन्हा देह धारण केलेला आहे. अष्टधा प्रकृतीतून अवतार म्हणजे आपल्या ज्ञानेंदियांना जाणीव करून देणारे कार्य. समाधीला मिठी मारून डोके टेकल्यावर माउलीवर नि:सीम प्रेम करणाऱ्याला जे आंतरीक समाधान मिळते तो अनुभव वर्णनातीत आहे. सर्वांनाच तो अनुभव येईल असे ही नाही. जे अव्यक्त आहे ते या सर्वातून व्यक्त होते. आणि याला काळाची मर्यादा नाही. जोपर्यंत हे विश्व आहे तो पर्यंत ज्ञानेश्वरांची, माउलीची प्रतीती आहे. हा समाधी भेटीचा आनंद अद्वितीय आहे. ज्ञानेश्वरांचे विभूतिस्वरूप जाणल्यावर लक्षात येते की त्यांच्यासारखे तेच, दुसरा ज्ञानेश्वर होणे नाही. ज्ञानेश्वरांचा जो संशोधनात्मक वेध घेतलेला आहे, त्या संशोधनाला स्थळकाळाचा संदर्भ असतो. परंतु विभूती म्हणून जे आहे त्याला भूत-भविष्य-वर्तमान असे असतच नाही. तो महाकाल स्वरूपामधे आहे. केवळ स्थळकाळाचाच संदर्भ घेऊन जे संशोधन करतात त्यांना ज्ञानेश्वरांचे व्यक्तिस्वरूप कदाचित कळेल परंतु विभूतिस्वरूप कळणार नाही. विभूतीपाशी जे स्फुरण असते, ते अंगीभूत असते, आणि ते विचारांच्या ताब्यात नसते. विठ्ठलपंतामुळे ज्ञानदेव व निवृत्ती यांचे समाज, परिसर, माणसांची नाती, भूभाग इत्यादींचे अनुभव, चिंतनविश्व लहान वयातच तीर्थयात्रेतून समृद्ध झाले. याचा प्रत्यक्ष प्रत्यय आपल्याला ज्ञानेश्वरीत प्रत्येक ओवीत जाणवतो. लहान वयातच ते गीतेच्या सहाव्या अध्यायातील चाळीस ते पंचेचाळीस श्लोकातील योगभ्रष्टापेक्षाही विभूती म्हणून सर्वज्ञ झाले. याचा प्रत्यय जगाला शुद्धिपत्रासाठीच्या पैठण भेटीच्या वेळी समजला. बहुआयामी धर्मग्रंथांची जाण, तत्त्वज्ञान, विविध धर्म व पंथाच्या आचार्यांचे व संस्कृतींचे परिणाम या उभय बंधुंनी लहान वयात केवळ पूर्णत्वाने आत्मसात केले, एवढेच नसून त्याचा त्यांनी प्रत्ययही दाखविला. तत्त्वज्ञान, वेदोपनिषदे,

अन्यधर्मीय विचारसरणी त्यांना विठ्ठलपंतांकडून शिकता आले.

सुयोग्य संस्कारांनी घरोघरी ज्ञानेश्वर जन्माला येतील, असे डॉ. सरदेसाई म्हणतात. ज्ञानेश्वर ही आता व्यक्ती नाही. ज्ञानेश्वर नावाचा एक एक बीज (germ) आहे. तेरावे शतकाचे आधी व नंतरही अनेक क्षेत्रात असे ज्ञानेश्वर निर्माण झाले. ज्ञानेश्वरांना विभूती म्हणून ज्या ईश्वरी देणग्या मिळाल्या त्या त्यांनी आपल्या पुढील आयुष्यात सिद्ध केल्या. अष्टधा प्रकृतितून ईश्वरी अवतार (God gifted born with eight highest faculties). भूतलावर अवतरलेला ज्ञानेश्वर हा एक ईश्वरी अवतार आहे. ज्ञानेश्वर स्थितप्रज्ञ आहेत. ते एक पुरुषोत्तम व युगपुरुष आहेत. म्हणूनच ते ज्ञानेश्वरीत पूर्ण जाणिवेने म्हणतात –

[१] हे शब्देविण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।

बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ।। ज्ञा.१.५८ पण हे कसे तर –

कां आपुला ठांवो न सांडिता । आलिंगिजे चंद्रु पगटतां ।

हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ।। ज्ञा.१.६०

'इतक्या सुलभ व तुम्हा जाणत्या संतांना व इतरांनाही सहज समजेल अशा भाषेत मी तुम्हाला गीतेतील मर्म सांगेन' असे ज्ञानेश्वरांनी प्रतिज्ञेने सांगितले आहे. ज्ञानेश्वर सांगतात की 'मी सांगतो ते जाणायला भाषेची गरजच नाही. जो आनंद उपभोगायचा त्याला ज्ञानेंद्रियांचीही गरज नाही.' ज्ञानेश्वर आपले गुरुप्राप्य समाधिधन उलगडून सांगतात. ज्या प्राण्याला भाषाच नाही अशा प्राण्याकडून ज्ञानदेवांनी वेद म्हणविले. ती भाषा कोणती? ज्या भाषेत अचल भिंतीतील चेतना जागृत केली, ती भाषा कोणती? ही भाषा आहे जीवा-शिवाची, स्थितप्रज्ञाची. गीतेत अर्जुन भगवंताला विचारतो –

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।

स्थितधी: किं प्रभाषेत किमसीत व्रजेत किम् ।। गीता २.५४

[२] अर्जुन म्हणतो – 'हे केशवा समाधिसुख अखंड भोगणारा असा जो स्थितप्रज्ञ तो कोणत्या लक्षणांनी ओळखावा? तो स्थितप्रज्ञ काय बोलतो, कसा राहतो व कसा चालतो?' भगवान म्हणाले, 'जेव्हा मनामध्ये असलेल्या सर्व इच्छा जो सर्वथा टाकून देतो व स्वतः स्वरूपाच्या ठिकाणी संतुष्ट होतो, तेव्हा त्या पुरुषास

---

१. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी अ. १

२. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी अ.२.५४, पान ५९-६५

स्थितप्रज्ञ म्हणतात. (गीता २.५५) तसेच जो पुरुष सर्व इच्छांचा त्याग करून निरिच्छ, ममत्वरहित व अहंकाररहित होऊन संचार करतो तोच शांतीला प्राप्त होतो' (गीता २.७१). असामान्यता हीच अत्यंत क्रियाशील किंवा निर्मितीक्षम असते. (Abnormality is most creative) ज्ञानेशांची सहज – समाधि – अवस्था ही अव्यक्ताची कायम स्थिती होती. त्यासाठी लागणारी परिपूर्ण अलिप्तता, नि:संगता (total detachment) ज्ञानेशांजवळ उपजतच होती. समाधि: या शब्दाचा [१]श्री. आपटे यांच्या संस्कृत शब्दकोषात दिलेला अर्थ मोठा मार्मिक आहे.

1) Collecting, Composing, Concentrating (as mind)

2) Profound or Abstract meditation, Concentration of mind on one object, perfect absorption of thoughts into one object of meditation i.e. the supreme spirit आत्मेश्वराणां न हि जातु विघ्ना: समाधिमेवप्रभवो भवंति ।

3) Penance, Religious obligation, Devotion इत्यादी. हे सगळे अर्थ पाहिल्यावर लक्षात येते की इथे विचारांना थाराच नाही. विसाव्या शतकातील ज्येष्ठसंत शंकरमहाराज शिष्यांना म्हणत असत की, 'विचार ही स्थिती समाधी अनुभवायला योग्यच नाही. कारण 'विचार' याच्या अवस्था तीन – विचार, अतिविचार व अविचार. म्हणून विचार ही प्रक्रियाच टाळा.' कारण समाधी हीच स्थितप्रज्ञाची भाषा. ज्ञानेश्वरांसारखे 'शब्देविण संवादिजे' अशी ओवी लिहिणे, त्यांच्या खेरीज अन्य कोणालाही जमलेलेच नाही. अशी 'सहज समाधी' अवस्था त्यांची लहानपणापासूनचीच आहे. ही त्यांची स्थिती अचल आहे. देह धारण करताना व देह त्यागताना हीच समाधी स्थिती होती. (Concentration on one object) हा One object किंवा ही एक ध्येय वस्तु कोणती? सर्वात्मक, सर्वेश्वर, विश्वात्मक देव हीच त्यांची ध्येयवस्तु (object of concentation) होती. ही वस्तु त्यांनी पूर्ण आत्मभावाने (With full concentration) बघितली. (Perfect absorption of thoughts into one object of meditation i.e.the supreme spirit.) व्यवहारात पहा–तान्ह्या मुलाला आईच पाहिजे असते ही जी आईची ओढ असते ना, ती बाळाच्या भावविश्वातील असते. मातृत्वाच्या प्रेमाची बरोबरी ईश्वरालाही करता येत नाही. या प्रेमाची बरोबरी फक्त भक्त आणि त्याचा भगवंत यांच्यातील नात्याशी

---

[१]. Apte V. S., Sanskrit- English Dictionary, page 587

करता येईल. ती अव्यक्ताची ओढ असते. समाधी स्थिती ओळखणे अवघड आहे. ज्ञानेश्वर स्थितप्रज्ञ आहेत, पुरुषोत्तम आहेत, 'सत्यं शिवं सुंदरम्' म्हणजे ज्ञानेश्वर. नामदेवादी संतांच्या व्यक्तिनिष्ठ उद्गारावरून (subjective remarks) आपल्याला ज्ञानेश्वर विभूती आहेत हे समजू शकते. आपण ज्ञानेश्वरांना स्थितप्रज्ञ म्हणतो, पुरुषोत्तम म्हणतो, माउली म्हणतो अगर संत म्हणतो, ही सर्व लक्षणे त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत पूर्णपणे आहेत. त्यासाठी ह.भ.प.ल.रा. पांगारकर यांनी संत तुकाराम चरित्रात दिलेले स्वामी विवेकानंदाचे विचार महत्वाचे आहेत.

[१]स्वामी विवेकानंदाचा अनुभव पुढे दिलेला आहे. अर्वाचीन युगातले विख्यात सत्पुरूष स्वामी रामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद हेही श्रीगुरूला शरण जाऊनच कृतार्थ झाले आहेत. स्वामी विवेकानंद आपल्या भक्तियोगावरील प्रबंधात म्हणतात, ''गुरूच्या कृपेने मनुष्याच्या उच्च व गूढ शक्तींचा विकास होतो. त्यांना चैतन्य येऊन त्यांच्या आध्यात्मिकतेची वाढ होते व अखेर नराचा नारायण होतो. हे आत्मविकासाचे कार्य ग्रंथ वाचून होत नाही. एका जीवात्म्याला दुसऱ्या जीवात्म्याकडूनच हे साहाय्य मिळाले पाहिजे. तुम्ही हजारो ग्रंथ जन्मभर उलथेपालथे करीत बसा, त्याने फारतर तुमची बुद्धी वाढेल, पण आपले अध्यात्मबळ मुळीच वाढले नाही असेच तुम्हाला शेवटी आढळून येईल. बुद्धीच्या वाढीबरोबर अध्यात्मशक्तींचाही विकास झाला पाहिजे असे कोणी म्हणेल तर ते खरे नाही. ग्रंथ वाचनाने मनुष्यात असा भ्रम उत्पन्न होतो खरा; पण बारकाईने पाहिल्यास बुद्धी खूप वाढली तरी अध्यात्मशक्तीची वाढ झाली नाही असेच त्याला समजून येईल.''

''एका जीवावर अध्यात्माचे खरे संस्कार घडविण्यास दुसरा तसाच जीव कोटीतून पुढे गेलेला महात्मा पाहिजे. ते सामर्थ्य ग्रंथात नाही. अध्यात्माचे संस्कार ज्यावर घडतात तो शिष्य व ते घडविणारा तो गुरू. भूमी भाजलेली, नांगरलेली तयार पाहिजे, आणि बीज निर्मळ जिवट पाहिजे; उभय संयोगातच अध्यात्माचा विकास होतो. अध्यात्माची तीव्र क्षुधा लागताच म्हणजे जमीन तयार होता क्षणीच त्यात ज्ञानबीजाची पेरणी होते असा सृष्टीचा कायदा आहे. आत्मप्रकाश ग्रहण करण्याची पात्रता सिद्ध होताच प्रकाशाचा पुरवठा करणारी शक्ती प्रगट होते... सत्य ज्ञानानंद अशा सद्गुरूला जग देवाप्रमाणे पूज्य मानते. शिष्य शुद्धचित्त, जिज्ञासू व कायक्लेशी असावा लागतो, तसा तो तयार होताच त्याला श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, निष्पाप, दयाळू व

---

[१]. ह.भ.प. पांगारकर ल. रा. संत तुकाराम चरित्र, स्वामी विवेकानंद विचार, पान १४६-१४७

प्रबोधनचतुर असे समर्थ सद्गुरू भेटतात.... सद्गुरू डोळ्यात ज्ञानांजन घालून शिष्याला डोळस करितात. असे सद्गुरू भाग्याने भेटतील तेव्हा अत्यंत नम्रतेने, विमल भावाने, दृढविश्वासाने त्यांना शरण जावे, आपले सर्व हृदय निष्कपटपणाने त्यास अर्पावे, त्याच्याविषयी चित्तात परमावधीचे प्रेम ठेवावे, त्यास साक्षात् परमेश्वर भावाने म्हणजे भक्तिज्ञानाचा समुद्र आपलाच आपणास सापडून कृतार्थता वाटेल.''

''महात्मे हे ईश्वरअवतारच होत. ते केवळ स्पर्शाने, एका कृपाकटाक्षाने किंवा नुसत्या इच्छेनेही शिष्यास कृतार्थ करितात. पापाचे पर्वत असलेल्या भ्रष्ट जीवासही ते दयेने क्षणार्धात पुण्यात्मा बनवितात, ते गुरूंचे गुरू होत. मनुष्यरूपाने प्रगट झालेले हे साक्षात नारायण होत. मनुष्याला यांच्याच रूपाने परमात्मा दिसतो. देव निर्गुण निराकार आहे, पण आपण जोवर मानव आहोत तोवर मानवरूपानेच आपण त्याला भजले पाहिजे. तुम्ही वाटेल ते म्हणा, हवा तितका प्रयत्न करा, तुम्हाला मनुष्यरूपी (सगुण) परमेश्वराचेच भजन केले पाहिजे. निर्गुण निराकारपणाच्या कोणीही वल्गना करो, सगुणाला झिडकारून बोलो, अवताराची निंदा करो, सूर्यचंद्रतारांगणाकडे बोट दाखवून बुद्धिवादाने तेथेच देव पाहण्यास सांगो – त्याला परमात्म्याचे काय ज्ञान आहे हे तुम्ही पाहायला जाल तर ते 'शून्य' आहे असेच तुम्हाला आढळून येईल! आपण माणसे आहोत, परमात्मा सगुणरूपाने – सद्गुरूंच्या रूपानेच आपणास भेटतो यात संदेह नाही.''

स्वामी आणखी म्हणतात की ''भगवत् भेटीची आकांक्षा बाळगणाऱ्या मुमुक्षूचे डोळे उघडणारे श्रीगुरूच होत. गुरू व शिष्य यांचे नाते पूर्वज व त्यांचे वंशज यांच्या नात्यासारखे आहे. श्रद्धा, नम्रता, शरणागती, व आदरभाव या गुणांनी शिष्य गुरूंचे मन मोहील तरच त्याची आध्यात्मिक उन्नती होईल. आणि लक्षात ठेवण्याची ही गोष्ट आहे की गुरूशिष्यांचे असे अत्यंत प्रेमाचे नाते ज्या ज्या ठिकाणी असते तेथे तेथेच प्रचंड आध्यात्मशक्तीचे महात्मे उत्पन्न झालेले आढळतात. ज्ञानाची परमसीमा अशी जी स्वानुभूती ती ग्रंथापासून मिळत नसते, वा धुंडूनही सापडत नाही. स्वानुभवाचे खरे धर्मरहस्य वरील गुण अंगी आणून श्रीगुरूचा प्रसाद जोडल्याशिवाय तुम्हाला कालत्रयी उमजणार नाही! म्हणून भगवंताच्या अनुग्रहाने श्रीगुरूभेटीचा भाग्योदय येईल तेव्हा श्रीगुरूंना सर्वभावाने शरण जा. हेच माझे परब्रह्म अशी त्यावर दृढ निष्ठा ठेवा, त्याचे लेकरू होऊन त्याची अनन्य सेवा करा म्हणजे धन्य व्हाल. अशा परम प्रेमादराने जे श्रीगुरूला शरण गेले आहेत त्यांना–आणि त्यांनाच केवळ–सच्चिदानंद प्रभूने होऊन आपल्या परम भक्तीचे आणि अध्यात्माचे अलौकिक चमत्कार दाखविले आहेत !'' स्वामी विवेकानंदांनी स्वत:च्या अनुभूतीतून सद्गुरूवाचून कृतार्थता

नाही हा वेदशास्त्रसंतांचा सिद्धांत आपल्या अनुभवातून मांडला आहे.

अनादिकाळापासून सर्व ज्येष्ठ श्रीगुरूंनी आपल्या शिष्यांना हाच उपदेश केलेला आहे की सद्गुरू कृपेशिवाय शिष्याच्या भक्तीला पूर्णत्व नाही. साक्षात्कारी अवस्थेत मीच सर्वत्र भरून राहिलो आहे या पूर्णत्वाच्या जाणीवेतूनच ही पसायदानाची प्रार्थना प्रगटली. हा ज्ञानेश्वरांच्या विभूतिमत्त्वाचा साक्षात्कार आहे. केवळ बुद्धिमान मनुष्य अशी प्रार्थना करू शकत नाही. 'मी माझ्यासाठीच माझ्याकडूनच मागून घेतो. जो विश्वात्मक देव आहे तो मीच, मागणाराही मीच, आणि ज्यांच्यासाठी मागून घ्यायचे तोही मीच आहे,' अशी ही सर्वोच्च अवस्था आहे. [१]लो. टिळकांनीही 'गीतारहस्यात' सांगितले की हाच सर्वोच्च टप्पा आहे. म्हणजेच प्रकांड बुद्धिमत्ता हा शेवटचा टप्पा नाही. त्याला गुरूस्पर्शाची जरूर आहे. विवेकानंदांनीही हेच सांगितले. श्रीगुरूंशी एकरूप झालेली ज्ञानेशांची भावावस्था ज्ञानेश्वरी लिहिताना ज्ञानेश्वरांची झालेली स्पष्ट दिसते. ज्ञानेश्वरी सांगतांना ते वारंवार म्हणतात की 'माझा बोलविता धनी माझे श्रीगुरू आहेत. ते सांगतात म्हणून मी बोलतो.' अन्यथा ज्ञानेश्वरी, त्यातील पसायदानासारखे शब्द येणारच नाहीत. विवेकानंदांचे निवेदनातून ज्ञानदेवांसारखी विभूती कशी उभी राहते याचे यथार्थ दर्शन मिळते. निवृत्ती व ज्ञानदेवांच्या सर्व गुणांचे प्रकटीकरण (Manifestation) या निवेदनातून मिळते. ज्या निवृत्तिनाथांच्या प्रत्येक श्वासाचे ज्ञानदेवांना मोल आहे, त्या निवृत्तिनाथांच्या नावातच निवृत्ती आहे. ज्ञानेश्वर या नावाने ज्या विभूतीचे वर्णन आपण पूर्ण नि:संग (Totally Detached) म्हणून करतो त्यांचे सद्गुरू निवृत्तिस्वरूपच आहेत. जगरहाटीप्रमाणे पाहता या चार भावंडांना समाजाकडून काय मिळाले? साधे जगण्याकरिता जे किमान तेही मिळाले नाही. ते मिळविण्याचा प्रयत्न केला तर अपमान, छळ इतक्या टोकाचा झाला की मुक्ताईला ज्ञानेशांची समजूत घालावी लागली की–

[२]'योगी पावन मनाचा । अपराध साहे जनांचा ।।
चिंताक्रोध मागे सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।' मु.ता.अ.

पराकोटीचे दु:ख, छळ झाल्यानंतरही या भावंडांनी त्याचा साधा उच्चारही केला नाही. त्यांनी ही त्यांच्या मनाची निर्लेपता व साम्यावस्था आहे. तुलनाच करायची झाली तर उद्वेकाने तुकोबा म्हणतात – ''माझा देव मेला''. नामदेव म्हणतात –

---

१. लो. टिळक बा. गं.; श्रीमत् भगवद्गीता रहस्य – विषय प्रवेश, पान १६–१७
२. पू. साखरे किसनमहाराज; सार्थ ताटीचे अभंग

[१]पतित पावन नाम ऐकूनि आलो तुझिया द्वारी ।

पतित पावन ना होसी म्हणूनी जातो माघारी ।।

मला काहीही नको आहे, ज्ञानेश्वरी सांगणे हे ही कर्तृत्व श्रीगुरु व श्रोते यांचेच आहे हे ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायाचे शेवटी मांडले आहे. ज्ञानेशांच्या तोडीचा विचार कोणाही संताने केलेला नाही. श्रीगुरुकृपेनंतर श्रीगुरुशिष्याला सांगतात कीं –

शास्त्राभ्यास नको । व्रते मख (यज्ञ) नको । तीर्थासी जाऊ नको ।

ज्याचीया स्मरणे पतीत तरती । तो शंभु सोडु नको ।।

'शंभु म्हणजे शिव म्हणजे चैतन्य, म्हणजेच पसायदानातील विश्वात्मक देव. सगुण देह जरी असला तरी विश्वाचे मूळ तत्त्व मान्य केल्यावर, कोणत्याही शास्त्रांचा अभ्यास नको. व्रते नको कारण स्वत:वर कोणतीही बंधने नकोत. कारण जीव जन्मत:च तू मुक्तात्मा आहे. यज्ञही नको कारण ती तर हत्या. हा यज्ञ म्हणजे जर त्याग असेल (Sacrifice) (पण संन्यास नसेल), ज्ञान असेल, ज्ञानयज्ञ असेल तर तो सर्वश्रेष्ठ आहे. तीर्थासी जाऊ नको, कारण जो चराचरात भरून राहिला आहे त्याला पहायला तीर्थयात्रेची जरूर नाही. भगवंताचे तू फक्त स्मरण कर.' शिष्य असे नसतात म्हणूनच [२]साईबाबा म्हणत – 'याद रख'. याद रख म्हणजे तू फक्त माझे स्मरण कर. तुझ्यावर माझा अंकुश आहे.

काय स्वत:स समजतोस । बुद्धिपणाचा तोरा मिरवतोस ।

जन्मभर जरी शिकलास । काय मिळविलेस शेवटी श्री साई म्हणे ।। ८० ।।

तू तो शंभू सोडू नको. तेच चैतन्य आहे, तोच एक विश्वात्मक देव आहे. लौकिक मायेत अडकू नकोस. माया भय निर्माण करते. मुक्तात्म्याला भयच नाही. म्हणून –

भोगे रोग भयम् । कुले च्युतिभयम् । वित्ते नृपालात् भयम् ।

माने दैन्य भयम् । बले रिपुभयम् । रुपेज्जरायात् भयम् ।

---

१. श्रीनामदेवांची गाथा; गीता प्रेस, गोरखपूर

२. डॉ. दीक्षित माधवराव; 'श्री साँई म्हणे' (एकाध्यायी साईवचनांची पारायण पोथी) ओवी ८०, पान १४

शास्त्रे वाद भयम् । गुणे खलभयम् । काये कृतांतात् भयम् ।

सर्वे वस्तु भयान्वितम् भुविनृणां वैराग्यमेवाभयम् ।। भर्तुहरि

विवेक व वैराग्य देह स्थितीत प्राप्त झाल्यावर ज्ञानदेवांना जाणवले की देहरुपात संसार करताना भय माझ्यामागे लागणारच आहे. म्हणून जीव देहभावावर जर असेल तर त्रास होणारच, देहभाव नसेल तर त्रास होणार नाही. वरील श्लोकांचे महत्त्व जाणले तर ज्ञानेश्वरांचे विभूतिस्वरूप आणि विवेकानंदांचा अनुभव समजू शकेल. देहभाव त्याच्या पंचेद्रियासह, ज्ञानेंद्रियासह महत्त्वाचा आहे. आता या देहभावाबद्दल संत तुकारामांचा अनुभव महत्त्वाचा आहे. रामेश्वरभट्टांनी तुकोबांना अभंगाच्या वह्या इंद्रायणीत बुडवायला सांगितल्या होत्या. तुकोबांना याचे अत्यंत दुःख झाले. इंद्रायणीत या अभंगवह्या बुडविल्या गेल्या म्हणून, तुकारामांनी पांडुरंगाला साकडे घातले. तेरा दिवस उपोषण केले. चौदाव्या दिवशी वह्या तरल्या. तेरा दिवस म्हणजे दहा अधिक तीन, त्रयोदशी, देहदशा निर्माण करणारे पांच ज्ञानेंद्रिय, पांच कर्मेद्रिय व मन बुद्धी आणि अहंकार असे दहा अधिक तीन. हेच त्रयोदश गुण देहांवर सर्व मर्यादा घालतात. विठ्ठलाच्या अखंड आर्त नामस्मरणाने तुकारामांचा देहभाव गेला, मग अभंग तरले. हा तुकोबांच्या भक्तिचा अर्थ. म्हणूनच माउलींची समाधी त्रयोदशीला. त्याच प्रमाणे 'श्रीराम जय राम जय जय राम' हा जीवन उद्धाराचा मंत्रही त्रयोदशाक्षरी आहे. तसाच मंत्र आहे, 'ॐ गं गणपतयेनम: ।' माउलींनी हा मंत्र आणखी सोपा केला – 'जय जय राम कृष्ण हरी'. हे पुण्यात्मेच जगाला भवपाशातून सोडवितात.[१] संत तुकारामांना ज्ञानदेवांबद्दल अपार श्रद्धा व भक्तीभाव आहे. ती त्यांनी त्यांच्या अभंगातच व्यक्त केली आहे.–

ज्ञानियांचा राजा गुरू महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें ।।

मज पामरा हे काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ।।

ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळगणें । इतर तुळणे काय पुढे ।।

तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली । म्हणोनी ठेविली पायीं डोई ।। तु. गा. ३३९८

तुकोबा माउलींना 'महाराव' म्हणतात आणि स्वत:ला म्हणतात – 'पायींची वहाण पायी बरी'. ज्ञानदेवांचे विभूतिमत्त्व जाणूनच तुकाराम महाराजांनी व एकनाथ महाराजांनी त्यांचे पायी मस्तक ठेविले,

---

[१] सकल संतवाणी, खंड-२, तु.गा. ३३९८

त्यांचे गुरूपण स्वीकारले. इतकी नम्रता या दोन महान संतांची आहे. ती नम्रता म्हणजे ज्ञानदेवांनी जी नम्रता आपल्या श्रीगुरूंचे विषयी धरली तीच नम्रता तुकाराम, एकनाथ यांनी ज्ञानेशांचे पायी धरली. आणि या अवस्थेत सगळेच संत पांडुरंगमय झाले.

[१]दासबोध अभ्यासून जीवनात जे परिवर्तन होईल त्याबद्दल संत रामदास म्हणतात – 'अज्ञान, दु:ख व भ्रांती नाश पावून लगेच वैराग्य अंगी बाणेल. त्याला विवेकाची जोड मिळेल. बद्ध मुमुक्षु होतील. मूर्ख दक्ष होतील. अभक्त भक्त बनून मोक्ष पावतील. नाना दोष जाऊन पतित पावन होतील. देह बुद्धीचे धोके जातील. संसाराचे उद्वेग नष्ट होतील. अधोगती चुकेल आणि मनाला खरी विश्रांती मिळून अत्यंत समाधान लाभेल.''

संत श्री समर्थ रामदास स्वामींचा 'अखेरचा संदेश' होता की –

माझी काया आणि वाणी। गेली म्हणाल अंत:करणी।

परि मी आहे जगज्जीवनी। निरंतर ।।१ ।।

आत्माराम दासबोध । माझे स्वरूप स्वत:सिद्ध ।

असता न करावा खेद । भक्तजनी ।।२ ।।

नका करु खटपट । पहा माझा ग्रंथ नीट ।

तेणे सायुज्याची वाट । गवसेल की ।।३ ।।

ज्ञानेश्वरांचे विभूतिमत्त्व व पसायदानाची अलौकिकता जाणून घेत असताना ज्ञानेश्वरीतील काही उद्बोधक ओव्या डोळ्यासमोर असणे महत्त्वाचे वाटते.

[२]पावसाचे वै. पू. स्वामी स्वरुपानंद यांनी साधकभक्तांना ज्ञानेश्वरीचे महत्त्व समजावे म्हणून संपूर्ण ज्ञानेश्वरीतील सुमारे एकशे नऊ ओव्यांचा 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' तयार केला. त्यातील महत्त्वाच्या ओव्या पुढील प्रमाणे आहेत.

ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या ।

जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ।। ज्ञा.अ.१.१

---

१. कै. डॉ. बेलसरे के. वि. 'सार्थ श्रीमत् दासबोध'

२. पू. स्वामी स्वरुपानंद, श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी, पूर्वार्ध

मज हृदयीं सद्गुरू । जेणें तारिलों हा संसारपूरु ।

म्हणौनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ।। ज्ञा.अ.३.२२

उपजे म्हणऊनि महाभारतीं जे नाहीं । ते नोहेचि लोकीं तिहीं ।

येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ठ जगत्रय ।। ज्ञा.अ.१.४७

हे शब्देविण संवादिजे । इंद्रिया नेणतां भोगिजे ।

बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ।। ज्ञा.अ.१.५८

अहो अर्जुनाचिये पांती । जे परिसणया योग्य होती ।

तिहीं कृपा करुनि संतीं । अवधान द्यावे ।। ज्ञा.अ.१.६२

तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरुप तुझें ।

तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्व ।। ज्ञा.अ.१.७१

उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे ।

हें घटिकायंत्र तैसें । परिभ्रमे गा ।। ज्ञा.अ.२.१५९

आपणयां उचिता । स्वधर्मे रहाटतां ।

जें पावें तें निवांता । साहोनि जावें ।। ज्ञा.अ.२.२२८

देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरूषीं अर्पिजे ।

तरी परिपूर्ण सहजें । जाहलें जाणें ।। ज्ञा.अ.२.२७१

म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । तें अखंड यज्ञयाजन ।

जो करी तया बंधन । काहीं चि न घडे ।। ज्ञा.अ.३.८३

तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।

पूजा केली होय अपारा । तोषालागीं ।। ज्ञा.अ.१८.९१७

देख पां जनकादिक । कर्मजात अशेख ।

न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ।। ज्ञा.अ.३.१५२

एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती ।

तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ।। ज्ञा.अ.३.१५८

दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे ।

देहीं कर्मजात तैसें । योगयुक्ता ।। ज्ञा.अ.२.४९

अर्जुना समत्व चित्ताचें । तें चि सार जाण योगाचें ।

जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ।। ज्ञा.अ.२.२७३

तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दु:ख कैचे कें आहे ।

तेथे आपैसी बुद्धि राहे । परमात्मरुपीं ।। ज्ञा.अ.२.३४०

ज्ञानाग्निचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्में अशेखें ।

तो परब्रह्मचि मनुष्यदेखें । वोळख तूं ।। ज्ञा.अ.४.१०५

एसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकारु जाईल ।

जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ।। ज्ञा.अ.४.१७१

ते ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे ।

मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ।। ज्ञा.अ.५.४९

माझा मराठाची बोलु कौतुकें । परि अमृतातेंही पैजासीं जिंके ।

ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ।। ज्ञा.अ.६.१४

ऐसें हळुवारपण जरी येईल । तरीच हे उपेगा जाईल ।

एरव्हीं आघवी गोठी होईल । मुक्याबहिऱ्याची ।। ज्ञा.अ.६.२६

तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय आपुनोहे ।

म्हणऊनि ते अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ।। ज्ञा.अ.६.३५

तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरुपाचें रुप दावीन ।

अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ।। ज्ञा.अ.६.३६

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।

अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।। गीता ४.७

जे धर्मजात आघवे । युगायुगीं म्यां रक्षावें ।

ऐसा ओघु हा स्वभावें । आद्य असे ।। ज्ञा.अ.४.४९

म्हणोनि अजत्व परतें ठेवीं । मी अव्यक्तपणही नाठवीं ।

जे वेळीं धर्मातें अभिमवी । अधर्मु हा ।। ज्ञा.अ.४.५०

परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम् ।

धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।। गीता ४.८

ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें ।

मग अज्ञानाचें अंधारें । गिळूनि घालीं ।। ज्ञा.अ.४.५१

तैं पापाचा अचळु फिटे । पुण्याची पहाट फुटे ।

जैं मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ।। ज्ञा.अ.४.५६

ऐसी निजपुण्याचिया जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवडी ।

तिये जन्मे तो सुरवाडी । योगच्युतु ।। ज्ञा.अ.६.४४८

मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पहांट फुटे ।

सूर्यापुढां प्रगटे । प्रकाशु जैसा ।। ज्ञा.अ.६.४५२

तैसी देशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां ।

बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ।। ज्ञा.अ.६.४५३

तैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुतां पाउलीं निघे ।

तर्कु आयणी नेघे । आंगी जयांचा ।। ज्ञा.अ.७.५

अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंचु हें विज्ञान ।

तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ।। ज्ञा.अ.७.६

अहो चंद्रकांतु द्रवता कीर होये । परि हातवटी चंद्रीं कीं आहे ।

म्हणऊनि वक्ता तो वक्ताचि नोहे । श्रोतेनविण ।। ज्ञा.अ.९.२९

मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । हृदयीं स्वयंभचि असे ।

प्रत्यक्ष फावो लागे तैसें । आपैसयाचि ।। ज्ञा.अ.९.४९

तरि तुवां पुसलिया विभुति । तयांचें अपारपण सुभद्रापती ।

ज्या माझियाचि परि माझिये मती । आकळती ना ।। ज्ञा.अ.१०.२०९

जी जाणितलें मियां साचें । महिमान आतां देवाचे ।

देवो होय चराचरांचे । जन्म स्थान ।। ज्ञा.अ.११.५६१

हरिहरादि समस्तां । देवा तूच परम देवता ।

वेदांतेही पढविता । आदिगुरू तूं ।। ज्ञा.अ.११.५६२

देह तंव पांचांचें जालें । हें कर्माचे गुणीं गुंथलें ।

भवंतसे चाकीं सुदलें । जन्ममृत्यूच्यां ।। ज्ञा.अ.१३.१०३

सकळु ना निष्कळु । अक्रियु ना क्रियाशीळु ।

कृष ना स्थूळू । निर्गुणपणें ।। ज्ञा.अ.१३.१०८

हें विश्वचि माझें घर । ऐसी मति जयाची स्थिर ।

किंबहुना चराचर । आपण जाहला ।। ज्ञा.अ.१२.२१३

मग याहीवरी पार्था । माझिया भजनीं आस्था ।

तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ।। ज्ञा.अ.१२.२१४

परि तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा ।

जेथ नामघोषु बरवा । करिती माझा ।। ज्ञा.अ.९.२०८

माझिया कीर्तीविण । जयांचे रिते नाहीं श्रवण ।

जयां सर्वांगीं भूषण । माझी सेवा ।। ज्ञा.अ.९.४४६

जैसें तंव चि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ ।

मग होऊन ठाकती केवळ । गंगारुप ।। ज्ञा.अ.९.४५८

तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।

जाती तंव चि वेगळालिया । जंव न पवती मातें ।। ज्ञा.अ.९.४६०

यापरी पापयोनीहि अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।

माते भजतां सदना । माझिया येती ।। ज्ञा.अ.९.४७४

तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं ।

सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ।। ज्ञा.अ.९.५१७

तैसे भोगाआंतुनि निगतां । चित्त मजमार्जी रिगतां ।

हळूहळू पंडुसुता । मीचि होईल ।। ज्ञा.अ.१२.१०९

ऐसें नेणों काय आपैसे । तयातेंचि कीजे अभ्यासें ।

समाधि घर पुसे । मानसाचे ।। ज्ञा.अ.६.४६१

पाहें पां ॐ तत्सत् ऐसें । हें बोलणें तेथ नेतसे ।

जेथूनि कां हें प्रकाशे । दृश्यजात ।। ज्ञा.अ.१७.४०१

आतां विश्वात्मकु हा माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा ।

तो अवधारु वाक्यपूजा । ज्ञानदेव म्हणे ।। ज्ञा.अ.१५.५९८

हें गीतानाम विख्यात । सर्व वाङ्मयाचें मथित ।

आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ।। ज्ञा.अ.१८.१३२३

परीवत्साचेनि वोससें । दुभतें होय घरोद्देशें ।

जालें पांडवांचेनि मिषें । जगदुद्धरण ।। ज्ञा.अ.१८.१४६७

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।

तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ।। ज्ञा.अ.१८.१७९३

जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रति वाढो ।

भूतां परस्परें पडो । मैत्र जिवांचें ।। ज्ञा.अ.१८.१७९४

येथ म्हणे श्रीविश्वशरावो । हा होईल दानपसावो ।

येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ।। ज्ञा.अ.१८.१८०१

भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोंवियाफूलें मोकळीं ।

अर्पिलीं अंध्रियुगुलीं । विश्वरुपाचां ।। ज्ञा.अ.११.७०८

हे आहे वै. प.पू. स्वामी स्वरुपानंदांनी मांडलेले भगवंताचे व ज्ञानदेवांचे मनोगत, जे त्यांनी ज्ञानेश्वरीच्या अठरा अध्यायांतून ओव्यांच्या द्वारे त्यांची अमोल ठेव म्हणून भक्तांच्या हाती दिलेले आहे.

## भगवद्गीतेतील विभूतियोग

[१]भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायात अर्जुनाच्या प्रेमळ आग्रहाने भगवंताने आपल्या असंख्य विभूती पैंकी काही म्हणजे सुमारे पंच्याहत्तर विभूती त्याला सांगितल्या आहेत. पण त्याला हेही आवर्जुन लक्षात ठेवायला सांगितले की विश्वातील प्रत्येक गोष्टीचे, प्राणिमात्रांचे बीज मीच आहे. आणि हे संपूर्ण विश्व मीच व्यापून राहिलो आहे. कृपया तू याला कोणताही भेदाभेद लावू नकोस. विश्वात अवतरलेल्या सर्व विभूती भगवंताच्या म्हणजे माझ्याच आहेत. हे स्पष्ट करताना दाशरथी श्रीराम व यादववंशी श्रीकृष्ण व खुद्द पांडवपुत्र अर्जुन याही भगवंताच्याच विभूती असल्याचे, दोनशे एक्कावन, दोनशे ब्याण्णव–त्र्याणव ओव्यातून ज्ञानेश्वरीत सांगितले आहे. हा ज्ञानेश्वरीतील विभूतियोगाचा अर्जुन व भगवान श्रीकृष्ण यांचा संवाद अत्यंत हृद्य व विभूति – महात्म्याचा आहे.

येथ विभूति प्रतिविभूति । प्रस्तुत अर्जुना सांगिजेती ।

ते विदग्धा रसवृत्ती । म्हणिपैल कथा ।। ज्ञा.अ.१०.४१

एथ वेद मुके जाहाले । मन पवन पांगुळले ।

रातीविण मावळले । रविराशी ।। ज्ञा.अ.१०.६४

---

[१]. वै. दांडेकर शं. वा. सार्थ ज्ञानेश्वरी, अ. १०वा.

उदरींचा गर्भु जैसा । नेणे मायेची वयसा ।
देवांसि मी तैसा । चोजवेना ।। ज्ञा.अ.१०.६५
मी कवण केतुला । कवणाचा कै जाहला ।
निरुती या करितां बोला । युगे गेली ।। ज्ञा.अ.१०.६७
तैसा राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें ।
अजत्व माझें देखे । आपुलिये डोळां ।। ज्ञा.अ.१०.७४
मी आदीसि परु । सकळलोकमहेश्वरु ।
ऐसिया माते जो नरु । यापरी जाणे ।। ज्ञा.अ.१०.७५
तेंचि माते कैसे जाणिजे । ऐसे कल्पी जरी चित्त तुझें ।
तरी मी ऐसा हे माझे । भाव ऐके ।। ज्ञा.अ.१०.८१
आतां भय आणि निर्भयता । अहिंसा आणि समता ।
हे मम रुपचि पांडुसुता । ओळख तूं ।। ज्ञा.अ.१०.८७
यापरी माझा भावीं । हे जीवसृष्टि आहे आघवि ।
गुंतली असे जाणावीं । पांडुकुमरा ।। ज्ञा.अ.१०.९०
यालागीं सुभद्रापती । हे भाव इया माझिया विभूति ।
आणि यांचिया व्याप्ती । व्यापिले विश्व ।। ज्ञा.अ.१०.१०४
तरी मीचि एक सर्वा । या जगा जन्म पांडवा ।
आणि मजचिपासून आघवा । निर्वाहो यांचा ।। ज्ञा.अ.१०.११२
जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
ह भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।। ज्ञा.अ.१०.११८
लळेयाचिया बाळका किरीटी । गवसणी करुनि स्नेहाचिया दिठी ।
जैसी खेळतां पाठोपाठी । माउली धावे ।। ज्ञा.अ.१०.१३४

तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयाचा करूनि ठेवी ।

तैसी उपास्तीची पदवी । पोषित मी जायें ।। ज्ञा.अ.१०.१३५

म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो ।

एक मी वाचूनि वावो । येर मानिलें जिही ।। ज्ञा.अ.१०.१४१

जी जन्मलेपण आपुलें । हे आजि मियां डोळां देखिलें ।

जीवित हाता चढलें । मज आवडतसें ।। ज्ञा.अ.१०.१४६

तैसीं व्यासादिकांचीं बोलणीं । तिया मजपाशीं चिद्रत्नांचिया खाणी ।

परि उपेक्षिल्या जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ।। ज्ञा.अ.१०.१६२

तरि साचचि हे कैवल्यपती । मज त्रिशुद्धी आली प्रतीती ।

जे तूं देवदानवाचिये मती- । जोगा नव्हसी ।। ज्ञा.अ.१०.१७४

तैसें गुरु जी सर्वत्र आथी । परि कृष्णा आम्हां तूंचि गती ।

हें असो मजप्रती । विभूति सांगे ।। ज्ञा.अ.१०.१८४

तरि तुवां पुसलिया विभूति । तयांचे अपारपण सुभद्रापती ।

ज्या माझियाचि परि माझिये मती । आकळती ना ।। ज्ञा.अ.१०.२०९

अंगीचिया रोम किती । जयाचिया तयासी न गणवती ।

तैसिया माझिया विभूति । असंख्य मज ।। ज्ञा.अ.१०.२१०

ऐसें बहुवस आणि व्यापकपण । माझे विभूतियोगे जाण ।

तरी जीवचि करुनि श्रवण । आइकोनि आइक ।। ज्ञा.अ.१०.२१९

तयां वहिलियां गतिमंता । आंतु पवनु तो मी पंडुसुता ।

शस्त्रधरां समस्तां । मार्जी श्रीराम तो मी ।। ज्ञा.अ.१०.२५१

एऱ्हवीं वेगळालिया विभूति । कायि एक परिससी किती ।

म्हणोनि एकिहेळां महामती । सर्व मी जाण ।। ज्ञा.अ.१०.२६३

हें काय कितीएक सांगावें । तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें ।

तरि यादवांमाजी जाणावें । हेंचि स्वरुप माझें ।। ज्ञा.अ.१०.२९२

आणि सोमवंशीं तुम्हां पांडवा । माजी अर्जुन तो मी जाणावा ।

म्हणोनि एकमेकांचिया प्रेमभावा । बिघडु न पडे ।। ज्ञा.अ.१०.२९३

आम्ही तुज भेदाचिया वाहाणी । सांगितली जे विभूतिंची कहाणी ।

ते अभेदें काय अंत:करणी । मानिली कीं न मने ।। ज्ञा.अ.१०.३२५

हेंचि पहावयालागीं । नावेक बोलिलो बाहेरिसवडिया भंगी ।

तव विभूति तुज चांगी । आलिया बोधा ।। ज्ञा.अ.१०.३२६

## समारोप

तरी अवधान एक वेळें दीजे । मग सर्वसुखासी पात्र होइजे । हे प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका ।। ज्ञा.९.१ असे आश्वासन ज्ञानदेवांनी नववे अध्यायाच्या पहिल्याच ओवीत दिले आहे. तसेच नवव्या अध्याची प्रशंसा करिताना ज्ञानदेव म्हणतात –

आतां अठरा पर्वीं भारतीं । ते लाभे कृष्णार्जुन वाचोक्तीं ।

आणि जोडे अभिप्रावो सातेंशतीं । तो एकलाची नवमी ।। ज्ञा. १०.३१

ही सर्व प्रस्तावना अठरावे अध्यायातील 'पसायदाना'ची आहे. अर्जुनाच्या आग्रहामुळेच भगवंतांनी त्यांच्या अनंत विभूतिस्वरूपापैकी विशेष व सामान्य अशा सुमारे पंचाहत्तर विभूति अवतार अर्जुनास सांगितले. या विभूति सांगताना भगवंतांनी श्रीराम, श्रीकृष्ण व स्वयं अर्जुन याही त्यांच्याच विभूति असल्याचे स्पष्ट केले आहे.

भगवंताच्या ज्या विभूति महाभारतानंतर विश्वविख्यात झाल्या त्यात श्रीज्ञानेश्वर, त्यांचे श्रीगुरू श्रीनिवृत्तिनाथ, श्रीसोपानदेव व चितकला मुक्ताई या अग्रगण्य विभूति आहेत. श्रीकृष्ण अवतारातील कार्यच पुढे नेण्यासाठी या विभूति महाराष्ट्राच्या देवभूमीत अवतीर्ण झाल्या. आपले ईश्वरीय कार्य संपताच त्या मूळ स्वरुपी एकरूप झाल्या.

भगवद्गीतेचे निश्चित कार्यकारण आहे. ते मायबोलीतून सर्व संत-सामान्यांना सांगून सर्वांसाठी पसायदान मागितले. हे ज्ञानेश्वर या विभूतिचे विश्वकार्य आहे. हे विश्वकार्य त्यांनी वयाच्या केवळ एकवीस वर्षांत केले.

[१]आपली विविध विभूति रूपे अर्जुनाला सांगण्यापूर्वी या 'विभूतियोग अध्यायात' भगवंत अर्जुनाला सांगतात, "जो मी तुझ्यापुढे उभा आहे, तेवढाच मी मर्यादित नसून सर्व विश्वाच्या आकाराने मीच आहे. प्रत्यक्ष सर्वज्ञ वेद, मोठमोठे ऋषि, देव यांनाही माझ्या यथार्थ स्वरूपाचा निर्णय करता आला नाही. मात्र इंद्रियाद्वघारा बाहेर धावणारी वृत्ति अंतर्मुख करून तिन्ही देहांचा विचाराने निरास करून जो पंचमहाभूतांच्या डोक्यावर चढतो, त्याला माझे अनादि व लोकमहेश्वरस्वरूप अनुभवाला येते व तो सर्व संकल्पनातून मुक्त होतो. सर्व प्राणीमात्रांच्या ठिकाणी असणारी बुद्धी, ज्ञान, विकास माझाच विस्तार आहे. माझ्यापासून व्यासादि सप्तर्षि, चार मनुलोक, लोकपाळ उत्पन्न झाले. ब्रह्मदेवापासून मुंगी पर्यंत सर्व विश्वात मीच व्यापून राहिलो आहे. मी, माझ्या विभूति व त्यांनी व्याप्त सर्व विश्व हे एकच आहे, असा ऐक्याचा अनुभव येणे हा अभेद भक्तियोग आहे. असे भक्त 'जे जे भेटेभूत । ते ते मानिजे भगवंत ।' असे समजून त्रैलोक्यात भक्तिप्रेमाने संचार करीत असतात. स्वर्ग, मोक्ष इत्यादी सुखाकडे या भक्तांनी केव्हाच पाठ फिरवली असते. व माझे प्रेमसुख प्राप्त करून घेतलेले असते. हे सुख आपण स्वतः मिळविले असताही भगवंताने ते आम्हाला दिले असे जगाला सांगतात. माझ्या जवळचे जे खरे सुख आहे ते मी या प्रेमळांच्या करीता राखून ठेवतो." अशा भक्तांच्या मांदियाळीसाठीच विभूति ज्ञानदेवाने विश्वेश्वराकडे पसायदान मागितले. ज्ञानदेवांनी स्वधर्मासाठी निष्कामकर्माचे स्वतः आचरण केले आणि निष्काम कर्म करणाऱ्यांचा लोकसंग्रह जमा केला. हेच त्यांचे श्रेष्ठ विभूतिमत्व आहे. ज्ञानदेव भविष्यातील पिढ्यांसाठी दीपस्तंभ झाले.

---

१. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी अ. १०, पान २८४-८५

# ज्ञानेश्वरांचे विभूतिमत्व–
# आणि पसायदान (क)

श्रीज्ञानेश्वरांचे विभूतिस्वरूप पाहत असताना, विभूति स्वरुप ज्ञानेश्वर आणि पसायदान यांचा अन्योन्य भावनिक व आत्मिक संबंध असल्याचे सहज जाणवते. विश्वात्मक देवाकडे ज्ञानेश्वरांनी पसायदान का मागितले तर ते स्वत: विभूतिस्वरूप आहेत व त्यांचे श्रीगुरु स्वत:च विश्वात्मक विभूती आहेत. माउली म्हणतात –

आतां विश्वात्मकु हा माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा ।

तो अवधारू वाक्यपूजा । ज्ञानदेवो म्हणे ।। ज्ञा.१५.५९८

भगवद्गीतेत विभूतियोगात भगवंताने आपल्या अनेक विभूतींपैकी सुमारे पंचाहत्तर विभूती सांगितल्या आहेत. याचाच अर्थ असा की जो एकमेवाद्वितीय – एकोऽहं हा बहुरुप बहुस्याम् झाला. हा एक विश्वात्मक देव विभूतिस्वरूप झाला. आणि ती विभूती म्हणजे ज्ञानेश्वर. मानवी देह धारण केला म्हणून त्यांना त्या विश्वात्मक देवापासून वेगळेपणा दाखवावा लागला. मूळ जे अद्वैत आहे ते द्वैत ज्ञानसंवादासाठी स्वीकारलेले आहे. नाही तर सामान्यांना ज्ञान सांगणार कोण? ज्ञान संवाद दोघातच होऊ शकतो. म्हणून विश्वात्मक देवाने आपल्याच एका विभूतिरुपाला ज्ञानेश्वररूप दिले, आपल्यापासून वेगळे काढले. नाहीतर पसायदान कोण कोणाकडे मागणार? याचा अर्थ असा होतो की विभूतिस्वरुप ज्ञानेश्वर म्हणजेच विभूतिस्वरुप परमेश्वर. व तो त्या सर्वात्मक देवाकडे मागतो आहे. परमेश्वरच परमेश्वराकडे मागतो आहे. विश्वात्मक देवाचीच विभूती ज्ञानेश्वर असल्याने ते विश्वात्मक देवा इतकेच विरागी (detached) किंवा अलिप्त आहेत. विभूतीत्व म्हणजेच अलिप्तता (detached) आणि ते असे विरक्त असल्याने पसायदान मागताना ते व्यक्ती ज्ञानेश्वर म्हणून शिल्लकच नाहीत. म्हणूनच विरक्त ज्ञानेश्वर मागतात, – 'जो जे वांछील तो ते लाहो.' पसायदानातील सर्व विधाने (मागणे) पूर्णपणे पारदर्शक आहेत (they are absolutely colouress) आणि कोणत्याही सापेक्षतेपासून मुक्त आहेत. (free from any kind of relativity) कोणाचाही कशाचाही व्यक्तीगत उल्लेख नाही. प्रसाद कोणाला मिळावा, कोठे मिळावा याला व्यक्ती व स्थळ काळाचा संदर्भ नाही, 'जो जे वांछील तो ते लाहो', यातील हा 'जो' आहे, त्यामधे सगळे आले. सर्वांनाच प्रसादाचे दान प्राप्त होणार आहे, हा होकार आहे. 'जे' म्हणजे

ज्या सगळ्यांनी इच्छा केली ते त्या सर्वांना मिळावे. म्हणूनच अशा पसायदानाची निर्मिती जे ज्ञानेश्वर विभूतिस्वरूप आहेत तेच करू शकतात. ज्ञानेश्वरांच्या विभूतिमत्त्वाचे प्रतिबिंब त्यांच्या पसायदानात आहे. आणि हेच पसायदानाचे महत्त्व आहे. गीतेवरच्या निरुपणात व्यक्तींचा संदर्भ होता. श्रीकृष्णाने अर्जुनाला काय सांगितले? अर्जुनाने श्रीकृष्णाला काय विचारले? कशासाठी विचारले, कुठे विचारले, केव्हा विचारले? घटना काय घडल्या? म्हणजे भगवद्गीता हा घटना स्थळ, काळ, व्यक्ती या संदर्भातील संवाद आहे. ज्ञानेशांनी या संवादांचा अर्थ स्पष्ट केला. लोककार्य केले. धर्मसंकीर्तन पूर्ण केले. परंतु येथे ज्ञानेश्वरांचा देहरुप संदर्भ शिल्लक होता. माउली हे विठ्ठल–रखुमाईचे पुत्र, निवृत्तिनाथांचे शिष्य, सोपान–मुक्ताई यांचा मोठा भाऊ. त्याचप्रमाणे या संदर्भात त्यांच्या कुटुंबांचेही संदर्भ आहेत व येतात. परंतु 'पसायदानाला' स्थल, काल, व्यक्ती यांचे संदर्भ नाहीत. कोणी कोठे काय मागावे असा उल्लेखच नाही. कशासाठी मागावे हाही उल्लेख नाही. 'जो जे वांछील तो ते लाहो'. म्हणजेच जो कोणी जे काही इच्छा करील ते त्याला मिळो. इतके पसायदान पारदर्शक, स्फटिकासारखे स्वच्छ (Colourless) आहे. कारण चराचरातच 'तो' आहे असे म्हटल्यानंतर 'त्याने' त्या चराचरासाठीच मागून घेतले आहे. त्याला कालाचा कोणताही संदर्भ नाही. सर्वांना सर्व लाभो, आणि सर्व सुखरूप असोत. सर्वेत्र सुखिन: सन्तु । गीताभाष्याचे हे सर्व निरुपण झाल्यावर निवृत्तिनाथांनी असे का म्हणावे की – 'हे सर्व झाले खरे आता तुझ्या अनुभूतिचे तूं साग.' याचा अर्थ हाच की विभूतिस्वरुप ज्ञानेश्वरांना काय अनुभूती आली? त्यांची अनुभूती हीच कीं सगळा मीच आहे. मी जर विभूतिस्वरूप आहे, तर मी फक्त ज्ञानेश्वर या देहासाठी कशाला मागून घेऊ? सर्वेश्वराच्या अनेक विभुतिस्वरुपापैकीच मी एक आहे. जो या कालापुरता ज्ञानेश्वर म्हणून वेगळा काढलेलो आहे. मी चैतन्यरुपच आहे. पण सोईसाठी, विश्वव्यवहारासाठी मला ज्ञानेश्वर हे देहरुप प्राप्त झालेले आहे. विभूतिस्वरूप परमेश्वर बहुरूप झाला आहे, तरीसुद्धा तो या सर्व विभूतिस्वरूपांपासून दशांगुळे निराळा व शिल्लक उरलेला साक्षी आहे. (एकोऽहं बहुस्याम). तसे ज्ञानेश्वर दशांगुळे वेगळेच आहेत. पसायदान मागताना ज्ञानेश्वर देहरूपाने शिल्लकच नाहीत, आहे ते त्यांचे विभूतिस्वरूप. 'जो जे वांछील तो ते लाहो' ही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची अंतरिक्ष अनुभूती आहे. म्हणून निवृत्तिनाथांनी ज्ञानेश्वरांना सांगितले की जे कृष्णार्जुन संवादाचे भाष्य आहे ते तू केलेस, पण तुझे स्वत:चे असे काय?' त्यावेळी ज्ञानदेवांनी आपले विभूतिस्वरूप दाखविले. ते स्वरूप इतके स्वच्छ, पारदर्शक (Colourless) आहे की त्या पसायदानातील एक एक शब्द बोलका आहे. 'आता' इथे ज्ञानेश्वर वर्तमानात आहेत. त्या विश्वात्मक

देवाने त्या माझ्या श्रीगुरुंनी सांगितलेला जो वाग्यज्ञ मी त्यांच्यासाठी केलेला आहे त्याने त्यांचा संतोष व्हावा. तो 'एकमेव' जो आहे त्याला संतोष व्हावा. आणि 'जो जे वांछील' – म्हणजे या विश्वातील प्रत्येकाने जे जे इच्छिले असेल ते ते त्याला मिळावे. विभूती म्हणजे विशेष होणे. 'मी ज्ञानेश्वर परमेश्वराचे स्वरूप आहे म्हणजेच जो निर्गुण निराकार आहे त्याचे एक विशेष प्रकटीकरण म्हणून 'मी' आहे.' ज्ञानेश्वर विश्वात्मक देवांचे विशेष प्रकटीकरण आहे. ते अवतार आहेत. म्हणून मृत्यूलोकांमधें ज्या ज्या विभूती आणि जे जे अस्तित्वात आहे, जे जे काही 'झाले' आहे (that has come into existance) तेच पुन्हा अस्तित्व धारण करून आले आहे. यालाच 'असणे' म्हणजे (Being) म्हणतात. अस्तित्वात जे जे काही आलेले आहे, मग ते साधी किडा–मुंगी का असेना, ज्यात त्याने प्राण घातलेला आहे व त्यामुळे जे जे काही अस्तित्वात आलेले आहे त्या अस्तित्वासाठी ज्ञानेश्वरांना मागून घ्यायचे आहे. आणि मी म्हणजेच विश्वात्मक देव ते देणार आहे. जसे बाप आपल्या मुलांना सर्व काही देतो. म्हणजे मी मलाच देतो आहे. असे म्हणल्यावर त्यामध्ये काहीही अपूर्णत्व नको. सूर्य हवा, पण त्याचा ताप नको. तो ज्ञानप्रकाश देवो, त्याचे तेज आम्हाला मिळू दे, पण त्याचा तापणारा त्रास नको. म्हणून 'मार्तंड जे तापहीन'. चंद्र शीतल आहे पण त्याच्यावर डागांचे लांछन आहे. असा लांछन असलेला चंद्र आम्हाला नको म्हणून 'चंद्रमें जें अलांछन'. आम्हाला सर्वांची मनोरथे पूर्ण व्हायला हवी आहेत. मनी जे जे कल्पिले ते ते देणारे कल्पवृक्ष आहेत, चिंतामणी आहे. त्या तरूंच्या चैतन्याचे स्पंदन – कल्पतरूंचे आरव म्हणजे मूळ चैतन्याचा तो ध्वनीच आहे. सर्व विश्वामधे या कल्पतरूंची सळसळ आहे, त्या सळसळीतच सर्व निर्मिती आहे. अमुक व्यक्तीसाठी, 'जो जे वांछील तो ते लाहो'. यामधे आत्म्याचे स्वातंत्र्य (Freedom of soul) मान्य केलेले आहे. आता मागणाराने विचार करायचा की त्याला काय हवे. आता विश्वेश्वराने हे पसायदान दिल्याने, मागणाऱ्याने लक्षात ठेवायचे की त्याची प्रत्येक इच्छा पूर्ण होईल. आता इच्छा काय करायची ते त्याने ठरवावे. तो परमात्मा त्या इच्छा पूर्ण करील. याशिवाय खळांचा, दुष्टांचा दुष्टपणा जावो व त्यांना सत्कर्माची गोडी लागो. सर्व प्राणिमात्रांना एकमेकांबद्दल प्रेमभाव, मैत्रीभाव वाढो. त्याचप्रमाणे पापाचा अंधार दूर होवो आणि संपूर्ण विश्व स्वधर्मरूपी सूर्यप्रकाशाने प्रकाशित होवो. आत्मज्ञानाच्या प्रकाशाची पहाट होवो. या भूमीवर ईश्वरनिष्ठांची मांदियाळी सर्वांना भेटो, याही सृजनात्मक गोष्टी ज्ञानदेवांनी त्या सर्वेश्वराकडे विश्वाकरिता मागितल्या आहेत. त्यांनी सर्व मागितले आहे, अगदी प्रत्येकासाठी. अशी प्रार्थना आजपर्यंत जन्माला आलेली नाही. या प्रार्थनेत तत्त्वज्ञानांच्या सर्व शाखांचा

(Schools of thoughts) समन्वय आहे. द्वैत तत्त्वज्ञान आहे. तसेच अद्वैत तत्त्वज्ञान आहे, शून्यवाद आहे. हे जे सगळे तत्त्वज्ञानाचे विशेष आहेत त्यांचा समन्वय तेथे आहे. याचे कारण हे सर्व विश्वात्मक देवाच्या स्फुरणातून निर्माण झालेले आहे. हे स्फुरण सर्वव्यापी असल्याने कोणतेही विशिष्ट तत्त्वज्ञान असे या पसायदानात नाही. त्यात आहे सर्व तत्त्वज्ञानांचा समन्वय, पण तत्त्वज्ञ निराळा आणि विभूती निराळी. हा ईश्वरी साक्षात्कार ज्याला त्याला त्याच्या त्याच्या सूक्ष्मदर्शकात दिसेल तेवढाच होईल. जसा नामदेवाला गुरुकृपेपूर्वी झाला. विठ्ठलाची मूर्ती म्हणजेच त्याचा परमेश्वर. त्या सर्वात्मक ज्ञानेश्वरांच्या विभूतिमत्त्वाचे प्रतिबिंब त्यांच्या पसायदानात दिसते. पसायदान हे नवनीत आहे. ज्ञानेश्वरांचे पसायदान ही वैश्विक प्रार्थना आहे. एका विश्वेश्वराने आपल्याच विश्वस्वरुपाला केलेली प्रार्थना आहे. पसायदानाच्या ओव्यांचा यथार्थ मागोवा घेण्यासाठी त्यापूर्वीच्या काही ओव्यांच्या अर्थगर्भात शिरणे अत्यावश्यक आहे. कारण त्या ओव्यांनी पसायदानच्या ओव्यांचे औचित्य व स्पष्टीकरण केलेले आहे.

मुळातच ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायाला कलशाध्याय किंवा एकाध्यायी ज्ञानेश्वरी मानले जाते. या अध्यायात महर्षी व्यास, श्रीकृष्ण, भक्त अर्जुन, ज्ञानेशांचे श्रीगुरू, संतश्रोते व शेवटी कृष्णभक्त संजयाचे भावपूर्ण वर्णन ज्ञानेश्वरांनी केलेले आहे.

गीता-भाष्य जसेजसे पूर्णत्वाला जाऊ लागले, तसे तसे ज्ञानेश काहीसे भावूक झालेले वाटतात. या गीताभाष्याच्या निमित्ताने त्यांचा श्रीगुरू व संतश्रोते यांचेशी आत्मिक पातळीवरून चाललेला सुखसंवाद, प्रेमसंवाद आता काही ओव्यानंतर संपणार होता. तो संपल्यावर ज्ञानेश्वरांनी या वाग्यज्ञाचे कर्तेपण आपल्या श्रीगुरूंना व संतश्रोत्यांना अर्पण करून स्वत:कडे पूर्ण नि:संगता घेतली आहे. म्हणूनच माउली म्हणतात –

धर्मकीर्तन हें तुमचे केले । येथे माझें जी उरलें पाईकपण ।।

ही आहे महाकाव्य रचनाकाराची पूर्ण अलिप्तता. गीतेचा शेवटचा श्लोक हा कृष्णभक्त संजयाचा आहे. त्या आधीचे तीन श्लोकही व्यासशिष्य संजयाचेच आहेत. संजयाला व्यासांनी दिलेल्या दिव्य दृष्टीने रणांगणावर समोरासमोर उभे असणारे, समोरच्यांच्या रक्ताला आसूसलेले क्रूरकर्मा योद्धेच दिसले नाहीत, तर अर्जुन, भिष्माचार्य यांसारखे कृष्णभक्तही दिसले आहेत. अगदी अर्जुनाला झालेल्या स्वजनांच्या हत्येच्या विषादापासून ते 'नष्टोमोह:' असे सांगणाऱ्या अर्जुनाची सर्व स्थित्यंतरे त्यांनी पाहिली आहेत. भगवंताच्या अनेक विभूतींनाही जे कधीही पहायलाही मिळाले नाही, ते भगवंताचे विश्वरूपही अर्जुनाच्याही अगोदर

संजयाने पाहीले. अर्जुनाला मात्र ते पहाण्यासाठी 'दिव्यं ददामि मे चक्षु:' असे भगवंताला म्हणावे लागले. श्रीकृष्णाचे म्हणजेच भगवंताचे पूर्ण स्वरूप संजयाने पाहिले. आणि म्हणूनच त्याच्या तोंडून गीतेचा शेवटचा श्लोक बाहेर पडला अगदी उत्स्फूर्तपणे –

यत्र योगेश्वर: कृष्ण यत्र पार्थो धनुर्धर: ।

तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।। गी. १८.७८

जेथे योगेश्वर कृष्ण व धनुर्धर पार्थ असतील, तेथे श्री, विजय, ऐश्वर्य आणि अढळ नीती असणारच अशी संजयाची ठाम निष्ठा आहे. वास्तविक ही एक श्लोकी गीताच आहे. श्रीकृष्णस्वरूपातील सर्वेश्वर, आणि अर्जुनासारखा विभूतिस्वरूप शिष्य संजयाच्या अंतःचक्षूसमोरून हालत नसतील. डोळे आनंदाश्रूंनी भरून आले असतील. संजय कृतार्थ झाला. त्याची भगवंतावर इतकी निस्सीम भक्ती आहे, की जिकडे भगवंत आहे तीच विजयाची खूण आहे. केवळ व्यासांच्या कृपाप्रसादामुळेच संजयाला हे बघायला व ऐकायला मिळाले, याची कृतार्थता त्याला आहे. या शेवटच्या चार श्लोकांत ती व्यक्तही झाली आहे. पांचवा श्लोक आहे संजयाला झालेले आत्मदर्शन. म्हणूनच या संजयाच्या श्लोकाबद्दल ज्ञानेश्वर म्हणतात–

तैसें शब्दब्रह्म अनंत । जालें सवालक्ष भारत ।

भारताचें शतें सात । सर्वस्व गीता ।। ज्ञा. १८.१६६१

तयाही सातां शतांचा । इत्यर्थ हा श्लोक शेषींचा ।

व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्गारु जो ।। ज्ञा. १८.१६६२

अर्जुनाची जशी भगवंतावर एकमेवाद्वितीय श्रद्धा आहे, तशीच ज्ञानदेवांची निवृत्तिनाथांवर अपरिमित श्रद्धा आहे. आपल्या गुरूंचे मोठेपण सांगताना ज्ञानेश्वर सांगतात –

परि साचचि गुरूनाथें । निमित्त करूनि मातें ।

प्रबंधव्याजें जगातें । रक्षिले जाणा ।। ज्ञा. १८.१७६५

या ग्रंथातील तत्त्वज्ञानाने जगाचे रक्षण करण्यासाठी माझ्या श्रीगुरूंनी केवळ माझे निमित्त केले आहे. अर्जुनाचे निमित्त करून जे कार्य भगवंताने केले, तेच कार्य माझ्या या विश्वात्मक देवाने केले आहे. त्यांनी आपल्या समाधीधनाचा पर्जन्यकाळी कोसळणाऱ्या वर्षावाप्रमाणे, शांतरसाचा वर्षाव केला, तेव्हा मी हे

समाधीधन बापया पक्षासारखा आर्ततेने ऐकत समोर बसलो होतो. ते समाधीधन म्हणजेच हा वाग्यज्ञ, तीच ही ज्ञानेश्वरी.

या ग्रंथसमाप्तीपूर्वी ज्ञानेश्वर पुन्हा पुन्हा आपले श्रीगुरू व संतश्रोते यांचे मोठेपण व्यक्त करीत आहेत. हे समाधीधन आदि शंकरापासून आलेले असून तो माझ्या गुरूंना 'गुरूआज्ञेचा बोलू' म्हणून प्राप्त झालेला आहे, हे सांगताना ज्ञानेश्वर म्हणतात –

आधीच तवं तो कृपाळु । वरी गुरुआज्ञेचा बोलु ।

जाला जैसा वर्षाकाळु । खवळणें मेघां ।। ज्ञा. १८.१७६०

मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें ।

वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ।। ज्ञा. १८.१७६१

तेथ पुढां मी बापीया । मांडला आर्ती अपुलिया ।

कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ।। ज्ञा. १८.१७६२

एवं गुरुकृपें लाधलें । समाधीधन जें आपुलें ।

तें ग्रंथे बांधौनि दिधलें । गोसावी मज ।। ज्ञा. १८.१७६३

परी साचचि गुरूनाथें । निमित्त करूनि मातें ।

प्रबंधव्याजें जगातें । रक्षिले जाणा ।। ज्ञा.१८.१७६५

अशी श्रीगुरूंची स्तुती करून हे गीता भाष्य माझे नसून माझ्या श्रीगुरूंनीच माझ्याकडून ते वदवून घेतले आहे असे आर्जवाने सांगून त्याचे पूर्ण कर्तृत्व श्रीगुरूंना अर्पण केले आहे.

या नंतर हा ग्रंथसिद्धीचा सोहळा तुमचाच कृपाप्रसाद आहे हे संतश्रोत्यांना सांगतात, गीतेची व श्रीगुरूंची व संत श्रोत्यांची शेवटी स्तुती अशी –

गीतार्थाचा आवारु । कलशेंसी महामेरू ।

रचुनि मार्जी श्रीगुरू । लिंग जे पूजी ।। ज्ञा. १८.१७८१ ही गीतार्थाने केलेली शिवाची प्रार्थना.

गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय ।

ते मायपुता भेटी होय । हा धर्म तुमचा ।। ज्ञा. १८.१७८२ हा गीतेच्या उपमेने श्रोत्यांचा गौरव केला आहे.

संतश्रोत्यांची यथार्थ स्तुती करून श्रीगुरुप्रमाणेच संतश्रोत्यास ज्ञानेश्वरीचे श्रेय अर्पण करून ज्ञानेश्वर स्वतः निष्काम झाले.

मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा ।

ते पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ।। ज्ञा. १८.१७८५

म्हणौनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथरुप जो हा त्रिजगती ।

उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ।। ज्ञा. १८.१७९१

किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धि गेलें ।

येथ माझें जी उरलें । पाईकपण ।। ज्ञा. १८.१७९२

ज्ञानेश्वरांची श्रीगुरुंना व सर्व संतश्रोत्यांनाही मोठेपण व कर्तृत्व अर्पण करून टाकले आहे. उपमेतील उपमानासारखे तुम्ही नाही हे ही सांगून टाकले व त्याचे यथार्थ वर्णन पसायदानात आले आहे –

आतां विश्वात्मके देवें । येणें वाग्यज्ञे तोषावें ।

तोषोनि मज द्यावें । पसायदान हे ।। ज्ञा. १८.१७९३

जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।

भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ।। ज्ञा. १८.१७९४

दुरितांचे तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।

जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।। ज्ञा. १८.१७९५

वर्षत सकळमंगळी । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।

अनवरत भूमंडळी । भेटतु भुतां ।। ज्ञा. १८.१७९६

चलां कल्पतरूंचे आरव । चेतनाचिंतामणींचे गाव ।

बोलते जे अर्णव । पीयूषांचे ।। ज्ञा. १८.१७९७

चंद्रमे जे अलांछन । मार्तंडजे तापहीन ।

ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।। ज्ञा. १८.१७९८

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होउनि तिहीं लोकीं ।

भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ।। ज्ञा. १८.१७९९

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।

दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ।। ज्ञा. १८.१८००

येथ म्हणे श्रीविश्वेश्वरावो । हा होईल दानपसावो ।

येणें वरे ज्ञानदेवो । सुखिया झाला ।। ज्ञा. १८.१८०१

गीतेतील संजयाचा शेवटचा श्लोक हीच एकश्लोकी गीता आहे. त्यावरील ज्ञानेशांच्या दोन ओव्या सर्व अर्थ स्पष्ट करतात.

कृष्ण विजयस्वरुप निजांगे । तो राहिला असे जेणें भागें ।

तैं जयो लागेंवेगें । तेथेंचि आहे ।। ज्ञा. १८.१६४०

विजयी नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरुप श्रीकृष्णनाथु ।

श्रियेसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे ।। ज्ञा. १८.१६४१

[१]ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायातील सोळाशे एकवीस ओवीपासून सोळाशे तीस ओव्यात श्रीभगवंत व अर्जुनाचे गुणगौरव गायीले आहेत. त्यानंतर गीता व गीतेचे लेखक महर्षी वेदव्यास यांचा गुणगौरव सांगितला आहे. त्यातील सोळाशे नव्याण्णव ही ओवी विशेष महत्त्वाची आहे. कारण गीतेने स्त्रीशूद्रांनाही न्याय देणारे असे जे धर्मशास्त्र सांगितले त्याचा उल्लेख मुद्दाम केलेला आहे.

तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें ।

स्त्रीशूद्रादि प्रतिभे । सामाविले ।। ज्ञा. १८.१६९९

गीता स्तवनानंतर ज्ञानेशांनी व्यासांची स्तुती केली आहे व व्यास स्तुतीनंतर ज्ञानेशांना पुन्हा श्रीगुरू प्रेमाची ओढ लागली. कारण ते त्यांचे सर्वस्व होते.

---

१. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी अ. १८, १६३१-६०, १६६१-१७०५, १६९९

तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरू निवृत्तिनाथु ।

राहाटत असे मजही आंतु । रिघोनिया ।। ज्ञा. १८.१७२८

श्रीगुरुप्रमाणेच संतश्रोत्यावर ज्ञानदेवांचा खूप लोभ आहे. आपल्या कर्तृत्वाचे श्रेय ते श्रीगुरूंप्रमाणेच संतश्रोत्यांनाही देतात. आपली आदिनाथांपासून आलेली नाथ परंपरा सांगून श्रीगुरुमुखातून लाभलेले समाधीधन हे केवळ माझ्या श्रीगुरूंचेमुळेच श्रीशंकरापासून माझ्यापर्यंत येऊन पोहोचले आहे असे म्हणून नाथपंथाचे व श्रीगुरूंचे गुणगौरवानंतर माउली संतश्रोत्यांचा आदराने गौरव करतात. माउली श्रोत्यांना सांगतात की श्रीगुरूंच्याच कृपेने मला तुमच्यासारखे श्रोते प्राप्त झाले. त्यांच्याच कृपेने मला तुमच्यासारखे माहेर मिळाले. आणि अत्यंत नम्रतेने म्हणतात की तुमच्याच कृपेने केलेले हे धर्मकीर्तन पूर्णत्वाला गेले आहे. माझा काय तो सेवकपणाच उरला आहे. आणि या नंतर ज्ञानेशांनी पसायदान मागितले आहे.

या संतश्रोत्यांच्या मोठेपणाला उपमा देताना ज्ञानदेवांनी –

‘मजलागी ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टी जे हे केली तुम्ही । असे म्हणून श्रीगुरुंना सृष्टिनिर्मात्याची उपमा दिली आहे. आणि पुढे श्रीगुरुंना म्हणतात की तुम्ही ही जी माझ्यासाठी ग्रंथाची दुसरी सृष्टी निर्माण केली आहे. ती पाहून आम्हाला विश्वामित्राचे हसू येते. कारण ती सृष्टी नाश पावणारी होती. ती सृष्टी विश्व–अमित्राची होती.

मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजीसृष्टी जे हे केली तुम्हीं ।

तें पाहोनिं हांसों आम्ही । विश्वामित्रातेंही ।। ज्ञा. १८.१७८६

जे असोनि त्रिशंकुदोषें । घातयाही आणावें वोसें ।

तें नासतें कीं जे ऐसें । निर्मावें नाहीं ।। ज्ञा. १८.१७८७

आपल्या संतश्रोत्यांना ज्ञानेश्वर विशाल सागराची, अंध:काराचा नाश करणाऱ्या

सूर्याची आणि शीतल चांदणे देणाऱ्या चंद्राची उपमा देतात. परंतु या तीनही उपमांची कणसरता ध्यानी येताच तीही उपमाने आपल्या सज्जन श्रोत्यांना मान देण्यायोग्य नाहीत हे ही त्यांच्या लक्षात आले म्हणून पुन्हा माउली आपली झालेली चूक पुढील ओव्यात दुरुस्त करते.

शंभू उपमन्यूचेनि मोहें । क्षीरसागरूही केला आहे ।

येथ तोही उपमे नोहे । जे विषगर्भ की ।। ज्ञा. १८.१७८८

अंधकारू निशाचरां । गिळितां सूर्ये चराचरां ।

धावा केला तरी खरा । ताउनी कीं तो ।। ज्ञा. १८.१७८९

तातलिया जगाकारणें । चंद्रें वेंचिलें चांदणें ।

तया सदोखा केवीं म्हणे । सारखें हे ।। ज्ञा. १८.१७९०

माझे संतश्रोते ज्यांचे अंत:करण महासागराप्रमाणे विशाल व अमर्याद आहे असे म्हणावे तर सागराचे पोटांत विष आहे. माझे संत श्रोते अमृत–सागरासारखे आहेत. ते आहेत 'पियूषाचे अर्णव'. माझे श्रोते अंध:काराचा नाश करणाऱ्या सूर्यासारखे आहेत असे म्हणावे तर सूर्य तापही देतो. संतश्रोते तर कधीच तापदायक नसतात. म्हणून ज्ञानेश्वरांचे पसायदानातील मागणे आहे – 'मार्तंड जे तापहीन'. माउली म्हणतात माझे श्रोते जगाला शीतलता देतात म्हणून चंद्रासारखे शीतल आहेत. परंतु चंद्राला डागांचे लांछन आहे. म्हणून मागणे आहे की 'चंद्रमे जे अलांछन' हा हळुवारपणा, कोवळीक केवळ ज्ञानदेवांजवळच आहे. ज्ञानेश्वरांचे मनी आहेत – विश्वाच्या आर्ताचे हुंकार –

विश्वाचे आर्त माझे मनीं प्रकाशलें । अवघेचि जालें देहब्रह्म ।।

आवडीचें वालभ माझेनि कोंदाटले । नवल देखिलें नभाकारगें माये ।।

बापरखुमादेवीवरु सहज निटु जाला । हृदयी नटावला ब्रह्माकारें ।। ज्ञा. गा. ६६४

इतक्या विश्वहृदयी सर्वेश्वराचे पसायदानही त्याच तोलामोलाचे आहे. संपूर्ण ज्ञानेश्वरीत ज्ञानेश्वरांनी अगदी आपल्या श्रीगुरूंकडेही स्वत:करिता काहीच मागितले नाही. जो स्वयं सर्वेश्वर आहे तो कोणाला काय मागणार? हा विश्वकल्याणाचा प्रसाद त्यांनी आपल्या विश्वात्मक देवाकडे श्रीगुरूंकडे मागितला आहे. श्रीगुरूंनाच त्यांनी विश्वात्मक देव, विश्वेश्वरावो असे यथार्थाने संबोधले आहे. पंधराव्या अध्यायाचे अखेरच्या ओवीत ज्ञानदेवांनी श्रीगुरूंना विश्वात्मक देव असे संबोधले आहे –

आतां विश्वात्मकु हा माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा ।

तो अवधारू वाक्य पूजा । ज्ञानदेवो म्हणे ।। ज्ञा.१५.५९८

या ज्ञानेश्वरी ग्रंथाला ज्ञानेश्वरांनी ग्रंथ-सागरू, प्रबंध अशा अनेक नावांनी संबोधले आहे. या वागयज्ञाचे महत्त्व ज्ञानदेव पूर्णपणे जाणून आहेत. ज्या 'विश्वात्मकु' देवाच्या आदेशाने ज्ञानदेवांनी हा ज्ञानेश्वरीच्या वागयज्ञाचा मांड मांडला, म्हणजेच पूर्णत्वाने या यज्ञाची सिद्धता केली, त्याच विश्वेश्वराकडे हे जगाच्या, नव्हे विश्वाच्या कल्याणाचे हे विश्वस्तरावरचे पसायदान मागत आहेत.

आतां विश्वात्मकें देवें । येणें वागयज्ञें तोषानें ।

तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ।। ज्ञा. १८.१७९३

निवृत्तिनाथा, विश्वेश्वरा तू 'आता' म्हणजे (माझी एवढी गुरुसेवा झाल्यावर) मी ह्या पूर्ण केलेल्या वाग्यज्ञाने संतुष्ट होऊन मला हे पसायदान, अमृतत्वाचे दान द्यावे. मी माझ्यासाठी काहीसुद्धा मागत नाही. स्वामी, तुम्ही मला अंतर्बाह्य जाणता. मी समर्थाचा शिष्य आहे. तुम्हीच मला आपल्यासारखे केले आहे. मीही विश्वात्मक देवच आहे. माझे मागणे सुद्धा विश्वकल्याणाचेच आहे -

जे खळांची व्यकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।

भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचे ।। ज्ञा. १८.१७९४

देवा, खळांचा-दुष्टांचा कुटिलपणा, दुष्टपणा नाहिसा होवो आणि त्यांचीच सत्कर्माच्या ठायीची आवड वाढो. विश्वातील सर्वप्राणिमात्रांनी एकमेकांशी प्रेमानेच वागणे ठेवावे.

या ठिकाणी गीतेच्या चवथ्या अध्यायातील भगवंताने दिलेल्या आश्वासनाची आठवण झाली, आणि ज्ञानदेव या विभूतीचे वेगळेपण प्रकर्षाने जाणवले.

यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।

अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।

परित्राणाय साधुनां विनाशायच दुष्कृताम् ।

धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।

या अभिवचनात परित्राणाय साधुनां - म्हणजे 'सज्जनांच्या रक्षणासाठी, आणि विनाशायच दुष्कृताम् - म्हणजे दुष्ट प्रवृत्तिचे व त्याच्या परिणामांचे निर्दालन करून 'स्वधर्माचे पुन:स्थापनेसाठी मी प्रत्येक युगात अवतार धारण करीन', असे भगवंताचे आश्वासन आहे. पण अशी परिस्थिती केव्हा निर्माण होईल जेव्हा

स्वधर्माचा म्हणजेच माणसाचा माणूसपणा संपेल, स्वधर्म आधोगतीत जाईल, तेव्हा हा धर्म–स्वधर्म उभा करण्यासाठी मी युगायुगात अवतार धारण करेन असे भगवान म्हणतात.

पसायदानात ज्ञानदेवांनी खळांचे निर्दालन मागितलेले नाही. त्यांचे खलत्व जावो, आणि त्यांना सत्कर्माची वाढती आवड निर्माण होवो, ही मागणी फक्त ईश्वरच करू शकतो आणि पुरवू शकतो.

दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।

जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।। ज्ञा. १७९५

पापी वृत्तीचा अंध:कार जावो व विश्वात स्वधर्माच्या सूर्याची पहाट होवो. पृथ्वीवरचाच नव्हे विश्वातील प्रत्येक अणू–रेणूसह प्रत्येकास जे जे हवे ते ते त्याला प्राप्त होवो (freedom of desire, and it's expression by every atom existing).

वर्षत सकळमंगळी । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।

अनवरत भूमंडळीं । भेटतु भूतां ।। ज्ञा. १८.१७९६

'सर्वेश्वरा, सकल, संपूर्ण मंगलाचा – कल्याणाचा वर्षाव करणाऱ्या तुझ्या निष्ठावान साधुसंतांची मांदियाळी – समुदाय या पृथ्वीवरील सर्व भूतमात्रास भेटोत.' हे सर्वच काही अपूर्व आहे. असे मांगल्याचे मागणे ज्ञानेश्वरच अधिकार वाणीने मागत आहेत.

चलां कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणींचे गांव ।

बोलते जे अर्णव । पियूषांचे ।। ज्ञा. १७९७

या ओवीचा सरळ अर्थ असा की ज्ञानदेव आपल्या संतश्रोत्यांसाठी व विश्वातील प्रत्येक जीवासाठी चालणाऱ्या कल्पतरूंचे आरव, चैतन्यमय चिंतामणीचे गांव व अमृताचे [१]सागर मागत आहेत. ज्या कल्पतरूंच्या छायेत मनी इच्छिलेली प्रत्येक इच्छा पूर्ण होते, ते कल्पतरू हलते – बोलते असून त्याचा आरव, त्यांचे सळसळणारे आवाज हीच जणू काय पूर्णतेची बांग आहे. 'चिंतामणी चिंतितमेव दत्ते' ही ज्यांची ख्याती त्या चिंतामणींचे ईश्वरी चेतनेने भरलेले गाव, अमृताने भरलेले बोलणारे सागर हे सगळेच केवळ अपूर्व आहे. म्हणूनच ज्ञानेश्वरांना सागर ही उपमा संतश्रोत्यांसाठी हिणकस, त्यांचे मोठेपणाला कमीपणा

---

[१]. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी, पान ८२५

आणणारी वाटली. केवळ या साठीच ज्ञानदेवांनी त्यांना अमृताचे सागर म्हणाले आहे. चेतना चिंतामणींच्या गावीं हे कल्पतरू आपल्या आखानें संतश्रोत्यांना पूर्ततेचे आवाहन करतात. कारण या संतश्रोत्यांमुळे त्यांनाही कृतार्थता मिळणार आहे. या आहेत ज्ञानेशांच्या आध्यात्मिक अनुभूती.

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।

ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।। ज्ञा. १८.१७९८

[१] माउलींना आपल्या संतश्रोत्यांना अज्ञान अंध:काराचा नाश करणारे व सर्व प्राणिमात्रांना प्रेमाने चंद्रप्रकाशाची शीतलता देणारे हीच उपमा द्यावयाची आहे. परंतु सूर्य, चंद्र यांच्यातील प्रखरतेचा ताप, व चंद्रावरील डागांचे लांछन त्यांना नको आहे. या कणसरपणाबद्दल माउलींनी पूर्व ओव्यांतच सांगितले आहे.

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिही लोकीं ।

भजिजो आदिपुरूखीं । अखंडित ।। ज्ञा. १८.१७९९

[१]किती भव्य, उदात्त मागणे आहे माउलींचे ! किंबहुना या शब्दाने पसायदानाबद्दल फार काय सारंगावे ! केवळ या मृत्युलोकांवरीलच नव्हे तर संपूर्ण चराचर विश्व सुखी व्हावे अशी प्रार्थना केली आहे. जिथे जिथे चैतन्याचे स्फुरण आहे तो प्रत्येक अणु रेणु सुखी होवो, त्याच्या अस्तित्वाचे सार्थक होवो. आणि त्या प्रत्येकाने विश्वाच्या आदिशक्तीचे अखंड स्मरण करावे ही ज्ञानेशांची प्रार्थना आहे.

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकी इथे ।

दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ।। ज्ञा. १८.१८००

ज्ञानेश्वरी कथनाच्या सुरुवातीपासून त्यांच्या समोर बसलेल्या जाणत्या-नेणत्या प्रत्येक श्रोत्याबद्दल ज्ञानदेव भावुक झाले आहेत. कारण आता ज्ञानेश्वरी त्यांची, त्यांच्या श्रीगुरूंची राहिलेली नाही. ज्ञानेश्वरीपूर्ततेनंतर ती प्रत्येक श्रोत्याची जीवनदायिनी झालेली आहे. त्या सर्वांचे दृष्ट म्हणजे या इहलोकीचे व अदृष्ट म्हणजे परलोकीचेही जीवन सर्वदा सुखी व्हावे, ईश्वरी कृपेने या उभय जीवनात विजयी व्हावे ही ज्ञानेश्वरांची प्रार्थना आहे.

---

१. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी, पान ८२५

येथ म्हणे श्रीविश्वेश्वरावो । हा होईल दानपसावो ।

येणे वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ।। ज्ञा. १८.१८०१

ज्ञानेश्वरीची खऱ्या अर्थाने शेवटची ओवी विश्वप्रार्थनेचे अंतिम चरण म्हणजे एका योगेश्वराने आपल्याच स्वस्वरूपाला मागितलेला प्रसाद आहे. सर्व ज्ञानेश्वरी भक्त श्रोत्यांना मिळालेले सर्वेश्वराचे ज्ञानेश्वर रूपातील प्रत्यक्ष साक्षात दर्शन आहे. माउलींनी आपल्या समोर बसलेल्या श्रीविश्वेश्वर श्रीगुरूंना व प्रत्येक संतश्रोत्यांच्या अंत:करणी विराजमान असलेल्या ईश्वरी स्वरूपाला परमानंदाने हे पसायदान मागितले आहे. आणि सर्वांनी पूर्ण आनंदाने व कृतार्थतेने क्षणात 'हा होईल दान पसावो' असा ज्ञानेशांना मंगल आशीर्वाद दिला आहे. व हा – हो, अशा तऱ्हेच्या प्रसादाचे दान होईल हा होकार भरलेला आहे.

ज्ञानेश्वर या विभूतीने आपला स्वधर्म पाळला आहे. स्वकर्म कुसुमांची माला सर्वेश्वराच्या गळ्यात घातली आहे. ही वैश्विक प्रार्थना एका विश्वेश्वराने आपल्याच विश्वस्वरूपाला केलेली आहे. त्या विश्वेश्वराने ज्ञानदेव या आपल्याच स्वरूपाची प्रार्थना स्वीकारून मंगलाशीर्वाद दिला आहे. पुन्हा पुन्हा मनात येते की हा मंगल प्रसंग पाहण्याचे भाग्य ज्या संतश्रोत्यांना लाभले असेल ते खऱ्या अर्थाने संतशिरोमणी आहेत. त्यांच्या भाग्याचा हेवा कोण करणार? कारण मागणारा सर्वेश्वर, देणाराही सर्वेश्वर, आणि ज्यांच्यासाठी मागितले तेही सर्वेश्वर सर्वच सर्वेश्वर स्वरूप आहेत.

अशी वैश्विक प्रार्थना ज्ञानेश्वरांचे पूर्वी या महाराष्ट्राचे भूमीवरच नव्हे तर पूर्ण विश्वात झाली नाही व होणारही नाही. अशी विश्वप्रार्थना जगाला मिळाली हे प्रत्येक वाचक–अभ्यासकाचे भाग्य आहे. कारण हे पसायदान केवळ महाराष्ट्राची नव्हे तर सर्व विश्वाची सामुदायिक प्रार्थना आहे.

# ज्ञानेश्वरांचे विभूतिमत्व–
# आणि पसायदान (ड)

विभूतिस्वरूप ज्ञानेश्वरांनी जे गीतेवर भाष्य केलेले आहे त्याचा परिपाक, त्याचा कळस पसायदानात आहे. कारण पसायदान हे स्वानुभूतीवर आधारलेले आहे. धार्मिक वाङ्मय अनेक संतांनी निर्माण केलेले आहे. नामदेव, कबीर, चोखोबा, एकनाथ, तुकाराम यासारख्या अनेक ज्येष्ठ संतांनी खूप अर्थगर्भ वाङ्मय निर्माण केले आहे. मग या सर्वात ज्ञानदेवांचे वैशिष्ट्य काय आहे? इतर सर्व संत व्यक्तिस्वरूप आहेत आणि ज्ञानदेव हे विभूतिस्वरूप आहेत. ज्ञानदेवांनी आपल्या गीताभाष्याला 'भावार्थ दीपिका' हे नाव देण्यामागचा त्यांचा विचार काय असावा? 'भाव तोचि देव' हे त्यामागील प्रधान तत्त्व (Principle) आहे म्हणून त्यांनी गीता–भाष्याला 'भावार्थ दीपिका' संबोधले. त्यांनी या ग्रंथाला ज्ञानेश्वरी, ज्ञानदेवी, एक टीका ग्रंथ, गीतेचे रहस्य असे काहीही म्हटले नाही. स्पष्टपणे भावार्थ दीपिका असेच म्हणाले आहे. ज्ञानेश्वरी हे नामाभिधान नंतर प्रचलित झाले असावे. त्यांनी असे स्पष्टपणे म्हटलेले आहे की मी हे जे कथनाचे कार्य केले ते गुरूकृपेने केलेले आहे. विनयाने ज्ञानदेव असेही म्हणतात की 'एरवी तरी मी मूर्खु'. इतकी मनात नम्रता धारण करून ज्ञानेशांनी गीताभाष्याचे कार्य केलेले आहे. हा जो भावार्थ दीप मी लाविला आहे, तो ज्ञानप्रकाशाचा दीप आहे. श्रीगुरूंनी जे सांगितले तेच मी माझ्या शब्दात मांडीत आहे. नम्रता हा ईश्वराला आवडणारा सर्वांत मोठा गुण आहे. ज्ञानेशांच्या मनीचा भाव नम्रतेचा आहे. म्हणून ज्ञानदेव म्हणजे नम्रता. आणि नम्रता म्हणजेच देव. मग या भूमिकेतून पसायदानाचा अर्थ हाच होतो की देवानेच देवाकडे प्रसाद मागून घेतलेला आहे. परंतु मायेत येण्यासाठी द्वैत पत्करावे लागते. संवाद होण्यासाठी दोन पात्रे आवश्यक असतात. ज्ञानेश्वरीचे दोन भाग आहेत. पहिला कृष्णार्जुन संवाद. अर्जुन प्रश्नाने मनातले विचार मांडतो. कृष्ण त्याला उत्तर म्हणून जीवनाचे तत्त्वज्ञान सांगतो. या ठिकाणी द्वैत आहे. कारण येथे विचारणारा व सांगणारा असे दोघे आहेत. दुसरे, परंतु हे पसायदान ज्ञानेश्वरांचे मनोगत आहे. स्वत: ईश्वरानेच स्वत:ला (ईश्वराला) सांगितलेले स्वगत आहे. ईश्वर आपलेच विचार सामान्य जिवांसाठी व्यक्त करीत आहे. जन्म घेण्यासाठी, अवतार घेऊन अस्तित्वात येण्यासाठी द्वैत स्वीकारणे भाग आहे. देहरूप धारण करणे भाग आहे. कारण देहरूप नाहीसे झाले की मूळ चैतन्यच आहे. परंतु चैतन्याला जेव्हा बोलण्याची इच्छा होते त्यावेळी त्याला गुण व आकार धारण करावा

लागतो. त्याशिवाय चैतन्य बोलू शकत नाही. अयोध्यापती राम आणि श्रीराम, श्रीकृष्ण आणि गीता सांगणारे भगवान हा असाच फरक आहे. गीतेत कोठेही 'श्रीकृष्ण उवाच' असे म्हटलेले नाही. प्रत्येक ठिकाणी आहे – 'श्रीभगवान उवाच.' तसे सर्वेश्वराने धारण केलेला आकार, गुण, स्वरुप म्हणजे ज्ञानेश्वर. तो स्वयं ब्रह्मचैतन्यच आहे. पण मायेत येण्यासाठी मानवी अवतार धारण केलाच पाहिजे. म्हणून देहरूप विभूती हा जन्म. राम, श्रीकृष्ण, अर्जुन या अशाच देहधारी विभूती असे भगवंतानेच विभूतियोग अध्यायात सांगितले आहे. विभूती म्हणजे विशेष होणे. गायत्री मंत्रात – ॐ भू: भूवस्व: यात 'भू' हा धातू आहे. मूळ ओंकार आहे. त्यातून ओंकार नाद अस्तित्वात आला. भुव: म्हणजे तो ओंकार नाद झाला. (भुव: म्हणजे होणे) मग तो कोणत्या रूपात झाला, तर ज्ञानेश्वर या रुपात झाला. मूळचा ओंकार विभूती स्वरूपात देहरूपात अस्तित्वात आला आहे. ती व्यक्ती नव्हे. नंतर गुरुकृपा झाल्यावर विभूती म्हणजे निवृत्त, अलिप्त. ही व्यक्ती निवृत्त आहे हे दर्शविणारे त्यांचे श्रीगुरूही निवृत्त आहेत. निवृत्ती ही अवस्था आहे. निवृत्त अवस्थेतलेच त्यांचे बंधू म्हणून त्यांनी जन्म घेतलेला आहे. ते विभूती आहेत.

'ओंकार स्वरूप रूप गणेशाचे'. हा जो ओंकार आहे तो आहे निर्गुण, निराकार. तो फक्त प्रकाश आणि ध्वनी यांच्या माध्यमात आहे. 'ओंकार स्वरूप रूप गणेशाचे', म्हणजेच गणेश हेच त्याचे रूप आहे. म्हणूनच ज्ञानेश्वरीत पहिली प्रार्थना गणेश वंदनाची आहे.

देवा तूंची गणेशु । सकलमतिप्रकाशु ।

म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ।। ज्ञा.१.२

आता गणेशाला जे सांगायचे आहे त्याला वैखरी पाहिजे, वाणी पाहिजे. ती जी वाग्देवता आहे ती सरस्वती–शारदा. म्हणून सरस्वतीचे वंदन आहे.

आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी ।

ते शारदा विश्वमोहिनी । नमस्कारिली मियां ।। ज्ञा. १.२१

ज्ञानेश्वर म्हणतात की माझ्या पाठीशी हा ओंकाररूप गणेश आहे. त्याचे सामर्थ्य आहे. म्हणजे मूळ स्वर निर्माण करणारा ओंकार. त्याला आपण 'सूर' म्हणतो. आणि जीवनात हा सूर जर नसेल तर सामान्यांचे जिणे बेसूर आणि भेसूर होते. ज्यांच्या जीवनात सूर नाही त्या सामान्य जीवांना मला हा सूर प्राप्त करून

द्यायचा आहे. त्या शिवाय त्यांच्या जीवनात सामर्थ्य येणार नाही. त्यांचे कल्याण होणार नाही. म्हणून ओंकार हा जो मूळ नाद आहे, हा नाद त्यांना प्राप्त करून द्यावयाचा आहे. म्हणून ज्ञानेश्वर जेव्हा गणेशाला वंदन करतात तेव्हा ते स्वस्वरूपालाच वंदन करतात. तिथे द्वैत राहिलेले नाही. पसायदान हे जे आहे ते मूळ विभूती स्वरूपाच्या देहरूपाचे / पदार्थाचे, त्याच्याच अंशाचे मागणे आहे. सागरातल्या थेंबानेच सागराकडे मागणे मागितलेले आहे. ते हे पसायदान आहे. आणि ते अनुभवावर अधिष्ठित आहे. म्हणून गीताभाष्याच्या शेवटी निवृत्तिनाथांनी सांगितले की, ''श्रीकृष्णार्जुन संवादाचा गर्भितार्थ तू एक तत्त्वज्ञ म्हणून सांगितला आहेस. हे ज्ञान कार्य तू केले आहेस. तू 'ज्ञानदेव' झाला आहेस. परंतु या ज्ञानाला भक्तीचा ओलावा असल्याशिवाय हे सर्व ज्ञान कोरडे राहील. म्हणून भक्तीचा ओलावा जेथे आहे तेथे तू 'नामदेव' व्हावेस, आणि नामाचे महत्त्व सांगावेस.'' ज्ञानदेवांनी चंद्रभागेच्या वाळवंटात संतांच्या मांदियाळीत चोखोबांच्या विनंतीवरून भक्तजनांसाठी हरिपाठातून नामाचे महत्त्व सांगितले की, 'हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥'. जे भद्र आहे, जे पुण्यकारक आहे, जे कल्याणकारक आहे त्याचा पाया आहे 'नाम'. [१]'गोंदवलेकर' महाराज सांगत त्याप्रमाणे नाम म्हणजेच ओंकार. म्हणून जे नामसंकीर्तन आहे, ते ओंकार संकीर्तन आहे. म्हणून ज्ञानेश्वरांचा गीता निरूपणासाठी ज्ञान संप्रदाय आहे, व त्यात जी भक्ती सांगितलेली आहे, त्यासाठी नामसंप्रदाय आहे. म्हणून पसायदानाचे दोन पाये आहेत. एक ज्ञान आणि दुसरे नाम (भक्ती) आणि म्हणून ज्ञानोत्तर भक्ती.

माउली स्वत: प्रेमावतार आहेत. त्यांची जात कळवळ्याची आहे. ज्ञानदेव सांगतात, ''जे सामान्य जीव आहेत, ते अज्ञानी आहेत. ते कुठल्याही मायेच्या नादी लागून, मोहात पडून, नको तो व्यवहार करून आपले जीवन भेसूर बनवत आहेत. त्यांच्या जीवनाला सूर नाही. जीवन बेसूर आहे. त्यासाठी सद्गुरूंनी सांगितलेले कार्य मी करतो आहे. त्यांनी सांगितलेले कार्य केले. 'धर्मसंकीर्तन हे तुमचे केले!' या सर्व कार्यानंतर ते मला त्यांच्यासारखेच करणार आहेत. मी त्यांच्याच, विश्वरूपात विलीन होणर आहे. हेच माझे अवतार कार्य आहे. मी जरी श्रीगुरूप्रसादाने 'ज्ञानेश्वर' असलो, तरीही हे माझे सर्व सामान्य जीव भक्तीच्या त्या 'नामदेव' अवस्थेला अजून पोहोचलेले नाहीत. त्यांना तेथे पोहोचण्यासाठी मलाच त्यांना शिडीचे पायंडे

---

१. कै. बेलसरे के. वि. 'ब्रह्मचैतन्य गोंदवलेकरमहाराज चरित्र आणि वाङ्मय, त्रिदल प्रकाशन, अवृत्ती ९वी, पुनर्मुद्रण २०००, पान १३९

दाखवायला पाहिजे आहेत. हे पायंडे चढा म्हणजे माझ्यासारखी सहज समाधीअवस्था तुम्हालाही प्राप्त होईल. ही समाधीअवस्था प्राप्त झाल्यानंतर मी जो विश्वात्मक देव पाहिला, जो योगिया दुर्लभ आहे, त्या विश्वात्मक देवाचे दर्शन तुम्हालाही होईल. मग त्या विश्वात्मक देवाचे दर्शन झाल्यानंतर मागण्यासारखे काहीही उरणार नाही. म्हणून मी जे त्या ईश्वराकडे मागतो आहे, तेच तुम्हीही मागाल. मी त्या विश्वात्मक देवाकडे तुमच्यासाठी, तुमच्या कल्याणासाठी प्रार्थना करीन. त्या ओंकारस्वरूप गणेशाचा स्पर्श तुमच्या जीवनाला होईल. तुमच्यासाठी मी धर्मसंकीर्तन करीन. धर्म म्हणजे धारणा. कारण मायेच्या त्या धारणेमधे प्रपंच करताना फक्त दुःखच वाट्याला येईल.''

ज्ञानदेव पुढे म्हणतात, ''भेदाभेद अमंगळ'' समाजातील भेदाभेदाने तुमचे सर्व जीवन अमंगळ बनेल. आणि मला त्या विश्वात्मकाचा आशीर्वाद यासाठी मागून घ्यायचा आहे की 'सर्व मंगल मांगल्ये । शिवे सर्वार्थ साधिके ।' मंगलातील जे मंगल आहे ते तुम्हाला प्राप्त होवो. मी हा प्रसाद ईश्वराकडून मागून घेतो आहे – प्रसाद दोन प्रकारचा, प्रत्यक्ष साक्षात दर्शन, आणि वस्तुरूप प्रसाद; तो मला तुम्हाला वाटायचा आहे. ते वाटण्याचे काम मी भावार्थ दीपिका लिहून पूर्ण केलेले आहे. सर्व ज्ञान तुमच्यापर्यंत पोहचविण्याची माझ्या श्रीगुरूंची आज्ञा मी पाळलेली आहे. हे सर्व श्रीगुरूकृपेने झालेले आहे. ही माझी भावार्थ दीपिका कथनामागील भूमिका आहे. या भावार्थ दीपिकेचे सामर्थ्य हेच आहे की मला जे सांगायचे आहे ते बोजड अथवा तुम्हाला न समजणाऱ्या संस्कृत भाषेत सांगायचे नव्हते, तर जीवनाचे तत्त्वज्ञान तुम्हाला समजेल असे द्यायचे आहे. 'तत् त्वं असि' । 'तो तूच आहेस'. विश्वात्मक देवाचा अंश तूच आहेस. केवळ अज्ञान व मोहामुळे तू दूर झालेला आहेस. तो दुरावा दूर व्हावा म्हणून हे तत्वज्ञान मी तुम्हाला सांगितले आहे. मी जे तत्त्वज्ञान सांगतो आहे ते तुम्हाला सहज समजेल अशा भाषेत, अमृतवाणीने सांगितले आहे. याला संप्रदाय नाही, याला भेदाभेद नाही. पण मी जे सांगितले ते सर्व तत्त्वज्ञानांचा अर्क म्हणून सांगितले आहे. हे आहे 'बोली अरूपाचे रूप दावीन'।. म्हणून मी जे सांगतो आहे ते सर्व समन्वयात्मक आहे. एखाद्या विशिष्ट संप्रदायाचे अथवा परंपरेचे म्हणून सांगत नाही. हे आहे निखळ ज्ञान. भक्तिची गोडी काय आहे, राणीव काय आहे याचे महत्त्व या भाष्यात सांगितले आहे. सर्व तत्त्वज्ञानाचा अर्थ आणि सार काय आहे हे सर्व लालित्यपूर्ण भाषेमधे, भावाला महत्त्व देऊन सांगितले आहे.''

[1]लोकमान्य टिळक आपल्या ग्रंथात म्हणतात – ''परमेश्वर काय संदेश सांगतो 'श्रद्धाना मत्परमा भक्ता: ते अतीव मे प्रिया:।' (अ.१२.२०) भगवंतांनीच अर्जुनाला सांगितले की माझे भक्त मला प्रिय आहेत. म्हणून हे भक्त जेव्हा माझे चिंतन करतात तेव्हा त्यांचे योगक्षेम मी करतो – 'योगक्षेमं वहाम्यहम्।' योग म्हणजे अप्राप्य वस्तूची प्राप्ती आणि अप्राप्य वस्तू म्हणजे दहाव्या अध्यायात ज्या सर्व विभूतींची माहिती आहे, त्यांच्या सामर्थ्यांची प्राप्ती तुम्हाला होईल.''

परमेश्वर या सर्व विभूतिस्वरूपांमध्ये आहे. तो परमेश्वर सांगतो आहे की, 'मी तुमचे योगक्षेम चालवीन. माझी ही जी विभूती–रूपे आहेत ती मी तुम्हाला सहाय्याला देईन. त्याने तुमचा प्रपंच सुखाचा होईल.' ''मी त्या विश्वात्मकाकडून पसायदान (प्रसाद) मागून घेऊन तुम्हाला देतो आहे. श्रीगुरूंनीच मला आज्ञापिले आहे, की आता सर्वांना तुझा अनुभव सांग. त्या माझ्या सर्व अनुभवांचे सार 'भावार्थ दीपिकेत' आहे. पसायदान ही त्याची सांगता आहे.' भावार्थ दीपिकेत गीतेतील ज्ञान संवाद आहे. परंतु पसायदानात स्वानुभवाधिष्ठित जे मागून घेतले ते आहे.'' असे सर्वश्रेष्ठ पसायदान जगांत दुसरे नाही. कारण या मधे सर्व तत्वज्ञानांच्या संप्रदायांचा मिलाफ आहे. आणि म्हणून ''भक्तिसंप्रदायाचा, गीता संप्रदायाचा उत्तम मराठी ग्रंथ म्हणजे भावार्थदीपिका होय.'' असे [2]लो. टिळक म्हणतात, 'गीतेच्या अठरा अध्यायांपैकी पहिल्या चोहोंमधे कर्म; पुढील सातांत उपासना आणि त्या पुढील अध्यायातून ज्ञान प्रतिपाद्य आहे.' माउलींनी आपण आपली टीका 'भाष्यकाराते वाट पुसत' सांगितली. परंतु स्वत:चा अनुभव स्पष्टपणे मांडला आहे. तो अनुभव असा आहे की मी त्या सर्वात्मक देवाला बघतो आहे, हा अद्वैताचा आनंद आहे. विभूतीने गुणाकार घेतला व ती विभूती ज्ञानेश्वरांच्या स्वरूपात देह रूपाने जगापुढे आली. ''गीतेचा अर्थ अनेक सरस दृष्टांतांनी फुलवून सांगण्याची ज्ञानेश्वर महाराजांची शैली अलौकिक आहे. श्रीशंकराचार्यांपेक्षा विशेषत: भक्तिमार्गाचे आणि निष्काम कर्माचेही त्यांनी समर्थन केलेले आहे. म्हणून ज्ञानेश्वरी हा गीतेवरचा एक स्वतंत्रच ग्रंथ मानला पाहिजे.'' असा लोकमान्य टिळकांनी ज्ञानेश्वरीचा गौरव केला आहे. याची दोन सूत्रे आहेत. ज्ञान कोरडे असते म्हणून भक्ती सांगितली, नामाचे महत्त्व सांगितले. आणि दुसरे सूत्र म्हणजे–निष्काम कर्म. निष्काम कर्म हे त्यांनी केवळ इतरांना सांगितले नाही. त्यांचे स्वत:चे जे कार्य आहे ते निष्कामच आहे. कार्य संपल्यावर ज्ञानेश्वर रहाणार

---

१. लो. टिळक बा. गं. गीता रहस्य, प्रकाशक – टिळक बंधु, पुणे – १९८६, पान ७२०–२१
२. लो. टिळक बा. गं. गीता रहस्य, प्रकाशक – टिळक बंधु, पुणे – १९८६, पान १६–१७

नाहीत तर त्यांना काय हवे असणार? ''श्रीगुरूंनी जे कार्यकर्म दिलेले आहे ते मी पूर्ण केले आहे, ते निरपेक्ष आहे. कारण त्यांच्याच स्वरूपात विलीन झाल्यावर मला मिळवायचे काहीही राहणार नाही. तुमच्याचसाठी त्या विश्वेश्वराचा प्रसाद मी मागून घेतला आहे. हा प्रसाद मी तुम्हाला वाटणार आणि तुम्हाला त्याचे वचन सांगणार आहे की – 'जो जे वांछील तो ते लाहो.' आता तुमच्यावरच मी त्याच्याकडून काय मागायचे ते सोडीत आहे. कारण मी तुमच्यासाठी मागितले आहे की, – 'जो जे वांछील तो ते लाहो.' ईश्वरा, त्यांची जी इच्छा होईल ती पूर्ण कर. विश्वेश्वराकडून ईश्वर मागायचा का नश्वर मागायचा याचा निर्णय तुम्हीच करा. तुम्ही विवेकी आणि विरागी बनावे.'' ज्ञानेश्वरांनी जे मागितले त्याला विश्वात्मक स्वरूप आहे. हे विश्वात्मक स्वरूप जे विभूतिस्वरूपात आलेलं आहे त्याची ही जबाबदारी आहे. त्यानेच अनेक जीवांना (चल–अचल, सजीव–निर्जीव) निर्माण केले आहे. त्याचीच त्यांच्या जन्म–क्षयाची, पालनपोषणाची जबाबदारी आहे. म्हणून ज्ञानेशांनी विश्वात्मक देवाकडून विश्वकल्याण मागून घेतले. आणि मग तुम्हाला, समजेल की [१]मी विश्वेश्वराकडे हे सर्व का मागून घेतो आहे. यानंतर माउली त्या विश्वात्मकाला मागतात – 'आता विश्वात्मके देवे । येणे वाग्यज्ञे तोषावे ।' या ओवीतील 'आता' या शब्दाचा अर्थ खूप बोलका आहे. 'आता' म्हणजे ज्ञानेश्वर म्हणतात, ''तुमच्या आदेशाप्रमाणे तुमच्या आशीर्वादाने हा 'भावार्थदीपिका' कथनाचा वागयज्ञ, ज्ञानयज्ञ मी मांडला आहे. त्याची पूर्तता आता होते आहे. त्यावेळी म्हणजे 'आता' हे विश्वात्मक देवा, माझ्या श्रीगुरुराया या वाग्यज्ञाने तुमचा संतोष व्हावा. तुम्ही संतोष पावून, संतुष्ट होऊन तुमच्या आशीर्वादाचा प्रसाद हे 'पसायदान' मला द्यावे.'' 'येणे वाग्यज्ञे तोषावे । तोषोनि मज द्यावे पसायदान हे ।' या ओवीतील 'मज द्यावे' हे शब्द ज्ञानेश्वरांनी स्वत: करिता सांगितले नाहीत. प्रत्येक जीवाने सर्वेश्वराकडे स्वत:करिता मागावे. ज्ञानेश्वरांचा भाव, भूमिका अशी आहे की जरी त्यांनी 'मज द्यावे' असे म्हटलेले असले, तरी निष्काम भक्ती असल्यामुळे, 'मज द्यावे' कशासाठी तर तुम्ही मला जे द्याल ते मी या सर्वांनाच वाटीन, म्हणून ही निष्काम भक्ती आहे. 'सर्वजनांना तुमच्या विश्वसत्तेचा अर्थ कळू दे, तुमच्या कृपेचा अर्थ कळू दे. तुमच्या ईश्वरी प्रेमाच्या सत्तेचे सामर्थ्य सर्वांना कळू दे. हे तुझे ईश्वरी सामर्थ्य त्यांनाही जाणवू दे. मग त्यांना कळेल की हे सामर्थ्य असल्यावर त्या ओंकाराचा स्पर्श, त्या सुरांचा स्पर्श, तुमच्या संसाराला झाल्यावर तुमचे जीवनाला सौंदर्य प्राप्त होईल, त्याला चेतना प्राप्त होईल.' अशी त्या विश्वात्मक देवाच्या पसायदानाची भूमिका आहे. 'तोषोनि मज द्यावे'

---

१. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी, पान ८२५

'पण मी (ज्ञानेश्वर) स्वत: करिता काहीच मागत नाही. मी मागतोय ते सर्वांच्यासाठी आहे. श्रीगुरूंनी सोपविलेले धर्मसंकीर्तनाचे, धर्मजागृतीचे, संरक्षणाचे कार्य मी पूर्ण केलेले आहे. श्रीगुरूंना दिलेल्या वचनाची पूर्तता केलेली आहे. रसिक संतश्रोतेहो, तुम्ही अवधान देणारे आहात, मात्यापित्याचे प्रेम देणारे आहात. म्हणून तुम्हा सर्वांसाठी त्या माझ्या विश्वेश्वर श्रीगुरूंकडे मी हे प्रसादाचे दान मागितले आहे.' पसायदान म्हणजे विभूतीने विभूतीकडे मागितलेले दान. ज्ञानेश्वर या सर्वेश्वराने स्वत:कडेच मागितलेले हे दान आहे. या दानात कोणतीही लौकिक गोष्ट मागितलेली नाही. कशाचाही कसलाही उल्लेख नाही. या पसायदानाला स्थलकालाचे बंधन नाही. जे मागतील ते तू दे. या वाग्यज्ञाच्या पूर्तीपूर्वी ज्ञानेश्वर म्हणतात, 'किंबहुना तुमचे केले । धर्मकीर्तन हे सिद्धी गेलें । येथ माझे जी उरले । पाईकपण ।।' [१] 'किंबहुना तुमचे केले म्हणजे, संतश्रोतेहो तुमच्याच कृपेने केलेले हे धर्माचे व्याख्यान शेवटास गेले. मी फक्त श्रीगुरुंचा व तुमचा सेवक उरलो आहे. तुम्ही मला ज्ञानदेव म्हणा, माउली म्हणा, मी तुमचाच आहे. या नंतरचे पसायदानाचे सर्व मागणे व्यक्तिनिरपेक्ष (Impersonal) आहे. 'जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।' मायेमध्ये विसंगती आहे, दुष्ट प्रवृत्ती आहे, एक जीव दुसऱ्याला दु:खी करून सुख मिळविण्याचा प्रयत्न करतो. अज्ञान आहे. मोह आहे. भय आहे. त्यामुळे दुष्ट प्रवृत्ती निर्माण होते. परंतु तुझा आधार असल्यावर दुष्ट प्रवृत्तीतून निर्माण होणारी जी संकटे आहेत, ती नाहिशीच होतील. खलांचे खलत्व, कुटीलपणा नाहीसा होवो. त्या खलांना सत्प्रवृत्तीची आवड निर्माण होवो. त्यांना काय मागावे हे जर कळले नाही तर मी त्यांच्यासाठी मागून घेतो.' 'भूतां परस्परे पडो । मैत्र जीवांचे ।' 'भूत म्हणजे जे अस्तित्वात आलेले आहे, ते जे मायेत आलेले आहेत त्यांना तुझ्या साक्षीने एकमेकांशी प्रेमाचे व्यवहार करू देत. त्यांची एकमेकांशी मैत्री व्हावी. 'वर्षत सकळ मंगळी । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूमंडळी । भेटतु भूतां ।।' 'ईश्वराचे दर्शन, त्याचा प्रसाद मिळविण्यासाठी जनांचाही भाव असा हवा की, ईश्वरा तूच एक आहेस अशीच प्रवृत्ती कायम रहावी. संपूर्ण कल्याणाचा वर्षाव करणाऱ्या ईश्वर निष्ठांचे समुदाय म्हणजे मांदियाळी या भूतलावर निरंतर सर्व प्राण्यांना भेटोत. तू निर्माण केलेल्या प्रत्येक जीवात हाच भाव असावा. तुझ्यावर सर्वांची निष्ठा असू दे. आणि हे एकदोघात नको. सर्व विश्वाचीच अशी मांदियाळी, ईश्वरनिष्ठांचेच समुदाय निर्माण होवोत. या मृत्यूलोकात अशी ईश्वरनिष्ठांची मांदियाळी भरलेली बघण्याची मला आस आहे. 'भाव तोचि देव' मानणारेच सर्व असावेत.' येथे कोठेही

---

१. वै. दांडेकर शं. वा.; सार्थ ज्ञानेश्वरी पान ८२५

स्थळ, काळ, व्यक्ती यांचा उल्लेखही नाही. ज्ञानेश्वरांचा यातला कोणताही विचार हा व्यक्तिसापेक्ष नाही. (It is totally impersonal) 'चला कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणिंचे गाव ।' बोलते जे अर्णव पीयूषांचे ।। कल्पतरू हा मनी इच्छिलेले देणारा वृक्ष आहे, अशी पूर्वपार कल्पना आहे. वास्तवत: वृक्ष हा स्थाई, स्थिर असतो. परंतु ज्ञानेशांनी सकलांच्या इच्छापूर्तीसाठी या कल्पतरूंनाही या संतांच्या मांदियाळीकडे जाण्यासाठी त्यांनाही चालते केले आहे. त्यांची सळसळ, त्यांचा आरव ही इच्छापूर्तीची साद आहे. आणि जेथे हे संतजन काही मागतील तेथे चैतन्यचिंतामणीचा आविष्कार होऊ दे. कल्पवृक्षाप्रमाणेच चिंतामणी हाही चिंतिलेले देणारा आहे. अशा गावात सर्वांना चैतन्य प्राप्त होवो. प्रत्येकाच्या कल्पनेत जे जे काही आहे, ते ते त्यांना प्राप्त होऊ दे. चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वाही सदा सज्जन । सोयरे होतु ।। विश्वेश्वरा आम्हाला काहीही गढूळ आणि अपूर्ण देऊ नकोस. आम्हाला काही अपूर्तता नको. अलांछनीय चंद्र, तापहीन सूर्य, विषगर्भाऐवजी अमृताचे सागर, असे सर्व परिपूर्ण असेल तेच दे. ''किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊनि तिहीं लोकी । भजिजो आदिपुरुखी अखंडीत ।।'' येथेही 'किंबहुना' म्हणजे अहो संतश्रोतेहो ! या त्रिलोकात जे काही चल-अचल अस्तित्वात आले असतील त्यांनी आदिपुरुषास, त्या सर्वेश्वरास अखंडित, नेहमीचे भजावे. व ते सर्व सुखी होवोत. यात ज्ञानेश्वरांनी चराचरांचाही विचार केलेला आहे. तूच निर्माण केलेल्या गोष्टींचा नाश करण्याची वृत्ती नको. सर्वांना आपापल्या ठिकाणी सुखी राहू दे. आस्वाद घ्या, पण विनाश नको. मने-काये-वाचे तुला भजतील त्यांना सुखी ठेव. ''आणि ग्रंथोपजीविये । विशेषी लोकीं इथे । दृष्टादृष्ट विजयें । हो आवें जी ।।'' 'संतश्रोतेहो ! या मृत्यूलोकांत, विशेषकरून हा ग्रंथ ज्यांचे जीवन होऊन राहिला असेल त्यांनी विश्वेश्वरा तुझ्या कृपेने सुखी व्हावे. दृष्ट आणि अदृष्ट यातील भेद जीवाला समजत नाही हे अज्ञान असते. अदृष्ट हा परमेश्वर आहे. माया दृष्ट आहे. म्हणून सर्वांनी इहलोकीच्या व परलोकीच्या भोगांच्या मायेकडे न लागता, तुझ्या स्वरूपाकडे लक्ष ठेऊन सुखी व्हावे विजयी व्हावे. दृष्ट व अदृष्ट यातील जो भेद आहे, तो या सर्व जाणत्या, अजाणत्यांना समजू दे. त्यांना समजू दे की जे दृष्ट म्हणजे इहलोकीचे आहे ते सर्व नश्वर आहे. सतत बदल होत राहणे हा जीवनाचा धर्म आहे. हा त्यांचा विवेक जागृत होऊ दे. आणि जे मिळाले आहे त्यातून शांती, समाधान मिळवून ते विरागी होऊ देत. माझ्यासारखे होण्याचा त्यांना प्रयत्न करू देत. ''येथ म्हणे श्रीविश्वेश्वरावो। हा होईल दान पसावो। येणेवरे ज्ञानदेवो । सुखिया जाला ।।'' आता प्रत्यक्ष विश्वेश्वरालाच ज्ञानेश्वर गवसणी घालत आहेत. कारण हे पसायदान देणारे ते स्वयं आहेत.

संतश्रोत्यांना ज्ञानदेव म्हणतात की, आता मी प्रत्यक्ष सर्वेश्वराला, विश्वेश्वरावो म्हणजेच माझे श्रीगुरूंना या विश्वाच्या मालकालाच मागणी केली आहे. म्हणून 'येथ म्हणे श्रीविश्वेश्वरावो'; आता इथे तो विश्वेश्वर म्हणतो मी ऐकले आहे. त्यांनी सांगितले की ज्ञानदेवा, तू जे मागतो आहेस ते मी दिले आहे. कारण तू हे निष्काम भक्तीने मागतो आहेस. सर्व विश्वात्मक कल्याणासाठी तू हे मागून घेतो आहेस. मीच धन्य झालो. तुला मी हा प्रसाद दिला आहे. हे या पसायदानाचे यश आहे. विश्वेश्वराने कवाडे उघडी केली. म्हणून हे ज्ञानभांडार तुमच्या माझ्यासाठी खुले झालेले आहे. आणि यातला माझा जो अनुभव आहे तो अनुभव मी पसायदानात प्रकट केलेला आहे असे ज्ञानेश्वर पूर्ण समाधानाने सांगतात हे आहे – पसायदानाचे श्रेष्ठत्व. सर्वेश्वर विभूतीने सर्वेश्वर विभूतीकडून मागून घेतलेले अमृतमय दान.

माउली ज्ञानेश्वर व त्यांचे वैष्विक कार्य हा विश्व पटलावर कोरलेला अविनाशी शीलालेख आहे.

उपसंहार

# ज्ञानेश्वर – एक 'तत् त्व'ज्ञ विभूती

ज्ञानेश्वर म्हणजे कायम सहज समाधीत असणारा ज्ञानाचा सागर. लौकिक समाधी देह सोडण्यासाठी घेतली. पण देहभानावर असताना ज्ञानेश्वर सहज समाधी अवस्थेतच असत. ते त्या अवस्थेतून खाली आलेच नाहीत. 'ॐ नमोजी आद्या'– या ओवी पासून ज्ञानेश्वरीच्या शेवटच्या ओवीपर्यंत त्यांच्या उच्चकोटीच्या प्रतिभेने जी उंची गाठली होती ती शेवटपर्यंत खाली आलीच नाही. इतक्या उच्च कोटीची प्रज्ञा व प्रतिभा त्यांच्याशिवाय इतरांना लाभणे केवळ अशक्य, कारण ते स्वत:च एकल कैवल्यांचा पुतळा होते. परमात्म्याने गीता सांगितली व तो स्वत:च रूप बदलून ज्ञानेश्वर महाराज म्हणून 'भावार्थ दीपिका' सांगायला आला. म्हणून 'ज्ञानेशो भगवान विष्णु:' असेच म्हणावे लागते.

तत्त्वज्ञान साध्या शब्दात सांगितले तरी समजण्यास कठीण असते. ज्ञानेश्वर तत्त्वज्ञ आहेत पण कवी मनाचे आहेत. ते रसिक आहेत. त्यांच्यात कवित्व आहे. ज्ञानेश्वरीत आधी त्यांचे काव्य (रसात्मक 'वाक्य') समजावे लागते. वेद वाक्येच आहेत पण त्यात रस नाही. त्यात रस निर्माण करणे, नवरस निर्माण करणे, म्हणजे श्रीरंगाचा रंग दाखविणे हे ज्ञानेश्वरांनी एक कवि म्हणून केले. ते तत्त्वज्ञ आहेत, परंतु ते रूक्ष नाहीत. रसात्मक वाक्यानंतर त्यांचा दृष्टांत आणि नंतर त्या पलीकडचे तत्त्वज्ञान समजावून घ्यावे लागते. ज्ञानेश्वर तत्त्वज्ञान सांगण्यासाठी दृष्टांत सांगतात व मग तो काव्याच्या कोंदणात घालतात. म्हणून ज्ञानेश्वरी समजून उमज पडण्यासाठी (उमज म्हणजे आत्मबोध Realisation किंवा अनुभूती होण्यासाठी) ज्ञानेश्वरीचे निरुपण ऐकणाराला तत्त्वज्ञानाची पूर्ण माहिती असावी लागते, आणि दृष्टांत व काव्य समजण्यासाठी साहित्यशास्त्र माहीत असावे लागते. पुराणे, त्यातील संकेत माहीत असावे लागतात. संकेत म्हणजे (Symbolism). प्रत्यक्षाचे वर्णन करण्यासाठी वापरलेली प्रतिमा माहीत असावी लागते. ज्ञानेश्वरीतील ओवीमध्ये सौंदर्य काय आहे की ग.दि.मा. म्हणतात त्याप्रमाणे 'प्रत्यक्षाहुन प्रतिमा उत्कट'. अरुप जे आहे त्याचे रूप दाखविताना ज्या उपमा उत्प्रेक्षा वापरल्या आहेत त्याने जे अरुप दाखविले आहे त्याचे नुसते दर्शन

होत नाही तर त्याचे सौंदर्य प्रतीत होते हा चमत्कार आहे. ज्ञानेश्वरीच्या ओवीमध्ये प्रत्यक्षाहून प्रतिमा उत्कट असते. ती उत्कटता जाणवल्यावर काव्यातील गोडी कळते. पण लोकांच्या मनात उत्कृष्ट धर्मग्रंथाबद्दल ज्या समजुती असतात त्यामध्ये ज्ञानेश्वरी बसत नाही. ते दैवी आहे (अतिमानवी superhuman) त्रिकालज्ञ तत्त्वज्ञानी ज्ञानेश्वर एक संत आहेत. (सत्+त) ते जे सांगतात ते बुद्धीच्या आकलनापलीकडचे आहे. परंतु त्याचा हेतू लोककल्याण हा आहे.

[१]संत या शब्दाची फोड सत्+त किंवा सन्+त-सन् म्हणजे Real, Essential, True, Good virtuous, chaste, Noble, Worthy, High, Right, Proper, Venerable, Respectable, wise, welfare, Learned, Beautiful, firm, steady, Real entity, ब्रह्म म्हणजे Supreme spirit. या सर्व उच्चकोटीच्या विषेशणांचा समुच्चय जेथे होतो तेथे 'असणारी' स्थिती म्हणजे विभूती म्हणजे सत्+त किंवा सन्+त. त म्हणजे पूर्ण स्थिती. सत्य, चैतन्य, सौंदर्य व आनंदाची पूर्ण स्थिती म्हणजे संतपणा होय. असा संत नेहमी सहज समाधीत असतो. ज्ञानेश्वरांचे सुंदर ते ध्यान असे आहे.

[२]सुंदर ते ध्यान व्यासपीठावरी । वाटे ज्ञान ईश्वरी विश्वासाठी ।।

अर्धोन्मीलित नयन शांतीने प्रसन्न । दावी अधोवदन शरणभाव ।।

प्रकाश निस्तेज ज्ञानाच्या प्रकाशाने । उजळाया त्रिभूवने आत्मज्योत ।।

बैठक साधी सिद्ध योगासनी । अवस्था उन्मनी साक्षित्वाची ।।

कुंतल काळे रुळती मानेवरी । भव्य भाळावरी लांब गंध ।।

अंगकांती दावे चैतन्य नव्हाळी । दिसे कर्णपाळी अतीमृदू ।।

मृदुता लाजवे मऊ नवनीता । निर्मळ वत्सलता माउलीची ।।

बोलते वैखरी शब्द जिव्हाळ्याचा । मराठ मोळ्याचा पैजा जिंकी ।।

शांती सुखा देई कारुण्याची मुद्रा । टाळोनि अभद्रा अज्ञानाच्या ।।

---

१. Apte V. S., The Student's Sanskrit - English Dictionary, page 513

२. काव्यरचना : प्रा. डॉ. माधवराव दीक्षित

विष्णुच कृष्णासी सांगतो गीतेसी । प्राकृत भाषेसी योजुनिया ।।

गुरू आशीर्वाद बोलवितो वेद । अमंगळ भेदाभेद जावा म्हणुनी ।।

ज्ञानेश्वरांच्या देहव्यापाराविषयी माहिती उपलब्ध नाही. (त्यांची जीवनशैली, स्वभाव वैशिष्ट्ये, सवयी, आवडी निवडी, चरितार्थ, व्याधी, उपाधी, नित्यक्रम इत्यादी.) लक्षात राहते ते त्यांचे प्रसन्न ध्यान-देवस्वरुप किंवा साक्षात् ईश्वरत्व. ज्ञानेश्वर म्हणजे कैवल्य (केवळ-पणा) करुणा, दया, प्रेम, क्षमा, शांती, आणि चैतन्य, सौंदर्य यांचा पुतळा. अतिशय कोमल आणि नवनीताप्रमाणे मृदू, अमृताची चव, माउलीचे वात्सल्य, अतींद्रिय प्रसन्नता यांचा संगम. ज्ञानेश्वर द्रष्टे व तत्त्वज्ञानी आहेत. त्यांना संसारात पडलेल्या चरितार्थी भयग्रस्त जीवांचे भूत-वर्तमान-भविष्य स्पष्ट दिसते. काहीतरी बोलण्याचा त्यांचा हेतु जगत्कल्याण हा असतो. ते आपले म्हणणे दृढ संकल्पाच्या स्वरुपात सांगतात व सिद्धी होण्यासाठी विश्वात्मक देवाकडे प्रार्थना सर्वांसाठी करतात. त्यांची सांगण्याची पद्धत अत्यंत सूक्ष्म (subtle), मार्मिक व कलात्मक असते. ते इतरांच्या इच्छेप्रमाणे किंवा मताप्रमाणे आपल्या सैद्धांतिक शैलीत बदल करीत नाहीत. त्यांचे सांगणे सर्व जीवांसाठी अमंगळ भेदाभेदांच्या पलीकडचे अतींद्रिय शक्तीचे सामर्थ्य असलेले असते. ते सांगण्यात कलावंताची अलिप्तता असते. ते साक्षित्वाची व सहाय्यक (उत्प्रेरक) पदार्थाची (Catalytic Agent) भूमिका स्वीकारतात. सांगण्याचे (म्हणजे धर्मसंकीर्तनाचे) कार्य पूर्ण झाले की ते पुन्हा त्या प्रक्रियेपासून अलिप्त व स्वतंत्र होतात. सांगणे हे पारदर्शी व निरपेक्ष आणि अनाग्रही असते. उपदेशकाची भूमिका जरी घेतली तरी जे निखळ सत्य, चैतन्यपूर्ण (शिव) व सुंदर आहे व जे अरुप अतींद्रिय आहे त्याचे दर्शन घडवणे हाच त्यांच्या काव्यालंकाराने नटलेल्या तत्त्वज्ञानाचा उद्देश असतो. तत्त्वज्ञानी परंतु प्रतिभावान कवि अशा असलेल्या ज्ञानेश्वरांनाच ही साक्षित्वाची किंवा अलिप्ततेची भूमिका घेता येते. तेथे देहरुप मनुष्यत्व नसून देवत्व असते. 'देव' असते. 'घेव' नसते. फक्त 'भाव' असतो. तो शेवटी सामान्य जनांना शब्दालंकारात सोप्या पद्धतीने सांगावा लागतो. हा 'योग: कर्मसु कौशलम्' असा कर्मातील कौशल्याचा योग आहे. हे सांगण्यासाठी साक्षित्वाने घेतलेला भाव. करूणेचा, क्षमेचा, निरपेक्ष प्रेमाचा व नम्रतेचा आहे.[१] सर्वात महत्त्वाचा

---

१. वै. बेलसरे के. वि. ज्ञानेश्वरी २००२, मनोगत, पान २

म्हणजे सद्गुरुकृपेबद्दलच्या नम्रतेचा व कृतज्ञतेचा आहे. जो धर्मसंकीर्तनाचा संकल्प केला आहे तो गुरुकृपेनेच सिद्ध होणार आहे अशी नम्र जाणीव आहे.

[१]मज हृदयीं सद्गुरु । जेणे तारीलों हा संसारपुरु ।

म्हणूनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ।। ज्ञा.अ.१.२२

किंवा

येऱ्हवीं तरी मी मूर्खु । जरी जाहला अविवेकु ।

तरी संतकृपादीपकु । सोज्वळु असे ।। ज्ञा.१.७६

अशी विधाने आत्यंतिक नम्रतेची व लीनता दर्शविणारी आहेत. ही लीनता धारण करून धर्मसंकीर्तनाचे कार्य पूर्ण करून 'लीन' ज्ञानेश्वर 'सद्गुरुचरणी' विलीन होतात. त्यामुळे ज्ञानेश्वरांचा 'भावार्थदीपकु' हा 'संतकृपादीपकु' आहे.

तेथ व्यासादिकांच्या मतीं । तेचि मेखळा मिरविती ।

चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ।। ज्ञा.१.९

देखा षड्दर्शनें म्हणिपती । तेचि भुजांची आकृति ।

म्हणौनि विसंवादें धरिती । आयुधें हातीं ।। ज्ञा.१.१०

तरी तर्कु तोचि परशु । नीतिभेदु अंकुशु ।

वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ।। ज्ञा.१.११

एके हाती दंतु । जो स्वभावता खंडितु ।

तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ।। ज्ञा.१.१२

योगियांनाही दुर्लभ अशा ज्या विश्वात्मक देवाचे दर्शन ज्ञानेश्वरांना झाले त्याची तीन प्रतीके किंवा संकेत (symbolism) म्हणजे ॐ कार रूप श्रीगणेश, वाग्देवी सरस्वती आणि सद्गुरुशक्ती या

---

१. वै. बेलसरे के. वि. ज्ञानेश्वरी, पान ९-१२

तिघांनाही ज्ञानेश्वरांनी वंदन केले आहे. व संकल्प केला आहे की ज्ञानेश्वरी ग्रंथाचे पठण, श्रवण व अर्थज्ञानाने सर्व विश्वाला सुखप्राप्ती व्हावी. सर्व जीव प्राणिमात्र 'सुख' रूप व्हावेत. गणेश व सरस्वती यांच्या मूर्तींचे काव्यात्मक वर्णन केलेले आहे. सद्गुरू कृपेचे माहात्म्य एकाच अध्यायात नव्हे तर अनेक अध्यायात सांगितले आहे. कारण सद्गुरु कृपेनेच जीवात्मा आणि परमात्म्याचे (जीवा शिवाचे) ऐक्य वासनाक्षय होऊन घडून येते. हे करताना विभूतिस्वरुप ज्ञानेश्वर लौकीक जीवनात अनुभवी संत तत्त्वज्ञ व प्रतिभासंपन्न कवीची भूमिका बजावतात. त्याकरिता गणेश, सरस्वती व सद्गुरूंचे आशीर्वाद त्यांची प्रार्थना करून घेतात व स्वत:ला 'निवृत्तिदासु' म्हणवून घेतात. जीवनाचे तत्त्वज्ञान सांगतात. गीतेचा भावार्थ अलंकारिक भाषेत खुलवून सांगतात व हा स्फूर्तिविलास गुरुकृपेने घडतो आहे अशी कृतज्ञता व शरणभाव व्यक्त करतात.[१] गुरुदेव रानडे यांच्या मते ज्ञानेश्वरी म्हणजे तत्त्वज्ञान, काव्य आणि रहस्यवाद (mysticism) यांचा संगम असलेला आदर्श टीकाग्रंथ आहे. तत्त्वज्ञानी अंतर्मुख दृष्टी (philosophical insight) आणि काव्य प्रतिभेचा विलास (poetical imagination) हे आदर्श ग्रंथाचे दोन्हीही गुण ज्ञानेश्वरीत आहेत. शिवाय एका तत्वज्ञानी कलावंताप्रमाणे हे सांगताना ज्ञानेश्वरांची भूमिका फक्त साक्षित्वाची, अलिप्ततेची आहे.

ज्ञानेश्वरी निर्माण होऊन सातशेपेक्षा अधिक वर्षे झाली. तिचे स्वरुप (Kaleidoscopic) अनेक चित्रदर्शी असल्याने काळाच्या ओघांत शब्द व शब्दार्थ बदलले. विज्ञानवादी सुशिक्षितांची श्रद्धा ढळली. ''श्रद्धावान् लभते ज्ञानम्'' या न्यायानुसार श्रद्धा ढळल्यावर ज्ञान गुप्त व लुप्त झाले. परंतु समाजातील सामान्य जीवांच्या उत्थापनासाठी ज्ञानेश्वरांनी 'एक गुरू एक शिष्य' ही ज्ञानदानाची व ज्ञानार्जनाची नाथसंप्रदायाची परंपरा गुरूंची आज्ञा घेऊन मोडली व ज्ञानभांडार सर्व विश्वासाठी खुले केले. ज्ञानेश्वरांनी 'हरि मुखे म्हणा' हा हरिपाठ ज्ञानेश्वरी सांगितल्यानंतर सांगितला. ज्या भाष्यकारांजवळ धर्मकीर्तन करण्यासाठी ज्ञानेश्वरांनी वाट पुसली त्यापैकी शंकराचार्यांनीही 'भज गोविंदम्' हे पद निरुपणाच्या शेवटी लिहिले. म्हणजेच ब्रह्मतत्त्वांच्या संकल्पनेपेक्षा हरिनाम संकीर्तनच ईश्वर उपासनेमध्ये सर्वश्रेष्ठ आहे. हे विचार ज्ञानेश्वरांप्रमाणे शंकराचार्यांचेही आहेत.

---

१. वै. गुरुदेव रा. द. रानडे, मिस्टिसिझम् इन महाराष्ट्र – अनुवादक – प्रा. कृ. वे. गजेन्द्रगडकर, 'मराठी संतवाङ्मयातील परमार्थ मार्ग – १९९३

[१]प.पू. संत रामदासांप्रमाणे असलेले ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांनी हेच सिद्ध केले की हरिनामसंकीर्तन भक्तीला श्रुत्ति - प्रामाण्य आहे. महाराज आपल्या उपदेशात म्हणतात, "अखंड नामात राहणे यालाच मोक्ष म्हणतात. अखंड नामांत जगणे यालाच पराभक्ती म्हणतात. अखंड नामात गुंतणे यालाच संतत्व म्हणतात. नामात प्रेम येणे हीच संताची खरी खूण आहे. केव्हाही नामाला विसरू नये. असे जो करील त्याचा भगवंत ऋणी होऊन राहील."

[२]आपल्या शिष्याला ज्ञानेश्वरीचा ९वा अध्याय समजावून सांगताना 'आतां आमुतें गोड करुनि घ्यावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें । साईखडियानें कायी प्रार्थावें । सूत्रधाराते ।।' या ओवीवर आल्याबरोबर त्या शिष्याला थांबवून महाराज म्हणाले, "या ओवीत नवव्या अध्ययाचेंच नव्हे तर सर्व गीतेचे सार आले आहे. आपण बाहुली असून आपल्याला नाचविणारा परमात्मा आहे हे ध्यानात ठेवावे. यात सर्व वेदान्त व सर्व परमार्थ आला."

आत्मज्ञान किंवा निजबोध व्हावा हेच ज्ञानेश्वरी व इतर ग्रंथांचे प्रयोजन आहे. ज्ञानेश्वरी ही केवळ बुद्धिचातुर्याने नव्हे, तर अपरोक्ष अनुभूतीने सजलेली आहे. हेच ज्ञानेश्वरीचे अद्वितीयत्व आहे. भागवत धर्मीय संस्कृतीचा वारसा ज्ञानेश्वरांनी ईश्वर उपासकांना दिलेला आहे. तो भक्त, ज्ञानी, मुमुक्षु, साधक, वाचक या सर्वांच्या मालकीचा आहे. त्यांनी ज्ञानवर्धिनी अमृतानुभव देणाऱ्या ज्ञानेश्वरीची एक तरी ओवी अनुभवावी. कारण ज्ञानेश्वरीबद्दल जितके अधिक सांगावे तितके असे वाटत राहते की अजून आपल्याला काही कळत नाही. ज्ञानेश्वरी ही एक ईश्वरीय 'घटना' असल्याने वेदांनाही ईश्वराचा जसा अंत लागला नाही त्याप्रमाणेच ज्ञानेश्वरीच्या ओव्यांचा गूढ अर्थ कितीही चिंतन केले तरी लागत नाही. ज्ञानेश्वरांनी 'सांगितलेली' ज्ञानेश्वरी म्हणजे अध्यात्मशास्त्राचे 'मर्म' (मुळारंभ) आहे. त्याची उंची व खोली बुद्धीच्या आकलनापलीकडची आहे. अढळ श्रद्धा बाळगूनच ज्ञानेश्वरीतून काय घ्यायचे याची समज व उमज घडू शकेल. ज्ञानेश्वरीवर चिंतन करताना कर्तेपणाची भूमिका घेण्याऐवजी समर्पणाची भूमिका घेतली तरच विश्वात्मक देवाचा प्रसाद मिळेल. ज्ञानेश्वरांनीही हीच भूमिका घेतली आहे. तीच भूमिका ज्ञानेश्वरीवर प्रवचन (निरुपण) करताना, श्रवण करताना

---

१. वै. बेलसरे के. वि. श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय - बोधवचने, पुनर्मुद्रण २०००, पान ३१६-१७

२. वै. बेलसरे के. वि. श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज, चरित्र आणि वाङ्मय पान ३१६-३१७

घेतलीच पाहिजे.

ज्ञानेश्वरांनी सद्वस्तु, ब्रह्म, परमात्मस्वरुप हेच सर्वस्व मानले, ज्या ॐकाररुपी गणेशाला ज्ञानेश्वर परब्रह्म मानतात तो ज्ञानस्वरूप आहे. ज्ञान हे शक्ती स्वरूप आहे (knowledge is power) वाग्देवी शारदा ही गणेशाची अर्धांगिनी आहे. म्हणून परमेश्वराला व त्याच्या आदिशक्तीला ज्ञानेश्वर वंदन करतात, हे भारतीय परंपरेला शिष्टसंमतच आहे. परमात्म स्वरूपाचा अनुभव सद्गुरूंनी दिला म्हणून गुरुपरंपरेविषयी आदरभावाने व नम्र भावाने गुरुंना वंदन केले आहे. परमात्म स्वरूपाचे आद्यपण जगाला कळवून दिले आहे. पण परमात्म स्वरुपालादेखील कोणीतरी त्याला जाणल्या शिवाय चैन पडत नाही, ते रमू शकत नाही (एकाकी न रमते) म्हणून ते ज्ञानेश्वरीसारखा आदर्श ग्रंथ व ग्रंथकर्ता घडविण्याची लीला करते. ज्यांची ही लीला आहे त्याला आनंद होतो व तो आनंद तो उपभोगतो. हा उपभोग घेण्यासाठी स्वत:पासून दुसरे काही निर्माण करावे लागते. म्हणजेच आनंद द्वैतानेच उपभोगता येतो. म्हणून हे जे 'दुसरे' काही परमात्मा निर्माण करतो ते दुसरे म्हणजे 'ज्ञानेश्वर'(देहरुप) व धर्मकीर्तन करणारी 'ज्ञानेश्वरी'.

या द्वैताची जाणीव प्रथम वेदांनी करून दिली. म्हणजेच परब्रह्म हे वेदप्रतिपाद्य – वेदांचा प्रतिपादनाचा विषय आहे. जगात जे जे ईश्वर विषयक वाङ्मय आहे. ते सर्वारंभी वेदांनीच सांगितले. वेदांनी सत् स्वरुपाचे वर्णन केले. ते अतिशय पवित्र, धन्य, पूर्ण आहे. म्हणून ज्ञानेश्वर त्याचा जयजयकार करुन सर्व मंगल करून ज्ञानेश्वरीस आरंभ करतात.

सद्वस्तु, आत्मस्वरुप हे जाणीवमय किंवा जाणीवरुप आहे. सद्वस्तु मुळात (विश्वापासून) निवृत्त (Detached) आहे. पण ते कार्य करण्यासाठी जाणीवेवर येते. सगळीकडे असणारे (विश्वात्मक) चैतन्य स्वत:ला जाणते म्हणून ते स्वसंवेद्य आहे. पण मूळ स्वरुप अद्वैत व आद्य असणाऱ्या चैतन्याला कार्य करण्यासाठी व्दैताचा आधार घ्यावा लागतो. कारण द्वैताशिवाय सगुणाकार अस्तित्वात येऊ शकत नाही. अस्तित्वात येण्यासाठी, प्रकट होण्यासाठी व कार्य करण्यासाठी द्वैत हवेच. त्याच द्वैत भावातून ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी अस्तित्वात येतात. द्वैतातूनच अद्वैत स्वत:चा व स्वत:च्या कार्याचा अनुभव, आनंद व प्रसन्नता भोगते. सत्ता प्रेमाने व द्वैताने स्वत:च स्वत:ला भोगते. हा भाव तोचि देव. अद्वैताचे द्वैत होणे (भव, भवामि) सकलमतिप्रकाशु असे हे

आत्मस्वरूप आहे. 'यो बुद्धेः परतस्तु सः' असे ते स्वयंप्रकाशित सर्व बुद्धींचा प्रकाश आहे (स्वसंवेद्य व स्वयंप्रकाश), जाणीव ही सद्वस्तु आहे व तेच सत्य आहे (feeling is reality - Prof. Whitchead) हे सत्य बुद्धीला आकलन होऊन भावनेत उतरेपर्यंत परमार्थ नाही. याला (Ontological Feeling) 'असण्याची' किंवा 'विभूती' ची जाणीव किंवा भाव असे म्हणतात. मी जिवंत आहे हीच आत्मप्रचिती (आत्मसाक्षात्कार-निजबोध) आहे. हा आत्मसाक्षात्कार घडवणे हे ज्ञानेश्वरीचे प्रयोजन आहे, ते प्रयोजन ईश्वरीय आहे.

'हे अरुपाचे रूप ईश्वरउपासकांना दावीन' ही ज्ञानेश्वरांची प्रतिज्ञा किंवा संकल्प आहे. ही सर्वव्यापी जाणीव म्हणजेच विश्वात्मक देव स्वतःला जाणणे. ते जाणल्यानंतर (जाणीवेवर आल्यावर) ज्ञान होते ते सर्व बुद्धीचा प्रकाश (प्रज्ञा) आहे. जाणीव स्वयंसिद्ध आहे. मी जिवंत आहे ही जाणीव स्वतःचीच आहे. ते इतरांनी सांगावे लागत नाही. हा स्वयंप्रकाश बुद्धीपलीकडचा आहे. (इंद्रियाणि पराव्याहु: = अतींद्रिय) मनापलीकडील बुद्धी, बुद्धीपलीकडे आत्मा व सगळ्यांच्या बुद्धीला प्रकाश देणारा परमात्मा श्रीगणेश आहे. तो ॐकार स्वरुप शब्दब्रह्म आहे. तो सृजनशील (निर्माणकर्ता) आहे. आकाश हे शब्दाचे मूळ आहे. ते अनाघाती (अनाहत) आहे. शब्द हा आकाशाचा धर्म आहे. शब्दब्रह्म म्हणजे जीवनाचे सर्व ज्ञान. हे ज्ञान वाङ्मयाच्या माध्यमातून येते. वाङ्मय हा संस्कृतीचा (सुसंस्कारांचा) कणा आहे. संस्कृतीची मूल्ये वाङ्मयामध्ये (ग्रंथामध्ये) असतात. चिन्मय श्रीगणेश वाङ्मय रुपात प्रकटतो. त्यालाच ज्ञानेश्वर म्हणतात –

हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष ।
तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ।। ज्ञा.१.३

'शब्दब्रह्म अशेष' म्हणजे वेद वाङ्मय ज्ञानेश्वर महाराजांचा ॐकार हा शब्दब्रह्म आहे. तो संपूर्ण भारतीय वाङ्मय आहे. त्या वाङ्मयात भारतीय संस्कृतीचे चित्र आहे. शब्दब्रह्मात (जे वाङ्मयातून प्रगट होते) वेद, श्रृति, स्मृति, पुराणे, सहा दर्शने, काव्य, नाटक हे सर्व आले. प्रमेय म्हणजे जे सिद्ध करावयाचे व ज्याचे दर्शन घडवावयाचे ते "अरुपाचे रुप दावीन."

# विभूति

भूत-म्हणजे अस्तित्वात आलेले प्रगट झालेले.

वि-विशेष अस्तित्व - ईश्वरी योजनेने झालेले.

[१]विभूति-संपत्ती, समृद्धी, कल्याण, महात्म्य, तेज, प्रभाव, ऐश्वर्य शक्ती, आत्मसाक्षात्कार निजबोध, अष्टसिद्धी, लक्ष्मी, वृत्ति, विस्तार (विश्वात्मक) उरलो उपकारापुरता-अणुरणिया थोकडा-आकाशा एवढा-सूक्ष्म विराट-घटना-अघटित घटना-असंदर्भ कैवल्य (Absolute) एकमेवाद्वितीय, भगवद्गीतेतील विभूति-विभूतियोग-साकारलेले पसायदान-निवृत्त असलेली आंतरिक्ष प्रज्ञा (ब्रह्मचैतन्य) कार्य करण्यासाठी जाणीवेवर येते व सगुणाकार होते - (Energy and matter) मुळात ते निर्गुण निराकार-कार्य करण्यासाठी अवतार घेते व प्रकट होते. कार्य पूर्ण झाल्यावर प्रसन्न होते. त्याच्या करुणेचा व प्रसन्नतेचा विस्तार विश्वव्यापक. त्याचे देवत्व म्हणजे घेवत्व नाही - पुण्यात्मा.

साहित्य व काव्याचे (matter) अंतिम प्रयोजन निजबोध किंवा आत्मसाक्षात्कार - सत्य, शिव, सुंदराचा - कला -expression of the pious soul Absolute in sensuous existance - inorganic comes into existance as organic- त्यातून सौंदर्य निर्मिती - काव्याचे प्रयोजन जीवाची आध्यात्मिक उन्नती - प्रसन्नता - उपनिषद - आदर्श काव्य - त्याचे सार गीता - त्या गीतेच्या सत्य शिव सौंदर्याचा आविष्कार (भाव देव होऊन आला) म्हणजे ज्ञानेश्वरी-प्रतिभा स्थिर राहत नाही व कशातही रममाण होत नाही, गुंतत नाही (विचार व संप्रदायात, द्वैतात, द्वंद्वात) अति शुद्धतेतून व पावित्र्यातून सौंदर्याविष्कार-परतत्व स्पर्श ते नश्वर नाही, ईश्वर स्वरुप आहे - (ज्ञानेश्वरी अ.१८-३४७ वाचे बरवे कवित्व..) विश्वाचे जे मूळ (मुळारंभ आरंभ जो निर्गुणाचा) त्या विषयीची अनुभूती काव्यात (पसायदानात) व्यक्त झाली. विश्वचैतन्याची ओळख व त्याने दिलेली प्रेरणा (स्फूर्तिविलास) हे काव्याचे श्रेष्ठ प्रयोजन होय. विश्वचैतन्याची ओळख पटल्यानंतर निर्माण होणारा आनंद स्वत:पुरता मर्यादित ठेवायचा नाही. (आनंदे भरीन तीन्ही लोक-अवघाची संसार, समस्त सम्यक् समष्टी) संसार सुखरुप करणे हेच ज्ञानेश्वरांच्या भावार्थ दीपिकेचे प्रयोजन.

---

1. Apte V. S., Sanskrit- English Dictionary page 516

जीवनमुक्त स्थितीत आनंदाच्या परिभाषेत ज्ञानेश्वरी सांगण्यासाठी वापरलेली परावाणी ही अतींद्रिय वाणी आहे. ही आनंदानुभती म्हणजे 'ब्रह्मानंद सहोदर' आहे – हा आहे आनंदाच्या अनुभवाचा भाव व प्रतिभेतून (प्रज्ञेतून) ही नवनिर्मिती आहे. तिला संदर्भ व मर्यादा नाहीत. अनेक भाष्यकारांना वाट पुसून स्वत:च्या अनुभूतीच्या आनंदाचे स्फुरण स्वत:च्या वाणीत सांगितले व त्या साठी ओवी छंदाची निवड केली. म्हणून ज्ञानेश्वरीचे अर्थ अनंत आहेत. लौकिक अर्थ समजला तरी एकमेव परमअर्थ शिल्लक राहतोच. ज्ञानाला भक्तीची जोड दिल्यावरच या परमानंदाची, ब्रह्मानंदाची अनुभूती येईल. रसनिर्मिती व 'श्री'रंग निर्मिती, याचि देही याचि डोळा त्याचा अनुभव, सरस्वतीला अर्पण केलेले शब्दालंकार, पंचेंद्रियांना येणार सत्याचा-शिवाचा व सौंदर्याचा अनुभव (श्रवण, सुगंध, रस, स्पर्श, अदृष्ट दृष्ट होणे – अरुपाचे रुप दावीन ही प्रतिज्ञा) काव्यालंकाराचा वापर, भक्तिरसाची-शांतरसाची निर्मिती हे फक्त ज्ञानेश्वरीच देऊ करते.

[१]लो. टिळक श्रीमत् भगवद् गीता रहस्यात म्हणतात – "गीतेचा अर्थ अनेक सरस दृष्टांतांनी फुलवून सांगण्याची ज्ञानेश्वरांची शैली अलौकिक असून शंकराचार्यांपेक्षा, विशेषत: भक्तिमार्गाचे व काही अशी निष्काम कर्माचेही ज्ञानेश्वरांनी समर्थन केले आहे. अव्दैत पर्वसायी भक्तिमार्गच ज्ञानेश्वरीचा प्रतिपाद्य विषय आहे. मोक्ष प्राप्तीसाठी भक्तिमार्ग हेच सुलभ साधन आहे."

[२]डॉ. स. रा. गाडगीळ – आपल्या काव्य शास्त्र प्रदीप या ग्रंथात भक्तीची रीत, (ईश्वर निष्ठांची मांदियाळी – अनवरत भूमंडळी- भेटतू भूता), अमोद सुनांसी आले – श्रृतिसी श्रवण मिळाले. श्रृतीचे रहस्य, नामसंकीर्तन, ज्ञानेश्वरांची काव्यविष्कार पद्धती म्हणजे metaphorical thinking आहे असे सांगतात. [३]कृ. पां. कुलकर्णी भाषेची उत्पत्ती सांगताना etymology अद्वैत अमृतानुभव, प्रेमरंग-प्रेमावतार, ज्ञानेस्वर स्वामी (स्व+अ+मी) (स्व+आ+मी) इत्यादी शब्दांचे मूळ अर्थ सांगतात.

---

१. लो. टिळक बा. गं., श्रीमत् भगवत् गीता रहस्य, पान १६-१७

२. डॉ. गाडगीळ स. रा., काव्य शास्त्र प्रदीप, व्हिनस प्रकाशन, पान १२३

३. कुलकर्णी कृ. पा., मराठी भाषा उद्‌गम व विकास, मेहता पब्लिशिंग हाउस, पान ६-७

## ज्ञानेश्वरीचे वाङ्मय स्वरुप-ॐकार गणेश-षड्दर्शने-रसोत्कर्ष धर्मसंकीर्तन

आत्मरूप गणपती, सकलमतिप्रकाशु, बुद्धीला प्रकाश देणारा आहे. म्हणून तो स्वसंवेद्य असून स्वयंप्रकाश आहे. जाणिवेचे स्वरुप आहे, तो गणपती. तो बुद्धीला प्रेरणा देतो. ज्ञान अर्थस्वरूप आहे. शब्दांनी अर्थ व्यक्त होतो. शब्दांनी वाङ्मय बनते. म्हणून गणपती वाङ्मय स्वरुप आहे. गणपती हा ज्ञान - स्वरूप आहे. आणि तो जेव्हा शब्दात व्यक्त होतो तेव्हा तो अर्थरुप होतो. अर्थाला सौंदर्य आहे. म्हणून तेथे लावण्याची ठेव आहे. परमात्मा, आत्मस्वरुप रसमय आहे. म्हणून 'रसो वै स:' गणपतीच्या पायात लहान घुंगरे आहेत. नृत्यात घुंगरे वाजू लागली की स्वरांचे सौंदर्य निर्माण होते. ज्ञानदेवांनी वाङ्मयाची श्रुति, स्मृति, काव्य, नाटक आणि पुराणे ही गणपतीची वस्त्रे सांगितली आहेत. ज्ञानेश्वरांना विश्वात सौंदर्यच दिसते. कारण परमात्मा रसमय आहे. ज्ञानदेवांच्या वाङ्मयात काव्य, नाटकाबरोबरच दर्शनेसुद्धा आहेत. दर्शने बुद्धीचे काम आहे, प्रत्येक संस्कृतीत त्या वाङ्मयात तत्त्वज्ञान असलेच पाहिजे.

तरी तर्कु तोचि फरशु । नीतिभेदु अंकुशु ।

वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ।। ज्ञा.१.११

ज्ञानेशांनी तीन प्रकारचे तत्त्वज्ञान सांगितले आहे. तर्क म्हणजे विश्लेषण. नीतिभूदु अंकुशु म्हणजे राजनीतिशास्त्र. वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे, मुद म्हणजे आनंद. मोदक आनंद देणारा. म्हणजे वेदांन्त खरा आनंद देणारा आहे.

मग सहजे सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु ।

धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ।। ज्ञा.१.१३

गणपतीच्या एका हातात पद्म म्हणजे कमळ आहे. पद्महस्त म्हणजे आशीर्वाद देणारा हात आहे. कमळ हे आत्मविकासाचा संकेत आहे. कमळ म्हणजे सत्कार्यवाद. (जे कारणात अव्यक्त असते ते सत्कार्यवाद) धर्मप्रतिष्ठासिद्धु अभयहस्त. धर्मामुळे इहलोकात व परलोकात पुण्याने सुरक्षितता असते. ही गणपतीच्या हातातील सहा शास्त्रे आहेत.

पहिला तर्कु तोचि फरशु. भारतीय संस्कृतीत ऐश्वर्य लक्ष्मी, हत्तीने दाखवितात. हत्ती म्हणजे जनता. अंकुश म्हणजे शासन. वेदान्त हा मोदक आहे, हा आनंद देणारा महारस आहे. नंतर आहे सत्कारवाद. गणपतीचा तुटलेला दात म्हणजे लोकवार्तिक आणि तंत्रवार्तिक व बौद्धमताचे खंडन. सत्कार्यवाद म्हणजे जे कारणात आहे ते कार्यात येणे. शेवटचा आहे धर्मशास्त्र, समाजाला सुरक्षितता देणारा. ही आहेत ज्ञानदेव या विभूतीने गणेशरुपकाने सांगितलेली सहा शास्त्रे. आपण एरवी जी षड्शास्त्रे म्हणतो ती या विभूतीने मांडलेली सहा शास्त्रे. आपण एरवी जी षड्शास्त्रे म्हणतो ती या विभूतिने मांडलेली सहा शास्त्रे नाहीत.[१]

## भावार्थ दीपिका व पसायदानाचा मुख्य उद्देश

ईश्वरभक्ताला निष्काम कर्म आणि भक्तियोगातून जीवाला आत्मसाक्षात्कार करून देणे हा आहे. या साक्षात्कारातून विश्वात्मक देवाच्या प्रेमसत्तेचा आणि कृपेचा बोध घडावा या संकल्पातून सर्वेश्वराने ज्ञानदेवांचे गुणाकारीरुप घेतले, म्हणजेच ज्ञानेश्वरांचा मृत्यूलोकांत प्रेम अवतार झाला. योगिया दुर्लभ असणाऱ्या विश्वात्मक देवाचे दर्शन ज्ञानेश्वरांना घडले. विश्वात्मक देवाच्या प्रेमसत्तेचा स्वत: अनुभव घेतल्यावर ते अनुभवाचे व ईश्वरावरील श्रद्धेचे, निष्काम कर्म व भक्तीचे ज्ञान सामान्य जीवांना भाषेच्या माध्यमातून ज्ञानेश्वरांनी दिले. वस्तुत: 'शब्देविण संवादिजे' असे असणारे ज्ञान सांगण्यासाठी भाषा, शब्द, भाषालंकार हवेतच. तसेच सर्व समन्वयात्मक तत्त्वज्ञान ('तत् त्वं असि' हे ज्ञान) सर्व भेदाभेद, मतांतरे, परंपरा, संप्रदाय, ज्ञान शाखा टाळून एकसंध समन्वय करून सांगायला हवे. पण ते रुक्ष, नीरस असता कामा नये. त्यात भक्तिप्रेमाचा ओलावा असायला हवा. ज्या 'प्रेमभावे जीव जगी या नटला' (नाट्याचार्य खाडिलकर) तो प्रेमभाव म्हणजे विश्वात्मक सर्वेश्वर होय. हाच सर्वात्मक सर्वेश्वर म्हणजे ज्ञानेश्वर (कुसुमाग्रजांची कविता 'सर्वात्मका सर्वेश्वरा)

---

१. वै. बेलसरे के. वि., ज्ञानेश्वरी, पान ८ ते १५

# ज्ञानेश्वरांची विभूती प्रतिमा

श्रीपाद बल्लभाचा । संकल्प भाकित ।

जो श्री सत्यदत्त । मूळ मूळ ।।१।।

त्याच्याच इच्छेने । घेई अवतार ।

बने ज्ञानेश्वर । भक्तिमार्गी ।।२।।

आळंदी क्षेत्रांत । सिद्ध बेटावर ।

पुण्य भूमीवर । पुण्यकर्मी ।।३।।

समर्थ एकमेव । सर्वांचा ईश्वर ।

बने ज्ञानेश्वर । बहुरुपी ।।४।।

जगी संतरुपी । साक्षात् ईश्वर ।

करावया उद्धार । अभद्रनाशी ।।५।।

देव वाणीतून । देई गीतासार ।

उत्स्फूर्त उच्चार । तत्त्वज्ञानी ।।६।।

ईश्वरी योजनेचे । कार्य उभे केले ।

धर्मकीर्तन केले । बोधासाठी ।।७।।

तत्त्वज्ञानी कवी । प्रतिभेने देवकी ।

बोलतसे नेमकी । संतवाणी ।।८।।

कृती जी संतांची । सद्गुरु आदेशाची ।

वाट प्रचितीची । दावियली ।।९।।

तळमळ ज्ञानियाची । विश्वकल्याणाची ।

केवळ साक्षित्वाची । भूमिका त्याची ।।१०।।

स्वत:च घेऊन । परतत्व स्पर्श ।

करी उपदेश । अनाग्रही ।।११।।

तत्व जीवनदर्शी । अलंकृतभाषी ।

आचार विचारांशी । जोडीतसे ।।१२।।

स्वत:साठी काही । मागणे न राही ।

ऐसा हा विदेही । देहामाजी ।।१३।।

नसे व्यक्ति, विभूति । ज्ञानियांचा राजा ।

गुरु महाराजा । देव त्याचा ।।१४।।

कराया धर्मकीर्तन । ज्ञान विद्यापीठ ।

देई वस्तुपाठ । अतींद्रिय ।।१५।।

विचारी विवेकी । तैसाच विरागी ।

उपभोगुन त्यागी । दु:खे सारी ।।१६।।

ज्ञानी पुरुष संत । देवाचा प्रेषित ।

साधाया विश्वहित । अवतारी ।।१७।।[१]

## तत्त्वज्ञान निरुपणाची ज्ञानेश्वरांची शैली

ज्या ॐकारस्वरुप गणेशाला नमन करून ज्ञानेश्वर तत्त्वज्ञानाचे काव्यात्मक निरुपण करतात त्याचे वर्णवपु (वर्णरूप) शरीर निदोष आहे. वाङ्मय वाक्यांचे असते, वाक्य शब्दांचे असते, शब्द अक्षरांचे बनतात त्याला वर्ण म्हणतात. गणेशाचा रंग वेदवाङ्मयाच्या वर्णाचा आहे, आणि तो सांकेतिक आहे. तो रंग गुलाबी म्हणजे प्रेमाचा आहे. जे वेदवाङ्मयात आहे त्याच्या अर्थाचे विवेचन ज्ञानेश्वरीत ओवीबद्ध काव्यात आहे. म्हणून वाक्ये काव्याच्या स्वरुपात रसाळ झाली आहेत

१. काव्य रचना: प्रा. डॉ. माधवराव दीक्षित

(रसात्मकं वाक्यं काव्यम्) या काव्यातून गणपतीचा गुलाबी रंग हा रक्तवर्णी जीवनाचा रंग बनतो (तो सांकेतिक म्हणजे symbolic आहे) तो रंग लज्जेचा रक्तिमा दर्शवितो. ज्ञानेश्वरांना सौंदर्यापलीकडे काही दिसतच नाही. सर्व भद्र मंगलदायक दिसते.

श्रृति स्मृति हे गणेशाचे अवयव आहेत. श्रृति ही अंत:स्फूर्तीने, प्रतिमेने निर्माण होते. वेदातील मंत्र स्फुरले आहेत, ते रचलेले नाहीत. स्मृतीतला भावार्थ प्रतिभेने येतो. तो गूढ व सांकेतिक असतो (प्रतिकात्मक symbolic).

श्रृतीचा अर्थ स्मृती स्पष्ट करते. श्रृतीतून स्मृती आपोआप जागृत होऊन बाहेर येते. तसे गणपतीच्या श्रृतिरुप शरीरातून स्मृतिरुप अवयव बाहेर आलेले आहेत. स्मृती हे बुद्धीचे व तर्काचे काम आहे. बुद्धी व तर्क यातून गणपतीचा आंगिकभाव (सर्वांगसुंदरता) व्यक्त होतो. पुराणे कथारुपाने तत्त्व सांगतात. त्याचे वर्णन ज्ञानेश्वर 'अष्टादश पुराणे । तीचि मणिभूषणे' असे करतात. सर्वच वेदवाङ्मय, पुराणे ही शब्दरत्नांची खाण आहे. षट्दर्शने तर्कप्रधान आहेत. काव्यनाटक रसप्रधान आहे. श्रुतीला आर्षप्रयोग म्हणतात. त्याला व्याकरण नाही. तो जसा स्फुरला तसा नाही. पण ज्ञानेश्वरीतला ओव्यांचा छंद हा अनुष्टुभ् – म्हणजे सरस्वतीचा छंद आहे. श्रुतीचा अर्थ प्रतिभेने जो काढला तो ज्ञानेश्वरीत आहे. तत्त्वज्ञान संस्कृतीचे असते तसे विज्ञानाचे (विशेषज्ञानाचे –Micro or Fragmentary) असते. पण तत्त्वज्ञानाचे जे अंतिम प्रश्न आहेत. (उदा. हे जग का निर्माण झाले? या जगाचा निर्माता कोण? जगाचा अंत केव्हा होणार? या जगाची व्यवस्था कशी आहे? माणूस जन्माला का येतो? जगात दु:ख का? ईश्वर आहे की नाही?) प्रत्येक संस्कृतीच्या तत्त्वज्ञानात हे अंतिम प्रश्न असतात. ते सोडविण्याचे प्रयत्न अनेक विचार प्रवाह (schools of thought) करीत असतात. या प्रश्नांची उत्तरे वेद पुराणात मिळतात. कारण दोन्हीही 'खरे' आहेत. पण सांगायच्या पद्धतीतून प्रमेये निमाण होतात. 'पदपद्धती खेवणे । प्रमेय रत्नांची ।' सांगण्याची पद्धत (पदपद्धती) खेवणे म्हणजे प्रमेय रत्नांसाठी कोंदण बनवणे (शब्द, अलंकाराचे) या प्रक्रियेतून पुन्हा प्रमेयरत्ने निर्माण होतात. ही प्रमेये ज्ञानेश्वरांनी उत्तम भाषेत घातली आहेत.

नाना प्रमेयांची परी । निपुणपणे पाहता कुसरी ।
दिसती उचितपदे माझारी । रत्ने भली ।।

काव्य, नाटक, नृत्य यांची कोंदणे क्षुद्र घंटिका (लहान घुंगरासारखे) आहेत. ती सुभाषिते असतात. म्हणजेच सुंदर शब्द रचनेत सुंदर प्रमेये किंवा सिद्धांत घातलेले असतात. गणेशाच्या पायातील पैंजणात या घुंगऱ्या (घुंगरातील रत्ने) आहेत. शब्दब्रह्म निर्माण करण्यासाठी वापरलेली ज्ञानेश्वरांची भाषा (वाणी) अशरीरी, दैवी, वैखरी (सर्व व्यक्तापलीकडची) आहे. त्यामुळे सर्व विश्वाचे सार व मर्म यांचे दर्शन ज्ञानेश्वरच घडवू शकतात. त्या निरुपणात सहा दर्शनाचे वर्णन (schools of philosophy) ज्ञानेश्वरांनी केले आहे.

तरी तर्कु तोची परशु । नीतिभेदु अंकुशु ।

वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ।। ज्ञा.१.११

एके हाती दंतु । जो स्वभावता खंडितु ।

तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ।। ज्ञा.१.१२

मग सहजे सत्कारवादु । तो पद्‌करु वरदु ।

धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ।। १.१३

सत्कार्यवाद - जे कारणात आहे ते कार्यात येईल. ज्ञानेश्वरांच्या रुपाने आदिकारण जाणीवेवर येऊन कार्यात आले. त्यामुळे प्रसन्नता आली. कारण भगवंत सेवा, गुरुच्या आदेशानुसार करण्याचा भाव ज्ञानेश्वरांचा होता. तो भाव म्हणजेच देव. (विभूतिमत्त्व) भावार्थ दीप लावून अमंगळ भेदाभेद, शूद्रपणा व अंधार ज्ञानेश्वरांनी दूर केला. त्यासाठी शब्दातून वाङ्मयरुपी, ॐकाररुपी गणेश निर्माण करून, त्याला वंदन करून ज्ञानेश्वरांनी ईश्वरी सामर्थ्य व आशीर्वाद घेतला. विश्वासाठी प्रसाद (प्रत्यक्ष साक्षात दर्शन) मागितला. भगवंताचा ध्यास घेऊन ज्ञानेश्वरांनी आत्म्याची ज्ञानकला वाढविली. त्याबद्दलचे प्रेम वाढविले. प्रेमाची कर्मकला वाढविली व आत्म्याला सर्वांग परिपूर्ण केले. विश्वात्मक देवाचे वाङ्मयामधे दर्शन घडविले. त्या वाङ्मयातील तत्त्वज्ञान कलात्मक दृष्टीने सांगितले. दर्शन हे बुद्धीचे काम आहे. परतत्त्व स्पर्शाची अनुभूती हे भावाचे म्हणजेच स्थित्तप्रज्ञ, साक्षीदेवाचे काम आहे. तो स्थितप्रज्ञ, संजीवन समाधीत नेहमी असणारा ज्ञानस्वरुप विश्वात्मक सर्वेश्वर म्हणजे ज्ञानेश्वर होय.

ज्ञानेश्वर स्थितप्रज्ञ होते. त्यांची भाषा कोणती? याचे उत्तर भगवाद् गीतेत आहे. 'स्थितप्रज्ञस्य' का भाषा । समाधिस्तस्य केशव' असे भगवान श्रीकृष्ण म्हणतात. स्थितप्रज्ञ म्हणजे जो भ्रममूलक व भ्रम (असत्य) निर्माण करणारा आभास आहे. त्या आभासामध्ये ज्यांची प्रज्ञा स्थिर झाली आहे. असा आत्मा. तो संपूर्ण सत्याचा बोधी आहे. सदा संतुष्ट, शांत व समाधानी आहे. गीतेतील श्लोक 'प्रजहाति यदा कामान्... सर्वान् पार्थ मनोगताम्' – त्यांचे सूक्ष्ममन विराट आहे. म्हणून ते किडा मुंगीचे-सर्व प्राणिमात्रांचे मनोगत जाणतात. प्रेम हा त्याचा स्थायीभाव आहे. सर्व निरंतर, निष्कपट, अमर्याद प्रेमाचे ते अवतारी शांतिब्रह्म आहेत. देह घेतल्यावर व समाधी नंतरही ते समाधी अवस्थेत आहेत. ते सर्व जीवांच्या निकट आहेत. ते सर्व जीवांचे चैतन्यमय प्राण आहेत. त्यांच्यातील चैतन्याचे ब्रह्मचैतन्याशी सतत ऐक्य झाले होते व आहेही. ते कैवल्याचा सत्य-शिव-सुंदरचा पुतळा आहेत. त्यांची समाधी संजीवन प्राणाधिष्ठित आहे. ते ब्रह्मा-विष्णु-शिव स्वरुप आहेत. ते जीवांशी ज्ञानेश्वरीतून संवाद साधून विसंवाद व अविद्या दूर करतात. ते स्वयंप्रकाशु आहेत व अज्ञान, मोहमायेचा अंध:कार तेजाने घालवून टाकतात. पण त्यांचे तेज ताप देणारे प्रखर नसून, तापहीन मार्तंडासारखे आहे. त्यांच्या प्रेमाचे चांदणे अलांछित चंद्राच्या शीतल छाये सारखे आहे.

ज्ञानेश्वर तत्त्वज्ञान लिहीत नाहीत, ते तत्त्वज्ञान सांगतात. हे सांगणे देववाणीचे आहे. ईश्वराला जेव्हा एकटेपणा सहन होत नाही, आणि या ब्रह्मचैतन्याला जेव्हा बोलावेसे वाटते, कारण त्याला स्वत: होऊन बोलता येत नाही. म्हणून त्याला जे बोलायचे असते त्यासाठी त्याला गुण आणि आकार रुप देह घ्यावा लागतो. तो देह म्हणजे ज्ञानेश्वर, आणि म्हणून ज्ञानदेवांना विभूती म्हणायचे. सगुण रुप का घ्यायचे, देह रुपात का अवतार घ्यायचा? तर त्याचा एकमेव हेतू लोककल्याण हा आहे. या विभूतीच्या भोवती पूर्वीच्या सर्व विभूतींचे वलय असते. सत् म्हणजे असणे. असा संत नेहमी समाधी अवस्थेत असतो, हीच ती तूर्यावस्था. तो देहभावावर नसतो. त्याचा देहभाव आपल्याला दिसतो, परंतु तो तिथे नसतो, तो विभूतिस्वरूपच असतो. हे जे विभूतिस्वरूप आहे याचे प्रयोजन काय? भूत म्हणजे अस्तित्वात येणे. ज्ञानेश सांगतात – 'जे जे भेटे भूत । त्यासी मानी भगवंत।' भगवंतच सारखा होत असतो. त्यापैकी ईश्वरीकोटीचे होणे म्हणजे ज्ञानेश्वर भगवंताचे

प्रत्यक्ष रूपच. ज्ञानेश्वर या नव्या रूपात आहे. या विभूतिस्वरूपाचे प्रयोजन म्हणजे ती भावार्थ सांगण्यासाठी अवतरली. भावार्थातील मूळ धातू ''भव'' आहे. होणे, नाहीतर पोकळी, निराकार, निरामय. पोकळीतून जे अस्तित्वात आले ते भव-संभव, मंत्रातही हेच आहे. ॐ भु:भुवस्व:. हा निर्गुण निराकार ईश्वर भूत होतो. म्हणजे गुण आकाराच्या स्वरूपात अस्तित्वात येतो. तो दृश्य व्हावा म्हणून तो देहाचा आधार घेतो. या ईश्वराला काहीतरी सांगण्यासाठी प्रकट व्हायचे आहे, कारण तो निर्गुणात बोलू शकत नाही. तसे जे ब्रह्मचैतन्य आहे त्याला जर जीवनावर गीतेच्या स्वरुपात भाष्य करायचे असेल तर, निरुपण करायचे असेल तर हे चैतन्य भव होते आणि भूत होते. भूत म्हणजे भूति, भूत म्हणजे 'विभूती'. विशेषत्वाने जे भूत होते ते म्हणजे 'विभूती'. ज्ञानेश्वर ज्यांना आपण अवतार म्हणतो तो मृत्यूलोकांत ज्या विशेषत्वाने भूत स्वरूपात आलेला आहे म्हणून त्याला आपण विभूती, अवतार म्हणतो. या अवताराचे प्रयोजन आहे. भावार्थ सांगणे आणि पसायदान मागणे, ही महत्त्वाची उद्दिष्टे आहेत.

कृष्णाने अर्जुनाला काय सांगितले यावर भाष्य केले, पण स्वत:चे विचारही सांगायचे होते. तोच हा भावार्थ. भव ही घटना काय आहे याचा अन्वयार्थ सांगितला. आणि मग ज्यांना तो अर्थ सांगितला त्यांच्यासाठी काही मागून घेतले पाहिजे म्हणून स्वत:च स्वत:कडे मागणं मागितले आहे. विश्वात्मक देवाने ज्ञानेश्वर अवतार घेऊन स्वत:च स्वत:कडे मागणे मागितले आहे. म्हणजे संकल्प कोणी केला? विश्वात्मक देवाने संकल्प केला की मी या अवतार रूपाने प्रकट होतो. कारण चैतन्य निराकारात काही कार्य करु शकत नाही. माया, अज्ञान यांचा अंध:कार घालविण्याचे कार्य करावयाचे आहे. त्या साठी शब्दज्ञान आहे. वेद, उपनिषदे, गीता इत्यादींचे सार ज्ञानेश्वरी आहे. परंतु या शब्दवाङ्मयाची अनुभूती जनांना आली पाहिजे म्हणून ज्ञानेश्वर हा अवतार. जन कल्याणासाठी हा ज्ञानेश्वर विभूती अवतार धारण केला. विभूती ही मुळात निराकार असते. परंतु जनांसाठी ती अवतारी विभूती झाली. जो स्वत:ईश्वरी अवतार आहे तो कोणाची उपासना करणार? जसे सागराचा थेंब सागराची मर्यादा, उपासना काय सांगणार? पसायदान जर मागायचे असेल तर त्या सर्वात्मकाला प्रसन्न करून घेतले पाहिजे. म्हणजे मी मलाच, म्हणजे ईश्वराने ईश्वरालाच प्रसन्न करून घेतले पाहिजे. म्हणजेच निवृत्तिनाथ. जो स्वत:च प्रसन्न आहे त्याला स्वत:साठी काही

मागायचेच नाही. त्याचे सगळे मागणे इतरांसाठीच आहे. जे अज्ञानी आहेत, अप्रसन्न आहेत, आणि जे मायामोहाच्या अंध:कारात, लडबडले आहेत त्यांनासुद्धा ती प्रसन्नता मिळवून देण्यासाठी हा 'भावार्थ दीप' आहे. भावार्थ दीप हे नाव विशेषत्वाने घेतले आहे. याला तत्त्वज्ञान असे म्हणलेले नाही. या भावार्थ दीपिकेचे प्रयोजन ईश्वरभक्ताला निष्काम कर्मयोगातून आणि भक्तियोगातून आत्मसाक्षात्कार घडवून देणे. हा या मागील एकमेव उद्देश आहे. या साक्षात्कारातून विश्वात्मक देवाच्या प्रेमसत्तेचा आणि कृपेचा बोध व्हावा, या संकल्पातून सर्वेश्वराने ज्ञानदेवाचे गुणाकारी रूप घेतले. म्हणजेच ज्ञानदेवांचा या इहलोकात प्रेमावतार झाला. आणि त्यांचा अधिकार हा होता की ईश्वरउपासनेतील जे अनेक योग आहेत त्यावर प्रभुत्व मिळविलेले जे अनेक योगी आहेत त्या योग्यांनासुद्धा दुर्लभ असणाऱ्या देवाचे दर्शन ज्ञानेश्वरांना झाले. म्हणजे ईश्वरानेच स्वत:चे दर्शन घेतले. हे दर्शन अनेक रूपात घेतले. ज्ञानेश्वर देहभावावर नव्हतेच, आणि ते परावाणीतून बोलत होते. निवृत्तिनाथ या विभूती-गुरुतत्त्वाचे सामर्थ्य त्यांच्या मागे उभे होते. त्यांना याबद्दलची कृतज्ञताही होती. अशी ही ज्ञानेश्वरांची अशरीरी वाणी आहे, अतींद्रिय आहे. त्या वाणीतून ज्ञानेश्वरी बोलली-सांगितली गेली. विश्वात्मक देवाच्या प्रेमसत्तेचा अनुभव स्वत: घेतल्यावर ते अनुभवाचे, ईश्वरीश्रद्धेचे निष्काम कर्म व भक्तिज्ञान त्यांनी सामान्य जीवांना भाषेच्या माध्यमातून म्हणजे शब्दज्ञानाने दिले. वस्तुत: हे ज्ञान 'शब्देविण संवादिजे' असे आहे. परंतु मृत्यूलोकात शब्द वापरलेच पाहिजेत. संतलोक एकमेकांना भेटतात त्यावेळी काहीही बोलत नाहीत. कारण स्वत:चेच रूप ते समोरच्या संतात पाहतात. (ज्ञानदेवांनी पासष्टीत चांगदेवांना हेच सांगितले आहे) 'शब्देविण संवादिजे' असे ज्ञान सांगण्यासाठी शब्द, भाषा, अलंकार पाहिजेतच. तसेच सर्व समन्वयात्मक तत्त्वज्ञान - 'तत्त्वं असि'। हे सर्व भेदाभेद, मतांतरे, परंपरा, संप्रदाय, ज्ञानशाखा टाळून एकसंघ समन्वय करून सांगायला हवे. तेच ज्ञानेश्वरांनी सांगितले आहे. अरूपाचे दर्शन जर घडवायचे असेल तर या सर्व वाद, मतांतरे यांच्या पलीकडचे सांगायला पाहिजे. म्हणून ज्ञानेश्वरांनी सांगितलेले तत्त्वज्ञान निखळ Absolute आहे. संदर्भरहित आहे. त्याला स्थळ, काळ, व्यक्तिचा संदर्भ नाही. हे निव्वळ सत्यदर्शन आहे. हे जे समन्वयात्मक तत्त्वज्ञान प्रेमाच्या स्वरुपात सांगायचे ते नीरस असून चालणार नाही. म्हणून त्यात शब्दालंकार, काव्यालंकार हवे आहेत. त्या काव्यालंकारातून

अनुभवाच्या जवळ जाता येते. ज्ञानेश्वरीच्या सुमारे नऊहजार ओव्यातून ज्ञानेश्वरांनी एकही विषय उपमा, दृष्टांताशिवाय संपविलेला नाही. या सर्व ओव्या 'झालेल्या' आहेत. ज्ञानेश्वरांनी रचिलेल्या नाहीत. आणि मग ते कार्य थांबले. मग ते कार्य विश्वात्मक देवाने ज्ञानेश्वर रूप घेऊन पूर्ण केले आणि त्यानंतर पसायदान दिले आहे. अशी ही एक ईश्वरी अतींद्रिय घटना आहे. ज्ञानेश्वर हे देहस्वरूप नसून विभूतिस्वरूप आहेत. चैतन्याने ज्ञानेश्वर हे देहरूप धारण केलेले आहे म्हणून त्यांना अयोनिज म्हणता येणार नाही. परंतु ते जन्मापासूनच सहज समाधी अवस्थेतच होते. देहभाव नव्हताच. अन्य संतांचे संदर्भ ज्ञानेश्वरांना लागू पडत नाहीत. अन्न, वस्त्र, निवाऱ्याचे संदर्भ ज्ञानेश्वरांच्या कोणत्याही लिखाणातून आलेले नाहीत. संजीवन समाधी पर्यंत समाधी अवस्थाच होती. देहाचे प्रयोजन संपल्यावर या संजीवन समाधी अवस्थेतच देह विसर्जित केला आणि संजीवन अवस्थेत गेले. म्हणून ज्ञानेश्वर हे प्राणस्वरूप आहेत. या संजीवन समाधी अवस्थेतही ते प्राणस्वरूप आहेत. संजीवन म्हणजे 'मी आहे'. देहात असतानाही व नसतानाही ते प्राणधारी आहेत. म्हणूनच कोणतेही लौकिक संदर्भ ज्ञानदेवांचे संदर्भात ऐकायला मिळत नाहीत. मिळणारे संदर्भ विभूतिस्वरूपाशी समन्वयित (गम्य) Relevant नसतात. ज्ञानेश्वरांचे विभूतिस्वरूप अस्तित्व म्हणजे प्रेमभाव. ते प्रेमावतार आहेत. हा प्रेमभाव म्हणजे विश्वात्म सर्वेश्वर आहे, आणि तेच आहेत देहधारी ज्ञानेश्वर. म्हणून या सर्वात्मक सर्वेश्वराला प्रार्थना केलेली आहे. ही प्रार्थना ज्ञानेश्वरांनी स्वरूपालाच केलेली आहे. म्हणून जेथे प्रेम आहे तेथे भय नाही. निर्भय झाल्यावर दु:ख आणि पीडा असल्या तरी मोक्ष मिळतो. म्हणून ईश्वर भक्तीतून मोक्ष हे साधन दिलेले आहे. आणि हे या जीवनातच मिळवायचे आहे. निष्पापतेतून, निरागसतेतून जे प्रेम निर्माण होते त्या प्रेमाचे सौंदर्य ज्ञानेश्वरीत आहे. म्हणून ज्ञानेश्वर स्वत: सत्य शिव सुंदर आहेत. त्यांच्या कडून विश्वशक्तीने जे कार्य करवून घेतले तेही 'सत्य शिव सुंदर' आहे. सत्य शिवसुंदराचा अनुभव व दर्शन यांचा प्र सा द – प्रत्यक्ष साक्षात दर्शन ही ज्ञानेश्वरीची फलश्रुती आहे. ही फलश्रुती इतर संत वाङ्मयातून मिळेलच असे नाही. कारण इतर ग्रंथ जरी सौंदर्यस्वरूप असले तरी त्यामधे व्यक्ती, स्थल, काल यांचे संदर्भ आहेत. पसायदानातील 'मज' हा सर्व जीवात असलेला 'ज्ञानेश्वर' आहे. ज्ञानेश्वरीत ज्ञानेश्वरांचे नाव फक्त पसायदानाचे शेवटी 'येणे वरे ज्ञानदेवो सुखीया जाला' यात आहे. इथे ज्ञानाचा जो विश्वात्मक

ईश्वर तो सुखीया जाला. हा संदर्भ व्यक्तिस्वरूप नाही. म्हणून ज्ञानदेवांना व्यक्तिस्वरूप न देता ते विभूतिस्वरूप आहेत असेच म्हणावे लागते.

QQQ

# संदर्भ सूची


१. डॉ. अभ्यंकर शंकर, संत ज्ञानेश्वरांचा भक्तियोग, प्रका. - आदित्य प्रतिष्ठान, पुणे - १९९२

२. बहिरट भा. यं. : संत वाणीचा अमृत कलश, प्रका. पंढरपूर संशोधक मंडळ १९७५

३. बावकर रमेश : 'ज्ञान तेच देव' प्रका. रमेश बावकर आवृ. ५ वी. २००६.

४. बेलसरे के. वि. : ज्ञानदेवांचा हरिपाठ (सार्थ), त्रिदल प्रकाशन १९९६.

५. बेलसरे के. वि. : सार्थ श्रीमत दासबोध प्रका. समर्थ सेवा मंडळ, सज्जनगड (सातारा) १० वी आवृ.१९९६

६. बेलसरे के. वि. : ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय, त्रिदल प्रकाशन, पुनर्मुद्रण २०००,

७. बेलसरे के. वि. : ज्ञानेश्वरी खंड पहिला, अमृतानुभव ज्ञानवर्धिनी ट्रस्ट. मुंबई २००९.

८. डॉ. प्रल्हाद वडेर : संपादक 'ज्ञानेश्वर महाराज: चरित्र, कार्य आणि तत्त्वज्ञान २००९.

९. भगवत्‌गीता-जशी आहे तशी : भक्तिवेदांत बुकट्रस्ट तेरावे मुद्रण २००५

१०. प्रा. भट नम्रता : सकल संत चरित्र गाथा, स्वप्नील प्रकाशन १९९८.

११. भिंगारकर श्री. र. : महासाधु श्रीज्ञानदेव चरित्र. प्रसाद प्रकाशन, पुणे १९६२ (मूळ १८८६)

१२. भंडारे संदेश : वारी एक आनंद यात्रा, मनोविकास प्रकाशन, पुणे, २००८.

१३. डॉ. सुधाकर भोसले, प्रा. सुधाकर जोशी : ज्ञानेश्वरी अध्याय १२ वा. वैभव प्रकाशन, पुणे १९७१

१४. दांडेकर रां. वा. : 'श्री ज्ञानदेव', प्रकाशक - ग.गं. जांभेकर, पुणे. १९३२.

१५. दांडेकर शं. वा. : ज्ञानदेव चरित्र ग्रंथ व तत्त्वान गणेश प्रिंटर्स, पुणे १९३२.

१६. दांडेकर शं. वा. : श्री ज्ञानदेवांचे जीवन विषयक तत्त्वज्ञान. प्रका. नागपूर विद्यापीठ १९५५.

१७. दांडेकर शं. वा. : सार्थ ज्ञानेश्वरी, अवृत्ती ८वी, स्वानंद प्रकाशन १९८६.

१८. दांडेकर शं. वा. : श्री ज्ञानदेव चरित्र, प्रका. वारकरी प्रकाशन मंडळ, नागपूर १९९१

१९. ज्ञानेश्वरी-गूढार्थ दीपिका : गीता प्रेस, गोरखपूर संवत २०६५

२०. देगलूरकर धुंडामहाराज : हरिपाठ विवरण अर्थात भक्तिशास्त्र, प्रकाशक भानुदास धुंडिराज देगलूरकर, देगलूरकर मठ, पंढरपूर शके.१९२०.

२१. डॉ. ढेरे अरुणा : अर्ध्या वाटेवर नवचैतन्य प्रकाशन, मुंबई २००२

२२. ज्ञानेश्वर चिंतन : संपादक - डॉ. वसंत जोशी, प्राज्ञ प्रकाशन, वाई १९७६ (लक्ष्मण शास्त्री)

२३. डॉ. दीक्षित मा. चि., 'श्री साँई म्हणे', पान १४.

२४. डॉ. दीक्षित मा. चिं., ज्ञानेश्वर काव्यरचना, २०१०.

२५. हेमंत राजाराम : ज्ञानदेवांच्या अमृतानुभवाचा छंदानुवाद, प्रकाशक - प्रसाद कुलकर्णी, मुंबई २००८

२६. डॉ. गाडगीळ स. रा. : काव्य शास्त्र प्रदीप, व्हिनस प्रकाशन

२७. गीता प्रेस : श्री. नामदेवांची गाथा, गोरखपूर संवत २०६४

२८. गीता प्रेस : श्री एकनाथी भागवत, गोरखपूर, चतुर्थ संस्करण, संवत २०५६

२९. गीता प्रेस : श्रीमद् भगवतगीता, मूळ, पदच्छेद, अन्वयार्थ व सुगम टीका गोरखपूर संवत २०५५

३०. गीता प्रेस : हरिपाठ सार्थ विवरण - गोरखपूर चतुर्थ पुनर्मुद्रण संवत २०६४

३१. डॉ. इनामदार हे. वि. : संत नामदेव, प्रकाशक- ज. श्री. टिळक, पुणे १९७०

३२. डॉ. इनामदार हे. वि. : ज्ञानेश्वरी दशरुप दर्शन, चंद्रमा प्रकाशन १९९०.

३३. इंदूरकर उदयन : अद्‌भुत भारतीय शिल्प वेरूळ, अनंत प्रकाशन, पुणे २००७

३४. जोशी लक्ष्मण शास्त्री : ज्ञानेश्वर चिंतन. प्रस्तावना (पान.१-१४) प्रकाशक - रं. ब. जोशी, वाई १९७६.

३५. जोशी लक्ष्मण शास्त्री : ज्ञानेश्वर चिंतन. 'ज्ञानेश्वरांची जात कुळा वेगळी वंशावळी' पान १-९ वाई. १९७६

३६. जहागीरदार भी. रा. : श्री निवृत्तिनाथ देहधारी जीवनमुक्त, श्रीसद्‌गुरु साईकृपा विशेषांक २००९.

३७. जोग विष्णुकुवा : अमृतानुभव सार्थ विसरण. के. भि. ढवळे प्रकाशन.

३८. डॉ. कराड वि. दा. : 'पसायदान' ६९वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेमलन, स्वागताचे भाषण १९९६.

३९. डॉ. कराड वि. दा. : इथे साकारले पसायदान, विश्वशांती केंद्र आळंदी २००९

४०. करंदिकर विंदा : ज्ञानदेवविरचित अमृतानुभवाचे विंदाकृत अर्वाचिनीकरण, पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि., आवृत्ति तिसरी : २००८.

४१. करंदिकर वि. रा. - ज्ञानदेवांचा आत्मसंवाद, कॅन्टिनेंटल प्रकाशन, पुणे. द्वितीयावृत्ती.२००२

४२. डॉ. कुलकर्णी द. भि. : ज्ञानेश्वरांची प्रतीतिविश्रांती प्रका. ब्लू बर्ड (इंडिया लि.) पुणे २००८.

४३. कुलकर्णी कृ. पा. : मराठी भाषा उद्‌गम व विकास, मेहता पब्लीशिंग हाऊस.

४४. कुलकर्णी वा. ल. : ज्ञानेश्वरांची अभंगवाणी - 'ज्ञानेश्वर चिंतन', प्रकाशक - रं. ब. जोशी - वाई १९७६,

४५. कोल्हरकर कृ. के. : भारतीय मानसशास्त्र अथवा सार्थ आणि सविवरण 'पातजल-योग-दर्शन प्रकाशक - के. भि. ढवळे. आवृत्ती ५वी १९८३, मुंबई.

४६. नणदीकर गो. स. : श्रीज्ञानेश्वरी - अन्वयार्थ व शब्दरचना खंड १ ते ५ प्रका. प्रकाश गो. नणदीकर, पुणे - २००१.

४७. श्री. नामदेव गाथा : गीता प्रेस गोरखपूर संवत २०६४.

४८. निरंजन माधव : ज्ञानेश्वर विजय.

४९. पांगारकर ल. रा. : संत एकनाथ चरित्र, वरदा प्रकाशन आवृ.९वी २००३ चतु:श्लोकी भागवत पान.१५६-१६२.

५०. पांगारकर ल. रा. : ज्ञानेश्वर महाराज, चरित्र आणि ग्रंथ विवेचन, सुमंगल पब्लिशिंग कं. मुंबई शके १८३४.

५१. पांगारकर ल. रा. : 'चरित्रचंद्र' म्हणजेच पांगारकरांत्त्वे आत्मचरित्र पान.१७. प्रकाशक - पांगारकर ल. रा. १९३७

५२. पांगारकर ल. रा. : संत तुकाराम चरित्र, वरदा प्रकाशन २००७

५३. पाठक सिद्धेश्वर शास्त्री : ज्ञानेश्वर दर्शन भाग १, २. ज्ञानेश्वर मंडळ, अहमदनगर १९३४.

५४. पेंडसे, शं. दा. : ज्ञानेश्वरीचा अभ्यास, प्रका. शिक्षण प्रसारक मंडळी, पुणे १९५४.

५५. पेंडसे शं. दा. : भागवतोत्तम संत एकनाथ, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे. १९७१.

५६. पेंडसे शं. दा. : साक्षात्कारी संत तुकाराम, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, द्वि. आवृत्ती १९९८.

५७. पेंडसे शं. दा. : ज्ञानदेव आणि नामदेव प्र. कॉन्टिनेंटल प्रकाशन, तृ. आवृत्ति १९९८.

५८. फाटक न. र. : ज्ञानेश्वर वाङ्मय आणि कार्य प्रका. वा. पु. भागवत, मुंबई १९५२.

५९. डॉ. रानडे रा. द. : ज्ञानेश्वर वचनामृत, अध्यात्मग्रंथमाला, ग्रंथांक १ गुरुदेव रानडे समाधी ट्रस्ट, २००० निंबाळ.

६०. डॉ. रानडे रा. द. : संत वचनामृत ग्रंथांक २ श्री गुरुदेव रानडे समाधी ट्रस्ट २०००.

६१. डॉ. रानडे रा. द. : तुकाराम वचनामृत ग्रंथाक ३ प्रका. विजया आपटे, पुणे. १९९१.

६२. डॉ. रानडे रा. द. : एकनाथ रचनामृत, अध्यात्मग्रंथमाला, ग्रंथांक ५ प्रका. विजया आपटे, पुणे १९९१.

६३. डॉ. रानडे रा. द. : रामदास वचनामृत, अध्यात्मग्रंथमाला, प्र. श्री. गुरुदेव रानडे समाधी ट्रस्ट आवृत्ति-४-२०००

६४. डॉ. रानडे रा. द. : मराठी संत वाङ्मयातील परमार्थ मार्ग, प्रकाशक अनुवादक - प्रा. गजेन्द्रगडकर कृ. वे. दुसरी आवृत्ती १९९३.

६५. सकल संत वाणी : गीताप्रेस गोरखपूर, खंड १, संवत २०६१

६६. सकल संत वाणी : गीताप्रेस गोरखपूर, खंड २, संवत २०६१

६७. स्वामी स्वरुपानंद : श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी पूर्वार्ध-उत्तरार्ध अवृ. ६वी शके १९८६

६८. स्वामी स्वरूपानंद : श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी पूर्वार्ध, सेवामंडळ प्रकाशन, पावस पंचमावृत्ती शके १९०६

६९. साखरे ब्रह्मश्री दादामहाराज : सार्थ चांगदेव पासष्टी, संपादक - किसनमहाराज साखरे, यशोधन प्रकाशन आळंदी २००१

७०. साखरे ब्रह्मश्री दादामहाराज : सार्थ अमृतानुभव संपादक किसनमहाराज साखरे, यशोधन प्रकाशन आळंदी २००१.

७१. साखरे किसनमहाराज : सटीप ज्ञानेश्वरी, यशोधन प्रकाशन आळंदी २००२.

७२. साखरे किसनमहाराज : नवविधा भक्ति, यशोधन प्रकाशन, आळंदी, २००३

७३. साखरे किसन महाराज : ज्ञानेश्वरी भावपराग, यशोधन प्रकाशन, आळंदी २००४

७४. साखरे किसनमहाज : श्रीसंत मुक्ताबाई कृत सार्थ ताटीचे अभंग, यशोधन प्रकाशन २००५.

७५. प.पु. साखरे किसन महाराज : सार्थ ताटीचे अभंग, यशोधन प्रकाशन : आळंदी. २००५

७६. डॉ. साठे अविनाश म. : प्रसाद ज्ञानेश्वरी, अनमोल प्रकाशन पुणे २००२.

७७. डॉ. साठे अविनाश म. : प्रसाद अमृतानुभव (सान्वयासार्थ), अनमोल प्रकाशन पुणे २००२.

७८. डॉ. साठे अविनाश म. : ज्ञानदेवांची चांगदेव पासष्टी (सान्वय सार्थ) सरोज प्रकाशन २००८.

७९. शुक्ल आर. एन. : विश्व चैतन्याच्या अनुभूती, पुणे २००२.

८०. शुक्ल आर. एन. : विश्व चैतन्याचे विज्ञान, पुणे २००९.

८१. सकल संतवाणी : गीता प्रेस गोरखपूर, खंड २ संनत २०६०.

८२. श्री सकल संत गाथा : संपादक : डॉ. र. रा. गोसावी, खंड१ सारथी प्रकाशन, पुणे २०००

८३. श्रीसकलसंतगाथा : संपादक : डॉ. र. रा. गोसावी, खंड२ सारथी प्रकाशन, पुणे २०००

८४. श्री ज्ञानेश्वरी-गूढार्थ दीपिका : गीता प्रेस गोरखपूर संवत २०६५.

८५. डॉ. तळघट्टी. शं. रा. : श्रीमत् भागवत आणि मराठी संत, पद्मगंधा प्रकाशन, पुणे २००६.

८६. डॉ. तळघट्टी. शं. रा. : ज्ञानेश्वर विचार दर्शन, सन पब्लिकेशन, पुणे १९९४.

८७. साठे सीताराम ग. : श्रीमत् भगवत् गीता, प्राकृत भाषांतर प्रकाशक - सी. ग. साठे मुंबई १९५४

८८. तुळपुळे ग. वि. : नामदेव: अध्यात्मिक चरित्र व ज्ञानदीप, राजीव-रजन लाड ट्रस्ट मुंबई. द्वितीय आवृत्ती - १९९५.

८९. साने राजीव : नवपार्थहृदगत, प्रतिमा प्रकाशन, पुणे २००८

९०. सार्थ श्रीतुकारामाची गाथा : विष्णुबुवा जोग, प्रकाशक के. भि. ढवळे, ७वी आवृत्ती १९९०

९१. श्री श्रीपरमहंस योगानंद : योगीकथामृत (Autobiography of a Yogi) बोरा ॲण्ड कंपनी, मुंबई १९७३.

९२. लो. टिळक वा. गं. : श्रीमत् भगवत् गीता रहस्य प्रकाशक - टिळक बंधु, पुणे १९८६

९३ तुळपुळे ग. वि. : नामदेव अध्यात्मिक चरित्र व ज्ञानदीप, प्रका. -राजीव रजन लाड ट्रस्ट मुंबई द्वि. आ. १९९५.

९४. वाकडे म. वि. : स्वामीमाधवनाथ, ज्ञानेश्वर दर्शन, प्रकाशक - स्वरूपानंद ज्ञानेश्वरी मंडळ, पुणे १९७६.

९५. वाळींबे शं. गो. : ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा, प्रका. मयूर एजन्सी १९५०

९६. वैष्णव : नामदेवकृत ज्ञानदेवांच्या समाधीचे अभंग, चंद्रमा प्रकाशन १९९१.

९७. Apte, V. S. : The student's Sanskrit - English Dictionary, Motilal Banarasidas Publishers, Delhi - 2nd Ed. 1970.

९८. Bahirat B. P. : The Phylosophy of Dnynadeva, G. R. Bhatkal, Popular Book Depat. 1966.

९९. Rande R. D. : The Evalution of my own thought. Shri. Gurudeo Ranade Samdhi Trust. Nimbal 2001

१००. Rande R. D. : Mysticism in Maharashra, Bharatiya Vidya Bhavan - Bombay 1993.

१०१. Rande R. D. : A Constructive Survey of Unishadic Philosophy. Bharatiya Vidya Bhavan, Bombay 1986.

१०२. Gokhale, M. S. : The science of Indian Mystic Consciousness. Jnyaneshwari for III Millennium, Utkarsha Prakashan, Pune 2006.

१०३. Talghatti S. R. : Changadeva Pasasti. Pub. Geeta Dharma Mandal, Pune 2004.

१०४. Swami Umananda : Shri Denyeshwari As understood. Pub. Swami Shivananda Society, Vol. I II III Bombay 1980.